# मराठीचा परिमल

## खंड १ ला

[ समग्र मराठी वाङ्मयाचें सोदाहरण विवेचन ]



लेखक

दा. न. शिखरे,

एम्. ए.



मूल्य ४ रुपये

तीस वर्षांच्या
स्नेहभावाचें
प्रतीक म्हणून
**डॉ. के. ना. वाटवे**
यांस अर्पण

# अनुक्रम

जाणीव आहे. पण परिस्थितीची मर्यादा संभाळून, मला जे प्रातिनिधिक वाटले त्या ग्रंथकारांच्या साहित्य-संपदेचें अल्पसें दर्शन, मीं येथें घडविलें आहे. साहित्यांतील रथीमहारथींनाहि प्रत्येकीं अवघ्या वीस पानांतच बसविणें मला भाग पडलें. या संकोचामुळें ते सरस्वती-भक्त जसे रागेजणार नाहींत, तसेंच वाचकांनींहि रागावूं नये म्हणजे झालें. ग्राहकांची शक्ति अजमावून मला जेवढें क्षेत्र आंखून घेतां आलें, तेवढ्यांत हें कार्य मीं पार पाडलें आहे. माझी भूमिका ना चिकित्सक संशोधकाची, ना विद्वान टीकाकाराची; तर केवळ नम्र वाटाड्याची.

प्रत्येक ग्रंथकाराचें अल्पसें चरित्र आरंभीं देऊन त्याच्या विशिष्ट वाङ्मय-गुणांची ओळख करून देणारे उतारे पुढें दिले आहेत. त्या त्या वाङ्मय प्रकारांचीं लक्षणें सांगून त्या ग्रंथकाराच्या साहित्याचे गुण-दोष-विवेचनहि मीं यथावसर केलें आहे. पण भर दिला आहे तो, वाङ्मयाच्या परिचयावर, मूल्य-मापनावर नव्हे. मूळ वस्तु काय आहे, याची कल्पना वाचकास करून द्यावी हाच प्रधान हेतु. प्रत्यक्ष हिराच डोळ्यापुढें ठेवणें हें पहिलें काम; मग त्याची जात, त्याचें वजन, त्याचे गुणधर्म वगैरेंची चिकित्सा करणें सोपें जातें. गेल्या सुमारें एक हजार वर्षांत जें निर्माण झालें, त्याच्या गुणांचें द्योतक असें या ग्रंथांतील वेंचे वाचून वाचकवर्ग मूळ समग्र ग्रंथाचा आस्वाद घेण्यास प्रवृत्त होईल अशी माझी अपेक्षा आहे. ज्याला ज्याला हा ‘परिमल’ मिळेल, त्याचे पाय जेथून तो परिमल येतो त्या उद्यानाकडे वळले कीं माझें काम झालें. असा परिचयात्मक व प्राथमिक स्वरूपाचाहि ग्रंथ प्रकाशित करण्यास सध्यांची परिस्थिति बरीचशी प्रतिकूलच आहे. तरीहि, शिक्षकांच्या सहकार्यावर चाललेल्या ‘दि टीचर्स आयडिअल पब्लिशिंग हाऊस लि’चे चालक श्री. न. शं. कुलकर्णी यांनीं या ग्रंथाचें प्रकाशन अंगीकारलें हें त्यांना भूषणावह आहे.

महाराष्ट्र शारदेनें आपल्या सुमारें एक हजार वर्षांच्या आयुष्यांत जें

तेज प्रगटविलें आहे व जें कर्तृत्व गाजविलें आहे, तें कोणत्याहि अन्य भारतीय भाषेला हेवा वाटण्यासारखेंच आहे. 'कोणताहि गूढ किंवा सूक्ष्म अर्थ नाना तऱ्हांनीं यथेष्ट व्यक्त करण्याची तिची शक्ति अप्रतिम आहे.' ही इतिहासाचार्य राजवाडे यांची प्रशस्ती यथार्थच आहे. धर्म, नीति, तत्त्वज्ञान इत्यादि आध्यात्मिक विषयांतील विचारांच्या बारीकसारीक छटाहि प्रगट करण्यांत मराठी भाषा तरबेज आहेच, पण शेती, व्यापार, युद्ध, राज्यशासन वगैरे शास्त्रांतील विचारहि मराठींतून सहजतेनें व सुलभतेनें उमटूं शकतात. कोश-वाङ्मय, नाट्यवाङ्मय, विनोदवाङ्मय,–इत्यादि वाङ्मय–प्रकारांचे बाबतींत तर, मराठी ही आपल्या भाषा–भगिनींपेक्षां दोन पावलें पुढेंच आहे. शब्दांची संपन्नता, भाषकांची संख्या व विचार–प्रकटीकरणाची शक्ति या तिन्ही दृष्टींनीं मराठीचें स्थान भारतीय भाषामध्यें वरचें आहे.

**मराठीची संपन्नता**

'श्रीचामुण्डरायें करवियलें । गंगराजें सुत्तालें करवियलें' हे पांच शब्द म्हणजे मराठी भाषेचा पंचमुखी उगमच. म्हैसूर संस्थानांतील गोमतेश्वराच्या प्रचंड पुतळ्याखालीं शके ९०५ मध्यें जो शिलालेख कोरलेला आहे, त्यामध्यें हीं मराठी तेवीस अक्षरें काढलेलीं आहेत. हाच मराठींतील उपलब्ध असा पहिला लेख! त्याचें महत्त्व काय सांगावें? श्रीशिवाजीमहाराजांच्या हातच्या चौदा अक्षराप्रमाणेंच हीं तेवीस अक्षरें अनमोल आहेत. नदीप्रमाणेंच भाषेचेंहि 'मूळ' शोधणें अवघड असतें. या शिलालेखापूर्वींहि मराठी भाषेचे पाझर कोठकोठें वहात असतीलच. संस्कृत ही तर सर्व भारतीय भाषांची गंगोत्रीच. तिच्यापासून महाराष्ट्री आदिकरून प्राकृत व अपभ्रंश भाषा निघाल्या व त्यांच्या झिरप्यांतून मराठीचा प्रवाह खळखळूं लागला. इसवी सनाच्या पांचव्या शतकापासून मराठी भाषा बोलण्यांत असावी. पण मराठीचें लेखन सुरू होऊन एक सहस्र वर्षें झालीं

असावींत. या कालावधींत मराठीचा ‘ मोगरा ’ चोहो अंगांनीं फुलला, त्याच्या कळ्यांना ‘अतिभारु’ आला व त्याचा परिमल दशदिशां सुटला.

ज्ञानेश्वरापासून मयूरेश्वरापर्यंत साऱ्या कविवरांना मराठी भाषेची वकिली व संस्कृतच्या परंपरागत सत्तेविरुद्ध बंडखोरी करावी लागली. स्वराज्यांत मात्र मराठी भाषेचा मगदूर वाढतच गेला. ‘ येथ यदुवंशविलास । जो सकळकळानिवास । ’ अशा न्यायी क्षितीशाचा गौरव स्वराज्यांतील ज्ञानदेवांनीं आपल्या ‘ भावार्थदीपिके’च्या अंतीं केला आहे. पण पुढें चारशें वर्षे यावनी भाषांनीं मराठीवर आक्रमण केलें. तेव्हां शिवाजीमहाराजांना ‘ राज्य-व्यवहार–कोश ’ तयार करावा लागला आणि भाषिक स्वराज्याचाहि पाया घालावा लागला. संतकवींनीं मराठी भाषेचें शुद्ध स्वरूप टिक-विण्यास मोठेंच साहाय्य केलें. पेशवेकालीन सरदारांच्या व सेनापतींच्या पत्रव्यवहारांत मराठीचा दरबारी रुबाब झळकत आहे. बखरी व लावण्या–पोवाडे यांत अस्सल मराठीचा रंगढंग व तडफ उठून दिसते.

**‘ यथा राजा तथा भाषा ’**

यापुढें ब्रिटिशांच्या सत्तेचें सावट राष्ट्राच्या सर्वच अंगोपांगावर पसरलें. मराठीहि मरगळून पडली. तिला राजदरबारीं कोणी पुसेना, न्यायमंदिरीं कोणी विचारीना. फार काय, स्वराज्यासाठीं कंबर कसलेल्या संस्था-परिषदांचाहि कारभार इंग्रजींतूनच चालू लागला. ‘ मराठीचे शिवाजी’चाहि खाजगी पत्रव्यवहारसुद्धां इंग्र-जींतच ! मेकॉलेबोवाचें भविष्य खरें होऊं लागलें–हिंदी माणूस अंत-र्बाह्य इंग्रज बनूं लागला. पण नवभारताचे द्रष्टे व स्रष्टे असणारे न्या. रानडे यांच्या भगीरथ प्रयत्नानंतर मुंबई विद्यापीठांत मराठीचा प्रवेश कसाबसा झाला, पण तो केवळ एम्. ए. परीक्षेपुरताच. परवांपरवां-पर्यंत मराठीची प्रश्नपत्रिका इंग्रजींतून काढीत ! यापेक्षां विसंगति ती

**विद्यापीठाचें शिक्कामोर्तब**

काय असावयाची ? आतां विद्यापीठाच्या सर्व परीक्षांमध्यें मराठी भाषा, अभ्यासाचा विषय म्हणून, मान्यता पावली आहे. पुणें विद्यापीठ तर मराठीच्या उद्धारार्थच अवतरलें आहे. अध्यापनाचें माध्यम म्हणूनहि मातृभाषा मराठीच वापरण्याचा या विद्यापीठाचा विचार सध्यां चालू आहे. तो लवकरच कृतींत उतरेल अशीं चिन्हें दिसत आहेत. विशेष हें कीं, पुण्यामुंबईशिवाय, नागपूर, बडोदें, उस्मानिया, कर्नाटक, सागर, आग्रा, बनारस व मद्रास या आठ विद्यापीठांतहि मराठीचा अभ्यास चालू आहे. पण पाठ्य पुस्तकांची उणीव ही मातृभाषांच्या विकासांत विघ्न म्हणून सांगितली जाते. सुदैव मराठीचें कीं विद्यापीठांतील विद्यमान विषय तरी शिकविण्यास पुरेसे व साजेसे ग्रंथ तिनें आधींच निर्माण केलेले आहेत. श्री. वि. ल. भावे यांचें ' महाराष्ट्र सारस्वत ' किंवा श्री. ल रा. पांगारकर यांचा ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' हे ग्रंथ मराठीच्या अध्ययनाला उपयोगीं पडण्यासारखे आहेत. मात्र त्या दोन्ही ग्रंथांतील विषयांची समाप्ति पेशवाईच्या समाप्तीपाशींच होते. आणि पदवी–परीक्षेला अद्यावत मराठी वाङ्मयाचा इतिहास नेमलेला असतो. त्या परीक्षेच्या विद्यार्थ्यांना माझें हें पुस्तक थोडेंफार उपयुक्त वाटेल असा अंदाज आहे आणि सर्वसामान्य मराठी वाचकालाहि स्वभाषेतील साहित्य–संपदेची कल्पना या ग्रंथाच्या वाचनानें स्थूल रूपानें तरी येईल अशी माझी अटकळ आहे.

एकाद्या विस्तीर्ण प्रदेशाचें निरीक्षण धावत्या विमानांतून करतात ना ? तसें हें मराठी साहित्याचें विमानावलोकन ( Aerial View ) आहे. उंचीवर गेलेल्या विमानांतून खालीं पाहूं लागलें म्हणजे डोंगर हे सोंगट्या वाटतात, दरी भेगेसारखी दिसते, उड्या घेणारा धबधबा झारींतील पाण्याची धार भासतो आणि डेरेदार व डौलदार आमराई ही कुंडींतील फुलझाडाप्रमाणें छोटेखानी दिसूं लागते. तशाच

**शारदेचें शिरोभूषण**

सूक्ष्म स्वरूपांत या ग्रंथामध्यें सबंध मराठी वाङमय दृग्गोचर होईल. संतांचें वाङ्मय म्हणजे हिमालय-पर्वताच्या रांगा असतील, तर ज्ञानेश्वरी हें अत्युच्च असें गौरीशिखरच! एका साक्षात्कारी बाल-योग्याच्या आत्म्याचें प्रतिबिंब पूर्णचंद्राप्रमाणें त्यांत पडलेलें! 'सिद्ध' ग्रंथच तो! साऱ्या जगाच्या वाङ्मयांत त्याला तोड नाहीं. त्याचें सौंदर्य मीमांसेच्या कक्षेबाहेर आहे. तें सौंदर्य त्यांतील तत्त्वज्ञानाचें आहें कीं काव्याचें आहे? आणि त्या काव्यांतील अलंकारांचीं रत्नमाणकें रसिकांची दृष्टि दिपवितात कीं त्यांतील भावनेचा कोमलपणा व भाषेच लडिवाळपणा हे गुण त्यांचीं हृदयें हलवितात? हें सांगणें कठीण आहे. टीका—शास्त्राच्या तराजूत तोललें न जाणारें, पण शब्दाशब्दांतून ओसंडणारें असें जीवंत काव्य ज्ञानेश्वरींत आहे. तींत ज्ञानेश्वरांचें मूर्तिमंत हृदयच अवतरलें आहे. एका महान् विभूतीच्या सहवासांत राहिल्याचें सुख, एका दिव्य हृदयाशीं आपल्या हृदयाच्या तारा क्षणमात्र तरी जुळल्याचा आनंद, ज्ञानेश्वरी वाचतांना होतो. महाराष्ट्र—शारदेचें हें शिरोभूषण पृथ्वीमोलाचें आहे. त्याचा अत्यल्प परिचय या पुस्तकाच्या प्रारंभींच करून देण्यांत आला आहे.

मराठी काव्याची गंगा ज्ञानेश्वरीपासून उगम पावली, तशी मराठी गद्याची यमुना 'मालाकार' चिपळूणकरांपासून निघाली. एक नवा, स्वतंत्र, वेगवान् व सामर्थ्यशाली असा प्रवाहच महाराष्ट्रामध्यें निर्माण करण्याचें श्रेय या दोघां महापुरुषांना आहे. ज्ञानेश्वरांच्या ज्ञान-गंगेंतूनच नामदेव-तुकाराम इत्यादींचे काव्यप्रवाह अभंग रूपानें वाहूं लागले. तसेच चिपळूणकर यांच्या प्रेरणेनें लो. टिळक, प्रिं. आगरकर, प्रा. परांजपे, न. चिं. केळकर, बॅ. सावरकर, इतिहासाचार्य राजवाडे, ह.भ. प. पांगारकर, नाटककार कोल्हटकर, कादंबरीकार आपटे, आचार्य विनोबा भावे-इत्यादि किती तरी विविध वाङ्मय-शाखेचे प्रभु निर्माण

**दोन परंपरा**

झाले आणि महाराष्ट्र साहित्य व महाराष्ट्र समाज समृद्ध व उन्नत करून गेले ! ‘ ज्ञान–दीप लावूं जगीं ’ ही जशी संतकवींची प्रतिज्ञा; तशीच नवनवीन विद्यांचा, ध्येयांचा व तत्वज्ञानांचा प्रसार आपल्या मायभाषें-तून करण्याचें व्रत गद्य–लेखकांनीं घेतलेलें. संस्कृत भाषेच्या कडी-कुलुपांत अडकलेलें ‘ भांडार फोडून ’ संतांनीं ‘ मराठीचियें नगरीं साहित्य–सोनियाच्या खाणी ’ उघडल्या, तशीच इंग्रजीचें संपन्न भांडार लुटून, गद्य वीरांनीं मराठी भाषेची तिजोरी, नानाविध शैलींच्या व विचारांच्या मोत्यामाणकांनीं खच्चून भरली.

**शैलीचे दोन प्रवाह**

ज्याला ज्याला म्हणून आपली वाणी समाजाच्या कारणीं लावा-वयाची आहे, त्यानें ती सुबोध ठेवणें अवश्यच आहे. साऱ्या प्रेषितांची भाषा पहा. ती आबालवृद्धांना, स्त्रीपुरुषांना, काखनाखना सहज कळणारी असते. शास्त्रोक्त परंपरेचें, जीर्ण रूढीचें जोखड उलथण्यासाठीं अज्ञ बहुजनांनाच जागृत करणें धर्म-संस्थापकांना जरूर वाटतें. म्हणून ते बहुजनांच्या हितार्थ बहुजनामध्येंच मिसळतात, त्यांची भाषा बोलतात आणि त्यांच्या मनांत क्रांतीचें बीजारोपण करतात. भगवान् बुद्ध, महंमद पैगंबर इत्यादि प्रेषितांची भाषा अशीच सुटसुटीत आहे. बायबल किंवा उपनिषद् यांमध्यें तर बालांचीच बोली आहे. त्यांतूनहि उदात्त विचार व गहन तत्त्वज्ञान ऋषिमुनींनीं प्रगट केलें हें विशेष. संतांची सारी बोलीहि अशीच द्राक्षासारखी. आज ज्ञानेश्वरी दुर्बोध वाटते, ती कालमान व देशस्थिति बदलल्यामुळें. पण ती रचली, तेव्हां तिची भाषा ‘ आबाळसुबोध ’ अशीच ठेवलेली होती. तुकारामाचा बाणा तर ‘ सहज बोलणें हाचि उपदेश.’ तेंच साधेपणाचें ऐश्वर्य सानेगुरुजींची वाणी ल्याली आहे. हरिभाऊ आपट्यांची रसवंतीहि तशीच. अगदीं अलीकडील नव-कथा व

नवकविता यांचा भाषा-वेष साधासुधाच असतो. त्याशिवाय बहुजन-समाजाच्या हृदयाला थेट भिडणारें लेखन होऊंच शकत नाहीं.

जन-सेवा हें साध्य व भाषा–सेवा हें साधन, असें मानणाऱ्या सरस्वती-पुत्रांच्या भाषा-शैलीचा हा एक निसर्ग–सुंदर प्रवाह झाला. पण वाग्विलास करून आपल्या बुद्धीचें तेज पसरविणारे पंडितकविहि सर्व देशांत, सर्वकाळीं निर्माण झालेले आहेतच. सूक्ष्म व गहन ज्ञानाचे संशोधन व प्रगति होते ती अशा पंडितांकडूनच. संस्कृतांतहि व्यास-वाल्मिकी यांनीं भारत-रामायण रचलें तें आपल्या डोळ्यापुढें समाजांतील शेवटला थर ठेवून, पण कालिदास भवभूतिप्रभृतींनीं आपल्या प्रतिभेच्या विलासासाठीं कलारुचिर भाषा उपयोजिली. मराठींतहि मुक्तेश्वर-मोरोपंतादींनीं आपल्या प्रज्ञेचे पराक्रम आपल्या काव्यांत दाखविले; तसेंच कोल्हटकर–गडकरी इत्यादि साहित्यिकांनीं मराठी भाषेला नटवून–थटवून कलासंपन्न बनविलें. त्यांच्या भाषेंत कृत्रिमता येणें अपरिहार्यच होतें. त्यांचा आवाज विद्वान मंडळींच्या कानापर्यंतच जाऊन पोंचला. सर्वसामान्य समाजाचें हृदय हलवून त्याचें परिवर्तन करूं इच्छिणाऱ्या लेखकानें आपली भाषा, रानच्या वाऱ्याप्रमाणें, मोकळी ठेवली पाहिजे.

**अज्ञानी आक्षेप**

प्रस्तुतच्या प्रथम खंडांत ज्या पंचवीस साहित्यिकांचा परिचय घडविलेला आहे; त्यांचे एकेक गुण जो कोणी निरखून–पारखून पाहील; त्याला मराठी भाषेची थोरवी पटल्याशिवाय कधींच रहाणार नाहीं. ज्ञानेश्वरी म्हणजे तर दिव्य दीप–कलिकाच! तिची तुलना तिच्याशींच होऊं शकते. पण त्याशिवाय नामदेवांच्या अभंगांतील आर्तता व प्रेमळपणा जगांतील कोणत्याही अभिजात कवीला साजून दिसणाराच आहे. एकनाथांनीं बहुजनसमाजाच्या गळीं धर्म–ज्ञान उतरविण्यासाठीं किती युक्त्या योजल्या हें ध्यानीं घेतलें म्हणजे त्यांच्या

हृदयाची विशालता व तळमळ लक्षांत येते. तुकारामाच्या अभंगांत अंतः-करणाला भिडणारा जीवंतपणा आहे. काव्याला काव्यत्व लाभतें तें येथेंच! 'ते अभंग काव्याच्या उच्च कसोटीस उतरत नाहींत.' ( They do not rise to any great height as poetry ) असा शेरा " ब्रिटिश ज्ञानकोश " कर्त्यांनीं दिला आहे. पण त्यांत नवल काय ? मराठी 'ज्ञानकोश' कारहि म्हणतात, " आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून जरी गेलें, तरी जगाचें काव्य-नाश या दृष्टीनें कांहीं एक नुकसान व्हावयाचें नाहीं." अशा आक्षेपांना उत्तर म्हणजे मूळ ग्रंथ नीट वाचणें हेंच. निदान या ग्रंथांतील पहिले पांच संत-कवि चाळले तरी वरील आक्षेपांचें धुकें पार नाहीसें होईल. आणि तसें होणें हेंच या ग्रंथाचें साफल्य ! रामदासांनीं आपल्या 'महाराष्ट्र-धर्मा'ची दीक्षा महाराष्ट्राला देतांना रोकड्या शब्दांनीं मराठी भाषेंतून वीर-रस कसा खेळविला आहे, हेंहि या ग्रंथांत पहावयास सांपडेल.

**राष्ट्र-सेवक निबंधकार**

मराठी भाषेंत 'आद्य कवि' म्हणजे ज्ञानेश्वर, 'आद्य चरित्रकार' म्हणजे नामदेव, आणि 'आद्य संशोधक' म्हणजे एकनाथ; त्याप्रमाणें —आणि तितक्याच अर्थानें—'आद्य निबंधकार' म्हणजे मालाकार चिपळूणकर. त्यांची पल्लेदार व अलंकारिक भाषाशैली आणि तिच्यांतून प्रति-पक्षांवर केलेलें शरसंधान या गुणामुळें 'मराठीचे मेकॉले' ही पदवी त्यांना सहजच शोभून दिसते. अर्थात राष्ट्रीय उत्थानाचें कार्य करण्यांत शास्त्रीबुवा मेकॉलेपेक्षां वरचढच आहेत. राष्ट्रीय भावना प्रज्वलित करण्याचे कामीं मराठी भाषेचा उपयोग लो. टिळकांनीं रोखठोक पद्धतीनें केला. लोकांचें कर्तृत्व जसजसें फाकतें, तसतशी त्यांची भाषा वाढत जाते, हा अनुभव पूर्वी जसा शिवाजीच्या स्वराज्यांत आला; तसाच लो. टिळकांच्या स्वराज्य-संग्रामाचें वेळींहि आला. चळवळीच्या ओघांत त्यांनीं नवीन मराठी ।

राजकीय शब्द बनविले; तशींच धार्मिक परिभाषाहि ' गीतारहस्या 'च्या निमित्तानें सहजच निर्माण केली.

चिपळूणकर व टिळक या राष्ट्रसेवकांनीं जी राष्ट्रीय भावनेची ज्योत प्रज्वलित केली, ती भडकविण्याचें कार्य परांजपे व सावरकर या गुरुशिष्यांच्या जोडीनें केलें. हे दोघे गद्यलेखक असले, तरी त्यांच्याइतकी विशाल व तेजस्वी प्रतिभा अर्वाचीन कवींत क्वचितच सांपडेल. प्रतिभा आणि पांडित्य या त्यांच्या दोन्ही गुणांचा रंग मराठी भाषेवर चढला आहे. स्वातंत्र्यभक्ति व काव्यशक्ति यांचा उत्कट आविर्भाव या दोघांच्या निबंधांत उत्कृष्ट झाला आहे. वक्रोक्तीचीं वाघनखें परांजप्यांनीं आपल्या हातांत घातलीं आहेत, तर वीररसाची तलवार सावरकरांनीं चालविली आहे. या दोघां क्रांति–वीरांच्या देव्हाऱ्यांत बसलेली महाराष्ट्रशारदा ही महाकाली आहे. तशीच तेजस्वी व प्रतिभासंपन्न साहित्यसंपदा ' संदेश ' कार कोल्हटकर यांनींहि त्या शारदेच्या चरणीं वाहिली आहे.

प्रिं. आगरकर व प्रिं. वामनराव जोशी या दोघांनीं आपल्या निबंधांतून नव्या तत्त्वज्ञानांचा व सामाजिक सुधारणेचा पुरस्कार केला आणि मराठी भाषेमधील सौंदर्य, सामर्थ्य व साधुत्व हे तीनहि गुण वाढीस लावले. वाचकांना तर्कशुद्ध विचार करावयास लावण्याची कामगिरी या दोघांनीं फार मोठ्या प्रमाणांत केली आहे.

**सौंदर्य, सामर्थ्य व साधुत्व**

चिपळूणकर–टिळक काय किंवा परांजपे–सावरकर काय–त्यांच्या लेखनाचें प्रधानकार्य स्वातंत्र्यप्राप्ति हें होतें; आणि त्याला साधन स्वभाषा–सेवा हें होतें. पण स्वभाषेची सेवा हाच मुख्य उद्देश मनांत धरून ज्यांनीं लेखन केलें, त्यामध्यें न. चिं. केळकर यांचें स्थान उच्च आहे. साहित्याच्या बहुतेक सर्व क्षेत्रांत संचार करून त्यांनीं सहस्रावधि पृष्ठांचें साहित्य निर्मिलें–आणि तेंहि अलंकारयुक्त भाषेनें, तर्कयुक्त

प्रतिपादनानें व समतोल वृत्तीनें. तर्कशुद्ध मांडणी व समतोल विचार यांची देणगी केळकरांनीं आपल्या निबंधांतून मराठी भाषेला किती विपुल प्रमाणांत दिली, याचें प्रत्यंतर–पुरावे या पुस्तकांत वाचकांस पहावयास मिळतील. तशींच शुद्ध वाङ्मय-सेवा म. म. पोतदार, आचार्य कालेलकर वगैरेंच्या निबंधांनींहि साधली आहे. परांजपे यांचे उपरोधिक निबंध इंग्रजींतील स्विफ्टचें स्मरण जसें करून देतात, तसेंच केळकरांचें लेखन ॲडिसनची आठवण करून देतात. अर्थात हे सर्व लेखक पारतंत्र्याची तटबंदी फोडण्यासाठीं उत्सुक झालेले असल्यानें पाश्चात्य लेखकांपेक्षां यांच्या लेखनांत देशाभिमान रसरसलेला आहे हें विशेष. आचार्य कालेलकरांचीं प्रवास–वर्णनें जितकीं काव्यपूर्ण तितकींच पांडित्यपूर्णहि आहेत. त्यांना तोड मराठी वाङ्मयांत तरी नाहीं.

दहा निबंधकाराप्रमाणेंच दहा कादंबरीकारांचाहि स्थूल परिचय या ग्रंथांत करून दिलेला आहे. आधुनिक कादंबरी—लेखनाच्या

**यशस्वी कादंबरीकार**

दृष्टीनें पाहतां, हरिभाऊ आपटे हेच 'आद्य कादंबरीकार' ठरतात. 'वाङ्मय–सेवकांचे मुकुटमणि' या उच्च ध्रुवस्थानावर ते अढळ आहेत, असा निर्वाळा 'स्वभाव–लेखन'कार डॉ. सहस्रबुद्धे यांनीं दिला आहे. वास्तव कथानक, घरगुती भाषा, यथातथ्य वर्णन आणि सहजसुंदर स्वभाव–परिपोष हे त्यांचे गुण अलौकिक आहेत. करुण व वीर हे रस वठविण्यांत त्याचा हात कोणी धरणार नाहीं. डॉ. शरच्चंद्र चतर्जी या बंगाली कादंबरीकाराची सर कोणत्याहि मराठी कादंबरीकारास येत नाहीं हें सत्य कोण नाकबूल करील ? अर्वाचीन कवींत जसे रवींद्र, तसेंच कथाकारांत शरच्चंद्र ! दोघेहि इतरांना अगम्यच ! पण शरद्‌बाबूंच्या जातीचें कथालेखन मराठींत कोणी केलें असेल तर तें हरिभाऊंनींच. आपल्या साऱ्या कला–कौशल्याचा उपयोग सामाजिक सुधारणेसाठीं हरिभाऊंनीं केला.

त्यांच्याइतकेंच यशस्वी कथालेखन करणारे दुसरे कादंबरीकार म्हणजे प्रा. फडके. दोघांचीं कथाक्षेत्रें अगदीं भिन्न आणि लेखन-शैलीहि अगदीं वेगळी. पण दोघांची कला-चातुरी मात्र उंची. सधन व सुविद्य युव-युवतींच्या प्रणयाचीं कल्पनारम्य चित्रें रंगविण्याची कला फडक्यांनीं कळसास पोहोचविली आहे. आपटे व फडके या दोघा रस-सिद्ध कादंबरीकारांचें साम्य-वैषम्य प्रस्तुत ग्रंथांत पाहतांना चिकित्सक वाचकांना आनंद वाटेल.

कादंबरीकार म्हणून सानेगुरुजींना कलेच्या दरबारांत कोणता क्रमांक मिळेल हें ठरविणें कठीण आहे. पण त्यांच्या कथालेखनाची

**साहित्याची स्वतंत्र जात !**

जात निराळीच आहे. त्यांच्या मनाचा पिंड संताचा. त्या वृत्तींतून निघालेले सुवर्णकण त्यांच्या सर्व वाङ्मयांत विखुरलेले आहेत. रस-निर्मिति हें जर कलावंताचें प्रधान कार्य असेल; तर त्यांत सानेगुरुजी पूर्ण यशस्वी आहेत. त्यांच्या अंतरीचा जिव्हाळा तुकाराम—नामदेवाइतका उत्कट आहे. त्यामुळें '' श्यामची आई '' वगैरे त्यांच्या कादंबऱ्यांनीं मराठी भाषेमध्यें उदात्त रसाचे पाट वाहविले आहेत. त्यांची भाषा-सेवा अजोड आहे. त्यांचा ' शाम ' मराठींत अद्वितीय आहे. त्यांच्याइतकी रसाळ भाषा व उदात्त भावना इतरांच्या लेखनांत क्वचितच सांपडेल.

खांडेकर व माडखोलकर हे दोघे कोल्हटकरांचे शिष्य. त्या दोघांनीं आपल्या गुरुप्रमाणेंच महाराष्ट्र-शारदेवर बहुविध व बहुमोल अलंकार

**कला व प्रचार यांचा संगम**

चढविले आहेत. खांडेकरांची कल्पनाशक्ति तर अत्यंत तरल व प्रसन्न. ते आपल्या कलेचा उपयोग लोकजागृतीसाठीं करतात. ' कलेसाठीं कला ' म्हणण्याचा स्वप्नाळूपणा त्यांच्या अंगीं नाहीं. प्रचार व कला या सावत्र भाऊ-बहिणाचें सख्य घडवून आणण्यांत

खांडेकर कुशल आहेत. तेंच कार्य वरेरकर यांनींहि, थोड्या निराळ्या रीतीनें, पार पाडलेलें आहे. त्यांच्या कादंबऱ्यांत कलेवर प्रचाराचा वरचष्मा दिसत असला, तरी हरिभाऊंसारखी सहजसुंदर भाषा व समाज-सुधारणेची तळमळ हेंहि गुण त्यांच्या कादंबऱ्यांत आढळतात. ग्रामीण कथालेखनाचा उत्कृष्ट नमुना दिघे यांनीं आपल्या कादंबऱ्यांत दाखविला आहे. खेडूत जीवनाचा रुक्ष सांगाडा उभा करून त्यांत काव्याचा प्राण फुंकण्याचें त्यांचें कसब असामान्य आहे. डॉ. केतकर यांनीं आपल्या विशाल अनुभवाचा व दीर्घ चिंतनाचा उपयोग करून आपल्या कादंबऱ्या विचारप्रवर्तक बनविल्या आहेत.

पांच संतकवि, दहा निबंधकार व दहा कादंबरीकार--अशा पंचवीस वाग्भटांच्या साहित्याचा परिमळ या ग्रंथांत दरवळलेला वाचकांना आढळेल. ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांत दहा नाटककार व दहा आधुनिक कवी यांच्या रसपूर्ण साहित्याचा मधुर गंध पसरलेला असेल आणि पांच लघुकथाकार, पांच लघुनिबंधकार व पांच विनोदकार यांच्याहि वाङ्मयाची तोंडओळख करून दिली जाईल. त्यामुळें आरंभापासून आतापर्यंतच्या महाराष्ट्र सारस्वतांतील ठळक भाषा-शैलींचें, प्रमुख लेखन-प्रवाहांचे आणि विशिष्ट विचार-सरणींचें स्थूल दर्शन वाचकांस घडेल आणि तो मूळचें सर्व वाङ्मय वाचण्यास प्रवृत्त होईल अशी आशा मी बाळगतों. महानुभावी वाङ्मयाचें दर्शन घडविण्याचें काम उरलें आहे याची जाणीव मला आहे. ज्ञानेश्वरांच्या काळापूर्वीच या पंथाच्या वाङ्मयाला आरंभ झाला हें खरें, परंतु कंजूष बापानें लपवून ठेवलेला ठेवा जसा पुढें केव्हां तरी मुलाला अनपेक्षित सांपडतो, तसा कांहींसा प्रकार या वाङ्मयाचा झाला आहे. भास्करभट्ट, नरेंद्र इत्यादि कवींनीं मराठीची फार मोठी सेवा केली आहे. त्याचप्रमाणें इतिहासाचार्य राजवाडेप्रभृति प्रबंधकारांचाहि परिचय करून द्यावयाचें

**विषयाचा आटोप**

राहिलें आहे. पण त्यासाठीं स्वतंत्र ग्रंथच लिहिण्याचा माझा मानस आहे.

सांप्रत मराठी भाषा यौवनांत पदार्पण करीत आहे. इंग्रजी, फ्रेंच वगैरे भाषांप्रमाणें तिला अद्याप आपला संसार थाटावयाचा आहे.

**ग्रंथ-भांडार दरिद्री कां ?**

तिच्या बालपणीं, संस्कृतच्या आजीनें तिचें लालनपोषण केलें व अजूनहि नव-शब्द-निर्मितीच्या खणानारळांनीं ओटी भरण्यास ती कधीं कंटाळत नाहीं. कानडी, तामील व तेलगू यांचे संस्कार मराठीवर झालेले आहेत. नंतर फारशी-अरबी यांचा पगडा बसला आतां इंग्रजीचें वर्चस्व चालू आहे. तिचें अनुकरण करण्याकडे अद्याप ओढा आहे. अशा सर्व परभाषांनीं मराठीला सुमारें तीन हजार शब्दांचें दान केलें आहे. तरीहि तिची शब्द-संख्या सव्वा लाखाच्या आसपासच आहे. इंग्रजीचे शब्द-भांडार पांचसहा लाखांवर आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे मराठीची धन-दौलत किती वाढावयास पाहिजे याची कल्पना येते. मराठी बोलणाऱ्यांची संख्या सुमारें तीन कोटि आहे, म्हणजे भाषकांच्या संख्येनुसार भारतांत तिचा क्रमांक चौथा लागतो. पण भाषकांच्या संख्येच्या मानानें मराठीची ग्रंथ-संतति मात्र अल्पच आहे. एकूणएक मराठी पुस्तकांची मोजदाद केली, तरी ती तीस हजारांचे वर कांहीं जात नाहीं. इ. स. १८०० ते १९३७ या १३७ वर्षांच्या कालांत मराठींत फक्त १८७६८ ग्रंथ निर्माण झाले. याचा अर्थ सरासरीनें दर वर्षी १३७ च पुस्तकें प्रसिद्ध झालीं. पण हीहि प्रगतीच म्हटली पाहिजे. कारण, ज्ञानेश्वरीपासून १८६४ सालापर्यंत सुमारें सहाशें वर्षांच्या अवधींत मराठीमध्यें अवघे ६६१ ग्रंथ तयार झाल्याची नोंद न्या. रानडे यांनीं केली होती. त्यांनीं आपल्या भाषेचें हें दारिद्र्य स्वतः जाणलें व दुसऱ्यांना दाखविलें; एवढेंच नव्हे, तर तें दूर करण्याचाहि प्रयत्न सर्वांगांनीं केला. १८७८ सालीं त्यांनीं 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' काढली. याच बीजांतून आजची ' महाराष्ट्र

साहित्य परिषद ' जन्मास आली. असेंच भाषा–वृद्धीचे अन्य प्रयत्नहि त्यांनीं केले. त्यांचें फल म्हणजे १८६६ ते १८९६ या तीस वर्षांत पांच हजारावर मराठी ग्रंथ प्रसिद्ध झाले. यांत शालोपयोगी ८०० व किरकोळ ११०० असले, तरी ग्रंथ-निर्मितीचें प्रमाण आशादायकच आहे.

१९०१ ते १९१० या दशकांत मराठीमध्यें १८०२ ग्रंथ प्रसिद्ध झाले. याच कालखंडांत बंगाली भाषेमध्यें १०५३५ ग्रंथ निर्माण झाले.

**भाषा-भगिनींशीं तुलना**

बंगाली भाषकांची संख्या मराठी भाषकांच्या दुप्पट आहे हें जरी खरें, तरी ग्रंथ-निर्मितीमध्यें वंगभाषा पांचपट संपन्न आहे. या बाबतींत गुजरातीहि मराठीच्या पुढेंच आहे. मराठी भाषभाषकांच्या चतुर्थांश संख्या गुजराती बोलणाऱ्यांची आहे. पण वरील दहा वर्षांत गुजरातींत ३५६९ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. याचा अर्थ एक लाख माणसांमागें मराठींत १५ पुस्तकें प्रसिद्ध झालीं, तर गुजरातींत ६८ झालीं. हिंदीचें साम्राज्य तर फारच विशाल.

मराठींतील हें ग्रंथ–दारिद्र्य दूर होण्यास साक्षरतेचा प्रसार त्वरेनें झाला पाहिजे. स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेनें त्यासाठीं दहा वर्षांची

**भाषेच्या विकासाचे मार्ग**

मुदतच घालून दिली आहे. त्याबरोबरच महाराष्ट्रीय समाजाची आर्थिक स्थितिहि सुधारली पाहिजे. जो कांहीं उणापुरा पैसा महाराष्ट्रीयांच्या हातीं येतो, तो अन्न व वस्त्र या दोन प्राथमिक गरजा भागविण्यांतच उडतो. अशा स्थितींत साहित्याच्या वाट्याला कितीसा पैसा येणार ! तिसरा उपाय म्हणजे प्रकाशनाची सुयंत्र व्यवस्था. ती अस्तित्वांत येणें हें साहित्याच्या विकासाला पोषक ठरेल. दैनिक वृत्तपत्राप्रमाणें एकाच दिवशीं एकाच ग्रंथाच्या प्रति महाराष्ट्रांतील शेंपन्नास ठिकाणीं तरी उपलब्ध झाल्या पाहिजेत. युद्धकालीन

मंदी ही तर, साथीच्या रोगाप्रमाणें, मराठी साहित्याचा गळा दाबू पहात आहे. पण ती लाट गेल्यानंतरहि, मराठी—भाषकांचें आद्य कर्तव्य हें ठरतें कीं, त्यांनीं स्वतःला, ग्रंथ विकत घेऊन वाचण्याची सवय लावावी. पाश्चात्यांच्या संसर्गामुळें, आतां आपल्याला वर्षांतील वेगवेगळ्या ऋतूसाठीं, किंबहुना दिवसांतील निरानिराळ्या प्रहरासाठीं भिन्न भिन्न पोषाक करण्याची सवय जडत चालली आहे. वेरूळ—अजंठासारखीं प्रेक्षणीय स्थळें पहाण्यासाठीं सफरी काढण्याची उमदी सवयहि आपल्या अंगवळणीं पडली आहे. त्याप्रमाणेंच आपल्या घरच्या वार्षिक अंदाजपत्रकांत ग्रंथ—खरेदीसाठीं कांहीं ना कांहीं रक्कम आपण मंजूर करून ठेवणें अगत्याचें व हिताचें आहे. नाहीं तर आजकाल मोटारवंत विद्वानहि वाङ्मयाची उधार—उसनवारी करतांना आढळतात! ही स्थिति पालटून प्रत्येक साक्षर महाराष्ट्रीय जर मराठी वाङमयाचा आस्वाद घेण्यास सरावला, तर त्याचें व त्याबरोबरच मराठी भाषेचेंहि कोटकल्याण होईल. इतर दैवताप्रमाणेंच सरस्वतीदेवीचीहि पूजा 'यथामीलितोपचार द्रव्यांनीं' करण्यास आपण शिकलें पाहिजे, म्हणजे सरस्वतीहि आपल्या चित्ताला शांति व जीवनाला रुचि यांचें पसायदान केल्याविना कधीं राहणार नाहीं.

'महात्मा' मासिक
कार्यालय, पुणें.
ता. १ डिसेंबर १९५२

दा. न. शिखरे



# संत ज्ञानेश्वर : : : १

साधी ओवी ! तीहि साडेतीन चरणांचीच. पण तिच्यामध्यें ज्ञानेश्वरांनीं प्राण फुंकला. त्यामुळें ती ओवी सजीव झाली, महाराष्ट्रांतील घराघरांत हिंडूं लागली, बायकापोरांशीं बोलूं लागली, माळ्यासाळ्याच्या आणि कुंभारा–लोहाराच्या जिभेवर खेळूं लागली, मोटेवर आणि जात्यावर ती ऐकूं येऊं लागली, गेलीं सातशें वर्षें ती मराठी–भक्तांची जीव कीं प्राण बनून गेली. ‘ ओवी ज्ञानेशाची ’ अशी म्हणच तयार झाली. लाखों वारकरी ज्ञानेश्वरीला “ आई ” म्हणून पूजतात. ज्ञानेश्वरींतील ओवी म्हटल्याशिवाय झोंपीं जावयाचेंच नाहीं, असा रोजचा नियम लक्षावधि महाराष्ट्रीयांचा आहे.

## प्याले विष, दिलें अमृत

जन्मापासून समाजाचा छळ सोसणेंच ज्यांच्या वांट्यास आलें, त्या ज्ञानेश्वरांनी आपल्या लेखनावर प्रसन्न प्रतिभेची अशी कांही सुंदर व सुगंधी पखरण केलेली आहे की, तिला तोड साऱ्या पृथ्वीवरील वाङ्मयांत सांपडणें कठीण. समाजानें त्यांना विषाचे पेले दिले, पण समाजाला त्यांनी अमृताचे भेले दिले. त्यांच्या लेखनांत त्रागा नाही व रागाला तर जागाच नाहीं. आपाज न चढवितां व भिवई न उंचावतां सारें निरूपण केलेलें— प्रेमळ स्वराने, स्मित मुद्रेनें, लडिवाळ भावानें, श्रोत्यांना राजी राखीत राखीत, गीतेंतील गहन तत्त्वे उकलून दाखविली आहेत. 'निवृत्ति—ज्ञानदेव—सोपान—मुक्ताबाई' ही चार भावंडांची नामावलि आज महाराष्ट्राला मुखोद्गत झालेली आहे. या चार भावंडांनी महाराष्ट्र—भूमि पावन केली—महाराष्ट्र—भाषेची कूस धन्य केली.

## रूढीचा जाच

गोदेच्या कांठीं, पैठणापासून चार कोसांवर, आपेगांवीं तीं भावंडे जन्मलीं. पण त्यांचे जन्म झाले वडिलांनीं संन्यास घेतल्यावर. वडील विठ्ठलपंत काशीस जाऊन संन्यासी बनले. पण गुरूच्या आज्ञेवरून ते पुनः संसारांत पडले. बारा वर्षें गेलीं. नंतर दोन. दोन वर्षांच्या अंतरानें हीं चार मुलें जन्मास आलीं. त्यांत ज्ञानदेवांचा जन्म शके ११९७ मध्यें श्रीकृष्ण-जन्माष्टमीस झाला. चारी मुलें कांतिमान् व बुद्धिमान्. पण रूढीनें आंधळ्या झालेल्या समाजाला त्याचें काय ?

त्या वेळच्या रूढीप्रमाणें, संन्याशाच्या मुलांना मुंज करण्याचा अधिकार नाहीं, असा निर्णय आळंदीच्या ब्राह्मणांनीं दिला. एकदां संन्यास घेतल्यावर पुनः संसार केल्याबद्दल त्यांनी विठ्ठलपंतास देहांत प्रायश्चित्ताचीहि शिक्षा सांगितली. त्याप्रमाणें प्रयागला जाऊन विठ्ठलपंतांनी सहधर्मचारिणीसह त्रिवेणी—संगमांत जल—समाधि घेतली ! आईबाप अंतरले ! कोवळीं पोरें उघडीं पडलीं. त्यांची कोणीं करुणा केली काय ? त्यांना कोणीं आसरा दिला काय ? निंदा, छळ, अपमान, उपासमार हींच त्यांना समाजानें दिलीं.

## ताईनें काय शिकविलें ?

एके दिवशीं तर कहरच झाला ! ज्ञानदेव गांवांत भिक्षा मागून आले. भिक्षेची झोळी शिव्यांनीच अधिक भरलेली होती. या 'संन्याशाच्या पोरा'ला पाहून एका धर्ममार्तंडाला अपशकुन झालासा वाटला. त्याचे अपशब्द असह्य झाले आणि ज्ञानदेव आपल्या खोपटांत शिरले व त्यांनीं दार लावून घेतलें ! त्यांचें वय होतें दहा वर्षांचें. त्या बाल-जीवाचे दुःख कोणी जाणलें ? जाणलें फक्त मुक्ताताईनें. सहा वर्षांची ती चिमुरडी पोर; तीहि भिक्षा मागून घरी आली होती. पहाते तों घराचें दार बंद--ताटी लावलेली. मुलीच्या जिवाचें पाणी पाणी झालें. पण हृदयांत ज्ञानाची ज्योत पेटलेली. म्हणून तिनें शांतपणें आपल्या वडील बंधूची विनवणी केली— " ताटी उघडा ज्ञानेश्वरा ! " विनवणीच केली असें नव्हे तर, ज्ञानेश्वरांच्या अंगचें तेज फुलविण्यासारखे विचारहि ' लडिवाळ ' मुक्ताबाई बोलूं लागली—

**विश्व जाहलिया वन्ही । संतमुखें व्हावें पाणी ॥**

असा दया—क्षमा—शांतीचा बोध तिनें केला आणि " संत जेणे व्हावें । जग—बोलणें सोसावें " असा नियम सांगितला व शेवटी ' तुम्ही तरोनि विश्व तारा ' अशी महान् प्रेरणाहि दिली. या तिच्या साऱ्या आशा—मनीषा भरून—ओसंडून वहाव्यात अशीच अद्वितीय करणी ज्ञानदेवांनी केली.

प्रवरा नदीच्या कांठीं, नेवासे नांवाच्या गांवी, महालया देवीच्या मंदिरा-पासून थोड्या अंतरावर, ज्ञानदेवांनी भगवद्गीतेवरील आपली टीका, " भावार्थ—दीपिका ", शके १२१२ मध्यें, वयाच्या पंधराव्या वर्षीं, गुरु निवृत्तिनाथ समोर बसले आहेत असें कल्पून निरूपिली आणि " मेळविलों जन्मफळा " अशी आनंदाची ढेकर दिली !

## चार ज्योति निमाल्या !

ज्ञानेश्वरीनंतर अमृतानुभव. सुमारें आठशें ओव्यांचाच हा ग्रंथ, पण अध्यात्माचा अर्कच ! तो पूर्ण स्वतंत्र आहे. त्यांत ज्ञानदेवांचा स्वानुभव

भरलेला आहे. जग हें ब्रह्माचें स्फुरण आहे व त्या दृष्टीनें जग व ब्रह्म एकच आहेत, असें अद्वैतज्ञान सूत्ररूपानें त्यांत सांगितलेलें आहे. याहून लहानसा तिसरा ग्रंथ म्हणजे चांगदेव–पासष्टी. योगिराज चांगदेव वयानें फार मोठे. त्यांनीं ज्ञानदेवांना कोरेंच पत्र पाठविलें. त्याला उत्तर म्हणून ज्ञानदेवांनीं पासष्ट ओव्या त्याच कोऱ्या पत्रावर लिहून पाठविल्या. त्यांचेंच नांव चांगदेव–पासष्टी. या तीन ग्रंथांशिवाय सुमारें एक हजार अभंगहि ज्ञानदेवांनीं रचिले. ते आज महाराष्ट्रांतील लाखों वारकऱ्यांच्या जिव्हाग्रावर खेळत आहेत. नामदेवादि संतांच्या सांगातीं यात्रा करतां करतां ज्ञानदेवांनीं हे अभंग रचलेले आहेत. यात्रा संपवून आळंदीस आल्यावर, त्यांनीं आपली जीवित–यात्राच पुरी करावयाचें ठरविलें. आळंदी येथें, इंद्रायणीच्या कांठीं, शके १२१८ मध्यें, वयाच्या एकविसाव्या वर्षीं, त्यांनी जिवंत समाधि घेतली !

समाधि–मंदिरांत ज्ञानदेव प्रसन्न मुद्रेनें चालत गेले व नंतर निवृत्तिनाथांनीं बाहेरून शिळा लावून घेतली. या अपूर्व प्रसंगाचें वर्णन नामदेवांनीं हृदय हलविणाऱ्या भाषेनें अभंग–रूपांत केलें आहे. बाकीच्या दोघां भावांनींहि सात महिन्यांच्या आंतच स्वेच्छेनें समाधि घेतली. मुक्ताबाईवरहि वीज कडाडली. त्यामुळें तिजवर मृत्यु ओढवला. चार ज्योति विझल्या–पण तरीहि त्या महाराष्ट्राला सतत प्रकाश देत आहेत. "जगी सूर्य जैसे प्रगटले" असें त्यांचें वर्णन नामदेवांनीं भक्तिभावानें केलें आहे.

## अभंगांची अमृत–वृष्टि

ज्ञानदेवांनीं नामदेवादि संतांच्या सांगातीं द्वारका वगैरे क्षेत्रांच्या यात्रा केल्या. या यात्रा करण्यांतील हेतु ठायींठायींच्या देवांचें दर्शन सत्संगांत राहून घ्यावें हा होताच, पण त्याबरोबरच समाजाची स्थिति प्रत्यक्ष पहावी व ती पहातां पहातांच समाजाला नीतिधर्माचा उपदेश करावा हाहि होता. ज्ञानदेवादि संत ठिकठिकाणीं कीर्तनें करीत आणि कीर्तनांत आपापले अभंग म्हणत. ज्ञानदेवांचे हजार एक अभंग आजमित्तीला उपलब्ध आहेत. त्यांतील हरिपाठाचे अभंग तर वारकरी समाजाच्या नित्यपाठांत आहेत. नित्य पठणांत असल्यामुळें अभंगांची भाषा जनतेच्या बदलत्या बोलीशीं

जवळीक राखीत आली. आजहि सहज समजावेत, असेच ज्ञानदेवांचे अभंग आहेत. आज दुर्बोध झालेली ज्ञानेश्वरीहि मूळ " आबाळसुबोध " अक्षरांतच लिहिलेली आहे. तीनशें वर्षांनंतर एकनाथांनीं ' ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध, परी पाठांतरीं शुद्धाबद्ध ' झाला असें पाहून ज्ञानेश्वरीची शुद्धि केली आणि पुढिलांनीं तींत भेसळ करूं नये म्हणून बजावून ठेवलें की,

" ज्ञानेश्वरीपाटीं ( = पाठांत ) । जो वोवी करील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेवली । "

## सोनियाचा दिवस

ज्ञानेश्वरीचा भर तत्त्वज्ञानावर, तसा त्यांच्या अभंगांचा भक्तीवर. पंढरीच्या विठ्ठलाची सगुण भक्ति जन-मनांत रुजविणाऱ्या पावसाच्या सरी म्हणजे हे अभंग. ' रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी । ' हा ज्ञानदेवांचा अभंग अजून भजनाच्या फडाफडावर न चुकतां म्हटला जातो. ' बाप रखुमादेवीवरु ' सगुण स्वरूपांत प्रगट झाला म्हणजे ' सोनियाचा दिवस आजि । अमृतें पाहीला ॥ ' असें ज्ञानदेवांना वाटतें. ते सर्वसामान्य मुमुक्षु जनांना उपदेशतात, " भजनापरिस साधन आणिक । कलियुगी देख । आन नाहीं । " हरिभक्तीशिवाय मानवी जीवन व्यर्थ, हें खेड्यापाड्यांतील भोळ्याभाबड्या, दीन, निरक्षर, लोकांना पटवून देण्यासाठीं ते दाखल्या-मागून दाखले देतातः—

गळितशिर हें कलेवर रे । उदकेंविण सरिता भयंकर रे ।
रवि-शशिविण अंबर तैसें । हरिविण जिणें असार रे ॥

( डोकें पडलें कीं सारें शरीर प्रेत होतें, पाणी आटलें कीं नदी भयंकर भासते आणि चंद्र-सूर्याशिवाय आकाश भयाण दिसतें, तसेंच हरिभक्ती-शिवाय जीवन सुनें, रितें आहे. )

## भक्तीची तीव्रता

पंढरीला जाऊन विठ्ठलाची भेट घेण्याची तीव्र तळमळ ज्ञानदेवांना लागली होती.

" माझे जिवीची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ॥
पांडुरंगी मन रंगलें । गोविंदाचे गुणीं वेधलें ॥ "

अशा आर्त शब्दांनी त्यांनी आपलें मनोगत, आपली तळमळ बोलून दाखविली आहे. सर्व सुखाचें, सर्व आनंदाचें भांडार पांडुरंगाचे चरणीं आहे, हें सांगतांना ते म्हणतात,

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ।
जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ।
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगी ।
बापरखुमादेवीवरू विठ्ठलेशीं भेटी । आपुले संवसाटी करूनि ठेवा ॥

देवाच्या भेटीसाटीं भक्त किती विव्हळ होतो, याची कल्पना संसारी माणसांना यावी, म्हणून नाना संतांनी विरहिणीचे अभंग रचले आहेत. ज्ञानदेवहि एका अभंगांत आपली विव्हळता वर्णितात—

" पडिलें दूरदेशीं मज आठवे मानसी ।
नको नको हा वियोग कष्ट होताती जिवासी ॥
दिनु तैसी रजनी मज जाली गे माये ।
अवस्था लावुनि गेला अझुनी कां नये ॥ "

हीच हरिभक्ति बालकाच्या बोबड्या भाषेंतहि त्यांनीं रंगाविली आहे. एका गौळणीचें रूपक घेऊन ते म्हणतात—" कुनिकुन आला सालंगपानी । मला पोतासी धरिलें."

## अद्वैत तत्त्वज्ञान

असा भावभक्तीचा फुलोरा अभंगांच्या फांद्यांफांद्यांवर फुललेला असला, तरी अद्वैत तत्त्वज्ञान व निर्गुण भक्ति यांचीं फळेंहि मधूनमधून लटकलेलीं आढळतात.

" तूं तों माझें मी तों तुझें । ऐक्य जालें तेथें कैंचें दुजें
तूं तो मी गा, मी तो तूं गा । अज्ञानें बापुडीं नेणती पैं गा ॥
निर्गुण होतें तें गुणासि आलें । अज्ञान निरसूनि एकाचि जालें ॥ "

श्रोते ज्या अधिकाराचे, तसा उपदेश संत करतात. आधी सगुणाची गोडी लावून मग त्यांतून निर्गुणाकडे नेण्याचा साऱ्या संतांचा मार्ग आहे. "सो ऽ हं" हें अध्यात्मज्ञानाचें मूळ तत्त्वहि एका अभंगांत ज्ञानदेवांनीं किती सोपें करून सांगितलें आहे. ते म्हणतात,

"आतां याजपरते उरलें नाही कांहीं । देहींचि विदेही होऊनि ठेले ॥
आमुचे आम्ही देव आमुचे आम्ही भक्त । आमुचे आम्ही मुक्त एकविध ॥
आमुचे आम्ही ज्ञान आमुचे आम्ही ध्यान । सोहं रश्मी म्हूण हातां आली ॥
ज्ञानदेव म्हणे निर्गुण निरंजन । मनाचे मोहन मूर्तिमाजीं ॥"

समुद्रांत मिठाचा पुतळा विरघळून जावा, तसा देवामध्यें भक्त समरस होतो—देवाची पूजा करतां करतां तो स्वतःच देव बनतो, असें अनुभवामृत ज्ञानदेवांनी आपल्या अभंगांच्या साध्या द्रोणांतून भरभरून दिलें आहे. आणि ज्ञानेश्वरी म्हणजे तर कैवल्यरसाच्या पंचपक्वान्नांनीं भरलेलें सोन्याचे ताटच ! तीत भक्ति आहे आणि ज्ञान आहे, योग आहे आणि स्वानुभव आहे, व्युत्पत्ति आहे आणि साक्षात्कार आहे, प्रतिभा आहे आणि प्रसाद आहे —नाहीं काय ज्ञानेश्वरीत ? 'नित्यनूतन' असें हें "शारदेचें लावण्य–रत्न–भांडार" आहे. पुढे महाराष्ट्रांत सहा-सातशें वर्षें भक्तीचा जो मळा पिकला आणि त्यांत काव्याचें जें भरघोस पीक आलें, त्याचें बीज म्हणजे ज्ञानेश्वरी. ज्ञानदेवांनीं भागवत–धर्माचें जें इवलेंसें रोप लावलें, तें महाराष्ट्रभर पसरलें आहे आणि अजून टवटवीत आहे.

"इवलेसें रोप । लावियेलें द्वारीं । त्याचा वेलु गेला गगनावरी ।
मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेचितां अतिभारु कळियासि आला॥

हे संतोषाचे, आनंदाचे, धन्यतेचे उद्गार काढण्याचा अधिकार ज्ञानेश्वरांचाच.

## स्वतंत्र प्रतिभा

ज्ञानेश्वरी ही गीतेवरील पहिली मराठी टीका. मात्र ज्ञानदेवांचा हा ग्रंथ म्हणजे संस्कृतांतील भगवद्गीतेचें केवळ प्रतिबिंब आहे–भाषांतर आहे असें नव्हे. मूळ गीतेचे श्लोक ७००, तर ज्ञानेश्वरींतील ओव्या ९०३७.

हा जो तेरापट विस्तार ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथांत केला, तो बहुशः स्वतंत्रच आहे. तेराव्या अध्यायांतील एका सातव्या श्लोकावर ज्ञानेश्वरांनीं ३२७ ओव्या रचल्या आहेत! त्या श्लोकांतील 'अहिंसा' या एका शब्दाचा अर्थ समजावून सांगण्यासाठीं ज्ञानदेवांनीं १२१ ओव्या खर्ची घातल्या आहेत आणि ' आचार्योपासना ' या शब्दाचा भावार्थ स्पष्ट करण्यासाठीं नव्वद ओव्यांची रत्न–माला गुंफली आहे. याशिवाय अध्यायाच्या आरंभीं व अंतीं गुरु–गौरव, मातृभाषा–वर्णन, विवेचन–सार इत्यादींसाठीं सुमारें बाराशें ओव्यांचे घोस त्यांनीं लावले आहेत. अशा टीकाकाराला भाषांतरकार म्हणून कोण कमी लेखील? व्यासाचा 'मागोवा' घेत व भाष्य-कार श्रीशंकराचार्य यांना ' वाट पुसत ' ज्ञानेश्वरांनीं आपली टीका रचली हें खरें, पण त्यांतहि ६८ ठिकाणीं त्यांनीं स्वतंत्र अर्थ लावले आहेत. अध्यात्माचा स्वानुभव व अलौकिक काव्य–प्रतिभा यांच्या बळावर ज्ञानदेवांनीं गीतेवरील आपला टीका–ग्रंथ इतका अभिनव रचला की, कोणीं कोणाला भूषविलें ( तेथ अलंकारिलें कवण कवणें ) हें सांगणेंच कठीण.

## मराठीचा महिमा

गीता म्हणजे ' सर्व वाङ्मयाचें मथित. '–' आमच्या धर्मग्रंथांपैकीं एक अत्यंत तेजस्वी व निर्मल हिरा. ' पण तो तीन हजार वर्षें संस्कृत भाषेच्या कडीकुलुपांत अडकून पडला होता. सर्वसामान्य जनांना त्याचें दर्शनहि दुर्लभ. पण ज्ञानेश्वरांनीं मोठें बंड केलें आणि गीतेला ' देशीकार लेणें ' चढविलें. त्यांनीं ज्ञानेश्वरीच्या द्वारां गीतेंतील तत्त्वज्ञान रावारंकाच्या, ब्राह्मणशूद्रांच्या, तळल्यावरल्याच्या कानीं ' अमृतजिंक्या ' अक्षरांनीं घातलें. त्यामुळें ' मराठीचिये नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळ ' झाला.

मराठी भाषेला 'प्राकृत' व तुच्छ लेखणाऱ्या पंडितांचा एक वर्ग तेव्हां होता. त्याला वाटे, मराठी ही एक घरगुती बोली आहे–तिच्यांतून संस्कृतां-तील सूक्ष्म व गहन तत्त्वज्ञान कसें प्रगट करतां येईल? ही शंका ज्ञान-देवांनीं आपल्या कृतीनेंच समूळ उच्छेदिली. त्यांचें मराठीवरील प्रेम अपार आणि तिच्यांतून गीतेचा भावार्थ प्रगटविण्याचा त्यांचा आत्मविश्वास तर

अमापच ! समोर आपले गुरु श्रीनिवृत्तिनाथ प्रसन्न मुद्रेनें ऐकत बसले आहेत आणि भोंवतालीं सज्जन श्रोते भक्तिभावानें श्रवण करीत आहेत, अशा कल्पनेनें ज्ञानदेव आत्मविश्वासानें बोलत आहेत—" अमृताला‌हि पैजेनें जिंकतील अशी रसाळ अक्षरें मी मिळवीन. माझ्या भाषेचें माधुर्य इतकें असेल कीं, तें चाखण्यासाठी श्रोत्यांच्या कानाला जिभा फुटतील. गीतेंतील तत्त्वज्ञान कठीण आहे ना ? अतींद्रिय आहे ना ? असूं द्या. मी माझ्या शब्दांनी अरूपाचें रूप दाखवीन, तें तत्त्वज्ञान सोपें करून सांगेन. समुद्राहून सखोल आणि अर्थपूर्ण असे मराठी बोल मी तुम्हांला ऐकवीन. मलयपर्वतावरील वारा नेहमी सुगंधीच असतो, पण त्याला जर अमृताची गोडी आणि वीणेचा मंजुळ नाद लाभला, तर त्याची बहार काय वर्णावी ! तसाच मधुर मेळ ज्ञानेश्वरीत साधलेला आहे. काव्याचा राजा शोभणारा, प्रभूची वाङ्मयी मूर्ति असणारा मूळ गीता–ग्रंथ; त्याला पूर्वी व्यासांच्या संस्कृत वाणीची गोडी लाभली आणि आतां मराठीची मंजुळता जोडी करीत आहे. अमृताचे कल्लोळ असे रसाळ शब्द व रम्य उपमा कोंदाकोंदी भरून गेल्या आहेत. "*

---

* माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥
ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणीचि होती जिभा ॥
तेणें कारणें मी बोलेन । बोली अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियाकरवीं ॥
जो शांताचि अभिनवेल । ते परियेसा मऱ्हाटे बोल ।
जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥
सहजें मलयानिल मंद सुगंध । तया अमृताचा होय स्वाद ।
आणि तेथेंचि जोडे नाद । जरी दैवगत्या ॥
साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥

## नम्रतेची बैठक

हें वाचून कोणी म्हणेल, " हा आत्मविश्वास की अहंकार ? ज्ञानेश्वरांची प्रौढी कांही आगळीच दिसते ! " पण नाही, तसें मुळींच नाही; उलट ज्ञानेश्वराचा विनय अतिशय आहे, अतिरेकाचा आहे, पराकाष्ठेचा आहे. त्यांना गावयाचा आहे फक्त मातृभाषेचा महिमा. माझी मराठी भाषा संपन्न आहे, समर्थ आहे, मधुर आहे, हें ठसविण्यासाठींच ते अमृतालाहि चूक म्हणत आहेत, फिकें ठरवीत आहेत आणि आपल्या मातृभाषेचें हें वैभव दाखविण्याची उभारी धरीत आहेत, ती कशाच्या बळावर ? स्वतःच्या नव्हे, तर गुरु-कृपेच्या. गुरूचा गौरव व त्यापुढें स्वतःचें लाघव ज्ञानेश्वरांनी जितकें प्रगट केलें आहे, तितकें जगाच्या वाङ्मयांत क्वचित्च सांपडेल आणि हें गौरव–लाघव सांगण्यांतील त्यांची सलगी व गोडी तर खचित अलौकिकच आहे. निवृत्तिनाथ हे त्यांचे भाऊ म्हणून सलगी आणि गुरु म्हणून आदर. त्यांच्या प्रेमाचे आणि भक्तीचे ज्ञानेश्वरीत तरंगांमागून तरंग उठत आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात, " मी बोबडें बालक आहें, रांगतें अपत्य आहें, पंख न फुटलेलें पांखरूं आहें. मी रंक आहें, मुका आहें. शब्द कसा घडावा, सिद्धांत कसा जाणावा आणि अलंकार म्हणजे काय हें मला कळत नाही. पण गुरु–कृपेच्या आधारावर मी गीतेचा भावार्थ सांगण्यास धजलों आहें. येथें मी जें जे कांही बोलत आहें, तें सारें माझ्या गुरूनेंच मला शिकविलेलें आहे. त्यांनीच हें साहित्याचें गोड झाड लावलें, त्याला भावाचीं फुलें आणि अर्थाचीं फळें लकटतील. गुरु–कृपेमुळें माझ्या स्फूर्तीला पौर्णिमेची भरती येईल. महर्षि व्यासांनीं गीतेच्या कंठांत पुष्पांची माला घातली, म्हणून काय ती गीता–माय माझे दूर्वांकुर अव्हेरील ? "*

---

* शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं कैसें पां चाढिजे ।
अलंकार म्हणिजे । काय तें नेणें ॥
तुम्हां संतांचिये सभे । सलगी कीर करूं न लभे ।
परी मानावें जी तुम्हीं लोभें । अपत्या मज ॥

## काव्यमय वर्णनें

गुरूची कृपा आणि स्वतःची प्रतिभा यांच्या बळावर ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीत टिकटिकाणी ' साहित्य–सोनियाच्या खाणी ' उघडल्या आहेत. ' ता ' म्हणतांच ताजमहाल उभारण्याचें त्यांचें कौशल्य पहिल्या अध्याया-पासूनच आपले डोळे दिपवितें. कुरुक्षेत्रावर कौरव–पांडवांच्या संग्रामाचें सुरुवातीचें वर्णन पहिल्या अध्यायांत आलें आहे. सर्व वीरांनी शंख फुंकले. त्या शंख–नादानें आकाश आणि पृथ्वी दणाणून सोडली. ( नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन । ) एवढेंच वर्णन मूळ संस्कृत गीतेंत आलेलें आहे. त्याला मराटीचें लेणें ज्ञानदेवांनी चढवून कुरुक्षेत्रावरील तो तुमुल प्रसंग डोळ्यासमोर खडा केला आहे. ज्ञानदेव वर्णितात,

तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार आंदोलित ।
समुद्रजळ उसळत । कैलासवरी ॥
पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आसुडत । (=कोसळत)
तेथ सडा होत । नक्षत्रांचा ॥
सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळवादी जाहली ।
ऐसी एक सरी पिटिली । सत्यलोकीं ॥
दिहाचि (= दिवसाच) दिन थोकला ( = थांबला ) ।
जैसा प्रलयकाळ मांडला ।
तैसा हाहाकार जाहला । तिहीं लोकीं ॥

## खेळकर भाषा

पावसाची सर सरसर करीत आली कीं, आपल्याच अंगाभोवतीं गरगर फिरत, ' गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या ' म्हणून गात गात बागडणाऱ्या बाल-

---

तेवीं मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें ।
हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जीं झाड ।
परि गीता–ईश्वर भोळा । ले व्यासोक्ति–कुसुम–माळा ।
तरि माझिया दूर्वादळा । ना न म्हणे की ॥

काचा खेळकरपणा ज्ञानदेवांच्या भाषेंत भरलेला आहे. ' तूं युद्ध न करशील, तर लोक तुला नांवें ठेवतील ' हें श्रीकृष्णाचें गीतेंतील वचन ज्ञानदेवांनीं मराठींत कसें आणलें आहे, पहा. ' हे म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला (= भ्याला) '. श्रीकृष्णार्जुनांच्या संवादाची थोरवी वर्णन करतांना ज्ञानदेवांनीं एक समर्पक व रम्य रूपक योजलें आहे. ते म्हणतात, " अर्जुन केवढा शूर ! पण त्याच्या शूरपणाला ग्रहण लागलें. मेघांनीं सूर्याला झांकावें, तसें मोह, विषाद इत्यादि विकारांनीं अर्जुनाचें शौर्य कांही काळ लोपलें. उन्हाळ्यांत वणवा लागून एकादा पर्वत पेटावा, तसा अर्जुन त्या रणक्षेत्रावर दुःखानें संतप्त झाला. पर्वतावरील वणवा विझविण्यास मेघांतून पाण्याच्या धारा पडतात, तशा विचार–धारा मेघश्याम श्रीकृष्णाच्या मुखांतून निघूं लागल्या. मेघाबरोबर वीज, तशी त्या मुखांतील दंत–पंक्ति चमकत होती. आणि श्रीकृष्णाची वाणी तर मेघ–गर्जनेसारखी गंभीर होतीच. आतां श्रीकृष्ण अमृत–वृष्टि करतील, त्यामुळें अर्जुनाचा दाह शांत होईल आणि त्याच्या चित्तांत ज्ञानाचे अंकुर फुटतील."*

कोठें आकाशांतील मेघ आणि कोठें पृथ्वीवरील पर्वत ! एवढेंहि अंतर श्रीकृष्ण-अर्जुनामध्यें नव्हतें, असें ज्ञानेश्वरांना वाटत होतें. त्या दोघांमध्यें दुजाभावच नव्हता. हें सांगतांना ते म्हणतात, " एका दिव्याला दुसरा

---

* मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांती कवळुनु ।
जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥
तयापरि तो धनुर्धर । जाहलासे दुःखें जर्जर ।
जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवर । वणवला कां ॥
म्हणोनि सहजें सुनीळ । कृपामृतें सजळ ।
तो वोळला श्रीगोपाळ । महामेघ ॥
तेथ सुदर्शनांची द्युति । तेची विद्युल्लता झळकती ।
गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥
आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळ निवेल ।
मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥

दिवा लावावा, त्याप्रमाणें श्रीकृष्णाच्या ज्ञानापासून अर्जुनाला ज्ञान् मिळालें. या हृदयांतील ज्ञान त्या हृदयांत ओतलें–दोन्ही हृदयें एकरूप झालीं; समुद्र समुद्राला मिळाला. '' *

## अलंकारांच्या रत्नमाळा

जिकडे श्रीकृष्ण तिकडे जय, हा सिद्धांत ठसाविण्यासाठीं ज्ञानदेवांनीं एकामागून एक बहारीच्या किती उपमा दिल्या आहेत! त्या उपमांची मालाच जणुं ते पुढील शब्दांनीं गुंफतात—

चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथें विवेका । असणें कीं जी ।
रावो तेथ कटक (=सैन्य) । सौजन्य तेथें सोईरीक ।
वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥
दया तेथें धर्म । धर्म तेथें सुखागम ।
सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा ॥
वसंत तेथें वनें । वनें तेथ सुमनें ।
सुमनीं पालिंगनें (=थवे) । सारंगांचीं (=भुंग्यांची) ॥
गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथि जैसे ॥
भाग्य तेथ विलास । सुख तेथें उल्हास ।
हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें ॥

श्रीकृष्णाचें अर्जुनावर अपार प्रेम! अर्जुन म्हणजे मूर्तिमंत आस्था! तो रागावला तरी कृष्ण त्याचा राग शांतपणें सहन करीत, तो रुसला तर

---

* हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥
दीपें दीप लावला । तैसा परिष्वंग (=आलिंगन) तो जाला ।
द्वैत न मोडतां केला । आपणपें पार्थ ॥

त्याची समजावणी देव करीत. फार काय, ज्ञानेश्वर म्हणतात, ‘ देवाला अर्जुनाचें वेडच लागलें होतें.’ * कामधेनूनें आपल्या वासरासाठी पान्हा सोडावा, तसा विचारांचा वर्षाव श्रीकृष्णानें अर्जुनासाठीं केला. तूं ‘ प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा, मैत्रीची चित्कळा ’ अशा शब्दांनीं श्रीकृष्ण अर्जुनाला गौरवतात. उलट अर्जुनाला वाटे, श्रीकृष्ण म्हणजे ‘ संसार-श्रांताची साउली । अनाथ जीवांची माउली । ’ श्रीकृष्णाची अर्जुनाकडे पहाण्याची दृष्टि जणुं ‘ अमृताचि वोतली । कीं प्रेमाचि पिऊनि मातली । ’ अशी होती. वाऱ्याच्या झुळुकेनें झाडाचीं फळें टपटप खालीं पडावीं, तशीं श्रीकृष्णाची वचनें अर्जुनाच्या कानीं पडली. तीं ऐकून अर्जुनाचा सर्व मोह गेला आणि “ आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाही ” अशी पावतीच त्यानें श्रीकृष्ण सख्याला दिली. चकोराच्या निमित्तानें चंद्रकिरण किंवा भगीरथाच्या निमित्तानें गंगाप्रवाह जगाला लाभावा, तसा अर्जुनामुळें गीतेचा लाभ मानवजातीला झाला.

## गीतेची फलश्रुति

अर्जुन केवळ निमित्तमात्र; श्रीकृष्णानें सांगितलेलें ज्ञान अवघ्या मानवां-प्रमाणेंच आहे. त्यांच्या मुखांतून जी गीता-गंगा निघाली, ती त्रैलोक्याचें पाप धुणारी व ताप शमविणारी आहे. गंगेच्या कांठीं वृक्ष-वेली वाढतात; तसे गीतेच्या द्वारां ज्ञानभक्तिकर्माला पुष्टि मिळाली. सूर्याचें कार्य काय ? तर जगांतील अंधार नाहींसा करावा आणि कमळें फुलवावींत—

---

* हा कोपे—कीं निवांत साहे । हा रुसे—तरी बुझावीत जाये ।
नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥

सहज कृपामंदानिळें । श्रीकृष्ण-द्रुमाची वचनफळें ।
अर्जुन श्रवणाचिये खोळे । अवचित पडलीं ॥

तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें ।
दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण—गाय ॥

म्हणजे संपत्तीची दारें उघडावींत; तेच कर्तृत्व गीतेचें आहे. बांधलेले असतील त्यांची सुटका करावी, बुडत असतील त्यांना बाहेर काढावें व दीन-दुःखितांचीं संकटे नाहींशीं करावीत, हीच गीतेची फलश्रुति. *

## मानवधर्माचा संदेश

अर्जुनालाच काय, पण कोणाहि खऱ्या भक्ताला 'मी माथां मुकुट करीं' अशी ग्वाही श्रीकृष्ण देत आहेत. 'जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत' हें खऱ्या भक्ताचें लक्षण. सारें विश्व हें त्याचें घर, किंबहुना 'विश्व म्हणजे ईश व ईश म्हणजे मी' असें अद्वैत तो अनुभवतो. § ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची धांव अशी अंतिम सत्यापर्यंत आहे—आजचा मानव-धर्म, विश्वबंधुत्व हें सारे त्यांत सामावलेलें आहे. "म्हणोनि कुळ—जाति—वर्ण । हें आघवेंचि गा अकारण" अशी समतेची, अद्वैताची, मानवी ऐक्याची बैठक ज्ञानदेवांची आहे. खऱ्या भक्ताच्या चित्ताला वैषम्याची वार्ताच नसते. हा उत्तम, हा अधम असा विचार प्राणिमात्राचा भार सहन करतांना पृथ्वी करते का ? गाईची तहान भागवूं आणि वाघाला विष होऊन मारूं, असें पाणी मनांत आणतें कां ? घरच्या माणसांना उजेड दाखवावा आणि बाहेरच्यांपुढें अंधार पाडावा, असा भेद दिवा करतो काय ? झाड लावणारा माळी असो नाहींतर तें तोडणारा लाकूडतोड्या असो, दोघांनाहि झाड सारखीच सावली देतें ना ? ज्यानें ऊंस पेरला त्याला त्याचा रस गोड, पण तो ऊंस जो चरकांत घालून पिळून काढतो, त्याला त्याचा

---

* कां फेडीत पाप-ताप । पोखीत तीरींचे पादप ॥
समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥
कां जगाचें आंध्य फेडित । श्रियेचीं राउळें उघडित ॥
निघे जैसा भास्वत । प्रदाक्षिणे ॥
तैसी बांधलीं सोडित । बुडालीं काढित ॥
सांकडीं फेडित । आर्तांचिया ॥

§ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहाला ॥

रस कडू, असा फरक ऊंस कधीं करतो काय? भक्तहि असाच भेदभावरहित असतो. सर्वांवर प्रेमाची पाखर घालतो; अवघाचि संसार सुखाचा करण्यासाठीं झटतो.* असे भक्त म्हणजेः—

जे ज्ञानगंगें नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी झाले । पल्लव नवे ॥
जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबुकळोनि भारिले ॥

असे भक्त सूर्यासारखे तेजस्वी असतात. मात्र सूर्याला अस्त असतो व ताप असतो, तो भक्तांना नसतो. हे भक्त चंद्रासारखे शीतळ असतात, मात्र चंद्राला कलंक असतो व तो पौर्णिमेसच काय तो पूर्ण असतो; पण भक्त ‘ हे सदा पुरते ’ असतात.§

असे भक्त एकत्र आले म्हणजे प्रेमसुखाचा सोहळा काय वर्णावा? जवळजवळचीं दोन सरोवरें उचंबळलीं म्हणजे एकांतील पाणी दुसऱ्यांत शिरतें, तसे संवादसुखांत ते नाचतात, भक्तिप्रेमांत ते डुलतात, अध्यात्माचा आनंद ते मनसोक्त लुटतात.¶

कमळाची कळी उमलली म्हणजे ती आपला सुगंध आपल्या पोटांत ठेवूं शकत नाहीं—सर्वांना तो सुगंध लुटीत असते, तसेच भक्त हे स्वतः

---

* ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर । कीं महाबोधें विहार । केले जैसे ।
ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव ।
नातरी अलंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥
ते सत्त्वाचे सात्विक । कीं चैतन्याचे आंगिक ।
हें बहु असो एकैक । वानिसी काई ॥

§ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥

¶ जैसी जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासी धवळारें । तरंगचि होती ॥

भक्तिप्रेमरंगानें रंगतात आणि इतरांनाहि भक्तीचा रंग यथेच्छ लुटावयास देतात.*

## मूर्तिमंत तेजच !

संतांचा मेळा व त्यांचा भक्तीचा सोहळा यांचें वर्णन करतांना ज्ञानदेवांच्या वाणीला अगदीं भरतें येतें. तसेंच योगाचेंहि वर्णन करण्यांत ते रंगून जातात. योगी पुरुष कसा असतो, ' कुंडलिनी जगदंबा ' त्याच्या हृदयांत जागृत कशी होते आणि मग त्याचें सामर्थ्य किती वाढतें याचें शब्द-चित्र त्यांनी अतिशय हळुवार हातानें काढलें आहे. ' तो कनकचंपकाचा मळा । कीं अमृताचा पुतळा । ' अशा त्या योगिराजाची मूर्ति आपल्या डोळ्यांपुढें उभी करणारे ज्ञानराज हेच ते योगी आहेत कीं काय असा भास भाविक वाचकास होतो ! " बाळपणीच सर्वज्ञता वरी " असें भाग्य स्वतः ज्ञानदेवाविना अन्य कोणाचें ? प्रेमळ गुरूसमोर बसून गीता-भावार्थ निरूपणारे ज्ञानदेव म्हणजे " कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी " असें श्रोतृजनांना तेव्हां वाटलें असल्यास नवल काय ? रत्नासारखीं नखें, हिऱ्यासारखे दांत, माणिकासारखे केस, कमळासारखे तळवे, मोत्यासारखे डोळे,—असें योग्याच्या अंगोपांगांचें वर्णन त्यांनीं इतक्या तपशिलानें व बारकाईनें केलें आहे कीं, ही केवळ कल्पनासृष्टि नसून ज्ञानदेवांनीं असा योगी पुरुष प्रत्यक्षच पाहिला असावा— किंबहुना तेच स्वतः तसे असावेत असा मनाचा ग्रह बळावत जातो. ' देह होय सोनियाचें । परी लाघव घे वायूचें । ' आणि ' मनोगत ओळखे । मुंगियेचें । ' असें वर्णन जितकें रमणीय तितकेंच अद्‌भुत ! सहाव्या अध्या-

* बैसी कमळ—कळिका जालेपणें (=विकासानें)
हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे ।
दे राया—रंका पारणें ।
आमोदाचें ॥

यांतील एकट्या चौदाव्या श्लोकावर ज्ञानदेवांनीं ऐशी ओव्यांची रुंजी घातली आहे.

## अभ्यासाला योग्य स्थान

अशा अद्‌भुत रूपाचा व अलौकिक सामर्थ्याचा योगी पुरुष कोणती साधना करतो? या प्रश्नाचें उत्तर ज्ञानदेवांनी जें दिलें आहे, तें जगांतील कोणत्याहि प्रतिभाशाली कवीला भूषण होऊन राहणारें आहे. ज्ञानेश्वरीच्या अंतरंगांतील अध्यात्माची ओळख अधिकारी जनांनाच व्हावयाची, पण " लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया " ही जी ग्वाही ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथराजाच्या शेवटीं दिली आहे, तिची प्रचीति एकट्या योगाभ्यासाच्या वर्णनावरूनहि येण्यासारखी आहे. कोणाहि रसिकानें योग्याच्या स्थानाचें ज्ञानदेवांनीं केलेलें वर्णन वाचावें आणि काव्यानंदानें यथेच्छ डुलावें. योगाभ्यासासाठीं स्थान कसें निवडावें हें सांगतांना ज्ञानदेव म्हणतातः—

" भटकण्याची हौस असणाऱ्यालाहि आपण येथें बसावें असें वाटावें आणि एकदां बसल्यावर तेथून उठूंच नये असेंहि वाटावें. लोकांच्या पायधुळीनें तें स्थान मळलेलें नसावें. त्याची स्वच्छता व रम्यता पाहून मनाला संतोष व धैर्य प्राप्त व्हावें. अमृताहूनहि गोड अशा फळांनीं लकडलेलीं हिरवीगार झाडें तेथें असावीं. पावलापावलावर तळीं असावींत, झरे झुळझुळत असावेत आणि त्यांचें पाणी कसें स्फटिकासारखें निर्मळ असावें. सूर्याचें ऊन तेथें पडावें, पण कसें? अगदीं कोंवळें! आणि वाऱ्याची झुळुक यावी ती मंद नि गार! सारें वातावरण निवांत असावें—कोणाचाहि आवाज न उठावा—कोणीहि प्राणी तेथें नसावा—मात्र पोपट अन् भुंगे असले तर चालतील. इकडे पाण्यावर दोनचार हंस तरंगत आहेत, तर तिकडे आम्रवृक्षावर एकादी कोकिळा गात आहे—हेंहि एकादे वेळ चालेल. आणि आपले पाचू-माणकांचे पिसारे उभारणारे डौलदार मोर? तेहि चालतील—त्यांना आम्ही नको म्हणणार नाहीं—पण त्यांनीं तेथें सतत मात्र रहातां कामां नये—आले—गेले अशा रीतीनें थोडेफार मोर त्या स्थानावर

विहरत असावेत. असें तें स्थान पूर्ण एकांत, निवांत व शांत असावें—रम्य असावें—वैराग्य वाढविणारें असावें.*

## अमर प्रसाद

असा कल्पनाशक्तीचा विलास करणारे कवि हीच कांहीं ज्ञानेश्वरांची भूमिका नव्हे. ते कवि होते, तसे योगी होते, आणि ' धर्म-स्थापनेचे नर ' होते. त्यांना जगाचें कल्याण साधावयाचें होतें. म्हणून त्यांनीं आपला ग्रंथ संपत आल्यावर जें मागणें मागितलें आहे, तें सर्व जगांतील सर्वांचा सर्वांगीण उदय इच्छिणारेंच आहे. त्यांच्या वाग्यज्ञांतील ' पसायदान ' म्हणजे महाराष्ट्र-शारदेच्या कंठांतील मंगळ-सूत्रच आहे. त्यांत ते अशी विशाल व मंगल आशा व्यक्त करतात कीं, " सर्व विश्वाला व्यापून राहणाऱ्या ईश्वरानें माझ्या या ग्रंथानें संतुष्ट व्हावें आणि हेंचि दान द्यावें. दुष्टांचा वक्र स्वभाव नष्ट होवो आणि त्यांना सत्कर्मांची गोडी लागो.

---

* आणिकहि एक पहावें । जें साधकीं वसते हो आवे ।
आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ॥
जेथ अमृताचेनि पाडें । मूळाहीसकट गोडें ।
जोडती दाटें झाडें । सदा फळती ॥
पाउलापाउलां उदकें । वर्षाकाळाविण अतिचोखें ।
निर्झरें कां विशेखें । सुलभें जेथें ॥
हा आतपही अळुमाळ । जाणिजे तरी शीतळ ।
पवन अति निश्चळ । मंद झुळके ॥
बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद ।
शुक हन षट्पद । तेउतें नाहीं ॥
पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें ।
कवणे एक वेळे बैसे । कोकिळही हो कां ॥
निरंतर नाहीं । तरी आलीं-गेलीं कांहीं ।
होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥

सर्व प्राणिमात्रांमध्यें मैत्रीची भावना वाढो. पापाचा अंधार नाहींसा होवो आणि विश्वावर स्वधर्म–सूर्याचा प्रकाश पडो. फार काय, जो जो प्राणी जें जें कांहीं इच्छील, त्याला त्याला तें तें मिळो. "*

## खरा चमत्कार हा!

असा ग्रंथराज निर्माण करणाऱ्या ज्ञानेशांची नम्रता काय सांगावी! अज्ञ बालकाच्या ऋजुतेनें ते श्रोत्यांना विनवितात,

" तैसे घडतें प्रमेय घेइजें । उणें तें मज देइजे ।
जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ॥ "
" तरी न्यून तें पुरतें । आधिक तें सरतें ।
करूनि घ्यावें हें तुमतें । विनवीत असे ॥ "

असा विनय–संपन्न, प्रतिभा–संपन्न व स्वानुभव–संपन्न ग्रंथकार मराठींत तरी दुसरा कोणी झाला नाहीं–जगांतहि असेल वा नसेल! द्राक्षासारख्या रसाळ व नक्षत्रासारख्या तेजस्वी अशा नऊ हजार ओव्यांची ही ज्ञानेश्वरी, आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीं ज्ञानदेवांनीं रचली हें नवल म्हणावें कीं त्या ओवीओवींत ओवलेल्या अलंकार-रत्नांची कांति हें नवल मानावें कीं समाजाकडून संत्रस्त झालेल्या या बाल–योग्यानें आपल्या ग्रंथाच्या अणुरेणुमध्यें कोवळेपणा व प्रसन्नपणा ओतप्रोत भरून ठेवला आहे, हें नवल गणावें? ज्ञानेश्वरांच्या जीवनांतील खरा 'चमत्कार' आहे तो हा! हा ग्रंथराज म्हणजे मराठी भाषेचा उषःकालच! वैदिक ऋषीला पहिली उषा पहातांना जो विस्मय व हर्ष वाटला असेल, तोच मराठी

---

* आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥
जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

वाचकाला ज्ञानेश्वरी वाचतांना होतो. काव्य व तत्त्वज्ञान यांचें ऐक्य म्हणजे ज्ञानेश्वरी. साहित्य आणि शांति यांची युति म्हणजे ज्ञानेश्वरी. काव्य, रसवत्ता व अध्यात्मज्ञान या त्रिगुणांनीं नटलेल्या ज्ञानेश्वरीला साजेसें वर्णन ज्ञानेश्वरमहाराजच पुढील अमर शब्दांनीं करतात,

'वाचें बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्त्व ।
रसिकत्वीं परत्त्व- । स्पर्शु जैसा ॥





## संत नामदेव : : : २

कोठें पंढरी व कोठें पंजाब ! शेंकडों मैलांचें अंतर आणि वहातुकीचीं साधनें कमी. पण पंढरपूरच्या भागवत–धर्माची पताका तेराव्या शतकांत पंजाबांत नेऊन रोवली. कोणी ? नाहीं कांहीं विद्वत्ता, नाहीं गांठीं संपदा कीं नाहीं हातीं सत्ता, अशा एका साध्या शिंप्यानें. सुमारें सातशें वर्षांपूर्वी पंढरीची पताका पंजाबांत फडकविण्याचा पराक्रम त्यानें केला. हिंदु आणि मुसलमान, राव आणि रंक, स्त्री आणि पुरुष, अशा सर्वांच्या हातीं ज्यानें भागवत–धर्माची पताका दिली आणि त्यांच्या हृदयांत समतेचें अमृत शिंपलें, त्याचें नांव नामदेव.

## आद्य चरित्रकार

ज्ञानदेव–नामदेवांची जोडी अलौकिक आहे.या दोन भक्तांचें जीवन म्हणजे प्रयाग येथील गंगा–यमुनांचा संगमच. गंगेप्रमाणें शुभ्र, अथांग व विशाल ज्ञान ज्ञानदेवांचें, तर यमुनेच्या कांठावर गोपालकृष्णानें नानातऱ्हेच्या ज्या बालक्रीडा केल्या, त्यांचे पडसाद नामदेवांच्या अभंगांत उमटलेले. आद्यकवि म्हणून मराठी भाषेमध्यें ज्ञानदेवांचा जो अधिकार, तोच "आद्य चरित्रकार" म्हणून नामदेवांचा मान. या दोघांच्याही पूर्वीं महानुभावी लेखक–लेखिकांनीं काव्य–लेखन व चरित्र–लेखन केलेलें आहें, नाहीं असें नाहीं. पण, त्यांचें उत्कट स्वरूप प्रथम प्रकट झालें ज्ञानदेव–नामदेवांच्या द्वारेंच. गंगोत्री–जम्नोत्रीच्या वर कितीतरी अंतरावर हिमालयांत गंगा–यमुनांचे खरे उगम आहेत, पण ते दिसतात न दिसतात असे. दिसण्या-सारखे पहिले प्रवाह जेथें आहेत त्या स्थानांनाच गंगोत्री–जम्मोत्री हीं नांवें प्राप्त झालेलीं आहेत. याच रीतीनें ज्ञानदेवांना 'आद्य–कवि' व नामदेवांना 'आद्य–चरित्रकार' असा मान महाराष्ट्र–शारदेच्या दरबारांत आहे.

## देवाकडे फिर्याद

नामदेवांचा जन्म पंढरपूर येथें शके ११९२ मध्यें झाला. ज्ञानदेवांपेक्षां ते पांच वर्षांनीं मोठे. नामदेवाचे वडील दामाशेटी हे धंद्यानें शिंपी होते व वृत्तीनें विठ्ठलभक्त होते. नामदेवाच्या आईचें नांव गोणाई. नामदेव लहानपणापासूनच हाती टाळ घेऊन विटोबाचें भजन करीत असे. एकदां त्याच्या आईनें त्याच्या हातीं विठोबासाठीं दुधाचा नैवेद्य पाठविला. दुधाची वाटी नामदेवानें विठ्ठलापुढें ठेवली. नामदेवांचें वय होतें पांच वर्षांचें. त्यानें देवाला आग्रह केला दूध पिण्याचा. पाषाणाची प्रतिमा दूध कसें पिणार ? पण नामदेवाची बाल-बुद्धी. "दूध पी, नाहीं तर मी तुझ्या पायावर डोकें फोडून घेतों" असें तो म्हणूं लागला आणि खरोखरच आपलें डोकें फोडून घेऊं लागला. तेव्हां विठ्ठलानें वाटींतील दूध पिऊन टाकले, अशी आख्यायिका आहे.

नामदेवाचें सारें चित्त विठ्ठलाकडे लागलेलें. “ विठ्ठल विठ्ठल हेंचीं पै चिंतन ” अशी त्याची स्थिति झाली. “ मन पांगुळलें स्वरूपीं गुंतलें ” ही त्याची अवस्था पाहून त्याची आई त्याला म्हणाली,

“ सांडि देव–पिसें नको करूं ऐसें । बळें घर कैसें बुडविसी ॥
जन्मा येऊनियां पराक्रम करीं । कां होसी संसारीं भूमिभार ॥
सुदैवाचीं लेंकरें वर्तताती कैसीं । तूं मज झालासि कुळक्षय ॥
कैसी तुज नाही लौकिकाची लाज । हेचि थोर मज नवल वाटे ॥”

घरच्या शिवण्या–टिपण्याच्या धंद्यावर नामदेवानें पाणी ओतलें म्हणून गोणाई कष्टी होई ! कापड घेऊन बाजाराला जा असें ती त्याला सांगे. इतर दहा मुलांप्रमाणें आपल्या मुलानेंही संसार करावा, पैसाअडका मिळवावा, लौकिक कमवावा, अशी आईची स्वाभाविक इच्छा. त्यासाठीं तिनें नामदेवाचें लग्नही करून टाकलें. त्यावेळी त्यांचें वय अकरा वर्षांचे होतें. त्याच्या बायकोचें नांव राजाई. पण, नामदेवाचें सारें लक्ष परमार्थाकडे. लग्न झालें तेव्हां त्यांना दुःख वाटलें.

“ विषाचें गरळ पाजिसी केवळ । हृदय कोमळ कैसें तुझें ॥ ”
असा सवाल नामदेवांनीं गोणाईस केला.

नामदेव आपलें ऐकत नाहीं असें पाहून गोणाईनें त्याच्यावर फिर्याद केली. कोणाकडे ? तर विठ्ठलाकडे ! तिनें विठ्ठलावरच असा आरोप केला.
“लोकांचिं लेकुरें कां गा चाळविसी । आपणयाऐसें करसीं भलत्यासीं ॥ ”

एवढेंच नव्हे तर, ती वत्सल माता पांडुरंगाला अशी जरब घालीत आहे–

“ जीव मी देईन, नामा नेईन । नांव मी करीन गोतामाजीं ॥ ”

“ कां गा केलें वेडें बाळ माझें ” असा टाहो ती प्रेमळ माता फोडीत आहे. प्रपंच हाच तिचा परमार्थ होता. नामदेवांना करावयाचा होता परमार्थाचा प्रपंच. “ हांसें नाचें प्रेमें, फुंदतु डुलतु ” अशा भक्ति-प्रेमामध्यें नामदेवाचे दिवसांमागून दिवस चालले. नामदेवाचें वेड वाढतच चाललें. “ मायबापासी टाकिलें । ध्यान देवासी लागलें ॥ ” ही त्यांची

वृत्ति बळावत चालली—अनावर झाली, तेव्हां सांसारिक दृष्टीनें निराश होऊन गोणाई म्हणाली,

"पोर निर्दय झालें." पण काय करणार ? "ज्याचें दैव त्या सांगातें"

वडील दामाशेटी यांनींही नामदेवाला पुष्कळ सांगून पाहिलें. " सरलें आयुष्य, उरलें थोडे दिस. " अशी त्यांची स्थिती होती. " शिवणें-टिपणें करोनि आपलें नित्य चालविणें संसारिक ॥ " असा सरळ उपदेश वडिलांनी केला. पण नामदेवानें त्याकडे पाठ फिरविली. तेव्हां दामाशेटी विचारतात, " अरे नाम्या काय केलें, कासया घोड्यासि कोंडिलें ॥ " त्यांची तक्रार अशी की, " यासि नाहीं आप, तुज नाहीं पर । आमुचा संसार विभांडिला ॥ " आईवडिलांप्रमाणेंच पत्नीही कुरकुरूं लागली. राजाईनें नामदेवाला सरळ सवाल केला, " लावोनि लंगोटी झालेती गोसावी । आमुची ठेवाठेवी कोण करी ॥ " राजाई एवढें बोलूनच थांबली नाहीं. ती रात्रीं देवळांत गेली आणि तिनें रुक्मिणीपाशीं आपली तक्रार गुदरली. ती म्हणाली,

" अहो रखुमाबाई विठोबासी सांगा । भ्रतारासी कां गा वेडें केलें ॥
वस्त्रपात्र नाहीं खायाजेवायासी । नाचे अहर्निशीं निर्लज्जसा ॥
चवदा मनुष्यें आहेत माझ्याघरीं । हिंडती दारोदारीं अन्नासाठीं ॥ "

आपल्या दोन मुलांना महाद्वारापुढें आणून ती ओरडली,

" बाळेंसाहेत विख, घेईन मी आतां । "

## काकांनीं परीक्षा घेतली

पण पालथ्या घड्यावर पाणी. सर्व संसारीं जनानीं केलेला उपदेश नामदेवाच्या मनांतच शिरत नसे. उलट ते आईला म्हणत,

" लाभाचिया लोभें, मज म्हणसी आपुलें । परी नेणसीं तापलें चित्त माझें॥ "

एवढेंच म्हणून न थांबतां, तें आईलाच उपदेश करीत,

" कायावाचामनें ममत्त्व माझ्या ठायीं । तें तूं ठेवी पायीं विठोबाचे ॥ "

असें सांगून नामदेव संसारांतून झटकले. चवदा माणसांचें त्यांचें कुटुंब. त्या एका कुटुंबाची सेवा करण्यासाठीं नामदेवाचा जन्म नव्हता. विश्व

हेंच त्यांचें खरें कुटुंब. जगाच्या कल्याणासाठीं, स्वतःच्या संसाराची होळी त्यांनीं केली. ते भक्तिप्रेमरंगांत रंगून गेले—सर्वांना " प्रेमसाखर " वाटीत चालले. भक्तीच्या बाजारपेठेंत

" समतेचे फणस—गरे । आंबे पिकलें पडीभरें ॥
नाम—द्राक्षांचे घड । अपार रसी आलें गोड ।। "

या भक्तीरसाची गोडी नामदेवांनीं स्वतः चाखली आणि इतरांना चाखावयास दिली.

त्यांच्या भक्तीला ज्ञानाचें कोंदण लाभण्याचा योग लवकरच आला. वयाच्या सुमारें एकविसाव्या वर्षीं, म्हणजे शके १२१३ मध्यें, नामदेव आळंदीस गेले. त्यावेळीं ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी सांगून पुरी झाली होती. तिच्या कीर्तीचीं किरणें सर्वत्र फांकत होतीं. आळंदी येथें ज्ञानदेवांच्या भेटीला नामदेव गेले. आपण विठ्ठलाचे गाढेभक्त आहों असा अभिमान त्यांच्या चित्तांत दडलेला होता. तो मुक्ताबाईच्या बारीक नजरेनें नेमका हेरला, आणि तिनें नामदेवाला प्रश्न केला,

" अखंड जयाला देवाचा शेजार । कांरे अहंकार नाहीं गेला ? । "

पण निवृत्तिनाथांनीं मुक्ताबाईला दटावलें आणि, " ऐसें म्हणूं नये " असें समजाविलें. त्यांनीं नामदेवाचा, " भक्तीचिया बळें देव पै जिंकिला " असा मोठा गौरव केला. तथापि मुक्ताबाईची कुजबुज चालूच होती, " अंतरिचा कोरा गुरुवीण. " ते सारे भक्त परमार्थाच्या गोष्टी करीत असतांना सर्वांत वडील असे जे गोरोबा कुंभार, त्यांनीं एक थापटणें हातांत घेतलें आणि मातीचीं मडकीं जशीं कचीं कां पक्कीं हें तें वाजवून पहात, त्याप्रमाणें ते एकेकाच्या डोक्यावर थापटणें मारून पारख करूं लागले. निवृत्तीवर प्रथम प्रयोग झाला. नंतर ज्ञानेश्वरावर, नंतर सोपानदेवावर, मग मुक्ताबाईच्या मस्तकावर—सारीं मडकीं अगदीं पक्कीं—सारीं डोकीं ब्रह्मविद्येनें भरलेलीं. पण नामदेवाच्या माथ्यावर गोरोबाकाकांनीं थापटणें मारतांच नामदेव डोकें चोळूं लागले—रडूं लागले. तेव्हां, " गोरा म्हणे कोरा राहिला गे बाई." अशी चारचौघांत फजिती झाल्यावर " नामा म्हणे

जावें पळोनिया आतां " पुढें नामदेवांनीं विसोबा खेचर यांना गुरु केलें.

" सर्वकाळीं परमात्मा आहे सर्वदेशीं " हा गुरूपदेश नामदेवाच्या चित्तांत ठसला. " देवावीण ठाव रिता कोठें नाहीं " हें नामदेवाला पटलें. त्यामुळें " डोळियांचे डोळे उघडिले जेणें। आनंदाचें लेणें लेवविलें. " अशी वृत्ति नामदेवांची झाली. सर्व प्राणी म्हणजे ईश्वराचे अंश ही भावना त्यांच्या चित्तांत ठसली. एकदां नामदेव स्वयंपाक करीत बसले होते. तोंच एक कुत्रें आलें आणि रोटी घेऊन पळूं लागलें. तेव्हां नामदेवानें काय केलें? त्याला न मारतां किंवा ती पोळी परत मिळविण्याचा यत्न न करतां, तुपाची वाटी घेऊन नामदेव त्याच्या पाठोपाठ धांवत चालले, आणि " तूप घे गा जगजेठी। कोरडी रोटी कां खाशीं " असें म्हणूं लागले.

## विठ्ठल म्हणजे कोण ?

" सर्वांभूतीं विठ्ठल " ही जाणीव त्यांच्या रोमरोमांत भिनली. विठ्ठल म्हणजे भेदभावाचा अभाव, विठ्ठल म्हणजे स्वार्थ-लोभ-अहंकाराचा लोप, विठ्ठल म्हणजे प्रेमाची मूस आणि दया-क्षमा-शांतीची मूर्ती. समता, प्रसन्नता आणि बंधुता या सर्व गुणांचें प्रतीक म्हणजे विठ्ठल. विठ्ठलाची भक्ति करा, असा जो उपदेश ज्ञानदेवासारखे, नामदेवासारखे संतसाधु करतात, त्याचा आशय हे सर्व सात्त्विक गुण, ही सारी दैवी संपदा समाजानें आपल्या अंगीं मुरवावी असाच असतो. एक " आई " म्हटलें कीं, प्रेम, त्याग व सेवा हे गुण जसे डोळ्यांपुढें उभे राहतात, तसे एक " विठ्ठल " हें नांव घेतलें कीं, सर्व उदात्त गुण साकार होऊन दिसूं लागतात. " सोनें " म्हटलें कीं, कांति, काठिण्य व किंमत आलीच, " कापूर " म्हटला कीं, मार्दव, सुगंध व शुभ्रता आलीच, त्याचप्रमाणें " देव " म्हटला कीं, दया-क्षमा-शांति हे गुण आदर्श म्हणून चित्तापुढें उभे राहतात. देव म्हणजे सर्व सद्‌गुणांचा समुच्चय, देव म्हणजे सर्व सद्भावांचा आगर, देव म्हणजे मंगलाचें मंगल. असा हा विठ्ठल स्थावर–जंगमामध्यें ओतप्रोत भरलेला आहे अशी वृत्ति नामदेवांची झाली. ही अद्वैत भावना गुरु विसोबा खेचर यांप्रमाणेंच ज्ञानदेवांनींहि नामदेवाच्या चित्तांत रुजविली.

## अभंगांचे विषय

बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध या परमार्थ–मार्गांतील चार पायऱ्या. त्या प्रत्येक पायरीवर उभें असतांनाच्या आपल्या अवस्था नामदेवांनीं अभंगांच्या द्वारें प्रगट केल्या आहेत. नामदेवांनीं अभंग किती रचले हें एक कोडेंच आहे. "शतकोटी तुझे करीन अभंग" अशी प्रतिज्ञा त्यांनीं केलेली आहे. तिला पोषक असा हिशेब तुकाराममहाराज एका अभंगांत देतात. आई-वडील, मुलेंमुली इत्यादि नामदेवांच्या कुटुंबांतील चौदा माणसांनीं लाखों–क्रोडो अभंग रचले, अशी ग्वाही देऊन शेवटीं तुकाराम-महाराज सांगतात, "एकूणहत्तर लक्ष। चोपन्न कोटी। कविता गोमटी। नामयाची।" पण ही संख्या म्हणजे उघड उघड अतिशयोक्ति दिसते.

शंभर कोटी अभंग रचण्याला शंभर वर्षें अहोरात्र खर्च केली, तरी एका मिनिटाला सुमारें वीस अभंग तयार झाले पाहिजेत हें सरळ गणित आहे. आणि असे मिनिटाला वीस अभंग सतत होणें अशक्य आहे. "नवलाख पायऱ्या जेजुरीला" यांतील संख्येचा अर्थ जसा "असंख्य" एवढाच, तसाच नामदेवांच्या शंभर कोटी अभंगांचा अर्थ घ्यावयाचा. मात्र सध्यां उपलब्ध आहेत नामदेवाचे फक्त अडीच हजारच अभंग. त्यांतहि "विष्णुदास नामा" या नांवाचे अभंग दुसऱ्याचेच आहेत. ज्ञानदेवा-बरोबरीच्या नामदेवाचे अस्सल अभंग आज सांपडतात ते फक्त चारपांचशेंच. नामदेवाच्या नांवावर मोडणाऱ्या अडीच हजार अभंगांत श्रीकृष्णाच्या लीलेवर व बालक्रीडेवर सुमारें तीनशें अभंग आहेत आणि नामदेवांच्या आत्मचरित्रपर पांचशेंपन्नास आहेत. ज्ञानदेवांच्या समाधी-संबंधींचें जे सुमारें शंभर अभंग आहेत, ते पाषाणालाही पाझर फोडणारे आहेत. ज्ञानदेवांच्या समागमांत नामदेवांनीं केलेल्या तीर्थयात्रेचें वर्णन करणारे "तीर्थावळीचे" एकसष्ट अभंग भक्तीच्या लडिवाळपणानें गोडावलेले आहेत. विठ्ठल-माहात्म्यावर दोनशें पंचवीस व नाम-माहात्म्यावर दोनशें अभंग आहेत. उरलेल्या अभंगांतून नामदेवांनीं शुक, हरिश्चंद्र, श्रियाळ, प्रल्हाद, ध्रुव इत्यादि पौराणिक व्यक्तींची व कबीर, भानुदास, मीराबाई वगैरे संतांचीं चरित्रें सुरसपणें वर्णिलीं आहेत.

## पंजाबांतील धर्म-कार्य

नामदेवांच्या अभंगांचा विशेष म्हणजे प्रेमळ भावना. उत्तुंग कल्पनांचा चमचमाट त्यांच्या अभंगांत फारसा दिसत नाहीं; पण समुद्रासारखी सखोल भावना मात्र साध्या भाषेंत उचंबळलेली आढळते. उपमा–दृष्टांतादि अलंकार क्वचित्च भेटतात. त्याकडे नामदेवांचें फारसें लक्षच नाहीं. आपल्या मनांतील विठ्ठलाच्या भेटीची तळमळ सहज स्फूर्तीनें त्यांनीं व्यक्त केली आहे. ज्ञानदेवांच्या पश्चात् नामदेवांनीं दुसरी तीर्थयात्रा केली. पंजाबमध्यें अठरा वर्षें वास्तव्य त्यांनीं केलें. तेथील गुरुमुखी भाषा ते शिकले. त्या भाषेंत त्यांनीं काव्यरचनाही केली. त्यांतील एकसष्ठ पदें शिखांच्या " ग्रंथसाहेबांत " समाविष्ट केलेलीं आहेत. महाराष्ट्रांतील संताला शिखांच्या धर्मग्रंथांत पूजेचा मान मिळाला. फार काय ? महाराष्ट्रापेक्षांही पंजाबांतच नामदेवाचें पूजन अधिक होत आहे. कबीर, नानक, रामानंद, रोहिदास वगैरे पंजाबांतील संतांनीं नामदेवाकडून भक्तीची दीक्षा घेतली. त्या सर्वांनीं आपआपल्या काव्यांतून नामदेवाचा मोठा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. पंजाबांत नामदेवांची अनेक मंदिरें आहेत. त्यांत गुरुदासपूर जिल्ह्यांतील घोमान या गांवचें स्मारक–मंदिर विशेष प्रसिद्ध आहे. तेथें माघ शुद्ध द्वितीयेस मोठी यात्रा भरते. मुसलमानी धर्माचें आक्रमण समशेरीच्या टोकानें उत्तरेकडून दक्षिणेकडे येत असतांही नामदेवांनीं आपल्या भागवतधर्माच्या लाटा दक्षिणेकडून उसळविल्या. हें यश अभूत आहे, तसेंच अद्वितीयही आहे. पंढरीची पताका दिल्लीच्या समशेरीलाहि भारी झाली–अजिंक्य ठरली. शेवटीं वयाच्या एक्याऐंशींव्या वर्षीं, शके १२७२ मध्यें नामदेवांनीं पंढरपूर येथें श्री विठ्ठलाच्या चरणीं इहलोकची यात्रा संपविली. त्याचवेळीं त्यांच्या सर्व कुटुंबियांनींहि देह विसर्जन केल्याची आख्यायिका आहे.

## भक्त तीन, हृदय एक

भागवत–धर्माचा पाया ज्ञानदेवांनीं रचिला, त्याच्या भिंती नामदेवांनीं

उभारल्या, एकनाथांनीं त्याचे खांब उभे केले आणि तुकाराममहाराज कळस झाले.*

ज्ञानदेव आणि तुकाराम यांच्यांतील दुवा म्हणजे नामदेव. नामदेवाच्या अभंगांत ज्ञानदेवांचे सूर जसे ऐकूं येतात, तसें तुकारामाच्या अभंगांत नामदेवांचे शब्द व त्यांचे दाखले, त्यांचे विचार आणि त्यांच्या भावना या सर्वांचें प्रतिबिंब जागोजाग आढळतें.

पैं निद्रिताचेनि आंगेंसीं । साप तैसी उर्वशी ।
तेविं स्वरूपस्थासारिसीं । देही द्वंद्वें ॥
म्हणोनी तयाचिया ठायीं । शेणासोनेया विशेष नाहीं ।
रत्नागुंडेया कांहीं । नेणिजे भेद ॥

अशा ओव्या ज्ञानेश्वरींत आढळतात, तर त्यांचाच पडसाद नामदेवांच्या अभंगांत पुढीलप्रमाणें ऐकूं येतो.

निद्रिस्ताचे सेजे सर्प कां ऊर्वशी ।
पाहों विषयासी तैसे आम्ही ॥
शेण आणि सोनें भासतें समान ।
रत्न कां पाषाण एकरूप ॥

‘ समर्थाचे बाळ । पांघरीं वाकळ । ’ किंवा ‘ आम्ही जातो आमुच्या गांवा’ अथवा ‘ वाट्ुली पहातां शिणले डोळुले ’ वा ‘ अवघाचि संसार सुखाचा करीन ’ इत्यादि बोल ज्ञानदेवाचे ? नामदेवाचे ? कीं तुकारामाचे ? तिघांचेही ते बोल समान आहेत.

---

* संतकृपा झाली, इमारत फळा आली
ज्ञानदेवें रचिला पाया, उभविलें देवालया ।
नामा तयाचा किंकर, त्यानें केला हा विस्तार ॥
जनार्दनी एकनाथ, स्तंभ दिला भागवत ।
भजन करा सावकाश, तुका झालासे कळस ॥

—बहिणाबाई

" भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव ।
तैसें आचार–गौरव । सुकुलीन जनाचें ।
झाड जाणावें फुलें । मानस जाणावें बोलें ।
भोगें जाणावें केलें । जन्मांतरीचें ॥ "

या ज्ञानेशांच्या ओव्या नामदेवांच्या अभंगांत जशाच्या तशा सांपडतात. तिघांचेही देह भिन्न असले तरी दैवत एक, साधन एकच; ध्येय एक, मार्ग एकच; मार्गावरील आपले अनुभव तिघांनींही एकाच भाषेंत सांगितलेले.

या साम्याचें एक ठळक उदाहरण सांगण्यासारखें आहे. ज्ञानदेवांनीं लिहिलेला पुढील अभंग वाचावा आणि मग तुकारामांनीं रचिलेला तसलाच अभंग पहावा म्हणजे आरशांतील प्रतिबिंबच आपणाला दिसत आहे किंवा दोन जुळे भाऊच आपणाला भेटत आहेत असेंच कोणालाही वाटेल. ज्ञानदेवांचा अभंग असा,—

तंववरी जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाही ॥
तंववरी वैराग्याच्या गोष्टीं । जंव सुंदर वनिता दृष्टि देखिली नाहीं ॥
तंववरी मैत्रत्व संवाद । जंववरी अर्थेसि संबंध पाडिला नाहीं ॥
तंववरी युद्धाची मात । जंव परमाईचा पूत देखिला नाहीं ॥
तंववरी समुद्र करी गर्जना । जंव अगस्ती ब्राह्मणा देखिलें नाही ॥
तंववरी बाधी हा संसार । जंव रखुमादेविवरु देखिला नाहीं ॥

आतां तुकारामाचा अभंग पहा —

तोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥
तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं ॥
तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं ॥
तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥

अशीं साम्य स्थळें किती तरी आहेत ! एकाच भक्तीच्या धाग्यानें सर्व संतांनीं आपला जीवनपट विणला हाच त्याचा अर्थ.

## हृदय-द्रावक नामा-विलाप

नामदेवांच्या अभंगांत विलक्षण आर्तता आहे, व्याकुळता आहे, ओढ आहे. त्यांतही ज्ञानदेवांच्या समाधीविषयीं त्यांनीं जे शंभरावर अभंग

रचलेले आहेत, त्यांतील भावनेची तीव्रता कांहीं अलौकिकच आहे. त्याच्याइतकें करुणरसानें थबथबलेलें असें काव्य जुन्या मराठी वाङ्मयांत क्वचितच सांपडेल. संस्कृत साहित्यांत अज-विलाप, रति-विलाप वगैरे करुण कवनें अजरामर झालेलीं आहेत. पण तें पत्नीसाठीं पतीचा किंवा पतीसाठीं पत्नीचा असे शोक आहेत. हा नामदेव-विलाप मात्र कारुण्या-इतकाच उदात्ततेनें आणि भावनेइतकाच ज्ञानानें ओथंबलेला आहे. एक ज्ञानी तर दुसरा भक्त. आणि दोघेहि जिवलग. दोघांनीं मिळून सतत एकत्र राहून व सदैव भक्तीप्रेमाच्या गोष्टी करून देशभर पांचसहा वर्षे एकत्र यात्रा केलेली. त्यामुळें परस्परांची हृदयें एकमेकांत अतूटपणें गुंतलेलीं. पण त्यांची तूट होण्याची वेळ आतां आली. आपलें अवतारकार्य समाप्त झालें असें समजून ज्ञानदेवांनीं स्वेच्छेनेंच समाधी घेण्याचें ठरविलें. त्यांच्या समाधीचा सुखदुःखामिश्रित सोहोळा नामदेवांनीं किती तन्मयतेनें वर्णिला आहे !

## ‘ चालली विभूति योगियांची ’

ज्ञानदेवांनीं “ वैकुंठासी शिडी लावियेली, ” ही वार्ता साऱ्या संत-मंडळींत वाऱ्यासारखी पसरली. त्याबरोबर सारे सन्त-महन्त आळंदीपाशीं गोळा झाले. वाद्यांचे गजर सुरू झाले. कीर्तनाच्या लहरी उसळूं लागल्या. इंद्रायणीच्या कांठीं, “ आल्याड पल्याड पताकांचे भार ” दिसूं लागले. “ पिवळ्या पारव्या आणिक हिरव्या । नीलवर्ण साऱ्या लखलखीत ” अशा त्या पताका “ तिकोनी दाटलेल्या ” पाहून नामदेवांना वाटलें “ जरी जर्तारी झाल्या रानभरी । विजा त्यावरी खेळताती । ” या संत-मंडळींप्रमाणेंच पंढरीचा विठ्ठलही ज्ञानदेवांना निरोप देण्यास आलेला होता अशी नामदेवांची श्रद्धा. “ ज्ञानदेवायोगें सकळांसीं दर्शन । परब्रह्म निधान डुल्लतसें ” असा स्पष्ट उल्लेख त्यांनीं केलेला आहे. कार्तिक वद्य १३ हा निर्याणाचा मुहूर्त धरलेला होता. पण दशमीपासूनच कीर्तन-जागरणाचा उत्सव सुरू झाला. समाधीसाठीं तुळशी आणि बेल, दर्भ आणि फुलें आणलीं. भागिरथीचें उदकही आणलें. गंध आणि अक्षता, धूप आणि

दीप, पंचामृत इत्यादि साहित्य जमा झालें. लिंबें, नारळ, सुपारी, केळें इत्यादि मंगल समारंभाचीं सारीं साधनें सिद्ध झालीं.

वियोगाचें दुःख ज्याला त्याला आपआपल्या वृत्तीप्रमाणें जाणवलें. नामदेवांची वृत्ति अत्यंत कोमल—नवनीतासारखी. " मेणाहून मऊ " असें त्यांचें मन वियोगाच्या तापानें विरघळूं लागलें. त्यांनीं आपली दशा स्वतःच पुढील शब्दांनीं वर्णन केली आहे.

कासावीस प्राण मन तळमळी । जैसी कां मासोळी जीवनावींण ॥
दाही दिशा वोस वाटती उदास । करिताती सोस मनामाजीं ॥
घातियेली घोण प्राण आला कंठीं । ज्ञानदेवासाठीं तळमळी ॥
नामा म्हणे देवा वाटतसे खंती । चालली विभूति योगियांची ॥

## प्राण कासावीस झाले

ज्याच्यासाठीं आपल्या डोळ्यांतून प्रेमाश्रु लोटत आहेत, तो आपला सखा ज्ञानरूप आहे, विवेकाचा सागर आहे आणि आवतीभोंवतीं जमलेले साधुसंतही वैराग्याचे पुतळे आहेत–अशा मेळाव्यांत आपण शोक करणें लज्जास्पद आहे, ही जाणीव नामदेवांना मधून मधून होत होती. पण " नानापरी मन आवरीतो भारी । कांहीं केल्या हरी विसर न पडे " अशी त्यांची अनावर स्थिती होत असे. आजूबाजूला पहावें तर, सोपानदेव व मुक्ताबाई स्फुंदत आहेत—" आम्हां माता–पिता नित्य ज्ञानेश्वर । नाहीं आतां भार विश्रांतीसी" असा टाहो फोडीत आहेत. त्यांना निवृत्तीनाथ समजाबून सांगत आहेत—" रहाणे चौघांचें एकरूप " असा बोध करीत आहेत. पण त्या लहान भावंडांचें सांत्वन करतां करतांच खुद्द त्यांचेंच " कांहीं केल्या मन रहात नाहीं. " तळें फुटावें आणि पाणी बारा वाटा पसरावें, तसा त्यांच्या दुःखाला घातलेला विवेकाचा बांध फुटला. गवताच्या पेंढीची दोरी सुटावी आणि काड्यान् काड्या वाऱ्यावर उडूं लागाव्या तसें त्यांचें दुःख शेवटीं उफाळून बाहेर पडलें. हरिणी गेल्यावर तिचीं पाडसें

रानोमाळ भटकावींत तसें ज्ञानदेवांच्या समाधीनंतर त्यांच्या भावंडांना झालें. *

## ज्ञानदेवांना निरोप

या सर्व शोकाच्या सागरांत, अलिप्त असलेलें एकटे काय ते ज्ञानदेव होते. खवळलेल्या समुद्रांत एकादें शांत-सुंदर बेट असावें, तसें त्यांचें हृदय समाधानानें डोलत होतें—आनंदानें नाचत होतें. " ज्ञानेश्वरापाशीं आनंदीआनंद " अशी त्यांची स्थिति होती. त्यांनीं देवाच्या पायाला वंदन केलें आणि त्यांचें तीर्थ घेतलें. त्यांच्या अंगाला चंदनाची उटी लावली होती आणि कंठांत पुष्पमाला घातलेली होती. मुलांनीं समाधीची जागा झाडली होती. द्वादशीचें पारणें मोठ्या उत्साहानें झालें. " पिंपळाच्या पारीं, बैसविल्या पांक्ति. " त्यावेळीं गर्दी इतकी झाली कीं, " पिपिलिकेसी (=मुंगीला) मार्ग जावया न मिळे." पण नामदेवाची स्थिति काय झाली ? ते म्हणतात, " येतो कासाविसी प्राण माझा. "

समाधि-स्थानावर तुळशी आणि बेल अंथरले, त्यावर दूर्वा आणि दर्भ मोकळे टाकले. सुंदर-सुगंधी फुलेंही पसरलीं ज्ञानदेव त्या आपल्या निजधामाकडे चालले. आपल्या बंधूला, गुरूला वंदन करून ते म्हणाले,

" पाळिलें-पोसिलें चालविला लळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराया "

कृतज्ञतेचे, भक्तिभावाचे, प्रेमभराचे हे ज्ञानदेवांचे उद्गार ऐकतांच निवृत्तिनाथही गहिवरले—ज्ञानदेवांना आलिंगन देऊं लागले.—" अमर्यादा कधीं केली नाहीं येणें " असे गौरवाचे उद्गार काढून ज्ञानेश्वरीचा महिमा त्यांनीं आठविला. " फेडिलीं डोळ्यांचीं अत्यंत पारणीं । आतां ऐसे

---

* बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाटे मुरडताती ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेसें ॥
हरिणीवीण खोपी पडियेली वोस । दशादिशा पाडस भ्रमताती ॥
मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां । ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥

कोणी सखे नाहीं " असें विव्हळ बोल काढून निवृत्तीनाथांनीं ज्ञानदेवांना कडकडून मिठी मारली. तें दृश्य पाहतांच सारे संत कासावीस झाले—डोळ्याला पदर लावूं लागले. " ज्ञानियांनीं ऐसी करावी जंव खंती। अज्ञानाचा किती पाड आला " असें म्हणून देवानेंच निवृत्तीचें समाधान केलें. देवांनीं सर्व संतांना बोध केला,

आकाशाचे ठायीं अभ्रें येतींजातीं । कोण त्यांची खंती करूं पाहे ॥
अवतारादिक गेलेआले अपार । जैसा का विस्तार मृगजळाचा ॥

सर्व संतांनीं ज्ञानदेवांना नमस्कार केला. विठ्ठल व निवृत्ती या दोघांनीं ज्ञानदेवांचे दोन्ही हात धरून त्यांना समाधि-स्थानापाशीं नेलें. ज्ञानेश्वर आसनावर जाऊन बसले. पुढें ज्ञानदेवी ठेवली. " ज्ञानदेव म्हणे सुखी केले देवा " असा सार्थक्याचा ध्वनि निघाला. ज्ञानदेवांनीं तीन वेळां हात जोडले आणि आपले डोळे झांकले—ते ब्रह्मरूप झाले. निवृत्तीनाथ बाहेर आले आणि त्यांनीं समाधीवर शिळा घातली. त्यावेळीं नामदेवांना दुःखाचा जोराचा उमाळा आला. ते देवाला म्हणूं लागले,

ज्ञानदेव माझें सौख्य-सरोवर । त्यांत जलचर स्वस्थ होतों ॥
दुर्दैव-तापानें आटलें तें नीर । वर्षी रघुवीर कृपामेघ ॥
ज्ञानदेवावीण व्याकूळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी ॥
विठाबाई तूं ग जाणसी ना जाण । रक्षी मज कोण दुजें येथें ॥

किती हुबेहुब शब्दचित्र नामदेवांनीं त्या अपूर्व घटनेचें रेखाटलें आहे! त्या अवर्णनीय प्रसंगाचें वर्णन करण्याची शक्ति त्यांच्या शब्दांत आहे. स्वतःच्या आणि इतर संतांच्या हृदयाची कालवाकालव, दबले तरी उसळून येणारे दुःखाचे कढ नामदेवांनीं किती हळुवारपणें व्यक्त केले आहेत! कवीच्या सहसंवेदनेनें व शब्दसामर्थ्यानें त्यांनीं तो समाधीचा प्रसंग आपल्यापुढें मूर्तिमंत उभा केला आहे.

## वज्रासारखा निर्धार

भक्तिरस हाच एक नामदेवांच्या अभंगांत ओतप्रोत भरून राहिलेला असला, तरी त्या रसावर निरनिराळ्या भावनांचे रंग प्रसंगाप्रसंगानें

उमटले आहेत. " नाचूं कीर्तनाचे रंगीं " हा त्यांचा जीवनाचा व्यवसाय, " आणि ज्ञानदीप लावूं जगीं " हें त्यांच्या जीविताचें ध्येय. पण त्यासाठीं त्यांना किती तरी अवस्थांतून जावें लागलें. " देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ " ही त्यांच्या मनाची मूळ बैठक. त्यांच्या भक्तीचा निर्धार असा कीं,

मजवरी घाली घण । परी मी न सोडी चरण ॥
मान कापून देईन शीर । पाहे कृपण कीं उदार ॥

## मेणासारखें हृदय

विठ्ठलाची करुणा भाकतांना नामदेव त्याला किती परोपरीनें आळवितात ! विठ्ठलाचें व आपलें नातें किती जिव्हाळ्याचें आहे हें पटवितांना ते म्हणतातः—

तूं माझी माऊली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेम–पान्हा पांडुरंगे ॥
तूं माझी गाऊली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडी भवपाश पांडुरंगें ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घाली मज पांडुरंगे ॥

देवाच्या वियोगानें आपली अवस्था काय झाली तें नामदेव सांगतात—

डोळे शिणले पाहतां वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजीं ॥
तूं माझी जननी सरसिये संगातिणी । विठ्ठलें धांवोनि देई क्षेम ।
तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । गुंता भवपाश तोडी माझा ।
तूं माझी माऊली मी तुझी तान्हुली । वोरसें वो घालीं प्रेमपान्हा ॥

भक्त–भगवंताचें ऐक्य वर्णन करतांना ते म्हणतात—

तूं वृन्दावन मी चिरी । तूं तुळशी मी मंजरी ।
तूं पावा मी मोहरी । स्वये दोन्ही ॥
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मिणी ॥
तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ॥
तूं नदी मी थडी । तूं तारू मी सांगडी ॥

तूं धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही ।
तूं वेद मी स्तविता । तूं शास्त्र मी गीता ।।
तूं गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही ।।
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ।।
मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ।।

## देवाशीं भांडण

लहान बालकानें, परगांवीं गेलेल्या आपल्या वडिलांना बोलवावें, तशा लडिवाळपणानें नामदेव विठ्ठलाला तांतडीची हांक देतात, " बैसावया लागीं नको घेऊं घोडा । धांवत दुडदुडा त्वां बा यावें " एवढेंच नव्हें तर, " अडखळुनि पडसी नको घालूं जोडा । धांवत दुडदुडा त्वां बा यावें ।। " अशी घाई नामदेव करीत आहेत. घोडा नको, जोडाहि नको कारण " भेटीलागी माझा फुटतसे प्राण " अशी त्यांची अवस्था झालेली आहे. त्यांना एकच छंद लागलेला व तो म्हणजे " जया देखे तया, पुसे हेंचि मात । कैं मज अनंत बोलवील ।। " पण एवढ्या तळमळीनेंही देव भेटेना. तेव्हां रागारागानें नामदेव म्हणतात,

पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी दारां ।
पतीतपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ।।
घेसी तेव्हां देसी ऐसा अससी ऊदार ।
काय देवा रोधूं तुमचें कृपणाचें दार ।।

हा वैतागाचा झटका ओसरतांच नामदेवांना भक्तीची ऊर्मि येते व ते म्हणतात—

" प्रेमफासा घालूनि गळां । जित धरलें गोपाळा ।।
एक्या मनाची करूनि जोडी । विठ्ठलपायीं घातली बेडी ।।
हृदय करूनी बंदिखाना । विठ्ठल कोंडुनि ठेविला जाणा ।।
सोहं शब्दें मारा केला । विठ्ठल काकुळती आला ।।

## भगवंताची भेट

अशा अनुतापानें नामदेवाच्या मनाची भूमी चांगली भाजून निघाली. तेव्हां मेघश्याम त्यांच्यावर वोळला—वर्षला. परमेश्वर आपल्या भेटीसाठीं धावून आला हा आनंद प्रगट करतांना नामदेव म्हणतात,

कोटिसूर्यप्रभादीप्ति । गगनीं झळकली अवाचिती ।।
संत नामया सांगती । पैल आला कमलापति ।।
वत्सालागीं जैसी धेनु । तैसा धांवे जगज्जीवनु ।।
गरुडाचे धुंदवातीं । दाही दिशा आक्रंदती ।।
हरिकंठींची सुमनमाळा । सुटोनि आली भूमंडळा ।।
सवें चाले सुदर्शन । भक्त कराया रक्षण ।।
उचलोनि दोन्ही बाहीं । नामा धारिला हृदयीं ।।

तेव्हां साहजिकच ' कोटी दिवाळ्यादसरे ' आल्याचा आनंद नामदेवाला झाला—' नामा थोराचें लेकरूं ' असा अभिमानहि उत्पन्न झाला.

अशा सगुण भक्तींत रंगलेले नामदेव निर्गुणाचीही ओळख विसरलेले नव्हते. सर्व विश्वामध्यें एकच ईशतत्त्व भरून राहिलेलें आहे आणि विठ्ठलाची मूर्ति हें केवळ त्याचें प्रतीक आहे, हें शुद्ध ज्ञान त्यांच्या अंतरंगांत खेळत होतें. विठ्ठलामध्यें विश्व पाहणाऱ्या त्यांच्या दृष्टीला ज्ञानदेवांनीं विश्वांत विठ्ठल पहावयास शिकविलें होतें. त्यामुळें नामदेव म्हणतात,

" निर्गुणीचें वैभव आलें भक्तीमिषें । तें हें विठ्ठल-वेषें ठसावलें "

## मधुर पदें

सगुण-निर्गुणाच्या भक्ति-ज्ञानानें " धन्य माझा जन्म, धन्य माझा भाव " असे तृप्तीचें उद्गार नामदेवांनीं काढलेले आहेत. आपल्याला लाभलेल्या भक्तीसुखाचें धन सर्वांना वाटून देण्यासाठीं नामदेवांनीं कीर्तनाचें द्वारां लोकांना उपदेश केला. लहानमोठ्या स्त्री-पुरुषांना हें भक्तीचें गुज नीट कळावें म्हणून निरनिराळ्या दाखल्यांनीं त्यांनीं तें समजावून सांगितलें. कधीं " कुतन्या ! थमाल ले थमाल आपल्या गाई " असा बोबड्याच

रुसवा त्यांनीं रंगविला आहे; तर कधीं, यादवाच्या पोराचा खेळ मांडल आहे. संसारी जनांना "मानस मुंडावे, देहभाव सांडावा, वासना दंडावी" असा नीतीचा उपदेश त्यानीं केला आहे. " सत्संगानें स्वहित साधा " असा आदेश त्यांनीं दिला. " युगें अठ्ठावीस विटेवरी उभा " ही त्यांची आरती अठ्ठावीस युगें चिरंजीव होणारी आहे. ' नको वाजवूं श्रीहरि मुरली । तुझ्या मुरलीनें तहानभूक हरली ' ही त्यांची 'मुरली' भाविकांची मनें अजून जिंकीत आहे. बालकाचा अल्लडपणा तर त्यांच्या अनेक पदांत भरून राहिलेला आहे. गौळिया घरीं नवनीत चोरून ' रांगत रांगत येतो हरि हा राजमंदिरीं ' आणि ' लपत छपत येतो हा राजभुवनीं । नंदासि टाकुनि आपण बैसे सिंहासनीं ' अशा श्रीकृष्णाच्या बालपणींच्या खोड्या नामदेवांनीं गोडपणें वर्णिल्या आहेत.

## उपदेशाचें सौंदर्य

कृष्णाची म्हणा, रामाची म्हणा, विठ्ठलाची म्हणा—एका देवाची भक्ति जनतेंत रुजविण्यासाठीं नामदेवांनीं आपली वाणी किती शिणविली! तुमचे असतील ते धंदे व उद्योग तुम्ही खुशाल करा, पण ते करतांना सर्वांठायीं असणाऱ्या ईश्वराचें स्मरण ठेवा, आणि तें स्मरण ठेवून बंधुभावानें वागा असा उपदेश ठसविण्यासाठीं त्यांनीं व्यवहारांतील अनेक दाखले दिले आहेत. तीं तीं शब्द-चित्रें उभीं करण्याचें नामदेवांचें सामर्थ्य पुढील अभंगांत दिसून येतें.—

वावडी दुरीच्या दुरी उडतसे अंबरीं । हातीं असे दोरी परि लक्ष तेथें ॥
दुडीवरी दुडी पाण्या निघाली गुजरी । चाले मोकळ्या करी परि लक्ष तेथें॥
धनलोभ्यानें धन ठेवियलें दुरी । वर्ते चराचरीं परि लक्ष तेथें ॥

## दंभावर प्रहार

विठ्ठलाचा छंद किती तीव्रपणें लागावा हें सांगतांना नामदेव उपमांच्या सरीवर सरी पाडतात. निर्धनाला धनाचा, आंधळ्याला दृष्टीचा, मोराला मेघाचा तसा भक्ताला देवाचा छंद लागला पाहिजे. याहिपेक्षां अधिक

तळमळीचीं उदाहरणें ते देतात. " पारधियें पाडस धरियलें वनीं । तें चिंती जननी रात्रंदिवस ॥ सर्पें डंखिलें तें स्मरतो गारोडी । पुरीं जातां सांगडी मन चिंती ॥ असे पंधरा दृष्टांत एकाच अभंगांत नामदेवांनीं दिले आहेत. पंधरा पुष्पांची ही काव्य–माला अत्यंत सुगंधी आहे. त्यांत वर्णिलेली तळमळ स्वतः नामदेवांनीं अनुभवली होती. ही तळमळ सत्य हवी, दांभिकतेची नको हें सांगतांना ते पुढील सूत्र सांगतातः—

त्यागेविण विरक्ति । प्रेमावाचूनि भक्ति ।
शांति नसतां ज्ञप्ति ( = ज्ञान ) । शोभा न पवे ॥
हेतुवाचूनि प्रीति । गुणरहित स्तुति ।
करणीवाचुनि कीर्ति । शोभा न पवे ॥

## " नामा करांगुळी धरी "

जपतपाचें सोंग करणाऱ्या दांभिकांना ते स्पष्टपणें बजावतात,

भुजंग विखार करी पवनाचा आहार । परि योगेश्वर म्हणूं नये ॥
पवित्र गंगाजळ मीन सेवी निर्मळ । परि दुष्ट तें केवळ कर्म त्याचें ॥
घर सांडोनियां वन सेविताती । वनीं काय नसतीं रीस व्याघ्र ॥

केवळ वारा खाऊन योगी होतां येत असतें, तर साप काय थोडे आहेत ? गंगेंत उभे राहूनच मोक्ष मिळता, तर तेथें मासे काय थोडे आहेत ? रानांत राहिल्यानेंच हरि भेटता, तर अस्वल–वाघ कोठें राहतात ? असे दाखले देऊन त्यांनीं लोकांना शुद्ध भक्तीचा, खऱ्या विरक्तीचा उपदेश केला. ज्ञानदेवांनीं आरंभिलेला भगवतधर्मच त्यांनीं विस्तारला. नामदेवाचा अधिकार या भक्तमंडळींत केवढा आहे हें जनाबाईनें एका अभंगांत मार्मिकपणें सांगितलें आहे. तो अभंग असा—

विठो माझा लेकुरवाळा । संगें लेकुरांचा मेळा ॥ निवृत्ति हा खांद्यावरी सोपानाचा हात धरी ॥ पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥ गोरा

कुंभार मांडीवरी । चोखा जीवा बरोबरी । बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी । जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ।।

किती हृदयंगम शब्द–चित्र !





# संत एकनाथ : : : ३

प्रपंच साधून परमार्थाचा लाभ कसा करून घ्यावा याचा उत्तम आदर्श म्हणजे एकनाथ. गृहस्थ धर्म व भागवत धर्म यांची सुंदर सांगड घालणारा हा एकच भक्त. चाळीस वर्षें संसार करून त्यांनीं स्वतः ईश्वराची जोड करून घेतली व ती करून घेण्याचा मार्ग इतरांस दाखविला. हा मार्ग दाखविण्यासाठीं त्यांनीं साठ हजार ओव्या रचल्या आणि त्याशिवाय अभंग, पदें, भारुडें वगैरें कवनें किती तरी केलीं. त्यांच्या वाङ्मय-हिऱ्याला जितके पैलू आहेत, तितके दुसऱ्या कोणत्याच संतकवीच्या साहित्याला नाहींत. समाजांतील सर्व थरांशीं समरस होण्याची त्यांची हातोटी तर अलौकिक आहे. सर्वांभूतीं समता कशी आचरावी याचा वस्तुपाठच नाथांनीं दिला.

## पवित्र तें कुळ

नाथांचा जन्म एका पुण्यपावन वंशांत झाला. संत भानुदास हे विठ्ठलाचे गाढे भक्त. त्यांनीं विठ्ठलाची मूर्ति विजयानगरहून परत पंढरीस आणली. एकनाथ हे त्या संताचे पणतू आणि नाथांचे नातू मुक्तेश्वर. हे तर काव्यदेवतेचे लाडके बाळ. थोर पूर्वज व थोर वंशज यांनीं मागेंपुढें संपन्न असलेल्या कुळांत नाथांनीं जन्म घेतला. पैठण ही पूर्वींची आंध्राची राजधानी. तें त्या वेळचें महान् विद्यापीट—जणूं महाराष्ट्राचें काशीक्षेत्रच—संस्कृत भाषेच्या व धर्मग्रंथांच्या अभ्यासाचें केंद्रस्थान. त्या गांवीं नाथांचा जन्म शके १४५५ मध्यें झाला. बालपणींच त्यांनीं संस्कृत ग्रंथांचा व्यासंग केला. तरी त्यांच्या चित्तांत पारमार्थिक जिज्ञासा शिल्लकच होती. ती पूर्ण करून घेण्यासाठीं ते वयाच्या बाराव्या वर्षींच देवगड येथें गेले. त्यावेळीं मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत गाजत व गांजत होती. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रावर कोसळलेल्या यावनी सत्तेला येथें येऊन तीनशें वर्षें झालीं होतीं. या काळांत पारतंत्र्याच्या अजगरानें महाराष्ट्राला पुरें गिळलें होतें. त्याचें राज्य हिरावलें गेलें होतें, त्याचा धर्म संकटांत पडला होता आणि त्याची भाषा फारसी भाषेच्या दडपणाखालीं चेपली जात होती. जनतेंतील धैर्य, स्वाभिमान व आनंद लोपत चालला होता. परक्यांची सेवा करून त्यांच्या लाथा खाण्यांत बहुतेक लोक गुंतले असल्यानें त्यांचा स्वार्थ बळावत होता व नीति खालावत होती. पण अशा विपरीत परिस्थितीच्या प्रवाहाचे उलट पोहत जाणारेही कांहीं सामर्थ्यवान् सत्पुरुष होते. त्यांतील प्रमुख म्हणजे जनार्दनस्वामी. देवगडच्या मुसलमान किल्लेदाराचे ते कारभारी होते. ते आपलें काम अत्यंत चोखपणें व निःस्पृहपणें पार पाडीत. एवढेंच करून न थांबतां ते परमार्थाची साधनाही करीत. त्यांची कीर्ति महाराष्ट्रांत सर्वत्र पसरली होती. ती ऐकून नाथ त्यांच्याकडे गेले.

## गुरु-सहवास

जनार्दनस्वामींनीं नाथांच्या बुद्धीचें तेज पाहिलें, चित्ताची निर्मलता

जाणली, तळमळीची खोली मापली आणि एखादी प्रेमळ आई आपल्या लाडक्या मुलाचें संगोपन आस्थेनें करतें, तसें त्यांनीं नाथांचें पालन केलें. प्रथम त्यांनीं त्यांना सबंध ज्ञानेश्वरी समजावून सांगितली–तिचा भावार्थ उकलून दाखविला. तिच्या भाषेचें वैभव, कल्पनेचें तेज, भक्तीचा गंध आणि अध्यात्माचें सर्वत्र स्फुरणारें चैतन्य, हें सारें पाहून नाथांचें चित्त वेडावूनच गेलें–आणि तें ज्ञानेश्वरीवर निरंतर जडलें. तिच्यांतील गुरु-भक्तीचें व्रत त्यांनीं स्वतःच आचरिलें. सुदैवानें तसा गुरुही त्यांच्या सन्निध होता. त्यांचा लाभ सहा वर्षें त्यांनीं सतत घेतला. 'एका जनार्दनी' असाच जोड शब्द ते आपल्या अभंगाचे अंतीं वापरतात.

## वाङ्मयाचा अंकुर

फाल्गुन वद्य ६ हा विलक्षण योगायोगाचा दिवस. त्या दिवशीं जनार्दन-स्वामींचा जन्म झाला, एवढेंच नव्हें तर स्वामींचा व नाथांचा–दोघांचाही तो साक्षात्काराचा दिन, व दोघांच्याही देहत्यागाचा दिनही तोच ! याच तिथीला "सुलभ पर्वतावर" नाथांना साक्षात्कार झाला. त्यानंतर गुरुशिष्यांनीं मिळून दोन अडीच वर्षें तीर्थयात्रा केली मथुरा–वृंदावन–काशी–प्रयाग–द्वारका–डाकुर करीत ते बद्रिकाश्रमापर्यंत गेले. यात्रा करतां करतां ते नाशिकाजवळ आले. तेथें गुरूंनीं आज्ञा केली कीं, चतुःश्लोकी भागवतावर मराठी टीका करावी. त्याप्रमाणें पंचवटी क्षेत्रीं नाथांनीं भागवतांतील चार श्लोकांवर १०३६ ओव्या रचल्या यापुढें नाथांनीं जीं लहानमोठीं व साधीउंची साहित्याचीं वस्त्रें विणलीं, त्यांतील पहिलें सणंग हें "कलाकुसरी कौतुक नेणें' अशी विनयाची भाषा त्यांत त्यांनीं सहजच काढली. पण 'त्यामाजीं ब्रह्मज्ञान सखोल । नित्यनवी प्रेमाची ओल' हा अनुभव त्यांच्या या पहिल्या ग्रंथांतही आल्याशिवाय रहात नाहीं. या अंकुरावरून नाथांचा पुढील वाङ्मय–वृक्ष केवढा विशाल होणार आहे, याची कल्पना मनांत येऊन गुरूला खचित धन्यता वाटली असेल.

## काशीक्षेत्रांतील सन्मान

तीर्थ-यात्रा संपविल्यावर संसार–यात्रा नाथांनीं आरंभिली. पंचविसाव्या

वर्षी त्यांचा विवाह झाला. गिरिजाबाई ही त्यांची पत्नी त्यांना शोभेशीच होती. त्यांना तीन अपत्यें होतीं. नाथांनीं आपलें पुढील सारें आयुष्य पैठणासच घालविलें. मध्यंतरीं शके १४९२ ते १४९५ हीं तीन वर्षेंच काय तें ते काशीस जाऊन राहिले होते. तेथें त्यांनीं आपल्या भागवत–ग्रंथाची समाप्ति केली. नाथांचा ग्रंथ मराठी आणि काशीचे पंडित संस्कृत. तेव्हां कोणी चोरानें आपल्या घरांतील धन लुटून न्यावें तसें संस्कृतांतील अध्यात्म नाथांनीं मराठींत आणलें असें वाटून काशीकर विद्वानांनीं त्यांच्यावर मोठें काहूर उठविलें. परंतु, नाथांच्या ग्रंथाचा थोडासा आस्वाद मिळतांच तें शांत झालें–गारुड्याची पुंगी ऐकणाऱ्या नागाप्रमाणें ते डोलूं लागले. त्यांनीं नाथांच्या भागवताची मिरवणूक पालखींतून काढली. नाथांच्या काव्यगंगेचें स्वागत वाराणशीच्या गंगेनें केलें. तेथेंच नाथांनीं ‘ रुक्मिणी स्वयंवर ’ हाहि ग्रंथ लिहिला. परत पैठणास आल्यावर नाथांनीं प्रपंच व परमार्थ या दोहोंचा कित्ता घालून दिला. त्यांनीं भागवतधर्माचें भांडार उघडलें, परोपकाराची पाणपोई घातली, कीर्तनाची पेठ खुली केली आणि साहित्यसेवेचें पीक अमाप काढलें व तें सर्वांकडून यथेच्छ लुटविलें.

## समतेची कृति

मानवांतील उच्चनीचता हिंदु धर्म मानीत नाहीं; किंबहुना “ सर्वाभूतीं एक आत्मा ” ओळखून पूर्ण समतेनें वागण्यासच तो शिकवितो; असा प्रचार–नुसता प्रचारच नव्हे तर आचारही नाथांनीं केला. नाथांचें आचरण शुद्ध–सोवळें असे, तरी ते धर्मतत्त्वाला विसरण्याइतके रूढीनें अंध बनलेले नव्हते. एके दिवशीं ते गोदावरीच्या स्नानाला निघाले होते. ऐन दुपारची वेळ. ऊन रणरणत होतें. वाळवंट आगीसारखें तापलें होतें. त्यावर पडलेल्या एका अंत्यजाच्या अर्भकाचें किंकाळणें नाथांच्या कानीं आलें. लगेच ते तिकडे धांवले. त्यांनीं तें महाराचें पोर आपल्या शालजोडींत गुंडाळून घेतलें. त्याला त्यांनीं प्रेमानें कुरवाळिलें. जीर्ण शास्त्री-पंडितांच्या व भटा-भिक्षुकांच्या दृष्टीनें हा अनाचार झाला. त्यांनीं नाथांवर बहिष्कार घातला.

पुढें नाथांच्या घरीं श्राद्ध असतांना नाथांनीं भुकेल्या अस्पृश्यांनाच आधीं जेवावयास घातलें. शास्त्रीपंडितांचा क्रोध भडकला. ते नाथांच्या घरीं गेले नाहींत. पण नाथांचे साक्षात् पितरच जेवून गेले म्हणतात. स्पृश्य व अस्पृश्य हे एकाच हिंदु धर्माचे घटक; त्यांच्याकडे नाथ समभावानें पहात. एवढेंच नव्हे तर हिंदु व मुसलमान हा भेदही ते मानीत नसत. दोघांनाही ते "मानव" म्हणूनच लेखीत व समतेनें वागवीत. किंबहुना मानव व गाढव या दोन्ही प्राण्यांच्या शरीरांत एकच नारायण नांदत आहे अशा अद्वैत दृष्टीनें ते रोजच्या सांसारिक जीवनांत वागत. एक मुसलमान नाथांच्या अंगावर एकदां थुंकला. नाथांनीं गोदेंत स्नान केलें व ते वर आले. पुनः तो यवन थुंकला, पुनः नाथांनीं स्नान केलें. असें १०८ वेळेला झालें. पण नाथ कांहीं त्या छलकावर रागावले नाहींत. एकदां त्यांनीं काशीच्या गंगेची कावड तहानेलेल्या गाढवाच्या तोंडांत ओतली आणि ती रामेश्वराला पोंचली असें समाधान मानलें. "अवघे चराचर" ईश्वरस्वरूप आहेत अशी त्यांची स्थिर मति होती, आणि तशीच होती त्यांची रोकडी कृतिहि.

## दोन जीर्णोद्धार

ज्ञानदेव हे जसे मराठींतील आद्य कवी, नामदेव जसे आद्य चरित्रकार, तसें एकनाथ हे आद्य-संशोधक. तीनशें वर्षांपूर्वीं लिहिलेल्या ज्ञानेश्वरींत पुष्कळ भेसळ झालेली होती. ती काढून टाकून ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत नाथांनीं संशोधून तयार केली आणि आपल्या रसवंतीनें तिचा प्रसारही खूप केला. या वाङ्मयीन संशोधनाप्रमाणेंच भौतिक सृष्टींतील समाधीचीही त्यांनीं दुरुस्ती केली. मुसलमानांच्या आक्रमणामध्यें ज्ञानदेवांचें समाधीस्थान नामशेष झालें होतें—झाडाझुडपांत पडलें होतें. तेथें वस्ती कोणाचीसुद्धां नव्हती. तेव्हां "अजानवृक्षाची मुळी कंठासी लागली। येऊनि आळंदी काढी वेगी" असा स्वप्नांत नाथांना ज्ञानदेवांचा दृष्टांत झाला. त्याप्रमाणें ते आळंदीस गेले. तेथें त्यांनीं "नदीमाझारी देखिलें द्वार." त्यांनीं त्या समाधीचा जीर्णोद्धार केला. शके १५०५ मध्यें जेष्ठांत समाधीचा जीर्णोद्धार

आणि शके १५०६ मध्यें भाद्रपदांत ज्ञानेश्वरी ग्रंथाचा जीर्णोद्धार करून नाथांनीं भागवत–धर्मावर, वारकरी–संप्रदायावर, किंबहुना अखिल महाराष्ट्रावर डोंगराएवढे कायमचे उपकार करून ठेवले आहेत.

## ग्रंथांचा विस्तार

नाथांचें ग्रंथभांडार किती विपुल, किती विविध व किती संपन्न. त्यांचें भागवत म्हणजे १८,८०० ओव्यांचा सुरस ग्रंथ—केवळ एकादश स्कंधावरील ती टीका. तिला मान ज्ञानेश्वरीच्या बरोबरीचा आहे. भावार्थ रामायणाच्या २५,००० ओव्या नाथांनीं रचल्या. त्यांच्या एका शिष्यानें १५,००० ओव्या रचून हा ग्रंथ पुरा केला. रुक्मिणी स्वयंवर हें त्यांचें मधुर काव्य, १७११ ओव्यांचें आहे. याला आधार म्हणजे भागवतांतील फक्त १४४ श्लोक. श्रीशंकराचार्यांनीं हस्तामलक नांवांचें चौदा श्लोकांचें एक स्तोत्र रचलें आहे. त्यावर नाथांनीं ६७४ ओव्यांची टीका केली आहे. त्यावरून ज्ञानेश्वरांप्रमाणेंच नाथांच्या लेखनांत भाषांतराचा भाग किती अल्प आहे आणि स्वतंत्र प्रज्ञेचेंच स्फुरण मुख्य कसें आहे हें स्पष्ट होतें. शुकाष्टक ( ४४७ ओव्या ), स्वात्मसुख ( ५१० ओव्या ), आनंद-लहरी ( १५४ ओव्या ), चिरंजीवपद ( ४२ ओव्या ) इत्यादि ग्रंथांच्या राशीच्या राशी नाथांनीं ओतल्या आहेत. याशिवाय फुटकळ अभंग ३००, भारुडें ३०० अशी पत्री तर खूपच आहे.

## मराठीचा कैवार

बहुजनांच्या उद्धारासाठीं बहुजनांच्या भाषेंत आपले विचार मांडणें हें किती सरळ, सोज्वळ, 'पवित्र कार्य बरें ! पण तें अंगावर घेणें म्हणजे संकट ओढवून घेणें अशी विपरीत स्थिति त्यावेळीं होती. संस्कृत हीं प्रौढ भाषा खरी, पण ती कांहीं मूठभर पंडितांचीच भाषा झाली होती. तीच पारमार्थिक ग्रंथ–रचनेला योग्य, असें त्या मिरासदारांचें म्हणणें होतें. त्यांना मराठींत ग्रंथ लिहिणें हा भ्रष्टाकार वाटत असे. त्यांच्या विरोधाचा ओघ ज्ञानेश्वरां-पासून मोरोपंतांपर्यंत एकसारखा वहात आलेला दिसतो. पण तो गिळून टाकून मराठी काव्यरचनेचा शुभ्र प्रवाह महाराष्ट्राच्या या टोकापासून

त्या टोकांपर्यंत खेळविण्याचें धैर्य व सामर्थ्य महाराष्ट्र शारदेच्या सुपुत्रांनीं व्यक्त केलें. ज्ञानेश्वर तर आपले मराठी बोल हें अमृतापेक्षांही अधिक गोड असल्याची ग्वाही पैजेनें देतात, पण त्यांना विरोधकांशीं फारसें झुंजावें लागलें नाहीं. त्यांनीं फक्त मातृभाषेचा जयजयकार केला.पण एकनाथांना विरोधकांना तोंड द्यावें लागलें आणि मातृभाषेची वकिली करावी लागली. मराठीचाच कैवार पण तो घेतांना, आपल्या तान्हुल्याचें कोडकौतुक करणाऱ्या माउलीप्रमाणें ज्ञानेश्वर हर्षानें बोलतात; तर आपल्या मुलावर खोटें बालंट घेणाऱ्या शेजारणीवर कडाडणाऱ्या आईचा सात्त्विक संताप नाथांच्या वाणींत उसळत आहे. अगदीं पहिल्या ग्रंथांत—चतुःश्लोकी भागवताच्या टीकेंतसुद्धां–नाथांनीं म्हटलें आहे,

श्रीभागवत आणि भाषें मराठें । हें बोलणें नवल वाटे ॥
पूर्वीं नाहीं ऐकिलें कोठें । अभिनव मोठें धिटावा केला ॥

पुढें एकनाथी भागवतांत तर त्यांनीं मराठीची वकिली वारंवार कुशलतेनें केली आहे. " देवासि नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान " हा आपला सिद्धांत संस्कृत–भक्तांच्या गळीं तें परोपरीनें उतरवीत आहेत. " देखोनि मराठी गोष्टी । न म्हणावी वृथा चावटी " असें तें त्यांना आर्जवून सांगत आहेत. " येथें ठेवूं जातां दूषण । दोषी आपण होई जें " असा बारीक धाकहि ते घालीत आहेत. " सूर्य कधीं शिळा होतो काय ? सोन्याचीं फुलें कधीं गंजतात काय? " असे सौम्य प्रश्न करून नाथ युक्तिवाद करतात कीं,

कपिलेचें म्हणावें क्षीर । वा इतरांचें ते काय नीर ॥
वर्णास्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥

संस्कृतांतील ज्ञान म्हणजे समुद्रांतील मोतीं. समुद्रांत बुडी मारून तें मोतीं वर आणण्याची ताकद सर्वांजवळ कशी असणार ? पण " ते सांपडलिया घरीं विहीरीं । जो अव्हेरी तो मूर्ख " असा रागाचा शेराहि नाथांनीं मारला आहे; एवढेंच नव्हे तर सात्त्विक संतापानें व स्वाभिमानाच्या आवेशानें तें संस्कृत–भक्तांस विचारतात,

संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत काय चोरापासोनि जाली ? ।

## भागवताचा गाभा

नाथांचे मुख्य ग्रंथ दोन—भागवत व रामायण. भागवताच्या अकराव्या स्कंधावर नाथांनीं केलेली टीका सुबोध, ओघवती व प्रासादिक अशी आहे. गीता हें जसें भारताचें उत्तमांग, तसा हा स्कंध भागवताचें हृदय. गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जसें ब्रह्मज्ञान सांगितलें, तसें या स्कंधांत त्यांनीं उद्धवाला आत्मज्ञान निरुपलें आहे. गीतेवर ज्ञानेश्वरांची टीका ९००० ओव्यांची, तर या स्कंधावर नाथांची टीका १८,००० ओव्यांची. या दोन्ही गीतांना वारकरी लोक समान आदरानें भावतात. विषय व विचार यांच्यामध्येंही पुष्कळच समानता आहे. भाषा व कल्पना यांमध्यें मात्र पुष्कळ अंतर आहे. ज्ञानोबांचे शब्द म्हणजे आकाशीचीं नक्षत्रें, तर एकोबांचीं अक्षरें म्हणजे पृथ्वीवरील फुलें.

नाथांची गुरुभक्तीही ज्ञानेशांप्रमाणेंच अपरंपार आहे. बाराव्या अध्यायाच्या मंगलाचरणांत नाथ म्हणतात 'ज्ञानाच्या वनांतील वसंत म्हणजे सद्गुरु.' त्याच्या आगमनाबरोबर अविद्येचीं जुनीं पानें गळून पडतात आणि "अति लवलव नवपल्लव" फुटूं लागतात, "मीच परमेश्वर" अशा भावनेचीं फुलें फुलूं लागतात आणि त्यावर कृष्णभ्रमर झेपावतात. मोक्षसुखाचें गोड घड चोहोंकडे दिसूं लागतात आणि मुमुक्षु-मयूर पिसारे पसरून व आनंदानें नाचून गुरुच्या नांवानें टाहो फोडतात. या ज्ञानवनांतील भक्तिसरोवरांमध्यें भक्त स्नान करतात, आणि निर्मल व आनंदी होतात.

## सर्वत्र परमेश्वर !

गुरुभक्तीप्रमाणें ईश-भक्तीचा महिमाहि नाथांनीं आपल्या भागवतांत घोळून घोळून सांगितलेला आहे. खऱ्या भक्ताला सर्वत्र देवच कसा दिसतो हें सांगतांना ते म्हणतातः—

आपुला देह घालोनि पुढें । जें जें दृष्टीं आतुडे ॥
तेथ भगवद्भावें ठसा पडे । वाडेंकोडें निश्चित ॥
काया वाचा आणि चित्तें । सर्वाभूतीं भजले मातें ॥
त्यांसी भगवद्रूप सर्वभूतें । सुनिश्चितें ठसावती ॥

जेंवि गरुडाचे झडपेतळीं । होती सर्पाच्या चिरफळीं ।
तेंवि ये भाक्ति जंवळीं । विघ्नांची होळी स्वयें होये ॥
गगन पडो पाहे कडाडें । पृथ्वी उलथावया गडगडे ।
ऐसे मांडलियाहि सांकडें । नाम पढे श्रीहरीचें ॥

## भक्ताचें वर्तन

भक्ताचें वर्तन कसें असावें हें नाथांनीं भागवतांत अनेक ठिकाणी विस्तारानें सांगितलें आहे.

सत्यापरतें नाहीं तप । सत्यापरता नाही जप ॥
सत्यें पाविजे सद्रूप । सत्यें निष्पाप साधक होती ॥

आत्मज्ञानाचा उलगडा किती सोप्या शब्दांनी नाथांनीं केला आहे. ते सांगतात,

जेणें आपणासि होय दुःख । तें भूतासि करीना निःशेख ॥
जेणें आपणासि होय सुख । तें आवश्यक करी दीना ॥

यांत आत्मौपम्य आलें, ‘ अहं ब्रह्मास्मि ’ आलें, सर्व कांही आलें.

भक्तानें आपला संसार कसा चालवावा याचा कित्ता नाथांनी स्वतःच्या आचरणानें घालून दिलाच होता. “ देही असोनी नाहीं अहंकृति । गेहीं असोनी नाहीं गृहासक्ती ” अशा अलिप्तपणानें, पाण्यांतील कमलाप्रमाणें, किंवा कमलावरील पाण्याप्रमाणें, ते संसारांत वागत. अन्नदान व ज्ञान-दान यांचें जणु मुक्तद्वारच त्यांच्या घरीं चाळीस वर्षे चाललेलें होतें. साहजिकच ते उपदेशितात,

अन्न-वस्त्र-दान मान । पोटींच्या कळवळ्यानें जाण ॥
करावें भूतीं प्रियाचरण । हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥

## जातिपेक्षां गुण श्रेष्ठ

भक्तीचे गोडवे नाथांनीं अति गोडपणें गाइले आहेत.

भक्ती ते मूळ ज्ञान ते फळ । वैराग्य केवळ तेथीचें फूल ।
भक्ती ते माता मुक्ती ते दुहिता । जाणोनि तत्वता भजन करी ॥

अशी भक्तीची फलश्रुति नाथांनीं सांगितली आहे. भक्ती न करणाऱ्या ब्राह्मणापेक्षां भक्ती करणारा शूद्रही श्रेष्ठ आहे, असें सांगून नाथांनीं जातीपेक्षां गुणाला महत्त्व अधिक दिलें आहे. त्यांनीं स्पष्टच म्हटलें आहे.

हो कां वर्णांमाजीं अग्रणी । जो विमुख हरिचरणीं ।
त्याहुनि श्वपच श्रेष्ठ मानी । जो भगवद्भजनीं प्रेमळ ।।

भक्तीशिवाय ज्ञानाचें ओझें वागविणाऱ्या विद्वानाला नाथांनीं " चंदनभार वाहे खर । परी तो नेणें सुवासाचे सार । " अशा पदवीस नेलें आहे. " ज्यासि सर्वभूतीं बुद्धी समान । तोचि भक्ती तोंचि ज्ञान " अशा समतेचा उपदेश नाथांनीं केलेला आहे. " एका जनार्दनी नाहीं यातीचें कारण । " असा स्वच्छ निर्णय त्यांनी दिलेला आहे.

## सगुण मूर्तीचें ध्यान

भक्ती ज्या देवाची करावयाची त्याचें रम्य वर्णन भागवतामध्यें वारंवार आलेलें आहे. निर्गुण परमेश्वराचें स्वरूप त्यांनीं वर्णन केलें आहेच, पण जे निर्गुणरूप जाणूं शकत नाहींत, त्यांच्यासाठीं सगुण भक्तीचा उपदेश त्यांनीं केलेला आहे. "जैसें सुवर्ण आणि कंकण । " किंवा "विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरीस गोड आहे " असें निर्गुण-सगुणाचें नातें त्यांनीं समजावून सांगितलें आहे. श्रीकृष्णाच्या सगुण मूर्तीचें ध्यान त्यांनीं किती बहारीनें रेखाटलें आहे.

दीपकलिका हातीं चढे । तैं घरभरी प्रकाशु सांपडे ।
माझी मूर्ति जैं ध्यानिं जडे । तैं चैतन्य आतुडे अवघेंचि ।।

निर्गुण चैतन्य मनी ठसण्यासाठीं सगुण मूर्ति डोळ्यापुढें उभी हवी. ती मूर्ति कशी ? तर " घवघवीत घनसांवळा । मुकुट कुंडलें मेखळा । कंठीं कौस्तुभ वनमाळा । सोनसळा झळकत." पूजेसाठीं जी मूर्ति करावयाची ती कशी असावी याचें नाथांनीं किती बारकाईनें वर्णन केलें आहे. "पाहतां निवे तन–मन । देखतां जाय भूक–तहान । घवघवीत प्रसन्न वदन । कृपालेक्षण सुकुमार ।। जे देखतांचि जीवीं जडे । अतिशयें सर्वांसी आवडे ।

पाहों जातां निजनिवाडें । पूर चढे प्रेमाचा ॥ ईषत् दिसे हास्यवदन । अतिशयोसि सुप्रसन्न । " अशी रमणीय मूर्ति नाथांनीं शब्दांनीं कोरली आहे.

भक्तीचें हें उच्च शिखर नाथांनीं स्वतः गांठलें होतें. ' देव पाहूं गेलों । तों स्वयमेव देवच झालों " असा अनुभव ते स्वतः सांगतात. सोन्याच्या भक्तानें, सोन्याच्या देवळांत, सोन्याच्या देवाची, सोन्याच्या कमलांनीं पूजा करावी तशी नाथांची अवस्था झाली. 'साखरे अंगी गोडी,' किंवा 'कापुरा अंगीं सुगंध,' तसा नाथांच्या अंगीं देव मुरून गेला.

## राम-कथेवरील रूपकें

भागवताप्रमाणें 'भावार्थ रामायण' हाहि नाथांचा ग्रंथ मान्यता पावलेला आहे. कृष्ण व राम यांत नाथांना भेद कसला ? " सगुण चरित्रें परम पवित्रें " गाण्यास ते आसुसलेले. श्रीकृष्णाप्रमाणेंच श्रीरामाचें वर्णनही त्यांनीं तन्मयतेनें केलें आहे. तें करतांना त्यांनीं केवढी नम्रता धारण केली आहे ! " मूर्खपण माझी मिराशी " अशी आपली भूमिका ते सांगतात. मग तुम्ही रामचरित्राचें कार्य अंगावर कां घेतलें ? असें कोणी विचारील. त्याला नाथ उत्तर देतात, " रामें पुरविली पाठी । तो रामच वदवी कथा बलात्कारें " फार काय ? " लेखणी देवोनि हातीं । राम निजकीर्ति लिहवितो ॥ " नाथांनीं आपल्या रामायणांत अध्यात्म-विचारांची व रूपकांची वृष्टि केली आहे. अज म्हणजे परब्रह्म, दशरथ म्हणजे दशेंद्रियें, कौसल्या म्हणजे सद्विद्या, सुमित्रा म्हणजे मेधा, कैकेयी म्हणजे अविद्या आणि मंथरा म्हणजे कुविद्या अशीं रूपकें नाथांनीं रामायणांत मोठ्या युक्तीनें रामकथेवर रचलीं आहेत. सोन्याच्या मूर्तीवर भरजरी कपडे घालावेत, त्याप्रमाणें नाथांचें हें कौशल्य आहे.

## सीतेचें स्वभाव-चित्र

राम म्हणजे परमात्मा व सीता म्हणजे त्याची चित्शक्ति. हें ऐक्य पटविण्यासाठीं ते दाखले देतात.

सीता रस श्रीराम स्वाद । सीता सुमन राम सुगंध ।
सीता बुद्धी श्रीराम बोध । अनन्य सिद्धी येरयेरा ॥

रामाबरोबर सीता वनवासास निघाली, त्या प्रसंगाचें वर्णन करतांना नाथ म्हणतात, " सूर्यासवें जैसि प्रभा । वसन्तासवें वनशोभा । तेवि जानकी जगदंबा । प्राणवल्लभासवें निघे" पुढें सीतेस रावणानें अशोक वनांत ठेवल्यावर हनुमंतानें तिची भेट घेतली व खूण म्हणून रामाची अंगठी तिला दिली. ती पाहतांच सीतेच्या मनांत कोणकोणते कल्लोळ उठले याचें चित्र नाथांनीं, अभिजात कवीच्या कुंचल्यानें, रंगविलें आहे. रामाची ती मुद्रिका पाहून " सर्वांगें हर्षली जानकी. " तिनें ती मुद्रिका वंदिली, चुंबिली, आलंगिली आणि ती तिला विचारूं लागली:—

मुद्रिके ! तूं सांगें गोष्टी । रावणें माते हरिल्यापाठीं ।
दोघे येवोनि पंचवटीं । अतिसंकटी काय केलें ? ॥
विजनीं मूर्च्छित पाडिलें ? । कीं वृकव्याघ्रीं फाडिलें ? ॥
किंवा सिंहें विभांडिलें ? । की रगडिलें वनगजीं ? ॥
तें तो महावीर निधडे । सिंह-व्याघ्र काय बापुडे ? ॥
शार्दूल पळती तयापुढें । केलें कुडे रावणें ! ॥
माझेनि दुःखशोकें जाणा । स्वयें रामें सांडिले प्राणा ? ॥
येऱ्हवी निवटोनि रावणा । माझे सोडवणा येता कीं ! ॥
मुद्रिके ! सत्य सांगें मजपाशीं । श्रीराम तरी जाहला संन्यासी ? ॥
अथवा पहुडला समाधिसेजेशी ? । किंवा देहासी त्यागिलें ? ॥

आपला प्रिय व पराक्रमी राम आपल्याला सोडविण्यास कां आला नाहीं याविषयीं सीतेनें ही " संशय-रत्न-माला " किती हृदयंगमपणें गुंफली आहे. तिच्यांत राग आहे, प्रेम आहे, निराशा आहे, अभिमान आहे— मानी आर्यस्त्रीचें हृदयच आहे तें !

## राजकारणाचे पडसाद

नाथांनीं आपल्या भावार्थ रामायणांत अध्यात्म—विचारांची पेरणी जागोजाग केली आहे, रूपकांचीं कारंजीं ठायींठायीं उडविलीं आहेत, प्रपंचातील प्रेमळ प्रसंगांचे गार ताटवे उभारले आहेत आणि विनोदाच्या गुलाबदाणींतून हास्याचा शिडकाव सर्वत्र केला आहे. पण याबरोबरच लक्षांत

येणारी विशेष गोष्ट म्हणजे त्यांनीं रामकथेंतून सद्यःस्थितीलाहि थोडीफार वाचा फोडली आहे. त्यांच्या आजूबाजूला मुसलमानी सत्तेनें स्वराज्य, स्वधर्म व स्वभाषा यांच्या होळ्या पेटविल्या होत्या. त्या विझविण्यासाठीं समाजानें नीतिमान् व धैर्यवान् व्हावयास हवें, आणि अंगांत स्वाभिमानाचें पाणी आणि प्रतिकाराचें तेज खेळवावयास हवें, अशी जाणीव शक्य तेथें देण्यास नाथ चुकत नाहींत. रामजन्माचे वेळीं कौसल्येला डोहाळे कोणते लागले हें सांगतांना नाथांनी तिच्या तोंडीं पुढील वीरश्रीची भाषा घातली आहेः—

पाचारा वनीचे वनचर । मुकुटकुंडलें द्या अलंकार ।
लंका जाळारे भडभडा । पाडा तडतडा राक्षस ॥
राक्षसांच्या शिरकमळीं । खेळूं लंकेपुढें चेंडूफळी ।
मोडा देवांचि बांधवडी । उभारा रामराज्याची गुढी ॥
नासारे जगाचीं दुःखें । त्रैलोक्य भरारें हरीखें ।
दुमदुमीत विश्व मुखें । परम पुरुषें श्रीरामें ॥

## रूपकांची रास

'रुक्मिणी–स्वयंवर' हें नाथांचें अतिमधुर काव्य आहे. श्रीधरस्वामी, मोरोपंत, सामराज, विठ्ठल वगैरे शें–पन्नास कवींनीं ही शृंगारवीरमिश्रित कथा आपापल्या काव्यांतून रंगविली आहे. पण " नाथांच्या त्या कथा-चंद्रिकेपुढें त्या तारका मंदप्रभ वाटतात. " कृष्ण–रुक्मिणीचें लग्न म्हणजे जीवशिवाचें ऐक्य, हें सूत्र तर सर्व कथेमध्यें नाथांनीं ओवलें आहेच. पण प्रसंगा–प्रसंगांनीं त्यांनीं रूपकाचें दारुकाम उडविलें आहे. कृष्ण रुक्मिणीच्या राजवाड्यांत यावयास निघाले, त्यावेळच्या मिरवणुकीचें नाथांनीं केलेलें वर्णन ऐका. पुढें ममतेच्या हवाया जळत होत्या. अतिलोभाच्या चिचुंद्र्या पेटवून दुर भिरकावल्या जात होत्या. क्रोधाचे भुइनळे, कामाचे हातनळे, अहंकाराचें बाण यांनीं जनमनरंजन होत होतें. मधून मधून निजतेजाच्या चंद्रज्योति तेज उधळत होत्या. महामोहाचा मत्त हत्ती पुढें डौलानें चालला होता. चतुर्विध मुक्ति हातीं कलश घेऊन महाद्वारीं उभ्या होत्या.

प्रत्यक्ष रुक्मिणीचें रूप रेखाटतांना नाथांनीं आपलें सर्व पदलालित्य व कल्पनाचातुर्य पणास लावलें आहे असें वाटतें. ते म्हणतात,

चंद्रमंडळामागेंपुढें । जैसे तारांगणांचे वेढे ।
तैशी मोतीलग तानवडें । दोहीकडे तळपती ॥
जैशीं नक्षत्रें नभमंडळीं । तैशी मुक्त मोतियांची जाळी ।
लेइलीसे भीमकबाळी । तेजें वेल्हाळी शोभत ॥
मुखामाजी दंत-पंक्ती । जैशा ओंकारामाजी श्रुती ।
पाहतां तळहातीच्या रंगा । उणें आणिलें संध्यारागा ।

द्वारकेचेंही वर्णन नाथांनीं मनोहर केलें आहे. ज्ञानेश्वरांनीं जसें योगाच्या स्थानाचें रम्य चित्र रेखाटलें आहे, तसेंच नाथांनीं द्वारकानगरीचें शब्दचित्र उभें केलें आहे, सारें वैभव, सारें रम्यत्व, सारें पावित्र्य, श्रीकृष्णाच्या त्या द्वारकेंत एकवटलेलें होतें.

वसंत निववीं सदा सुमनेंसी । संताप कोणासी असेना ।
डोलती पै द्राक्षांचे घड । मुक्तपरिपाकें अति गोड ।
कोकिळा कृष्णवर्ण कूजतीं । शब्द निःशब्द मधुर वृत्तीं ।
मयूर आनंदें नाचत । अप्सरा-नृत्य तेणें तटस्थ ।
शुद्ध हंस द्वारकावासी । मुक्त मोतिये चारा त्यांसी ।
तें देखोनियां परमहंसी । निजमानसीं लाळ घोंटी ।
शुकपिंगळे अनुवादत । तेणें वेदान्त दचकत ।
अति गुह्याचे गुह्यार्थ । पक्षी बोलत द्वारकेचे ॥

## भारुडांची दौलत

कडू औषध गोड करून देण्यांत नाथांचा अगदीं हातखंडा. ब्रह्मज्ञान हें समजावयास अति कठीण. तें सर्वांना कळावें म्हणून त्यांनीं सोप्या मराठी भाषेंत सांगितलें. तसेंच रामसीता, कृष्णरुक्मिणी यांच्या विवाहाच्या मनोवेधक कथेच्या साखरेमध्यें घोळूनही तें त्यांनीं दिलें. श्रीकृष्णाच्या मधुर चरित्राच्या मधांत खलूनही त्यांनीं तेंच आत्मज्ञान सर्वसामान्य लोकांना दिलें. तरीही हें ईश्वरविषयक ज्ञान आपण घ्यावें असें बहुजनसमाजास

वाटत नाहीं. निंदा, टवाळी, सोंगेंढोंगें यांचीच आवड बहुतेकांस. ती त्यांची आवड पुरवून त्यांना अध्यात्मज्ञान द्यावें अशी तळमळ संतांना, तशीच ती नाथांनाही. त्यासाठीं त्यांनीं सामान्यांतील सामान्याला, संसाऱ्यांतील संसाऱ्याला, अडाण्यांतील अडाण्यालाही कळतील, आवडतील, पटतील अशीं पदें शेंकडों रचलीं. गोड चाली, गमतीचे शब्द, व्यवहारांतील दाखले आणि विनोदी मांडणी यामुळें नाथांचीं हीं पदें कट्ट्याकट्ट्यावर व अड्ड्याअड्ड्यावर चकाट्या पिटणाऱ्या व गप्पा छाटणाऱ्या माणसांचेंही चित्त वेधून घेऊं शकलीं. त्यांचीं भारुडें म्हणजे तर विनोदाची मेजवानीच. भारूड म्हणजे बहुरूढ–बहुजनसमाजामध्यें रुजणारें–गद्याइतकें समजण्यास सोपें असतें. तेंही ज्यांच्या बुद्धीस पचणार नाहीं अशांसाठीं नाथांनीं शुद्ध गद्यांतहि गमतीचीं रूपकें रचलीं आहेत.

## बायकांच्या बोलींत ब्रह्मज्ञान

बायकांना स्वयंपाकाची आवड असते ना ? मग त्याच भाषेंत नाथांनीं परमार्थ–विचार सांगणारें एक पद रचलें आहे. संसाराला कंटाळलेली सून आपल्या घरांतल्या नातेवाईकांवर मनांतून कावलेली–रागावलेली असते ना ? त्याच तिच्या विकाराला नाथांनी आध्यात्मिक स्वरूप कसें दिलें आहे तें पहा. “ रोडगा ” या हास्यकारक पदांत नाथ म्हणतात,

सत्त्वर पाव ग मला । भवानिआई रोडगा वाहिन तुला ॥
सासरा माझा गांवीं गेला । तिकडेच खपवीं त्याला ॥
सासू माझी जाच करिते । लवकरि निर्दळीं तिला ॥
जाऊ माझी फड फड बोलती । बोडकी कर ग तिला ॥
नणदेचें पोर किर किर करतें । खरूज येऊं दे त्याला ॥
दादला मारूनि आहुती देईन । मोकळी करगे मला ॥
एका जनार्दनीं सगळेचि जाऊं दे । एकटिच राहूं दे मला ॥

सासुसासऱ्याची व जावानणदेची अशी फजिती कल्पनेंत येतांच कोणती संसारी स्त्री पोट धरधरून हंसणार नाहीं ? पण हंसें थांबल्यानंतर तिच्या मनांत असे विचार हळूहळू येतील कीं, पदांतील सासरा म्हणजे अहंकार,

सासू म्हणजे कल्पना, जावा म्हणजे निंदा, नणंद म्हणजे चिंता, नवरा म्हणजे अविवेक—या सर्वांवरील आसक्ति सोडून परमेश्वराच्या चिंतनांत आपण एकटेंच रहावें. दुसऱ्या एका पदांत "तुम्ही वेगळें निघा" असें एक बाई सांगते, तर दुसरी "मला दादला न लगे बाई" असा पुरोगामी विचारही मांडते !

निव्वळ शृंगाराचीच चटक ज्यांना, असेंही कांहीं तरुण असतात. त्यांच्यासाठीं नाथांनीं निवडलेलीं राधेचीं दोन पदें ऐका.

वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥
राधा पाहुनि भुलले हरि । बैल दुभे नंदाघरीं ॥
हरि पाहुनि भुलली चित्ता । राधा घुसळी डेरा रिता ॥
मन मिनलेंसें मना । एका भुलला जनार्दन ॥ १ ॥

कृष्णा माझा पदर धरूं नको, सोड ॥
जाउनि सांगेन मी यशोदेला । मोडिन चांगली खोड ॥
तूं वनमाळी मी भोळी राधा । माझी तुझी नच जोड ॥
एका जनार्दनीं म्हणें मनमोहन । नाम तुझें बहु गोड ॥ १ ॥

प्रत्येक पदाचे शेवटीं दिलेली आध्यात्मिक कलाटणी कलात्मक नाहीं काय?

## 'एकाचीं' अनेक सोंगें

समाजाला दररोज भेटणारे, जागे करणारे, खूष करणारे असे गोंधळी, वासुदेव, कानफाटे, गारुडी, कडकलक्ष्मी, फकीर इत्यादि लोक पुष्कळच असतात. त्यांच्या नांवानें आध्यात्मिक विचार 'खपविण्याची' युक्ति ज्ञानेश्वर–नामदेवांनीं थोडथोडी करून पाहिली आहे. ज्ञानेश्वरांचा पांगुळ, आंधळा, वासुदेव मौजचा आहे. नामदेवांनीं पुढची मजल मारली आहे. पण सर्वांत जास्त करामत केलीं आहे नाथांनीं. भिक्षा मागणाऱ्या व समाजापुढें सदैव असणाऱ्या बहुतेक सर्व वर्गांचीं सोंगें घेऊन नाथ समाजाला लाडीगोडीनें शिकवीत आहेत. त्यांनीं घातलेला "जगदंबेचा गोंधळ" ऐकतांच खेड्यांतील सारे कारूनारू कान टवकारून ऐकत असतील. जगदंबेला उद्देशून नाथ म्हणतात,

दार उघड, बया दार उघड ॥
उदो उदो ऐसा शब्द गाजतो ।
कामक्रोधदैत्यावर कोरडा कडकडां वाजतो ।
ज्ञानपोत पाजळतो । बोधाची परडी घेतो ।
प्रेमाचा पाऊल पुढें टाकतो । अहंशंखासुर दैत्यबळी घेतो ॥
रणवाद्य भम भम् भम् । दण् दण् दण् कड् कड् कड् ।
तोचि गोंधळ अंबे तुजप्रती । बया दार उघड ॥
त्वां रणकुंड जबडा पसरिला । आहुती घेसीं दोनी दळां ।
रथ घोडे कुंजर तुला । नारळें बया अर्पिलीं ।
अंबे, तुझी न वर्णवे थोरी । खेळ खेळसी वैष्णवामाझारीं
पुंडलिक दिवटा महाभारी । ओवाळिसी महामाया ॥

## सर्व वर्गांना शिकवण

कधी वाघ्या–मुरळीचें सोंग घेऊन भक्तीचा भंडारा नाथ लुटतात, तर कधीं " मी आलों रायाचा जोशी । होरा ऐका दादांनों " अशी हांक देऊन नाथ सर्वांना सुखाचें भविष्य सांगतात, " येथूनि पुढें बरें होईल । भक्तिसुखें दोंद वाढेल " मात्र त्यासाठीं " जा शरण सद्‌गुरुशीं " असा उपदेश ते करतात. त्यांचा ' वेडापिसा " हीच शहाणपणाची गोष्ट सांगतो. त्यांचा " आंधळा " हेंच ज्ञान दाखवितो, त्यांचा " बहिरा " देवाधर्माच्याच गोष्टी ऐकवितो आणि त्यांचा ' मुका ' बोलतां तेही ब्रह्मज्ञानच. त्यांचा ' जागल्या ' पुकारतो ' उठा कीं जी मायबाप ! कशी लागली झोंप । हुजूर जाऊनि या । एवढी चुकवा खेप ' स्वार्थाच्या झोपेंत घोरत पडलेल्या लोकांनीं उठावें आणि ईश्वराकडे जाऊन जन्ममरणाचा फेरा चुकवावा हें किती नम्रतेनें सांगितलें आहे. नाथांचा ' बाळ संतोष ', त्यांचा 'वासुदेव', त्यांचा ' गारुडी ' हे सारे वेगवेगळ्या भाषेंत पण एकच विचार बोलतात. सामान्य जनांना भांडणाची आवड मोठी. ती लक्षांत घेऊन नाथांनीं हिंदु–मुसलमानांचा एक झगडा लावून दिला आहे. पण त्यांतही ओतलें आहे अध्यात्मच. ' खुदाकु तो जात नही । ' असा विश्वबंधुत्वाचाच

उदार विचार या भांडणांतूनही नाथांनीं काढला आहे. महाराच्या बोलींत ब्रह्मज्ञान सांगण्याची करामतही नाथांनीं केली आहे. त्यासाठीं त्यांनीं पांच-पन्नास ‘ जोहार ’ रचिले आहेत. ‘ जोहार मायबाप जोहार । मी विठू पाटलाचा महार ’ अशी आरोळी नाथ देतात.

## मधुर पदें

इतकें सोपें, इतकें गोड आणि इतकें रम्य रूप नाथांनीं परमार्थ-विचाराला दिलें आहे. अगदीं संसारांतील भाषा, लहान मुलांच्या खेळाची भाषा, तीच घेऊन नाथ गूढ धर्माचा खोल विचार स्त्री-पुरुषांच्या कानीं मोठ्या मौजेनें घालीत आहेत. याचें एक ठळक उदाहरण म्हणजे वात्सल्य-रसानें ओथंबिलेलें पुढील पद पहा,

असा कसा देवांचा देव बाई ठकडा ?
देव एका पायानें लंगडा ग । बाई ।। असा० ।।

गवळ्याघरी जातो दहिंदुध खातो ।
करि दह्यादुधाचा रबडा ग बाई ।।

शिंकेंचि तोडितो मडकेंचि फोडितो ।
पाडि नवनीताचा सडाचि ग बाई ।।

वाळवंटी जातो कीर्तन करितो ।
घेतो साधुसंतांसि झगडा ग बाई ।।

एका जनार्दनी भिक्षा वाढा बाई ।
देव एकनाथाचा बचडा ग बाई ।।

बायकापोरांच्या जिभेवर असलीं गाणीं सहजच खेळतात. त्याचप्रमाणें बाल–कृष्णाचें वर्णन किती कोमल शब्दांनीं नाथांनीं केलें आहे पहा.—

भिंगाचें भिंगुलें खांद्यावरी आंगुले ।
नाचत तान्हुलें यशोदेचें ग बाई । यशोदेचें ।।

कडदोरि बिंदुलीं वाघनखें साजिरीं ।
नाचत श्रीहरी यशोदेचा ग बाई । यशोदेचा ॥
पायी घागरिया वाक्या साजरिया ।
कानींच्या बाळिया ढाळ देति ग बाई । ढाळ देती ॥
गोपिका भोळिया वाजविती टाळिया ।
आमुचा कान्हया देवराव ग बाई । देवराव ॥
येती गवळिणी करिती बुझावणी ।
लागति चरणीं गोविंदाच्या ग बाई । गोविंदाच्या ॥
एका जनार्दनी एकत्र शरण ।
भावें निंबलोण उतरति ग बाई । उतरति ॥

## जिवाजीपंतास ताकीद

लहान मुलाला आई भात कालवून देते. पण कालविलेला भात तरी त्या मुलानें तोंडांत घातला पाहिजे ना ? त्याचेसाठी आई बारीक बारीक बुत्त्या करून भरवितें. त्याच प्रेमानें नाथांनीं सोपें गद्य लेखनही बरेंच केले आहे. त्यावेळच्या सरकारी कचेऱ्यांतून ज्या तऱ्हेचें अर्ज, पत्रें, करारनामें जात-येत असतील, तसें गद्य नाथांनीं लिहिलें आहे. हेतु हा की, कज्जेदलालीत गटांगळ्या खाणाऱ्या लोकांनाही परमार्थ–विचार ऐकवावा. नाथांचें एक ताकीद–पत्र पहा.

"समस्त राज्यकर्ते धुरंधर, परगणे शरीराबाद सुभा, ताकीदपत्र दिधलें कीं, कायापुरास जिवाजी नामें गृहस्थ. त्यास कौल देऊन देहगांवची वस्ती आबाद रक्षावयानिमित्त पाठविले आहेत. तर कोणत्याहि गोष्टीचा ताप न लागेल, व हरएक विषयीं साहित्य करावें. मनाजीराव सुभेदार, बुधाजीपंत फडणीस, चित्ताजीपंत चिटणीस. हे थोर मनुष्य असतात. अहंकाराजीपंत सबनीस याचें हवालीं सर्व देहगांवचा कारभार दिधला."

एका शेताचें रूपक करून नाथांनीं सद्गुणांचा उपदेश कसा केला आहे हेंहि पहाण्यासारखें आहे. मानवी जीवाला उपदेश करतांना ते म्हणतात,

" चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार। यांसी आत्मारामपंत कमावीसदार। कसबे ब्रह्मपुरी आशिर्वाद उपरी। तुम्हांसी देहगांवचें ठाणें दिलें। तर ठाण्यांत सावधपणें वर्तणूक करणें ॥ धैर्याचा नांगर धरून शेतांतील मदेखट काढून वासनेच्या पालव्या तोडून संशयाचा गाशा गोळा करून भूमिका शुद्ध करून मग भक्तिज्ञानवैराग्य तिफणी करून सद्गुरुमुखें निजबीज पेरणें ॥ जेथें शुद्ध सत्त्वाचा मेघ वर्षला ॥ तेथें सत्याचा माळा घालून ॥ कुतर्क पांखरूं उडवून देणें ॥ जागोजागीं विश्वास रक्षण ठेवून ॥ शेतांतील माल अवघाचि गोळा करून षड्गुणऐश्वर्य बैल जुंपून ॥ अवघाचि माल मोजून ॥ सहहुजूर ब्रह्मपुरीस येणें ॥ "

## जीवनाचें रहस्य

अशा तऱ्हेनें अध्यात्मविचारांचें सहस्रधारांचें कारंजें सतत चाळीस वर्षें उडवून, एकनाथ वयाच्या ६६ व्या वर्षीं, शके १५२१ मध्यें दिवंगत झाले. त्यांच्याइतकें लेखन व कीर्तन करणारे संत विरळा, आणि त्यांतही त्यांच्याइतकी विविधता व रम्यता साधणारे संत तर दुसरे कोणीच नाहींत. प्रपंच व परमार्थ यशस्वीपणें साधणारे संतही तेच. त्यांचा उपदेशही असा समतोलच आहे.

कुटुंब पीडूनी आपण। अन्यत्र द्यावें अन्नधन।
तोचि अधर्म परिपूर्ण। शुद्धपुण्य तें नव्हे ॥

कुटुंबेसी यथोचित। सुखी करुनि समस्त ॥
याहूनि उरला जो अर्थ। तो श्रेयार्थ वेंचावा ॥

संसार करतांनाही नाथांची वृत्ति कशी असे, याचें वर्णन त्यांनींच मोजक्या शब्दांनीं केलें आहे. ते आपल्या भागवतात म्हणतात, " शांति सकळ वैभवेंसि। अखंड असें संतापाशीं। " चित्तांत शांति, मुखांत हरीनाम आणि हातून परोपकार अशा साधनांनीं आपलें सारें जीवन नाथांनीं धन्य केलें. हें जीवन अलौकिक आहे, सुखमय आहे, सर्वांना ध्येयरूप

वाटणारें आहे. अशा या जीवनाची गुरुकिल्ली कोणती ? ती गुरुकिल्ली म्हणजे, नाथ सांगतात,

> एवं तो सगळा मजभीतरीं । मी तया आंत बाहेरी ॥
> ऐसेनि अभिन्नपणें करी । सुखें संसारी नांदतू ॥





# संत तुकाराम : : : ४

संध्याकाळचे वेळीं पश्चिमेकडे लालभडक मावळतें सूर्यबिंब क्षितिजावर टेकत असावें आणि त्याचवेळीं पूर्वेकडे पिवळेंधमक उगवतें चंद्रबिंब क्षितिजांतून वर येत असावें, अशी रमणीय घटना भागवत–धर्माच्या इतिहासांत सोळाव्या शतकामध्यें घडून आली. भागवतधर्माचा प्रसार समाजाच्या सर्व थरांतून करणारे एकनाथ शके १५२१ मध्यें समाधिस्थ झाले, तर शके १५२० मध्यें तुकारामाच्या रूपानें भक्तीचा अधिकच तेजस्वी असा तारा उदयास आला. आणि त्यानंतर दहाच वर्षांनीं रामदासही महाराष्ट्रभूमीच्या कुशींत जन्मास आले ही केवढी भाग्याची गोष्ट ! तुकारामाच्या घराण्यांत विठ्ठलाची भक्ति आठ पिढ्या चालत आलेली होती. तिचें पक्व फळ

म्हणजे तुकाराम. रामदासांच्या घराण्यांतही आठ पिढ्या सूर्याची उपासना चालू होती. तिचा परिपाक म्हणजे समर्थ.

पण याहीपेक्षां मोठा वारसा या दोघांना मिळाला होता आणि तो म्हणजे भागवतधर्माचा. ज्ञानदेव–नामदेव–एकनाथ हेच खरोखर तुकाराम-रामदासांचे पूर्वज. विठ्ठल हाच त्या सर्वांचा आदिपुरुष. सर्वांचें जन्म–ग्राम एकच–आणि तें म्हणजे पंढरपूर. सर्वांचा व्यवसाय एकच–आणि तो म्हणजे विठ्ठलभक्ति. साधुसंत हेच त्यांचे सगेसोयरे. आषाढी–कार्तिकीच्या वाऱ्या हेच त्यांचे सण–समारंभ. आणि त्यांचें संतान? आपण सारे महाराष्ट्रीय जन हींच त्यांचीं मुलेंबाळें. पिढ्यान्‌पिढ्या पुरेल अशी अध्यात्माची अलोट दौलत या आपल्या वाडवडिलांनीं ठेवलेली आहे.

## नामदेवाच्या कार्याची पूर्णता

ज्ञानदेवामुळें आळंदी, एकनाथामुळें पैठण, तसें तुकारामामुळें देहू हें गांव प्रसिद्धी पावलें व लाखों वारकऱ्यांचें पूजास्थान बनलें. ज्ञानदेवांनीं भागवत धर्माच्या इमारतीचा पाया घातला आणि तिचा कळस झाले तुकाराम. नामदेवाप्रमाणें तुकारामांनींही स्वतःचें चरित्र अभंगांत लिहून ठेवलें आहे. शतकोटी अभंगांचा नामदेवांचा संकल्प पुरा करण्यासाठींच तुकारामांचा जन्म होता असेंहि मानण्यांत येतें. ‘ नामदेवें केलें स्वप्नामाजि जागें । सवें पांडुरंगें येऊनिया ” असा अनुभव प्रत्यक्ष तुकारामांनीं एका अभंगांत लिहून ठेवला आहे. देव व नामदेव या दोघांनीं स्वप्नांत येऊन तुकारामांना “ सांगितलें काम करावें कवित्व ”. त्याप्रमाणें “ उरलें शेवटीं लावी तुका. ” पांच कोटी अभंगांची भरती तुकारामांनीं केली आणि शंभर कोटीचा नामदेवाचा संकल्प पुरा केला अशी आख्यायिका आहे. पण आजमितीला तुकारामाचे अभंग उपलब्ध आहेत सुमारें पांच हजारच. त्यांतही खरे किती, खोटे किती, मूळचे किती, प्रक्षिप्त किती याबद्दल वाद आहे. आठदहा तुकाराम त्या सुमारास होऊन गेले. शिवाय इतर सालोमालो होतेच. त्या सर्वांनीं मूळ झऱ्यामध्यें आपले किती ओघ मिसळले असतील हें एक पांडुरंगच जाणे! तुकारामांनीं पंचवीस–

तीस वर्षे जे अभंग रचले, ते लाख दोन लाख असणें अशक्य नाहीं. पण काळाच्या इंद्रायणींत तरले काय ते पांच हजार.

## संसाराची राखरांगोळी

लौकिक दृष्टीनें पहातां, तुकारामाचा जन्म पुण्याजवळील देहू गांवीं कुणब्याच्या कुळांत शके १५२० मध्यें झाला. त्यांचें आडनांव आंबिले. त्यांच्या वडिलांचें नांव वोल्होबा आणि आईचें नांव कनकाई. तुकोबांचीं दोन लग्नें झालीं. पहिली बायको रखमाबाई व दुसरी जिजाई. सतराव्या वर्षापर्यंत तुकोबाचा संसार दहाजणांसारखा चालला होता. घरीं वाण्याचा धंदा होता, तो ते पहात. पण सतराव्या वर्षीं त्यांच्यावर चोहोंबाजूंनीं संकटें कोसळलीं. आई मेली, वडील वारले, वडीलबंधु विरक्त होऊन तीर्थयात्रेस निघून गेले. त्यानंतर चार वर्षांनीं भयंकर दुष्काळ पडला. " दुष्काळें आटिलें, द्रव्यें नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली. " दुष्काळांत पहिली बायको रखमाबाई आपल्या मुलांसह मृत्यु पावली. उरली आवली. तिचेंच नांव जिजाई. ती कजाग-पणानें व भांडखोरपणानें इतिहासांत गाजलेली आहे—जशी कांहीं सॉक्रे-टीसची झांटिफीच. पण तिच्या दृष्टीनें विचार केला, तर ती इतर दहा-जणींसारखीच होती असें दिसतें. इतर सामान्य संसारी स्त्रिया काय करतात, तें ती करीत होती. पतीची देवाप्रमाणें ती भक्ती करीत होती, आणि मुलाबाळांना जेऊंखाऊं घालत होती. पण तुकोबा आणि संसार यांच्यांत छत्तीसाचा आंकडा ! त्यांना स्वतःच्याच देहाची शुद्ध नसे, तेथें मुलांबाळांच्या खाण्यापिण्याची काय दाद? त्यामुळें जिजाई कावलेली, संतापलेली असे, एवढेंच. ' काय तरी देऊं तोडतील पोरें ' हा प्रश्न तिला रोज भंडावून सोडी. ' संसारीं काढूं आपदा किती ' असें तिला होई.

## परमार्थाकडे धांव

तुकाराम म्हणजे साधा वाणी—एक अडाणी मराठा. त्यामुळें घरच्या या दुःखानें त्यांचा जीव त्रासला. " लज्जा वाटे जीवा " असें त्यांना झालें. 'नको हा संसार' असें त्यांना वाटूं लागलें. या तापांतूनच त्यांना अनुताप

उत्पन्न झाला. " झाला हा वमन संसार " अशी त्यांची वृत्ति झाली. देवाकडे त्यांचें ध्यान लागलें. " सहज घडिली होती सेवा । म्हणोनि पुजितों या देवा " असें करतां करतां त्यांचें चित्त विठ्ठलाच्या भजनांत अधिकाधिक गुंतूं लागलें. त्यामुळें त्यांच्या चित्ताला शांति प्राप्त झाली. संसार-दुःखाचे कांटे त्यांना टोचेनासे झाले. उद्वेगाची भाषा न बोलतां ते वाईटांतून चांगलें काढूं लागले आणि म्हणूं लागले,

बरें ज़ालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥

## भक्तीची साधना

देहूजवळ भंडारा भामनाथ व गोरोडा या नांवाचे तीन डोंगर आहेत॰ त्यांपैकीं कोणत्या तरी एका डोंगरावर जावें, संसारापासून व समाजापासून दूर व्हावें आणि विठ्ठलाचें नामस्मरण करावें असा क्रम त्यांनीं आपल्या आयुष्याला लावला. त्या निर्जन डोंगरावर, पूर्ण एकांतवासांत, निश्चल मनानें, त्यांनीं पुनः पुनः ज्ञानेश्वरी वाचली, एकनाथी भागवताचीं पारायणें केलीं आणि देवाची भक्ती चित्तांत ठसविली. ' संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाचि ' अशी त्यांची पहिली अवस्था होती. ' बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दीस जालों कासावीस.' अशी तडफड त्यांच्या हृदयाची होत होती. त्यावर त्यांना एकच औषध माहीत होतें आणि तें म्हणजे विठ्ठलाचें भजन. घरीं विठोबाचें देऊळ होतें. तें भंगलेलें होतें. तें त्यांनीं दुरुस्त केलें, आणि तेथें कीर्तन करावयास सुरवात केली. हें कीर्तन म्हणजे भजनच—केवळ स्वतःसाठीं, लोकांसाठीं नव्हे.

आपल्या दुःखाचा पोटउकाला देवापुढें करावा आणि देवाचे गुण आठवून मनाला शांति मिळवावी म्हणून तुकोबा प्रारंभीं कीर्तन करीत असत. आरंभीं फक्त एकादशीस कीर्तन करीत, पण 'अभ्यासांत चित्त नव्हतें.' तेव्हां संतांचीं कांहीं वचनें त्यांनीं पाठ केलीं. दुसरें कोणी कीर्तन करूं लागलें तर

त्यांची साथ तुकोबा करीत. आळंदी जवळच होती. तेथें ते वारंवार जात. ज्ञानेश्वरांच्या समाधीपुढें बसत. निवृत्तीनाथांची समाधि त्र्यंबकेश्वरीं आहे. तेथेंही ते जात. पैठणास जाऊन नाथषष्ठीचा सोहोळाही त्यांनीं अनुभविला. मुख्य म्हणजे आषाढी—कार्तिकीच्या वाऱ्या करून पंढरींत पिकणारा भक्तिरस यथेच्छ चाखला. वयाच्या एकविसाव्या वर्षी शके १५४१ मध्यें त्यांना स्वप्नांत गुरूपदेश मिळाला. बाबाजी चैतन्य या गुरूंनीं 'रामकृष्णहरी' हा मंत्र दिला अशी ग्वाही तुकारामांनीं आपल्या एका अभंगांत स्पष्टपणें दिलेली आहे. ' यावरि जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ' असे समाधानाचे व सफलतेचे उद्गार ते काढूं लागले.

## सामान्यांना जिव्हाळा कां ?

आपल्यासारखाच चुकणारा, विव्हळणारा, धडपडणारा एक साधा जीव आता शांतीमध्यें, सुखामध्यें, आनंदामध्यें पोहत आहे हा फरक सर्वांना दिसूं लागला. शिडीच्या ज्या पायऱ्या चढून तुकोबा इतक्या उंच जागीं, मोकळ्या वातावरणांत, स्वच्छ प्रकाशांत जाऊन बसले, त्या पायऱ्य वरून आपणही जावें अशी इच्छा सामान्यजनांना होऊं लागली. ज्ञानेश्वरांसारख्यांचें जीवन म्हणजे गरुडाचें उड्डाण. त्याच्याकडे लोक केवळ विस्मयानें पाहतात. पण जमिनीवरून आपल्याप्रमाणेंच चालणारा, चालतां चालतां पडणारा, पडला तरी सावरून पुन: उठून उभा राहणारा आणि पुढें व पुढेंच चालणारा असा तुकारामासारखा संत या सर्वसामान्य जनांना जवळचा वाटतो, जिव्हाळ्याचा भासतो, मार्गदर्शक ठरतो. म्हणून तुकारामांच्या कीर्तनाला शेंकडों—हजारों श्रोत्यांची गर्दी होऊं लागली. आपल्या अंतःकरणांतील दुःख हा उकलून, उघडून दाखवितो आणि त्या दुःखावर धन्वन्तरीप्रमाणें अचूक मात्राही देतो, असा विश्वास त्या श्रोत्यांना दिवसेंदिवस अधिकाधिक येत गेला. द्राक्षाचीही साल काढावी आणि आंतील गोड गाभा चाखावयास द्यावा, अशा साध्या, सोप्या, सरळ भाषेनें तुकारामांनीं भक्तीचा डांगोरा पिटला. " बोलावा विठ्ठल, पहावा विठ्ठल, करावा विठ्ठल जीवभावें " हा उपदेश किती बाळबोध आहे ! तो ऐकण्यासाठीं स्त्रीपुरुषांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या.

## कीर्तनांत परचक्र

आणि एके दिवशीं रात्रीं आले प्रत्यक्ष राजे शिवाजी. त्यावेळीं शिवाजीचें वय एकोणीस वर्षांचेच होतें. पण या बालसूर्यानें त्यापूर्वीच आपल्या स्वराज्याचीं किरणें पसरलीं होतीं. तोरणा किल्ला शिवाजीनें जिंकला होता. त्यांच्या कानीं तुकारामांच्या भक्ति-वैराग्याची कीर्ति पडली होती. "कोण हा सत्पुरुष आहे" हें पहावें म्हणून शिवाजीराजे तुकारामाच्या कीर्तनास गेले. हें कीर्तन पुण्यांतील विठ्ठल मंदिरात चाललें होतें. त्यावेळीं पुण्यास "पुनवडी" म्हणत. कीर्तनाच्या भक्तिरंगांत राजासकट सर्व श्रोते रंगले असतांना मुसलमान सरदार त्यांना पकडण्यासाठीं तेथें आले. कीर्तनांत खंड पडणें हें तुकोबांना संकट वाटलें. "भजनीं विक्षेप तेंचि पै मरण" असें ते म्हणाले, आणि त्यांनीं टाहो फोडून विठ्ठलाचा धांवा केलाः—

न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥
काय तुम्ही येथें नसालसें जालें । आम्ही न देखिलें पाहिजे हें ॥
परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । न देखिजेत देशें राहातिया ॥
तुका म्हणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥

हा धांवा देवानें ऐकला. कीर्तनास आलेला प्रत्येक श्रोता मुसलमान सैनिकांना शिवाजीच दिसूं लागला. त्यामुळें कोणालाच न पकडतां ते हात हालवीत परत गेले. परचक्र वाऱ्यावरील गवतासारखें उडून गेलें-वातचक्र ठरलें.

## राजलक्ष्मी लाजली !

हा "चमत्कार" पाहून शिवाजीमहाराजांची तुकाराममहाराजांवरील भक्ति अधिकच दृढ झाली. त्यांनीं कांहीं दिवसांनीं त्यांना भेटीचें निमंत्रण पाठविलें. दोघेही महाराजच. पण एक राजयोगी तर दुसरे भक्तियोगी. शिवाजीमहाराजांनीं आपल्या पद्धतीप्रमाणें उंची नजराणा आणि घोडे-मेणे पाठविले. पण तुकाराममहाराज म्हणजे वैराग्याची मूर्ती. "दिवट्या

छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे " अशी त्यांची कडकडीत विरक्ति. राजलक्ष्मी त्यांची सत्त्वपरीक्षा घेण्यास आली. पण रंभेला शुक्राचार्य भेटले, तसें त्या राजलक्ष्मीला तुकाराममहाराजांनीं परत वाटेस लावलें. " मान, दंभ, चेष्टा । हें तों शूकराची विष्ठा " असें मानणाऱ्याला कोण कसा मोह घालणार ? सारें कुबेराचें धन ओतलें तरी तें पायानें लाथाडून देण्याची तुकोबांची निर्लोभ वृत्ति. " सोनें आणि माती । आम्हां समान हें चित्तीं " हा गीतेंतील समतेचा योग त्यांनीं आपल्या अंगीं मुरविला होता. " तुका म्हणे धन । आम्हां गोमांसासमान " अशी खणखणीत भूमिका त्यांची होती. त्यांना पैशाचा मोह नव्हता कीं मानाचा लोभ नव्हता. ते आपल्या अंतरीच्या आनंदांत—भक्तिप्रेमाच्या सुखांत सदैव डुलत होते. " तिही त्रिभुवनीं आम्ही वैभवाचे धनी " हा सात्त्विक अभिमान त्यांच्या हृदयांत फुललेला होता.

## मुंगी आणि राव

सात्त्विक अभिमान होता, तसा तुकोबांचा विनयही अपार होता. स्वराज्यांतील राजाकडून आलेला तो नजराणा परत करून त्यांनीं मोठ्या नम्रतेनें पण निश्चितपणें शिवाजीमहाराजांस योग्य तो बोध केला. " शिव तुझें नाम । ठेविलें पवित्र " असें प्रारंभीं सन्मानानें म्हणून " चातुर्य-सागर " या पदवीनें तुकोबांनीं राजांना गौरविलें. " सांगणें न लगे । सर्वज्ञ तूं राजा " असा मोठेपणा देऊन त्यांनीं एका वाक्यांत राजधर्माचें रहस्य निवेदन केलें. तें कोणतें ? तर " अनाथाच्या काजा साह्य व्हावें. " समाजांतील अनाथ, अपंग, असहाय्य लोकांचीं दुःखें, क्लेश, यातना तुकोबांनीं डोळ्यांनीं पाहिल्या होत्या—स्वतःहि अनुभविल्या होत्या. त्या दीनदुबळ्यांचें रक्षण करणें हेंच राजाचें मुख्य कर्तव्य. सबलांचें, धनिकांचें किंवा विद्वानांचें रक्षण आपोआपच होत असतें, पण राजसत्तेचें कृपाछत्र पाहिजे असतें गरिबांना, अडाण्यांना, निःशक्तांना. त्याचें गाऱ्हाणें तुकोबांनीं राजाच्या कानावर घातलें. तसें करण्यास त्यांना अडचण कोणती ? ' मुंगी आणि राव । आम्हां सारखाचि जीव " ही तर त्यांची स्थितप्रज्ञाची भूमिका.

त्यांनीं आशेचें बिंदुलें ( शून्य ) केलें होतें. " विश्व हें विठ्ठल नाहीं दुजे कांहीं । देखणें तुझेही तयामाजी " अशी अभेदाची भावना त्यांच्या हृदयांत ठसलेली होती. त्यांनीं शिवाजीमहाराजांना गोड शब्दांनीं निरोप दिलाः—

" आमचा पाळीता पोसिता पांडुरंग आहे. त्यानें आम्हांस निराशेचा गांव बक्षिस दिला आहे. मग तुम्हांपाशीं येऊन काय उपयोग ? अन्न मागावें तर भिक्षेनें तें आम्हांस मिळतें, वस्त्र मागावें तर चार चिंध्या आम्हांला पुरेशा आहेत. " निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें" काय कमी आहे आम्हांला ? गरज कशाची आहे आम्हांला ? आणि आम्ही तेथें येऊन फायदा तरी काय ? आम्ही अरण्यवासी उदासीनपणें फिरणारे, अमंगळ दिसणारे, हातपाय रोड झालेले. अशा अवस्थेत "काय तो सोहोळा दर्शनाचा " म्हणून भेटीची वार्ता करूं नका. "

## परत नजराणा

राजाचा मौल्यवान नजराणा परत करतांना उपदेशाचा आपला बहुमोल नजराणा पाठविण्यास मात्र तुकोबा विसरले नाहीत. आम्ही गरीब असलों तरी विठ्ठलाचे वीर आहोंत ही ऐट त्यांची होतीच. " न हो केविलवाणें । नाहीं आम्ही दीन " असें ठासून सांगून ते छत्रपतींना बोध करतात, " सर्वांभूती देख एक आत्मा. " तसेंच " आम्ही तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखी " असाहि भक्तिमार्गाचा उपदेश त्यांनीं केला. यापूर्वी शिवाजीमहाराजांची व समर्थरामदासांची भेट झालेली होती. हें ध्यानीं घेऊन एकनिष्ठ भक्तीचें महत्त्व पटविण्यासाठीं शेवटीं बुवा सांगतात, " सद्गुरु श्रीरामदासाचें भूषण । तेथें घाली मन चळो नको " तुकारामाचें हें वैराग्य पाहून व हा बोध ऐकून त्यांचेविषयींची शिवाजीमहाराजांची भक्ती शतपट वाढली असेल यांत नवल काय ? तुकारामाच्या मृत्यूपूर्वी एका वर्षांत हा प्रसंग घडला.

## दांभिकावर कोरडे

अशा सन्मानाप्रमाणेंच अपमानाचे प्रसंगहि तुकारामांना बरेच सोसावे लागले. त्यांच्या अभंगांत आपल्या अभंगांची भेसळ करणारे सालोमालो

सहजच त्यांचा द्वेष करीत. त्यांनीं ज्या भोंदू बुवावर टीका केली, तेही त्यांच्या नांवानें जळफळत. तंबाखू, भांग, दारू सेवन करणाऱ्या दांभिक बुवांचा तुकाराम सडकून समाचार घेत. त्यांना " पादचारी मनुष्य परी कुतरी तीं " असें कोरडे त्यांवर ओढीत. अगदीं बीभत्स, अश्लील, शिवराळ वाटतील असे शब्दहि ते आवेशाचे भरांत योजीत. ' अवघे जग हें देव । परि निंदितों स्वभाव ' अशी त्यांची वृत्ति होती.

गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥
काय करोनि पठन । केली अहंता जतन ॥
अल्प असें ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥

असे घणाचे घाव ते निर्भयपणें घालीत, त्यामुळें मंबाजीसारखे स्वार्थी ढोंगी बुवा त्यांची निंदानालस्ती करीत. फार काय त्यांना प्रत्यक्ष काठ्या-कुठ्यांनीं बडवीतही. त्याचप्रमाणें संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणण्याचा गुन्हा तुकाराम करतात, म्हणून कांहीं ब्राह्मणपंडितांचाहि त्यांच्यावर घुस्सा होता. रामेश्वरभटानें तर त्यांना या गुन्ह्याबद्दल शिक्षा केली होती, आणि ती म्हणजे तुकारामांनीं आपले अभंग इंद्रायणी नदींत बुडवावेत ही !

तुकारामांना हें प्राणसंकट वाटत होतें. कारण, त्यांचें अभंग म्हणजे त्यांच्या रक्ताचे बिंदु होते, हृदयाचे काप होते, जीवनाचे उच्छ्वास होते. पण तरीही त्यांनीं ती शास्त्रांतील शिक्षा मान्य केली आणि अभंगांची पोथी इंद्रायणींत बुडविली. तिच्या कांठीं, निर्वाण मांडून, त्यांनीं तेरा दिवस निश्चक्र उपवास केला. मग त्यांच्या पांडुरंगानें त्यांचे अभंग तारले आणि इंद्रायणींतून अभंगांची पोथी कोरडी वर आली तेव्हां ' माझी मज आली रोकडी प्रचीत । होऊनि फजित दुःख पावे ' असा पश्चात्ताप रामेश्वरभटाला झाला. एवढेंच नव्हे तर तो तुकारामाचा भक्त बनला. तोच लोकांना सांगूं लागला,

तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जो अवतार नामयाचा ॥
भक्तीज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥

## मराठींतील वेद

तुकारामाचे अभंग म्हणजे मराठी वेदच असें मानण्यांत येतें. धर्म रक्षावयासाठीं "वाचा बोलो वेदनीति" असें स्वतः तुकारामबुवाच म्हणतात. "वेदाचा तो अर्थ । आम्हांसिच ठावा" अशी गर्जनाही ते करतात. "वेद इतुकेंचि बोलला" असें म्हणून अध्यात्माचें गूढ तें सोप्या भाषेनें उकलून दाखवितात. म्हणून,

"ज्याची वदे पूर्ण वेदान्तवाणी । म्हणावें कसें हो तयालागि वाणी" असें सारे लोक म्हणूं लागले. तुकारामांनीं जे हजारो अभंग रचिले, ते कांहीं काव्य करण्यासाठीं नव्हे. त्यांच्या हृदयांत वेळोवेळीं जे दुःखाचे, अनुतापाचे, भक्तीचे, समाधानाचे, लोककल्याणाचे तरंगामागून तरंग उमटले, त्यांचेंच प्रतिबिंब त्यांच्या अभंगांतून उमटलेलें आहे. त्यांचे अभंग म्हणजे त्यांच्या हृदयाचे आरसे. "करितों कवित्व म्हणाल हे कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची" अशी त्यांची निरहंकारी भूमिका आहे. "अवघे करितो विठ्ठल" असें ते म्हणतात. "बुडतां हे जन न देखवें डोळां । येतो कळवळां म्हणोनिया" त्यांची अभंग-रचना चालू होती. हें "टांकसाळी नाणें" नव्हें, तर "झरा लागला नवनीत" असें स्वयंभू व जिवंत काव्य त्यांच्या अभंगांतून वहात आहे. ते काव्याकडे पाठ फिरवून भक्ती करीत चालले होते; पण काव्यच त्यांच्या पाठोपाठ गेलें. असा हा प्रकार आहे. आणि काव्य म्हणजे तरी काय ? "प्रबळ भावनांचा सहजस्फूर्त उद्रेक"* तुकारामांच्या भावना अत्यंत प्रबळ होत्या, उत्कट होत्या. त्यामुळें "माझी मज झाली अनावर वाचा" अशी त्यांची अवस्था होई. सहज बोलतां बोलतां त्यांची कल्पनाशक्ति कधीं कधीं आकाशापर्यंत उड्डाण करी.

आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करी

अशा विशाल कल्पनाही त्यांच्या अभंगांत चमकतात. 'घेई आपोषण ब्रह्मांडाचें' येथपर्यंत त्यांची कल्पना-शक्ति भरारी मारते.

---

* Sponteneous overflow of powerful feelings
—Wordsworth

## आध्यात्मिक उत्क्रांतीचे पडसाद

पण कल्पनावैभव हें कांहीं तुकारामांच्या अभंगांचें सारसर्वस्व नव्हे. तो एक आगंतुकपणें आलेला आनुषंगिक गुण आहे इतकेंच. त्यांनीं आपल्या हृदयांतील भावनांना वाट करून देण्यासाठीं काढलेले पाट म्हणजे हे अभंग. संसारतापानें पोळलें जात असतांना होणारी तडफड, विठ्ठलाच्या भेटीसाठीं लागलेली तळमळ आणि त्याच्या भेटीनें उठलेलें आनंदाचे कल्लोळ व शेवटीं शांत मनानें लोकांना केलेला उपदेश—या चारी अवस्थांचे पडसाद त्यांच्या अभंगांतून स्वच्छपणें ऐकूं येतात. " नको हा संसार " असा वैताग आल्यामुळें " मनाच्या तळमळें । चंदनेंही अंग पोळे " अशी त्यांची प्राथमिक अवस्था पुष्कळ अभंगांतून प्रगट झाली आहे. " मी तो दीनाहूनि दीन " असा कमीपणा घेऊन त्यांनीं आपली जीवींची व्यथा व्यक्त केली आहे. " आम्हा चिंता—डोहीं बुडवितां " अशी तक्रार त्यांनीं आरंभीं केली आहे. पुनः गर्भवास नको, संसार नको असें म्हणणारेच तुकाराममहाराज शेवटीं देवाला सांगूं लागले आहेत, " सुखें घालावे गर्भासि. " तसेंच " मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस. " फार काय ? " तुका झालासे पांडुरंग " अशी अद्वैताची वृत्ति त्यांचें ठायीं बाणली. " तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता " अशी कर्मयोग्याची भूमिका त्यांना प्राप्त झाली.

## अंतर्बाह्य युद्ध

हें अद्वैताचें टोक म्हणजे हिमालयाचें गौरीशिखरच. तें गांठण्यासाठीं तुकारामांना किती चढावें लागलें, किती पडावें लागलें, किती कांटे रुतले, किती खडे टोंचले, त्यामुळें रक्ताच्या चिळकांड्या किती निघाल्या, घामाच्या धारा किती वाहिल्या—या सर्वांचें हुबेहूब चित्र त्यांच्या अभंगांत रेखाटलेलें आह. " रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । आंतरबाह्य जग आणि मन " अशी दुहेरी लढाई तें खेळत होते. त्यांत ते आरंभीं हरत होते. " ना संसार, ना तुझे पाय " अशी दोन्हीकडे फजिती झाल्याचें दुःख ते भोगीत होते. पण मनाचा निर्धार दांडगा आणि चिकाटी विलक्षण.

ईश्वराचा साक्षात्कार करून घेणें हें जें ध्येय त्यांनीं एकदां निश्चित केलें, तें पुढें कायम ठेवलें. सिंहगडावर नखें रोवून बसलेल्या घोरपडीप्रमाणें त्यांचें मन त्या ध्येयाशीं ठामपणें चिकटलेलें होतें. ते स्वतःच आपला निर्धार आवेशपूर्ण भाषेनें व्यक्त करतात. “ जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदो जिव्हे ” हा त्यांचा निश्चय हुतात्म्यासारखाच नाहीं काय ? ते आपल्या सर्व इंद्रियांना विनंती करतात,

घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥
तुम्ही घ्यारे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥
तुम्ही ऐका रे कान । माझ्या विठोबाचें गुण ॥
मना तेथें धांव घेई । राहें विठोबाचे पायीं ॥
तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥

त्यांची स्थिती ‘ पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं । जागृति स्वप्नीं पांडुरंग’ अशी एकरूप झाली होती.

## भेटीची आतुरता

सर्वांगांनीं ते विठ्ठलमय झाले होते. रात्रंदिवस त्यांना तोच ध्यास आणि तोच अभ्यास. त्यांना वासना एकच होती आणि ती म्हणजे ‘ ऐसें भाग्य कैं लाहातां होईन । अवघे देखे जन ब्रह्मरूप ’ आणि ब्रह्मरूप झाल्याची खूण काय ? तर अंगीं शांति, क्षमा, दया असावी, शुद्ध नवविधा भक्ति आचरावी आणि विवेकासहित वैराग्य, धगधगीत अग्निप्रमाणें, जीवनांत ओतलेलें असावें. हे सर्व गुण विठ्ठलाच्या भेटीनें मिळतील अशी त्यांची श्रद्धा. म्हणून ते त्या भेटीसाठीं ‘ जीवनावाचुनि तळमळी मासा ’ तसें तळमळत. ‘ बा रे पांडुरंगा, केव्हां येशी भेटी । जाहलों हिंपुटी (=दुःखी) तुजवीण ’ अशा हाका ते रात्रंदिवस मारीत असत. आपली तळमळ किती आहे हें देवाला पटवून देण्यासाठीं ते दृष्टांतामागून दृष्टान्त देतात आणि म्हणतात,

पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥
दिवाळीच्या मुळा लेकी आसावली । पाहतसे वाटुली पंढरीची ॥

भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं देवा ॥

तुकारामाची ही ओढ श्रोत्यांच्या कानीं जाई आणि त्यांच्याही मनांत ती उत्पन्न होई. किंबहुना संसारी माणसाच्याही चित्तांत ती आर्तता उत्पन्न व्हावी म्हणून ते त्याला पटणारे सांसारिक दाखले किती कोमल शब्दानें देतात पहा.

कन्या सासुऱ्यासि जायें । मागें परतोनि पाहें ॥
तैसें जालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥

शकुंतला सासरीं निघाली तेव्हां वृक्षवल्ली आणि हरिणेंसुद्धां दुःखी झालीं. फार काय ? वनवासी व योगी असणाऱ्या कण्वाच्या हृदयाचीसुद्धां कालवाकालव झाली. मग संसारी जनांची अवस्था कन्या सासरीं जातांना काय होत असेल ? त्याचें स्मरण देऊन तुकोबा लोकांचें लक्ष विठ्ठलाकडे ओढीत आहेत. कन्या-विरहाचा अनुभव ज्यांना नसेल त्यांच्यासाठीं ते दुसरा दाखला देतात कीं, “ चुकलिया मायें बाळ हुरुहुरु पाहे । ” एखाद्या बाजारांत किंवा जत्रेंत मायलेकरांची ताटातूट झाली म्हणजे तें लहान मूल किती गोंधळतें, बावरतें, इकडेतिकडे सैरावैरा कसें धांवतें, ज्याच्या त्याच्या तोंडाकडे पाहून प्रत्येकाला आपल्या आईचा ठावठिकाणा कसा विचारते, याचें सारें चित्र या एका ओळींत तुकोबांनीं उभें केलें आहे. “ धीर माझ्या मना, नाहीं नाहीं नारायणा ” असें ते आक्रंदून सांगतात.

वाटुली पाहातां शिणले डोळुले । दाविसी पाऊलें कै वो डोळा ॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥
तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥

## माहेरचा निरोप

याहून अधिक उत्कंठा ती काय असूं शकणार ! उत्कंठेची साक्षात् मूर्तीच तुकोबा बनले होते. पंढरीस वारकरी चाललेले पाहिले कीं त्यांचा जीव गोळा होई. “ हे भाग्यवंत माझ्या विठ्ठलाला भेटणार, पण मला कांहीं त्याची भेट होणार नाहीं. ” असें त्यांच्या मनांत येई. आणि मग

ते त्या वारकऱ्याबरोबर पंढरीनाथास पत्र पाठवीत. ते त्या संतांना हात जोडून म्हणत,

तुम्ही संतजनीं । माझी करावी विनवणी ॥
काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥
भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥

तुकोबाचा निरोप घेऊन संतजन पंढरीकडे गेले. वारकरी वाटेनें कदाचित् आपापल्या संसारांतील गोष्टी एखादेवेळीस बोलत असतील. पण देहू येथें तळमळत बसलेल्या तुकोबांची अवस्था काय होती ? रात्रंदिवस विठ्ठलाचा ध्यास. डोळ्याला झोंप नाहीं, जीवाची कासाविशी चाललेली, एक एक दिवस मोजण्यासाठी बोटें घालीत आहेत, त्यांतच मनांत शंका येते, ' संतांना माझ्या निरोपाचा विसर तर पडणार नाहीना ? पंढरीच्या त्या गर्दींत माझी आठवण कोणाला राहणार ? ' असें संशयामागून संशय घेत ते आपल्या ' माहेरीचा निरोप ' काय येतो, याची वाट पहात बसले. ' आतां माझे सखे, येती वारकरी । जीवा आस थोरी लागली तें ' अशी डोळ्यांत प्राण आणून ते वाट पहात बसले. ' सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ' या आशेंत ते झुलत राहिले आणि——

खरोखरच ते संत परत आले कीं ! पंढरीहून परतलेल्या, भगवंताला भेटलेल्या, त्या भाग्यवंत भक्तांची–वारकऱ्यांची गांठ पडतांच तुकाराम-महाराजांना केवढा हर्ष झाला, त्याचें वर्णन त्यांच्याशिवाय दुसरें कोण करणार ? ते आनंदाची आरोळी ठोकून म्हणतात,——

आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥
आर्तभूत माझा जीव जयांसाठीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥
वाट्टुली पाहतां सिणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥
माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥
तुका म्हणे भेटी निवारला ताप । फळलें संकल्प संत आले ॥

आणि प्रत्यक्ष विठोबाची भेट झाल्यावर तर काय ? ब्रह्मानंदच तो ! त्याचें वर्णन तुकोबांनीं किती लाडीगोडीनें केलें आहे पहा.

## साक्षात्काराचा अनुभव

विटेवर उभें असलेलें आणि कटीवर कर ठेवलेलें तें सुंदर ध्यान पहातांच तुकोबा तहानभूक विसरले. 'संचरूनि राही हृदयामाजि' असा वर त्यांनीं विठोमाउलीला मागितला, आणि तो वर त्यांना मिळालाही. 'आंत हरी बाहेर हरी । हरीनें घरीं कोंडिलें' अशी त्यांची स्थिति झाली. 'जेथें तेथें देखे, तुझींच पावलें' अशी दृष्टी त्यांना लाभली. 'जेथें देखे तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा' असा साक्षात्कार त्यांना सदैव होऊं लागला. 'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती' असा अनुभव त्यांना येऊं लागला. 'अवघे ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव' असा ब्रह्मरस अंगीं ठसावला. अणुरेणूमध्यें एकच ईशतत्त्व स्फुरण पावत आहे, हा अखेरचा अद्वैताचा अनुभव त्यांच्या ठायीं बाणला. योग्याची समाधी ती हीच. साक्षात्कार म्हणतात तो हाच. त्याचें वर्णन करणें हें काम भाषेपलीकडचें आहे. तथापि शब्दांची धडपड चालू असते. त्यामुळें त्या अतीन्द्रिय अवस्थेची अपुरी तरी कल्पना येऊं शकते. तशी कल्पना अनेक संतांनीं दिलेली आहे. तुकोबा व ज्ञानोबा यांचे शब्द तर अगदीं एकाच तोंडावळ्याचे आहेत.

तुकोबा म्हणतात—

स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावूनियां ॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीळित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥
चित्त चाकाटलें स्वरूपामाझारीं । न निघे बाहेरी सुखावलों ॥
सुनीळ प्रकाश उदैजला दिन । अमृताचें पान जीवन–कळा ॥
शशिसूर्या जाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥
तुका म्हणे सुखें प्रेमेंसी डुलत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥

ज्ञानोबा म्हणतात—

चित्त चाकाटलें आड्डु घेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ ।
आपाद कंचुकित । रोमांच आले ॥

अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें ।
आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥

समान अनुभवाचें वर्णन समान भाषेनेंच होणार. कारण दोघांच्याहि मनाची उंची समानच.

## जीवनांतील ध्रुवतारा

अशा साक्षात्काराच्या भूमिकेवरून, स्वानुभवाच्या अधिकारानें तुकाराम-महाराजांनीं सगुण भक्तीचा उपदेश केला. कीर्तन करतां करतांच त्यांच्या मुखावाटें सहज स्फूर्तीनें अभंग बाहेर पडत. त्या अभंगामध्यें म्हणीचा सोपेपणा आहे, सुभाषितांचा गोडवेपणा आहे आणि स्मृतिवचनांचा अधिकार पण आहे. त्यामुळें मराठी भाषा बोलणाऱ्या बायकापोरांच्याही जिव्हेवर हे अभंग तेव्हा खेळले, आज खेळत आहेत आणि पुढेंही खेळत राहतील. त्यांच्या अभंगांचे चरण महाराष्ट्रांतील खेड्यापाड्यांच्या भिंती-भिंतीवरही ब्रीदवाक्याप्रमाणें लावलेले आढळतात आणि ते गुणगुणतांना महाराष्ट्रीयांच्या मनाला अपार शांति लाभते.

'नम्र झाला भूता तेणें कोंडिलें अनंता ।' असा सिद्धांत सांगून तुकोबांनीं मानव सेवेनेंच ईशसेवा होते हें समजावून दिलें. तुकोबा संत कोणाला म्हणतात? तर, " जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें " ॥ तसेंच " बोले तैसा चाले । त्याचीं वंदावी पाउलें. "

## उपदेशाची मेघवृष्टि

अशीं सोपीं, सुटसुटीत, अर्थपूर्ण, ध्येयवादी, मार्गदर्शक शेंकडों—हजारों वचनें तुकोबांच्या अभंगांत विखुरलेलीं आहेत. हे अभंग म्हणजे हिऱ्यामोत्यांच्या खाणीच आहेत. पण खाणींतील रत्नें वर काढण्यासाठीं खालीं उतरावें लागतें व कष्ट करावे लागतात. तेही कष्ट त्यांनीं ठेवलेले नाहींत.

पर्जन्यें पडावें, आपुल्या स्वभावें, आपुलाल्या दैवें, पिकें भूमी ।

अशा मेघवृष्टीनें ते उपदेश करीत होते. तसें बोलल्यावांचून त्यांना रहावतच नव्हतें. आपल्या आनंदाचे वांटेकरी सर्वांना करावें हीच त्यांची भावना. " पूर आला आनंदाचा, लाटा उसळती प्रेमाच्या " अशी अवस्था त्यांच्या अंतःकरणांत झाली होती आणि म्हणून ते लोकांना हांकारून सांगत होते, " अवघे जन गडी । घाला उडी भाईनों. " आतां त्यांची भूमिका लोकांना मार्ग दाखविण्याची होती. " तुका म्हणे मज धाडिलें निरोपा " असें त्यांना वाटत होतें, आणि म्हणून ते म्हणत होते " सेविती रस तो वाटीतो आणिका "

जग आडरानानें भरलेलें आहे, शब्दज्ञानानें सर्वांचा नाश केलेला आहे, परमार्थाचीं साधनें बुडालीं आहेत, असें पाहून पोटींच्या कळवळ्यानें तुकोबांनीं भक्तीचा डांगोरा पिटला, आणि " यारे यारे लहानथोर । याति भलतें नारीनर " अशी सर्वांना हांक दिली. " गाढवाचे घोडे, करूं आम्ही दृष्टीपुढें " ही तर त्यांची प्रतिज्ञा. " आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी " हा त्यांचा अधिकार. कारण कोणतें ? तर

आम्हां हे कौतुक, जगा द्यावी नीत, करावे फजित, चुकती तें ।

## नीतीचे धडे

असे नीतीचे धडे समाजाला घालून देण्याचें कार्य हें त्यांनीं आपल्या जीविताचें ध्येय मानलें. ही नीति त्यांनीं कशी शिकवली ? तर " सहज बोलणें हित उपदेश " अशा सलगीनें, प्रेमानें, खेळीमेळीनें.

" मन करारे प्रसन्न, सर्व सिद्धीचें कारण " अशी सुखाची गुरुकिल्लीच त्यांनीं सर्वांच हातीं दिली. " सकळांच्या पाया दंडवत "घालून त्यांनीं सांगितलें काय ? तर " आपुलालें चित्त शुद्ध करा. " कारण त्यांचा असा ठाम विश्वास होता, " चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाति सर्प तया" आणि चित्त शुद्ध करण्याचा, मन प्रसन्न ठेवण्याचा मार्ग कोणता ?

तर " दया–क्षमा–शांति " दया तरी कोणती ? तर " दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दाळण कंटकांचे " अशी दुहेरी व्याख्या त्यांनी समजावून दिली. श्रीकृष्णांनींही गीतेंत आपलें अवतार–कार्य साधूंचें रक्षण व दुर्जनांचा विनाश असेंच दुहेरी असल्याचें सांगितलें आहे. विठ्ठल-भक्तांचा, वारकऱ्यांचा वैष्णवांचा धर्म कोणता ? तर तुकोबा सांगतात, " विष्णुमय जग " ओळखणें हाच. " वासुदेवः सर्वमिति " हेंच गीतेचें झालें तरी मूळ सूत्र आहे ना ? सर्व भेदाभेद अमंगळ माना व सर्वांना ईश्वर मानून, समतेनें व प्रेमानें वागा असाच उदात्त उपदेश तुकारामांनी केलेला आहे. देवाची पूजा कोणती हें सांगतांना ते म्हणतात,

कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर-पूजनाचें ।।

" पवित्र तें कूळ, पावन तो देश । जेथें हरीचे दास घेती जन्म " असा जयजयकार त्यांनी हरींच्या दासांचा केला आहे. पण त्या हरि-दासांचें कर्तव्य त्यांनीं काय सांगितलें आहे ? तर " यातायाती धर्म, नाहीं विष्णुदासा " अशी समतेची भावना वारकरी समाजानें फार मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केली आहे. वारकरी लोक कितीही लहानमोठे असले तरी एकमेकांच्या पाया पडतात, एवढेंच नव्हे तर देवभक्ताचीही समता सिद्ध करण्यासाठींच कीं काय, ते विठ्ठलाला " उराउरी " भेटतात. दुसऱ्या कांहीं देवांच्या चरणांनाही भक्त स्पर्श करूं शकत नाहीं; पण पंढरीचा दरबार सर्वांना खुला. विठ्ठलाच्या वक्षस्थलालाही कडकडून मिठी मारण्याची तेथें सर्वांना मुभा.

## जन हाच जनार्दन

" विश्वीं विठ्ठल विस्तारला " अशा भूमिकेवरून तुकाराममहाराजांनीं भागवतधर्माचा प्रसार आपल्या अमृतवाणीनें केला. त्यामुळें " हरिनाम–वेली पावली विस्तार । फळीं पुष्पींभार वोल्हावलीं ।। " त्या फुलाफळांचा लाभ सारा महाराष्ट्र आजही घेत आहे, आणि पुढेंही घेत राहील. त्यानेंच महाराष्ट्राची नैतिक उंची वाढेल आणि आध्यात्मिक विकास होईल. समाजाला

चारित्र्यसंपन्न करण्यास अशा संत-वाङ्मयाइतकें दुसरें कोणतेंच रसायन उपयोगी पडण्यासारखें नाही. " जोडूनिया धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करी " असा कुटुंब-धर्म जसा तुकारामांनीं पढविला, तसाच " जे कां रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुलें ॥ " तोंच साधु आणि तोच देव असें म्हणून समाज-धर्मही शिकविला. "ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरीं जो हृदयीं " अशा परोपकारी माणसाला तुकाराम ' भगवंताचि मूर्ती ' मानतात, कारण ' जनीं जनार्दन ' हें तत्त्व त्यांना वेदशास्त्रपुराणांपासून समजलेलें होतें आणि स्वतःच्या ध्यानानें, चिंतनानें, साक्षात्कारानें व अनुभवानें पटलेलें होतें. ते निश्चयानें सांगतात,

विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा सार ॥
जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥
व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥
जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥
सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥

## वैकुंठवास !

शेवटीं तुकारामांच्या जीवनांत आनंदीआनंद भरून राहिला. " धन्य म्हणवीन इहलोकीं लोका । भाग्यें आम्ही तुका देखियेला " अशी यथार्थ अभिमानाची भाषाही ते बोलूं लागले. "आपुल्या माहेरा जाईन मी आतां" असें ते लोकांना सुनावूं लागले. कारण " निरोप या संता हातीं आला. " तुकोबांचें अवतारकार्य संपलें आणि ते वैकुंठास निघाले. " पैल आले हरी, शंखचक्र शोभे करीं " असें दृश्य त्यांना दिसूं लागलें. टाळ-वीणा घेऊन ते इंद्रायणीकडे चालले. वैष्णवांचे दळभार लोटले, नामांचे गजर उठले, दिंड्यापताकांची दाटी झाली, देहूंत पंढरी पिकली. " सकळही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुम्ही " असा निरोप तुकोबांनीं भक्तांना दिला. पण महाराज, आपला आशीर्वाद ? " कर्मधर्में तुम्हां असावें

कल्याण। घ्या माझें वचन आशीर्वाद ॥ " " अवघे एकमय " असें सूत्र अखेरीस सांगून " कुडीसहीत जाला गुप्त तुका." !

वयाच्या एक्कावन्नाव्या वर्षी, शके १५७१ मध्यें, तुकाराममहाराज वैकुंठवासी झाले. पण त्यांचें अभंगवाङ्मय अजरामर आहे.





# संत रामदास : : : ५

ज्या भागवतधर्माच्या मंदिरांत सुमारें चारशें वर्षे ज्ञानदेवांची दिव्य वीणा निनादत होती, नामदेवांची पिपाणी प्रेमलतेचे सूर काढीत होती, एकनाथांची सतार प्रपंच–परमार्थांचे दुहेरी बोल ऐकवीत होती आणि तुकारामांच्या सनईतून सगुणभक्तीचे आलाप उच्च स्वरानें निघत होते, त्या मंदिराच्या दारापुढें प्रवृत्तिवादाचा चौघडा घडघडा वाजविण्याचें काम रामदासांनीं केलें. पूर्वीच्या संतांनीं जो 'भागवत धर्म' जोपासला व वाढविला, त्यालाच आलेलें पक्क फळ म्हणजे रामदासांचा 'महाराष्ट्र-धर्म.' समाजांतील नीतीची चाड व अन्यायाची चीड, ईश्वराविषयींची निष्ठा व मानवाविषयींचा कळवळा, सत्याचें प्रेम व दंभाचा तिटकारा या गुणांचीं

बीजें सर्व संतांनीं महाराष्ट्रांत मुक्त हस्तानें पेरलीं होतीं. मुसलमानी सत्तेचा ताप ज्ञानेश्वरांच्या अस्तापासूनच सुरू झाला आणि तो पुढें अधिकाधिक वाढत चालला, तसतशी त्याचा प्रतिकार करण्याची जरूरी महाराष्ट्राला अधिक भासूं लागली. महाराष्ट्राच्या मनांत खेळणाऱ्या या प्रतिकार–लालसेला धैर्याची, संघटनेची व भगवंताच्या अधिष्ठानाची जोड मिळवून देण्याची कामगिरी रामदासांनी पार पाडली.

## महाराष्ट्राचे राष्ट्र-गुरु

एकनाथांचा अंत होतो न होतो तोंच, तुकारामाचा उदय झाला. त्याच सुमारास मुक्तेश्वर व वामन हे दोन काव्याचे तेजस्वी तारेही महाराष्ट्रांत चमकत होते. अशा वेळेस श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनी आपलें तेज दाखविलें आणि स्वतःसाठी स्वतंत्र स्थान निर्माण करून ठेविलें. पूर्वींच्या सर्व संतांच्या वाणीचा परिणाम समर्थांच्या साहित्यावर साहजिकच झालेला आहे. मुकुंदराजांच्या विवेकसिंधूतील अनेक रत्नें त्यांच्या काव्यांत आढळतात. एकनाथांच्या रामायणाचा ठसा बारीकसारीक तपशीलांसह समर्थांच्या ग्रंथावर उमटलेला दिसतो. पण स्वतंत्र प्रज्ञा, स्वतः घेतलेला जगाचा अनुभव आणि स्वतःला झालेला साक्षात्कार यामुळें समर्थांचें स्वतःचें असें स्वतंत्र वैशिष्ट्य आहेच आहे. रोकड्या व ठोसर भाषेंत प्रबोध, प्रयत्न व प्रचीती यांचा प्रचार समर्थांइतका दुसऱ्या कोणीच केला नाहीं. त्यांचें सारें बोलणें–लिहिणें प्रत्ययाचें, अनुभवाचें; त्यामुळें लोकांना चटक लावून सोडण्याचें त्यांचें सामर्थ्य दांडगें. छत्रपती शिवाजी महाराजांच्या राजकारणी शक्तीला युक्तिबुद्धीची व प्रत्यक्ष संघटनेचीही जोड देऊन स्वराज्याचें राजकारण खेळणारे रामदास हे महाराष्ट्राचे " राष्ट्र–गुरु " होत यांत शंका कसली ? क्षात्र-ब्राह्म तेजांचे हे दोन पुतळे ! त्यांची भेट म्हणजे वादळ व वणवा यांची युति. त्यामुळें भडकलेल्या आगींत परसत्ता भस्मसात् झाली.

## बालवयांत महान् चिंता

रामदासांचें मूळ नांव नारायण व आडनांव ठोसर. वडिलांचें नांव

सूर्याजीपंत व आईचें नांव राणूबाई. हैद्राबादकडील जांब गांवचे सूर्याजीपंत हे कुलकर्णी. त्यांच्या घराण्यांत सूर्याची व रामाची उपासना आठ पिढ्या चालत आलेली होती. राणूबाईच्या पोटीं शके १५३० मध्यें रामनवमीचे पवित्र दिवशीं हा राम-दास ' टळटळीत दुपारीं जन्मला. ' त्याच्या वयाचे आठवे वर्षीं वडील मृत्यु पावले. बालवयांत शोभणाऱ्या खोड्या नारायण हूडपणें करीत असे. झाडावर उड्या माराव्या, नदींत डुंबावें, रानावनांत भटकावें, हुतुतू-हमामासारखे खेळ खेळावे, नमस्कार-बैठकी घालाव्या आणि शरीर गोटीबंद व चैतन्यानें मुसमुसलेलें ठेवावें ही हौस नारायणाला मोठी. त्याचबरोबर त्याच्या तीक्ष्ण बुद्धीवर संस्कृत विद्येचेही संस्कार होत होते. संस्कृतमधील धार्मिक ग्रंथांचें व मंत्रांचें पठण तो करीत होता.

अगदीं बालवय; पण मनांत अचाट कल्पना. जन्मतांच सूर्यबिंब कवळण्याची भरारी जशी मारुतीरायाची, तशीच थोर महत्त्वाकांक्षा नारायणाची. एकदां आपल्या विचारांत गर्क असतांना नारायण घराच्या एका कोपऱ्यांत बसून राहिला. राणूबाईनें त्याला शोधशोध शोधिलें. अखेरीस तिला तो सांपडला. " काय करतोस रे नारायणा ? " असा प्रश्न माउलीनें केला. " चिंता करितों विश्वाची " असें उत्तर नारायणाच्या मुखांतून निघालें. दहाबारा वर्षांचें वय असेल-नसेल, अशा आपल्या मुलाच्या तोंडून हें उत्तर ऐकतांच त्या मातेला काय वाटलें असेल ? श्रीकृष्णानें बालवयांत यशोदामातेला आपल्या मुखामध्यें विश्वरूप दाखविलें; तेव्हां ती माता जितकी विस्मित झाली असेल, तितकीच राणूबाईही विस्मित झाली. " एवढासा पोर आणि म्हणे विश्वाची चिंता करतो ! " हें वेडें कोडें कांहीं तिला उलगडेना. तें कोडें तिच्या सांसारिक मनांत सारखें खेळत राहिलें. विचार करतां करतां तिला तें कोडें सोडविण्याची एक युक्ति सांपडली. ती युक्ति म्हणजे नारायणाच्या पायांत लग्नाची बेडी ठोकणें.

## बोहोल्यावरून धूम !

बारा वर्षांचें वय. आईच्या आग्रहामुळें नारायण बोहोल्यावर चढला.

" बोहोल्यावर उभा राहीन " एवढेंच वचन त्यानें आईला दिलें होतें. तें वचन त्यानें शब्दशः पाळिलें. त्याच्या मामाची मुलगी त्याला वधू म्हणून आईनें नियोजित केली होती. वधू आली, बोहोल्यावर उभी राहिली, ती व नारायण यांच्यामध्यें भटजींनीं अंतरपाट धरला. नेहमींप्रमाणें भटजींनीं " शुभमंगल सावधान ! " असें उच्च स्वरानें म्हटलें. वधूवरावर मंगलाक्षता टाकून टाळ्या पिटण्यासाठीं 'इतरे जनांचे' हात वळवळूं लागले. पण—लग्नांत विघ्न आलें ! कोणाकडून ? वराकडूनच. नारायण खरोखरच 'सावध' झाला. परमार्थाकडे सावधान चित्त गुंतविण्याचें त्यानें ठरविलेंच होतें. आईच्या वचनांतून मोकळा होतांच तो तेथून सटकला. संसाराचा पाश तोडून तो जन्मभर ब्रह्मचारी राहिला. बोहोल्यावरून पळाला तो, रानेंवनें तुडवीत, अकरा दिवसांनीं, थेट नाशिकास जाऊन पोहोंचला.

## पंचवटींतील तप

गोदावरीच्या तीरावर, प्रभु रामचंद्राच्या त्या तपोभूमींत, पंचवटी क्षेत्रांत नारायणानें बारा वर्षें काढिलीं. त्यानें रामनामाचा जप केला, गायित्रीचें पुरश्चरण केलें आणि नाशिक क्षेत्रांतील वैदिकांजवळ वेदशास्त्रांचें अध्ययनही केलें. रामाची भेट व्हावी म्हणून त्याच्या जीवांत अखंड तळमळ चाललेली होती. " धांव रे धांव आतां " अशा हाका ते फोडीत होते. " शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी " अशी काकुळत ते करीत होते. " तळमळ निववीं रे, राम कारुण्य-सिंधु " अशी विनवणी ते करीत होते. " जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी, मजवरी करुणेचा राघवा पूर लोटीं " असा धांवा करीत होते. " दिवस गणित बोटीं, प्राण ठेवून कंठीं " अशा स्थितींत ते होते. " झडकरी झड घाली धांव पंचानना रे " असा त्यांनीं आकांत मांडला. ते रामरायाची अधीरतेनें वाट पाहूं लागले. एक एक क्षण त्यांना कठीण वाटूं लागला. " बळें लावितां चित्त कोठें जडेना " अशी त्यांच्या मनाची स्थिति झाली. " घडीनें घडी शीण अत्यंत वाटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ " असें म्हणून त्यांचें हृदय रात्रन्-

दिवस रडूं लागलें. “ बहूसाल भेटावया प्राण फूटे ” अशी असह्य अवस्था त्यांची झाली. डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. “ नव्हे धीर, नयनी सदा नीर लोटे ” अशा व्याकुळ स्थितीमध्यें एक नव्हे, दोन नव्हे, सतत बारा वर्षें, त्यांनीं एकट्यानें काढलीं. “ सर्वोत्तमा कै मज भेटि देसी ” हा एकच एक ध्यास त्यांना लागला. नदींत बुडणारा माणूस पाण्याच्या वर येऊन मोकळी हवा घेण्यासाठी जसा कासावीस होतो, तशी कासाविशी नारायणाची झाली.

## करुणाष्टकांतील काव्य

आणि ही त्यांची तपश्चर्या फळास आली. “ जनस्थान गोदातटीं वास केला । प्रभू देखिला दास संतुष्ट झाला” रामचंद्राची भेट नारायणाला झाली आणि “ नारायणाचा ” रामदास झाला. “ रवि–कुळ–टिळकाचें रूप–लावण्य पाहें । रविकुळ–टिळकाचें चिंतनीं चित्त राहे.” अशी सार्थकता रामदासाला लाभली. या पंचवटींतील साधकावस्थेचें शब्दचित्र रामदासांच्या “ करुणाष्टकांत ” स्पष्टपणें पहावयास सांपडतें. हीं करुणाष्टकें म्हणजे भक्तिरसाचीं सरोवरें आहेत. रामदासांच्या हृदयांतील कारुण्याच्या सहस्रधारा त्यांतून खळखळ वहात आहेत. रामदासांच्या अंतःकरणाची आर्तता व कोमलता यांचे निनाद या ‘ करुणाष्टकांत ’ उमटलेले आहेत. काव्याची कोणतीही कसोटी लावली तरी तीं सरस ठरणारीच आहेत.

## राष्ट्रांत संचार

धनुर्धारी राम हें रामदासांचें दैवत आणि गदाधारी हनुमान हा त्यांचा आवडता देव. आपल्या उपासनेची वंशवेल सांगतांना रामदास म्हणतात,

हनुमंत आमची कुळवेली । राम–मंडपीं वेला गेली ॥
श्रीरामभजनें फळली । रामदास बोले ॥
साह्य आम्हांसी हनुमंत । आराध्यदैवत श्रीरघुनाथ ॥
गुरु श्रीराम समर्थ । उणे काय दासासी ? ॥
म्हणोन आम्ही रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ॥
कोसळोन पडो हें आकाश । परी आणिकाची वास न पाहों ॥

अकरा मारुतींची स्थापना रामदासांनीं केली. त्यांतील पहिला मारुति नाशिकजवळील टाकळी येथें आहे. त्याची तेथें स्थापना करून समर्थ " जनीं जनार्दन " पहाण्यास निघाले. बारा वर्षें बालपणांत गेलीं आणि बारा वर्षें गोदातीरीच्या तपश्चर्येंत गेलीं. तेव्हां पुढील बारा वर्षें सर्व राष्ट्रांत संचार करावा, असा संकल्प रामदासांनीं मनीं धरला. पंचवटीहून निघाल्यावर बारा वर्षांत त्यांनीं काशी, अयोध्या, गोकुळ, वृंदावन, द्वारका वगैरे क्षेत्रांचें दर्शन घेतलें आणि श्रीनगरला जाऊन गंगोत्री-जम्नोत्रीपर्यंतही तीर्थयात्रा केली. तेथून रामेश्वरास जाऊन कर्नाटकांतून वाई वगैरे प्रांत अवलोकून ते स्वतःच्या जांब गांवीं परत आले.

## अजब गोसावी

" जयजय रघुवीर समर्थ ! " अशी धीरगंभीर ललकारी कानीं पडलीं. त्यासरशीं सूनबाईनें सुपांत कांहीं धान्य घेतलें आणि तें भिक्षेकऱ्याच्या झोळींत टाकण्यासाठीं ती दाराशीं आली. तिनें भिक्षा घातली, गोसाव्यानें भिक्षा घेतली, पण गोसावी कांहीं जागचा हालेना. तिला हा चमत्कार वाटला. पण खरा चमत्कार घडला, जेव्हां तिची वृद्ध सासू तेथें आली तेव्हां. आतां राणूबाईला नीट दिसतही नव्हतें. तरी ती चांचपडत दारापाशीं आलीं; तोंच तिच्या सुरकुतलेल्या पायावर त्या गोसाव्यानें आपलें डोकें ठेवलें, आणि गाहिवरलेल्या स्वरानें हांक मारली, " आईऽऽ ! "

म्हातारीचे डोळे आंधळे झाले होते पण हृदय डोळस होतें. तिच्या सर्वांगालाच जणूं डोळे फुटले. चोवीस वर्षांपूर्वी ऐकलेला आपल्या नारायणाचा आवाज तिनें ओळखला, आणि, " नारायणा ! " असें म्हणून तिनें त्याला कडकडून मिठी मारली. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. चोवीस वर्षांनंतरची ती मायलेकरांची भेट ! राणूबाई मुलाच्या पाठीवरून हात फिरवूं लागली–तोंडावरून हात फिरवूं लागली, तों दाढीमिशांचे जंगल वाढलेलें. " हें काय रे नारायणा ? " असें म्हणत ती आपल्या मुलाचें वाढलेलें शरीर न्याहाळून पाहूं लागली. पण बिचारी म्हातारी ! तिच्या डोळ्यांना कांहीं दिसेना. ती आनंदानें स्फुंदूं लागली.

त्या माउलीची करुण अवस्था रामदासांचे ध्यानीं आली. त्यांनीं तिच्या डोळ्यांवरून हात फिरविला. त्याबरोबर तिला दृष्टि आली; आणि—तिला तें सूर्यासारखें तेजस्वी मुख दिसलें. " चिंता करितों विश्वाची " असें उत्तर दहाव्या वर्षीं आपल्याला देणारा नारायण तों हाच ना ! अशी अभिमानी शंका तिच्या डोक्यांत थरारून गेली. तें पीळदार शरीर, ते तेजस्वी डोळे आणि मुखावरील ती शांतीची, निश्चयाची व तपश्चर्येची कांति,—हें सारें पाहून राणूबाईची खात्री झाली कीं, आपल्या मुलानें आपलें जीवन धन्य केलें आहे. ती त्याला घेऊन घरांत गेली. त्यांच्या पाठोपाठ ती सूनही चकित मुद्रेनें आंत गेली. तिला सारेंच नवीन होतें. नारायणाचे वडील बंधु, गंगाधर; त्यांनाच " श्रेष्ठी " म्हणत, त्यांची ती पत्नी. चोवीस वर्षांनंतर भेटलेले ते मायलेक एकमेकांशीं किती वेळ बोलत बसलीं असतील—काय बोलत बसलीं असतील ! रामदासांनीं आपण काशीपासून रामेश्वरापर्यंत जें जें कांहीं पाहिलें—

## देशांतील अस्मानीसुलतानी

—काय पाहिलें रामदासांनीं सर्व देशांत ?

बहूसाल कल्पांत लोकांसि आला ।
महर्गे ( =महागाईनें ) बहू धाडि केली जनांला ।
कितीयेक मृत्यूसि ते योग्य जाले । कितीयेक ते देश त्यागूनि गेले ॥
कितीयेक ग्रामें ते वोस जालीं । पिकें सर्व धान्येंचि नाना बुडालीं ।
कितीयेक धाडीवरी धाडि येती । तयां सैन्यकाचेनि संहार होती ॥
कितीयेक ते मेघही मंद जाले । अनावृष्टि स्थळोस्थळीं लोक मेले ।
कितीयेक अन्नाविसीं भ्रष्ट जाले । कितीयेक लोकीं जनीं प्राण दिल्हे ॥

अशा या दुष्काळाच्या, अवर्षणाच्या व युद्धाच्या संकटांनीं सारी प्रजा अन्नान्न दशेला पोचली व ' दे माय धरणी ठाय ' अशी अवस्था तिची झाली. तेव्हां धर्म, नीति व संस्कृति हींहि रसातळास पोचलीं यांत नवल काय ? समर्थ सांगतात,

नीच प्राणी गुरुत्व पावला । येथें आचारचि बुडाला !
वेदशास्त्र–ब्राह्मणांला । कोण पुसे ?
ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।
गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥
कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती ।
कित्येक तुरुक होती । अपुले इच्छेनें ॥
गुरुत्व आले नीच याती । कांहींयेक वाढली महती ।
शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणांचा ॥
राज्य नेलें म्लेंच्छक्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं ।
आपण अरत्रीं ना परत्री । कांहींच नाहीं ! ॥
आम्हीही तेचि ब्राह्मण । दुःखें बोलिलों हें वचन ।
वडिल गेलें ग्रामणी करून । आम्हांभोंवतीं ॥

शेवटी समर्थ प्रश्न करतात—

आतांचें ब्राह्मणीं काय केलें ? । अन्न मिळेना ऐसें जालें ।
तुम्हां बहुतांचें प्रचीतीस आलें । किंवा नाहीं ? ॥
बरें ऐसा प्रसंग जाला । जाला तो होऊन गेला ।
आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहणे करावें ॥

## स्वराज्याचा अंकुर

पारतंत्र्यानें राष्ट्राची राखरांगोळी केलेली पाहून रामदासांचा " आत्मा खौळला." त्यांच्या हृदयांत दुःखाचे कढ उसळले व डोळ्यांत करुणेचे अश्रु उभे राहिले. पण दुःखानें दुःखित होणें, पराभूत होणें हा सामान्य माणसांचा धर्म. ते संकटानें निराश होतात, कुंठित होतात, मृतप्राय होतात; पण असामान्य नेते तेच कीं, जे दुःखाला बळी पडत नाहींत, संकटानें स्वतः गांगरून जात नाहींत आणि कधींहि धीर सोडीत नाहीत. उलट जितकें जितकें संकट मोठें तितकें तितकें जास्त धारिष्ट ते धरतात व सर्व-सामान्य लोकांना आशा दाखवितात, स्फूर्ती देतात आणि कार्यास लावतात. संकटांचे पर्वत चूर्ण करून समाजाला भविष्याचा मार्ग आंखून देणारे तेच

खरे समर्थ. समर्थांनीं महाराष्ट्राला असा धीराचा मंत्र दिला. "धीर्धरा धीर्धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका । काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिंचें ॥" अशी त्यांची सिंह-गर्जना सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत दुमदुमत राहिली.

सर्व राष्ट्रांत समर्थांइतका संचार केलेला दुसरा महाराष्ट्रीय संत नाहीं. या संचारांत त्यांनीं समाजाचें अंतरंग बारकाईनें न्याहाळलें आणि ग्रस्त व भयभीत जनतेला आश्वासन दिलें. पण नुसतें शाब्दिक आश्वासन काय कामाचें ? तें लोकांना पोकळच वाटतें. पोटांत कावळे ओरडूं लागले असतांना कोणत्याही महात्म्यानें केवढाही वेदान्त सांगितला तरी तो ऐकणार कोण ? निव्वळ ईश्वराचा महिमा गाऊन, भक्तीची थोरवी सांगून किंवा परलोकांतील स्वर्गसुखाचीं वर्णनें करून भुकेल्या जनतेला शांत करतां येणार नाहीं, हें रामदासांच्या रोकड्या बुद्धीनें अचूक ताडलें आणि त्याच्याहीपुढें जाऊन त्यांच्या प्रखर विवेक–शक्तीनें हें जाणलें कीं, जनतेच्या अन्नवस्त्राचा हा प्रश्न, कोणा व्यक्तीच्या दानधर्मानें कायमचा सुटणारा नाही. त्यासाठी राज्यसत्ताच हाती घ्यावयास हवी. तीच सर्व राष्ट्राला अन्नवस्त्र देईल; निर्भयता–शांतता देईल. म्हणून स्वराज्य–स्थापनेकडे समर्थांचें लक्ष गेलें. एखादा धन्वंतरी जसें रोगांचें अचूक निदान करतो आणि नंतर त्या रोगावर रामबाण ठरणारी वनस्पति शोधतो; त्याप्रमाणें समर्थांनीं राष्ट्राच्या रोगावर स्वराज्याचेंच औषध लागू पडेल हें आपल्या मनाशीं निश्चित केलें. आणि नंतर स्वराज्याची ती अमृतवल्ली कोठें सांपडेल म्हणून त्यांनीं चौफेर नजर टाकली. तों त्यांना त्या स्वराज्य-वेलीचा लहानसा अंकुर सातारा जिल्ह्यांत उगवत असलेला दिसून आला. आणि लगेच ते तिकडे धांवले, स्थिरावले व तेथून स्वराज्याचीं सूत्रें हलवूं लागले.

## रामजन्माचे उत्सव

महाराष्ट्रांतील मुसलमानी शाह्यांचीं चक्रें फिरविण्याइतकें सामर्थ्य शहाजीराजे भोसले यांचे अंगी होतें. त्यांच्या जहागिरींत कृष्णाकांठचें

मसूर गांव होतें, तेथें समर्थांनीं आपला पाय रोवला. त्याच्या आधीं वीस वर्षें तरी शहाजीचें व दादोजीचें राजकारण चालू होतें. शके १५६७ मध्यें मसूरचा रामजन्मोत्सव रामदासांनीं थाटानें साजरा केला. कोदंडधारी रामाचे व ‘ सत्राणें उड्डाणें ’ करणाऱ्या हनुमंताचे गुण त्यांनीं लोकांच्या चित्तांत ठसविले. नंतर तीन वर्षांनीं चाफळ येथेंही समर्थांनीं राममूर्तीची स्थापना करून मोठा उत्सव केला. तेथल्या राममूर्तीच्या आगमनाची वाट रामदास किती आतुरतेनें पहात होते हें त्यांच्या पुढील कोमल श्लोकांवरून दिसून येतें.

लवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे । दिनानाथ हा राम येणार आहे ॥
जयाचेनि योगें सुखानंद लोटे । तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥

असे रामजन्माचे महोत्सव समर्थांनीं जागोजाग सुरू केले. मारुतीचीं मंदिरेंही गांवोगांव उघडून त्यांनीं बलोपासनेला चालना दिली. एवढेंच नव्हे तर अकराशें मठ स्थापून सर्व समाजाला युक्तीबुद्धीनें भारून टाकिलें. त्या मठाचे महंत हेच त्यावेळचे पुढारी. त्यांचे हजारो शिष्य ‘भिक्षामिषें’ घरन् घर पारखून सोडीत आणि नवचैतन्यानें भरून टाकीत. या सर्व व्यापक व बळकट संघटनेचा उपयोग श्रीशिवछत्रपतींना किती झाला असेल हें आज कोण, कसें सांगूं शकेल ? पण झाला हें मात्र खास.

## शिव–समर्थांचा योग

शिवाजीचें क्षात्रतेज व समर्थांचें ब्राह्मतेज यांचा संयोग शके १५७१ मध्यें झाला. त्यावेळीं शिवाजीचें वय होतें अवघें एकोणीस वर्षांचें. पण त्यांच्या स्वराज्याचीं किरणें फांकूं लागलीं होतीं. त्यांनीं समर्थांची भेट घेण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणें वैशाख शुद्ध नवमीस, चाफळ–जवळील शिंगणवाडी येथें, एका औदुंबराच्या झाडाखालीं, शिव–समर्थ भेट झाली. धनुर्धारी अर्जुनाला योगेश्वर कृष्णाचें सारथ्य मिळालें. पुढें प्रतापगडावर शिवाजीनें भवानी देवीची स्थापना केली; ती समर्थांच्या हस्तेंच. शके १६०० मध्यें तर शिवाजीनें समर्थांना चाफळची सनदच करून दिली. त्या सनदत शिवाजीनें असा इतिहास स्वच्छ शब्दांत दिला आहे कीं,

" समर्थांनीं मला आज्ञा केली—तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन. हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जें मनी धराल तें श्री सिद्धीस पाववील......जें जें मनीं धरलें होतें तें स्वामींनी आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केलें. " याच सनदेमध्ये असेंही म्हटलें आहे कीं, समर्थांनी " गिरी-गव्हरीं ( गुहेंत ) वास करून सांप्रदायाला दिगंत विस्तीर्णता घडली " चाफळ येथील श्रींचा महोत्सव व्हावा म्हणून ३३ गांवे, ४१९ बिघे जमीन वगैरे देण्याचें शिवाजीराजांनी योजिले. तेव्हां " विशेष उपाधीचें कारण काय ? " अशी निरिच्छ भाषाच समर्थांनी काढली. पण शिवाजीची गुरुभक्ति अलोट. त्यामुळे त्यांनीं चाफळची सनद " श्रीसद्‌गुरुवर्य श्रीसकल तीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराजस्वामीचे सेवेसी " अर्पण केली.

या गुरुभक्तीचा कळस म्हणजे शके १५७७ मध्यें शिवाजीराजांनीं आपल्या सर्व राज्याचीच सनद समर्थांच्या झोळीत टाकली ! शिष्याची ही भक्ति व ही विरक्ति जितकी थोर, तितकीच गुरूची निःस्पृहता व वत्सलताही थोर ! समर्थांनी तें राज्य शिवाजीस परत केलें आणि खूण म्हणून भगवा झेंडा लावण्यास व " राम राम " म्हणण्यास सांगितलें. गुरुदक्षिणा ती एवढीच ! सतत तीस वर्षें शिवाजीमहाराजांच्या पाठीशीं समर्थ उभे होते.

" शक्ति-युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत ( = ईश्वर ) धावती । "

## राम कथाच कां ?

सुमारें पन्नास वर्षें समर्थांनीं ग्रंथरचना केली. प्रारंभी करुणाष्टकें रचलीं, त्यानंतर सोळा लघुकाव्यें लिहिलीं. त्यांतील ' एकवीस समासी ' या प्रकरणाच्या १३४० ओव्या आहेत, त्यालाच " जुना दासबोध " असें म्हटलें जातें. त्यांत परंपरागत निवृत्ती-मार्गच सांगितला आहे. समर्थांनीं दोन रामायणें रचलीं. पहिल्यांत फक्त युद्ध-काण्डच आहे व त्याची श्लोकसंख्या अवघी १२५ आहे, पण दुसऱ्या रामायणांत सुंदर-काण्ड व युद्ध-काण्ड अशीं दोन काण्डें आहेत आणि त्यांत १४६२ श्लोक आहेत. रामायणाच्या आवरणाखालीं सद्यःस्थितीला वाचा फोडणें हाच समर्थांचा

हेतु दिसतो. त्या काळाला उपयुक्त ठरतील अशींच तीं काण्डें त्यांनीं निवडलीं, आणि तीं लिहितांनाही डोळ्यांपुढें आपल्या भोंवतालची परिस्थितिच ठेवली. सर्व देवांमध्यें राघवाची कथा श्रेष्ठ असें समर्थ पुनः पुनः सांगतात आणि त्याचें कारणही असें देतात कीं,

जयें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा ।
बळें फोडिला बंध त्या त्रिदशांचा ॥
म्हणोनि कथा थोर या राघवाची ।
जनीं ऐकतां शांत होते भवाची ॥

## रामराय व शिवराय

अशोक वनांतील सीतेपुढें मारुतीनें मुद्रिका टाकली तो प्रसंग किती रसपूर्ण ! कैक कवींनीं त्यावर करुण कवनें केलेलीं आहेत. एकनाथांनीहीं आपली प्रतिभा त्यासाठीं खर्ची घातली. पण समर्थांना त्याचें काय ? पारतंत्र्यानें गांजलेल्या महाराष्ट्राला त्यांतून काय स्फूर्ती मिळणार ? या विचारानें त्यांनीं " सितेनें पुढें मुद्रिका ओळखली । बहुतांपरी शुद्ध कारुण्यबोली " एवढ्या दोन ओळातचें त्या प्रसंगाची बोळवण केली आहे. तसेंच रामलक्ष्मण रणभूमीवर मूर्च्छित पडलेले पाहतांच "पुढें जानकीनें महाशोक केला" असें एका ओळीतच वर्णन करून समर्थांनीं तो भाग आटोपता घेतला आहे. याच्या उलट जेथें जेथें युद्धाचे प्रसंग येतात, तेथें त्यांच्या वाणीस विलक्षण चेव येतो आणि तिचा सहजच विस्तार होतो. " कपी लोटले लक्ष कोट्यानुकोटी " असें संग्रामाचें वर्णन तें मोठ्या उत्साहानें करतात. रामाच्या वानरांनीं रावणाच्या राक्षसांचा संहार केला हें सांगतांना समर्थांच्या डोळ्यापुढें शिवाजीचे मावळे औरंगजेबाच्या सैनिकांची कत्तल करीत आहेत हेंच दृश्य प्रत्यक्ष दिसत असावें, इतकें जिवंत वर्णन ते करतात. " करारां रणीं खादल्या वज्रदाढा " " वरीं पाहतां बाण बाणीं सणाणा " अशा शब्दांची गोलंदाजी करून समर्थ साक्षात् रणभूमीच डोळ्यांपुढें उभी करीत आहेत. प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रांनीं रावणाशीं महायुद्ध आरंभिलें, त्या वेळचें वर्णन समर्थ करतात—

रिपू सोडिती घोर शस्त्रें सणाणा ।
नळें वाजति बाण भाली खणाणा ।
बहूसाल स्फुल्लींग जाती फणाणा ।
महीमंडळीं घोष ऊठे दणाणा ॥

त्याचप्रमाणें रावणाच्या वधानंतर अयोध्येस आल्यावर श्रीरामाला राज्याभिषेक झाला, त्याचें वर्णनही समर्थांनीं किती विस्तारानें, किती उल्हासानें केलें आहे,—जणुं कांही शिवरायाचा राज्याभिषेकच डोळ्यापुढें ठेवून रामरायाचा अभिषेक ते रंगवीत आहेत. त्या आनंदमय प्रसंगाला योग्य अशींच शब्दरत्नेंही समर्थांनीं निवडलीं आहेत.

नभामाजि त्या दिव्य नक्षत्रमाळा ।
तयाचे परी शोभती मुक्तमाळा ॥
विराजे तया मंडपा मध्यभागीं ।
ऋषी राम माता सखे बंधुवर्गीं ॥

अशा रम्य शब्दांच्या रत्नमाला रामदासांनीं कुशलतेनें गुंफल्या आहेत.

"मज रघुनाथजीवेगळे कोण्ही जिवलग नाहीं." ही आपली अचल श्रद्धा समर्थांनीं रघुनाथरावास लिहिलेल्या खाजगी पत्रांतहि दिसून येते. पण ईश्वरभजनाबरोबरच जन-सेवेचाहि रोकडा उपदेश करणारे ते कर्मयोगी संत आहेत. 'मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥" असा क्रम त्यांनीं लावला आहे.

पंढरपूरला विठ्ठलाचें दर्शन घेण्यास एकदां समर्थ गेले, तरी त्यांच्या ध्यानींमनीं रामच—कोंडंदधारी, राक्षसान्तक व देवांचा स्वातंत्र्यदाता रामच ! हात जोडून विटेवर उभे राहिलेल्या विठ्ठलाला ते विचारतात, "येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ धनुष्यबाण काय केले । कर कटावरी ठेविले ॥ काय केलें वानर-दळ । येथें मिळाले गोपाळ ।"

## 'नारायणा 'ची प्रेरणा

धो धो धो धो वहाणाऱ्या धबधब्याच्या पाण्याप्रमाणें समर्थांची वाणी रामकथा सांगतांना वेगानें व घोषानें वहात आहे. सारें राष्ट्र "तुफान

प्रसंगांत'' सांपडलें आहे. “ कठीण त्यावरि कठीण जाले ” अशी अस्मानी-सुलतानी आपले धर्मबाधव भोगीत आहेत, हें समर्थांनीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिलें. मात्र देवावर हवाला ठेवून ते स्वस्थ बसले नाहींत. देवाला तर त्यांनीं आळविलेंच; पण त्याबरोबर मानवी प्रयत्नांनाही जागें केलें. त्यांत त्यांचें सर्वांत मोठें आशास्थान म्हणजे शिवाजीराजे. त्यांना अनुग्रह करण्यापूर्वीं समर्थांनीं एक पत्र लिहून किती व कशी प्रेरणा दिली आहे पहा.

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारू ।
अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥
तीर्थक्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं ।
सकळ पृथ्वी आंदोळलीं । धर्म गेला ॥
देवधर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण ।
हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥
या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकारितां ॥

महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्या समर्थांच्या अशा तेजस्वी उपदेशानें दुमदुमूं लागल्या.

मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ।
येविषयीं न करितां तकवां । पूर्वज हांसती ॥

असा महाराष्ट्र—धर्माचा स्फूर्तिप्रद संदेश खेड्यापाड्यांतील झोपड्यां-झोपड्यांपर्यंत त्यांनीं पोंचविला. अग्नीच्या ठिणग्या पाडीत समर्थांची वाणी महाराष्ट्राच्या कानामनांत ओरडून सांगत होती—

देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।
मुलुख बडवा कां बुडवावा । धर्म-संस्थापनेसाठीं ॥

## " तुझा तूं वाढवी राजा "

धर्मकारण व राजकारण यांचा इतका योग्य मेळ दुसऱ्या कोठें क्वचितच घातलेला सांपडेल. राजकारण करावयाचें, युद्धहि करावयाचें, पण तें सारें धर्मासाठीं, देवासाठीं—आक्रमणासाठीं, अन्यायासाठीं, शोषणासाठीं नव्हे. धर्महीन राजकारण ही कसाब-करणी ठरते तर राजकारणाविरहित धर्म हा अनाथ-पंगु मानला जातो. समर्थांनीं दोघांच्याहि मर्यादा बरोबर घालून देऊन त्यांचा नामी मेळ घातला आहे. प्रताप-गडच्या तुळजाभवानीचें दर्शन घेतल्यानंतर समर्थांनीं तिच्याजवळ जी प्रार्थना केली, तीहि अशीच दुहेरी आहे. सर्व विश्वाचें कल्याण तर समर्थांनीं चिंतिलें आहेच, पण त्याबरोबरच त्या " रामवरदायिनी " पाशीं त्यांनीं अशी मागणी केली आहे, " येकचि मागणें आतां । द्यावें तें मज-कारणें । तुझा तूं वाढवी राजा । शीघ्र आम्हांचि देखतां ॥ " शिवाजी-राजे म्हणजे भवानीआईच्या प्रेमाचें पोसणें. म्हणून समर्थ म्हणतात, " हा राजा तुझा आहे. पण आमच्या डोळ्यादेखत त्याचा यशकीर्तिप्रताप वाढीव. " तुझें रोकडें सामर्थ्य दाखीव, असेंहि " आतुर बोलणें " समर्थांचें आहे.

शिवाजी महाराजांवर अफझुलखान हा मुसलमानी सरदार चालून येत आहे अशी कुणकुण कानीं लागतांच समर्थांनीं आपल्या शिष्याकरवीं " विजापूरचा सरदार निघाला " असा संदेश शिवाजीकडे गुप्तपणें पाठविला. या संदेशांतील प्रत्येक अक्षरानें आरंभिलेल्या ओव्यांचें पत्र प्रसिद्धच आहे.

## कृतार्थतेचा आनंद

अफझुलखानाला ठार मारून महाराज दर्शनास आले, त्यावेळीं समर्थांना कृतकृत्य झाल्याचा केवढा आनंद वाटला ! त्या आनंदाला व्यापक स्वरूप देऊन त्यांनीं तो पुढील तात्त्विक भाषेनें महाराजांना ऐकविला,

बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजा भवानी ।
परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥
म्लेच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ।
याकारणें अखंड । सावधान असावें ॥
यशकीर्तिप्रतापमहिमा । उत्तम गुणांसी नाहीं सीमा ।
नाही दुसरी उपमा । देणें ईश्वराचे ॥
इहलोक परलोक पाहणें । अखंड सावधपणें राहणें ।
बहुतजनांचें साहणें । देणें ईश्वराचें ॥
धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले, आहेत, पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥

शिवाजीमहाराजांचा महिमा चढता–वाढता राहिला व महाराष्ट्रांत स्वराज्य अवतरूं लागलें, तेव्हां समर्थांच्या संतुष्ट नेत्रापुढें रामराज्य खेळूं लागलें. तें त्यांना स्वप्नांतही दिसूं लागलें " स्वप्नी जे देखिलें रात्रीं " तें रामराज्य त्यांनी " आनंदवनभुवन " या प्रकरणांत चित्रित केलें आहे. मिळविल्याचा आनंद आणि अधिक मिळविण्याचा उत्साह यांनीं हें प्रकरण कसें ओतप्रोत भरलेलें आहे समर्थ आरोळी ठोकतात—

बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ॥
उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ।
जपतपअनुष्ठानें । आनंदवनभुवनीं ॥
लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढतावाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥
रामवरदायिनी माता । गर्द घेऊनि उठली ।
मर्दिलें पूर्विंचे पापी । आनंदवनभुवनीं ॥
भक्तांसी रक्षिलें मागें । आतांही रक्षिते पहा ।
भक्तांसी दिधलें सर्वें । आनंदवनभुवनीं ॥
सामर्थ्यें यशकीर्तीची । प्रतापें सांडिली सीमा ।
राम कर्ता राम भोक्ता । रामराज्य भूमंडळीं ॥

## शिवराजाचा आदर्श

कृतकृत्य होऊन शिवाजीमहाराज दिवंगत झाले समर्थ मागें राहिले. संभाजीचीं दुष्कृत्यें ऐकण्याचें दुर्भाग्य त्यांचेवर ओढवलें. संभाजीमहाराजांनीं त्यांना एकदां निमंत्रण पाठविलें, पण त्याचा स्वीकार न करतां त्यांनीं संभाजीस पत्र मात्र पाठविलें. त्यावरून त्यांची स्थितप्रज्ञ वृत्ति व दूरदृष्टी दिसून येते. केवळ संभाजीलाच नव्हे तर महाराष्ट्राला—आणि त्यावेळेसच नव्हे तर आतां व पुढेंही—हा समर्थांचा संदेश दीपस्तंभासारखा मार्ग दाखविणारा आणि संजीवनी मंत्रासारखा जिवंत करणारा आहे. समर्थ म्हणतात,

आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ।
महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ।।
शिवराजास आठवावें । जिवित्व तृणवत् मानावें ।
इहपरलोकी रहावें । कीर्तिरूपें ।।
शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा प्रताप ।
शिवराजाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ।।
शिवराजाचें कैसें बोलणें । शिवराजाचें कैसें चालणें ।
शिवराजाची सलगी देणें । कैसें असें ।।

आपल्या लाडक्या शिष्याच्या पश्चात् पुरतीं दोन वर्षेंहि समर्थ इहलोकीं राहिले नाहीत. शके १६०३ मध्यें माघ वद्य नवमीस त्यांनीं सज्जनगडावर आपला देह ठेवला. तानाजीचीहि पुण्यतिथि तीच. छत्रपतीच्या गुरूनें व शिष्यानें स्वर्गाच्या प्रवासासाठीं एकाच मुहूर्तावर प्रस्थान ठेवलें !

## बहिरंगाकडे दुर्लक्ष

राजकारणाचीं सूत्रें खेळवीत असतांनाही समर्थांनीं धार्मिक साहित्य पुष्कळ निर्माण केलें. १४०० अभंगांचें एक स्वतंत्र प्रकरणच आहे. त्यांत पारमार्थिक ज्ञान सांगितलेलें आहे. त्याशिवाय स्फुट कविता विपुल आहेत. पदें, भारुडें यांचेंही धन अमाप आहे केवळ ओवी व अभंग या साध्या वृत्तांतच रमून न रहातां निरनिराळीं वृत्तें व चाली समर्थांनीं योजिल्या

आहेत. वामनपंडितांचा हा गुण त्यांनीं घेतलेला दिसतो. पण पंडितांप्रमाणें कोरीव–कातीव शब्द निवडणें व ते व्यवस्थितपणें वृत्ताच्या चौकटींत बसविणें याकडे समर्थांनीं फारसें लक्ष दिलें नाहीं. शब्दांची व वृत्तांची हिसकाहिसकी पुष्कळ ठिकाणी झालेली आहे. महापूर आलेली नदी दुथडा भरून चालली म्हणजे कांठावरच्या झाडांच्या किती फांद्या मोडतील, किती पानें पडतील यांची गणती नाही. तसा थाट समर्थांच्या काव्यप्रवाहाचा आहे. 'ओबडधोबड भाषेंत अंतःकरणांतील जळजळीत उद्‌गार" बाहेर फेंकणारे समर्थ ज्वालामुखी पर्वताप्रमाणेंच भासतात ज्वालामुखीवरही हिरवळ असतें पण क्वचित्. त्यांनींच आपल्या स्फूर्तीचें वर्णन " हवाया नळे, बाण भांडीं अनतें। बळें सोडीतां जाती आकाशपंथें " असें केलें आहे. बत्ती लागतांच सुरुंग उडावा तशी स्फूर्ती त्यांची आहे. शांतपणे तात्त्विक विचार मांडणारे त्यांचे दोन मुख्य ग्रंथ म्हणजे मनाचे श्लोक व दासबोध त्यांतील शेंकडों ओळी महाराष्ट्रीयांच्या मुखांत घोळत आहेत व मराठी भाषेमध्यें अमर झाल्या आहेत.

## मानव–समाजाला मार्गदर्शन

' मनाचे श्लोक " हा किती छोटा ग्रंथ. पण त्यांतील दोनशें पांच श्लोकांमध्यें सबंध मानवी जीवनाला पुरेल अशा विचारांची शिदोरी भरलेली आहे. नांव मनाचे श्लोक पण आहेत ते जनाचे श्लोक. " जनासि काय सांगणें मनासि सर्व सांगणें " ही त्यांची नम्र भूमिका आणि मनाला जें सांगावयाचें, तेंही त्यांनीं किती आर्जवानें, गौरवानें, गोडी-गुलाबीनें सांगितलें आहे. एखाद्या हट्टी, द्वाड, उनाड मुलाला प्रेमळ माता आंजारून–गोंजारून, 'माझा राजा तो' असें म्हणून जशी शाळेंत पाठवितें तशा धोरणानें हे मनाचे श्लोक समर्थांनी रचिलेले आहेत. मनाचा चंचलपणा काय सांगावा? अर्जुनानें त्याच्याविरुद्ध श्रीकृष्णाकडे पूर्वींच तक्रार केलेली आहे. नामदेवासारखे संत त्या मनाला उद्देशून म्हणतात, ' अरे मना मर्कटा! पापिया, चांडाळा, लंपटा. " पण अशा शिव्या देऊन चुकलेल्या मुलांची सुधारणा होत नसते हें आधुनिक शिक्षण-शास्त्रांतलें तत्त्व समर्थांनीं ओळखलें होतें. म्हणून त्यांनीं सुरवातच मुळीं

" मना सज्जना " अशा आदरार्थी शब्दांनीं केली आहे. ' देवाचा शोध घ्यावा ' हा पारमार्थिक विचार तर त्यांत आहेच आणि त्यासाठीं सद्‌गुरूची कास धरावी व अहंकार टाकावा ही साधनेंही सांगितलेलीं आहेतच. पण रोजच्या व्यवहारांत कसें वागावें याचीं सूत्रें सर्वत्र विखुरलेली आहेत. दासबोधांत तर तीं खूपच आहेत—जसा कांहीं पारिजातकाच्या फुलांचा सडाच. पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याही देशांतील मानव-समाजाला मार्ग-दर्शक ठरावीत अशी हीं समर्थांची आचारसूत्रें आहेत. त्यांचे हे प्रत्ययाचे बोल प्रत्येकांस चटक लावून योग्य मार्ग दाखविणारे आहेत. मनाचे श्लोक आणि दासबोध म्हणजे समर्थांच्या विचार-रत्नांनी भरलेल्या लहानमोठ्या तिजोऱ्याच.

## मनाला कानमंत्र

" मनाचे श्लोकांत " समर्थ सांगतात, ' अरे मना, संकटें आलीं तरी श्रेष्ठ धारिष्ट धर, चंदनाप्रमाणें झिजून लोकांची सेवा कर व सज्ज-नांना संतुष्ट कर अरे, क्रिया अशी करावी कीं, ज्यायोगें आपली कीर्ति आपल्या मृत्यूनंतरही मागें राहील. " मरावें परी कीर्तिरूपें उरावें. " यासाठीं बा मना, सर्व लोकांना राजी राख. आपण दुसऱ्याचें बोलणें सोशीत जावें. दुसऱ्याशी आपण नम्रतेनें बोलावें. आपल्याला कोणी चिमटा घेतला तर जीव कासावीस होतो ना ? आपणासारखे दुसऱ्याला राख. दुःख करूं नये. कारण जगांत सर्वतोपरी सुखी कोण आहे ? असा विचार कर. मना, जसें बोलावें तसें चालावें. वाद तुटत असेल तरच संवाद करावा. " जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा " हें जाणून, मना, तूं सदा रामनाम घे आणि देवकाजीं झीज, म्हणजे तुझी सारी चिंता देवास लागेल. भक्तावर संकट आलें तर राम त्याच्या पाठीशी उभा राहतो आणि भक्ताचें धारिष्ट कृपाळूपणानें पाहतों. चक्रवाकाला सोडविण्यासाठीं सूर्य जसा वर येतो, तसा देव भक्ताच्या संकटकाळीं उडी घेतो. रे मना, तूंच सांग " समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळी कोण आहे ? "

विवेकपूर्वक क्रिया आणि नम्रतापूर्वक भक्ति यांचा बोध समर्थांनीं मनाला

—आणि मनाच्याद्वारें जनाला—केला आहे. ' सदासर्वदा देव सन्नीध आहे " असा आशावाद आणि " क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे." असा प्रयत्न-वाद या कृष्णाकोयनांचा प्रीतिसंगम म्हणजे हा लघुग्रंथ. त्याच्या योगानें " चढे ज्ञान वैराग्य, सामर्थ्य अंगी " अशी फलश्रुति समर्थ आत्मविश्वासानें सांगत आहेत. त्या ग्रंथाचा विस्तार म्हणजेच दासबोध.

## दासबोधाची अपूर्वाई

" दासबोध " हा महाराष्ट्रधर्माचा प्रमाणग्रंथ होय. रामदासी लोक तर तो समर्थांचाच अवतार मानतात. तपश्चर्या व देशपर्यटन केल्यावर, ज्ञान व अनुभव संपादिल्यावर, मठांची संघटना बांधून, स्वराज्याचीं सूत्रें खेळविल्या-वर, आयुष्याच्या अखेरीअखेरीस आपल्या विचारांचा परिपाक म्हणून समर्थांनीं दासबोध ग्रंथ रचला. निधनापूर्वी दोन महिनेच पूर्ण केलेला हा ग्रंथ म्हणजे समर्थांचें मृत्युपत्रच होय. दहा समासांचा एक दशक असे वीस दशक दासबोधांत आहेत. ग्रंथांचीं एकूण ओवीसंख्या ७,७५१ आहे. गुरु—शिष्य—संवादाच्या रूपानें प्रपंचाचें व परमार्थाचें ज्ञान यांत रोकड्या भाषेनें ठामपणें सांगितलेलें आहे. मुमुक्षु जनांना हा ज्ञानकोशच वाटण्या-सारखा आहे. " येथ बोलिला विशद भक्तिमार्ग " ही समर्थांची प्रतिज्ञा सार्थ आहे. पण त्याबरोबर मूर्खांचीं लक्षणें आणि महंतांची लक्षणें, करंटा पुरुष आणि उत्तम पुरुष, व्यवहार व राजकारण इत्यादि सर्वांचा विचार त्यात आलेला आहे. हीं " समर्थ—कृपेचीं वचनें " आहेत. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ज्ञानेश्वरापासून सर्व संतांना मायभाषेच्या बचावाची जी लढाई खेळावी लागली होती, तींत समर्थांनाही भाग घ्यावा लागला. " येक म्हणती मऱ्हाटे काय । हें तो भल्यासी ऐको नये ' या आक्षेपाला समर्थांनीं रोखठोक उत्तर दिलें आहे. " भाषा—पालटे कांहीं । अर्थ वायां जात नाहीं ॥ आणि उपमा दिली आहे, " लोहाची मांदूस (=पेटी) केली। नाना रत्नें सांठविलीं । ती अभाग्यानें त्यागिलीं । लोखंड म्हणोनि.' शिवाजीमहाराजांनाही मराठीच्या पुरस्कारासाठीं " राज्यव्यवहार कोश " रचावा लागला होता.

## समर्थांची वाङ्मयी मूर्ति

दासबोधांत काय नाहीं ? सकाळीं उठून दांत घांसावे आणि नाना देशींचे बोरु आणून अक्षर घडसून सुंदर करावें अशा बाळ-बोध उपदेशा-पासून ' आहे तितुकें देवाचें । ऐसें वर्तणें निश्चयाचें " येथपर्यंत अध्या-त्माची भरारी आहे. तसेंच " रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी " आणि ' घालून अकलेचा पवाड । व्हावे ब्रह्मांडाहून वाड (=व्यापक)" ॥ असा गगनाला गवसणी घालणारा आदेशहि त्यांत आहे. कारण समर्थांच्या अंतःकरणांतील आकांक्षेचा झगाच इतका जोराचा आहे. राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥ हेळामात्रे मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचा ॥ " अशी प्रतिज्ञापूर्वक महत्त्वाकांक्षा त्यानीं जगजाहीर केली आहे. उगीच नाहीं त्यांना " समर्थ " पदवी लाभली ! ती पदवी कोणाला मिळते हें समर्थांनींच सांगून ठेवलें आहे. ' बहुत जनांसी चालवी । नाना मंडळें हालवीं " तोच समर्थ. त्याच्या राहणीचें वर्णन समर्थांच्याच मुखानें आपल्याला ऐकावयाचें आहे काय ? मग दासबोधाच्या पंधराव्या दशकांतील दुसरा समास उघडा आणि महंताचीं लक्षणें नीट वाचा म्हणजे कोणाची मूर्ती डोळ्यापुढें उभी राहतें हें कळून येईल.

उदंड करी गुप्त रूपें । भिकाऱ्यासारखा स्वरूपें ।
तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिलीं ॥
खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥
लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।
भूमंडळीं सत्ता चालें । गुप्तरूपें ॥

याहून दुसऱ्या कोणत्या शब्दांनीं समर्थांचें वर्णन करतां येईल ? " जेणें क्रिया पालटे त्या नांव ग्रंथ " या कसोटीला पुरेपूर उतरणारा ग्रंथराज म्हणजे दासबोध. ग्रंथांचें व काव्याचें काव्यमय वर्णन समर्थांनीं दासबोधाच्या

प्रारंभींच केलें आहे. कवि हे "शब्द-सृष्टीचे ईश्वर" आहेत असें म्हणून समर्थ काव्याचा महिमा पुढील रमणीय भाषाशैलीनें करतातः—

कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसाचे वोघ लोटले ॥
नाना सुखाचे उचंबळले । सरोवर हें ॥






# विष्णुशास्त्री चिपळूणकर : : ६

एकाद्याच्या हातांतच अमृत असतें असें म्हणतात. ज्ञानदेवांची वाणी तर अमृतावर ताण करणारी, तशीच चिपळूणकरांची. आणि जें वाणींत तें करणींतहि. ज्ञानोबांनीं भागवतधर्माचें जें इवलेसें रोप लावलें, त्याचा वेल किती तरी विस्तारला ! मालाकारांनीं सुरू केलेला राष्ट्रीयत्वाचा पंथहि वर्षानुवर्षें सारखा वाढतच आहे. मालाकारांनीं ज्या ज्या संस्था स्थापल्या, जीं जीं कार्यें उभारलीं, तीं अल्पावधींतच फुलाफळास आलीं. संस्कृतांतील ज्ञान मराठींत आणण्यासाठीं ज्ञानेश्वरांना 'बंड' करावें लागलें, तसेंच इंग्रजीचे दास बनलेल्या महाराष्ट्रीयांचे डोळे मायभाषेकडे वळविण्याचें कार्य विष्णुशास्त्र्यांना करावें लागलें. स्वभाषा, स्वधर्म व स्वदेश

+ ८

यांचा पुरस्कार त्यांच्याइतका त्यांच्यापूर्वी कोणीच केलेला नव्हता. उलट, या तिन्ही दैवतांची विटंबनाच त्यांच्यापूर्वीचे आंग्ल–विद्याविभूषित विद्वान करीत–किंबहुना त्यांतच ते धन्यता मानीत. त्यांनीं पसरलेलें भ्रमजाल सपासपा कापून टाकण्याचें कार्य शास्त्रीबोवांनीं मोठ्या धैर्यानें व चातुर्यानें पार पाडलें.

मराठींतील " आद्य काव्य–ग्रंथ " जसा ज्ञानेश्वरी; तसा " आद्य-गद्य-ग्रंथ " निबंधमाला. ज्ञानेश्वरीपूर्वींहि महानुभावांनीं मराठींत सहा–सात हजार ग्रंथ रचिले होतेच; पण मराठी काव्याची गंगोत्री म्हणजे ज्ञानेश्वरीच. त्याचप्रमाणें महानुभावापासून बखरी वगैरेमधून मराठी गद्य थोडेंफार विखुरलेलें असलें, तरी पहिला नांव घेण्याजोगा मराठींतील गद्य ग्रंथ म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची " निबंधमालाच ". ज्ञानेश्वरीचे निर्माते वयाच्या एकविसाव्या वर्षीं समाधिस्थ झाले, तर 'निबंधमाले'चे कर्ते बत्तिसाव्या वर्षीं दिवंगत झाले.

## ' मराठीचा शिवाजी '

विष्णुशास्त्र्यांचे वडील कृष्णशास्त्री. त्यांना 'बृहस्पति' म्हणत, इतकी त्यांची बुद्धि तेजदार होती. वयाच्या पंचविसाव्या वर्षीं ते इंग्रजी शिकूं लागले–आणि शिकले ते इतके कीं, ' रासेलस ' वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें त्यांनीं मराठींत केलीं. संस्कृत ' मेघदूताचा ' त्यांनीं केलेला अनुवाद सरस आहे. ' विचार–लहरी ' या पत्राचे ते संस्थापक होते. त्यांत ते ख्रिस्ती मिशनऱ्यांवर झोड उडवीत. त्यांच्या भाषा–सेवेचा व समाज–सेवेचा पूर्ण विकास विष्णुशास्त्र्यांच्या ठायीं झालेला आढळतो–जशी कांहीं शहाजी–शिवाजीची जोडीच. ' मी मराठी भाषेचा शिवाजी आहें ' असें विष्णुशास्त्री खाजगी भाषणांत कांहींशा विनोदानें, कांहींशा अभिमानानें म्हणतहि.

## लेखन–कलेचें भांडवल

विष्णुशास्त्र्यांचा जन्म ता. २० मे १८५० रोजीं पुणें येथें झाला. त्यांचें इंग्रजी शिक्षण ' पूना हायस्कूलांत ' झालें. ते १८६५ सालीं

मॅट्रिकची परीक्षा उतरले. त्याच वर्षी, त्या वेळच्या रूढीप्रमाणें, त्यांचा विवाहहि झाला. त्यानंतर ते ' पूना कॉलेज ' मध्यें गेले. ते कॉलेज वानवडी येथें होते. त्या कॉलेजांत प्राचार्य युरोपियन व कांहीं प्राध्यापकहि युरोपियनच. इंग्रजी–संस्कृत हे भाषा–विषय आणि इतिहास हे विषय विष्णुशास्त्र्यांनीं चांगले अभ्यासले. त्यांनी दोन शिष्यवृत्त्याहि पटकावल्या. पण गणित विषय त्यांचा नावडता. त्यामुळें त्यांना एकदां परीक्षेंत हार खावी लागली. १८६८ सालापासून नव्या जागेंत डेक्कन कॉलेज सुरू झालें.

तेथें विष्णुशास्त्र्यांनीं दोन वर्षें काढलीं व सपाटून वाचन केलें. इंग्रजींतील मेकॉले, संस्कृतांतील बाण व मराठींतील मोरोपंत यांचा विशेष अभ्यास त्यांनीं केला. पन्हाळकर बोवासारख्यांच्या कथांतूनहि संत–वाङ्मयाचा रस त्यांनीं चाखला. " प्राचीन हिंदु लोकांचें ज्ञान " या विषयावर त्यांनीं निबंध लिहून तो कॉलेजांतील वादसभेंत वाचला. मराठी भाषेवर प्रभुत्व मिळावें म्हणून ते विशेष परिश्रम करीत. दर आठवड्यास एका संस्कृत उताऱ्याचें मराठी भाषांतर करण्याचा क्रम त्यांनीं तीन वर्षें अखंड चालविला होता. परीक्षेच्या अभ्यासक्रमाबाहेरील वाचनांत त्यांनीं वेळ घालविल्यामुळें बी. ए. च्या परीक्षेंत प्रथम त्यांना अपयश आलें; पण १८७१ सालीं ते बी. ए. झाले. कॉलेजांतील चौफेर वाचनाचा उपयोग त्यांना पुढील आयुष्यांतील लेखनास अतिशय झाला. त्या प्रचंड वाङ्मय-व्यापाराचें भांडवलच तें !

## संस्कृत कवि–पंचक

पदवी–परीक्षेचा अभ्यास चालू असतांच विष्णुशास्त्र्यांनीं एका खाजगी शाळेंत शिक्षकाची नोकरी धरली होती. शिकवितां शिकवितां शिकावयाचें अशी दुहेरी कामगिरी ते पार पाडीत होते. शिवाय, अधूनमधून लेखनहि चालू होतेंच. तो त्यांचा छंदच. वडिलांनीं ' रासेलस ' चें भाषांतर आरंभिलें होतें; तें त्यांनीं पूर्ण केलें. संस्कृतांतील ' कादंबरी ' अशाच पितापुत्रांनीं पुरी केलेली आहे. ' शालापत्रक ' मासिकाच्या संपादकत्वाचीं सूत्रेंहि वडिलांनीं विष्णुशास्त्र्यांच्या हातीं दिलीं. ' संस्कृत कवि–पंचक ' हा

त्यांचा रसपूर्ण व मार्मिक ग्रंथ याच मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाला. कालिदास, भवभूति इत्यादि कविश्रेष्ठांची माहिती देऊन त्यांतील सौंदर्य–स्थळांचे वेचे शास्त्रीबुवांनीं आपल्या या पहिल्या ग्रंथांत दिले आहेत. ‘ मराठी कविता ’ असा विषयहि त्यांनीं विवेचनास घेतला होता. पण तें मासिकच पुढें बंद पडलें.

ज्या ‘ पूना हायस्कूलांत ’ विष्णुशास्त्री विद्यार्थी म्हणून शिकले, तेथेंच ते १८७३ पासून शिक्षक म्हणून शिकवूं लागले. ही सरकारी नोकरी उत्तरोत्तर त्यांना तापदायकच होत गेली.

## ज्ञानेशापासून स्फूर्ति

एक महान् संकल्प ! एका पुण्यक्षेत्रींच तो जन्मास आला. १८७३ सालीं, नाताळच्या सुटींत, विष्णुशास्त्री आळंदीस गेले होते. बरोबर स्नेहीसोबती होते. ज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीचें दर्शन सर्वांनीं घेतलें–जणु कांहीं त्यांतूनच त्यांना स्फूर्ति मिळाली. ‘ अमृतातेंहि पैजा जिंकणाऱ्या ’ मराठीचा तो प्रभु. त्यांच्या स्मृतीमुळें मराठी भाषेसंबंधीं गप्पा निघाल्या. बोलतां बोलतां मित्रांनीं शास्त्रीबुवांना सुचविलें कीं, “ तुम्ही एकादें झोकदार मासिक काढा आणि त्यांत ‘ संस्कृत कवि ’ सारखे रसदार लेख लिहा. त्यायोगें मराठी भाषेची मोठी सेवा होईल. ” जणु ज्ञानेशांनींच मित्रांच्या मुखानें आज्ञा केली असें मानून, शास्त्रीबुवांनीं लगेच १८७४ सालापासून मासिक सुरू केलें–त्याचें नांव ‘ निबंधमाला ! ’ राम–दास जसे दास–बोधांत पहावयास सांपडतात, तसें विष्णुशास्त्री निबंधमालेंत दिसतात. निबंधमालेनें मराठी वाङ्मयांत नवेंच युग सुरू केलें. केळकर–परांजपे–पांगारकर–कोल्हटकर–सावरकर इत्यादि कैक पुढील प्रभावी लेखकांचा संप्रदाय ‘निबंधमालेंतून’च जन्मास आला आहे.

## चौफेर राष्ट्र-सेवा

अज्ञान, दारिद्य व पारतंत्र्य यांच्या चिखलांत रुतलेल्या आपल्या राष्ट्राला वर आणण्यासाठीं चोहों अंगांनीं प्रयत्न करण्यास शास्त्रीबुवानीं कंबर

कसली. १८७८ सालीं ‘ काव्येतिहाससंग्रह ’ नांवाचें मासिक त्यांनीं सुरू केलें. ‘ पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काल ’ या न्यायानें आपल्या इतिहासाची खरी ओळख महाराष्ट्रीयांना करून द्यावी हा त्यांचा हेतु. त्याच वर्षी शास्त्रीबुवांनीं ‘ चित्रशाळा ’हि काढली. देवदेवतांचीं, साधुसंतांचीं व ऐतिहासिक स्त्रीपुरुषांचीं चित्रें निरक्षर समाजालाहि स्फूर्तिदायक होतील ही त्यांची आशा. रामपंचायतनाच्या चित्राच्या दोन हजार प्रति एका महिन्यांत उडाल्या !

## नोकरीची बेडी तोडली !

‘ निबंधमालेंतून ’ टीकेची सरबत्ती शास्त्रीबुवा चालवीतच होते. त्याचा एक परिणाम म्हणजे सरकारी अधिकारी गरम झाले. त्यांनी शिक्षा म्हणून, शास्त्रीबुवांची बदली पुण्याहून रत्नागिरीस १८७७ सालचे अखेरीस केली. त्या ‘ काळ्या पाण्यावर ’ त्यांनीं वर्ष दीडवर्ष कसेंबसें काढल्यावर, सरकारी शृंखला तोडण्याचें मनानें ठरविलें. सरकारी नोकरी करून सरकारावर टीका करणें कठीण होत गेलें आणि परक्या सरकाराच्या अन्यायावर तुटून पडणें हें तर त्यांना कर्तव्य वाटे. विष्णुशास्त्र्यांच्या वडिलांची एक मामी होती; ती त्यांना एकदां म्हणाली, “ काय रे विष्णु ! तुझा किती रे नांवलौकिक गांवभर आहे ! जें तें म्हणतें, तूं काय काय लिहितोस ? तुझा हात धरणारा कोणी नाहीं. तूं साहेबाविषयीं जर वांकडें लिहितास ना, तर एव्हांना कोठें तरी दोनचारशें रुपयांवर असतास. खरं ना विष्णु ? ” भोळ्या म्हातारीच्या या साध्याभोळ्या शब्दांत शास्त्रीबुवांच्या लेखन-कार्याचें, किंबहुना जीवन-कार्याचेंहि रहस्य येऊन गेलें आहे. त्यांना सरकारी नोकरीचें जोखड असह्य वाटत होतें. पण वडिलांची भीति. परंतु वडील ता. २० मे १८७९ रोजीं निधन पावले. लगेच विष्णुशास्त्र्यांनीं निवृत्तीपूर्वीची सहा महिन्यांची रजा घेतली व पुण्याच्या कर्मभूमींत ते जाऊन ठाकले. तेथूनच त्यांनीं आपला राजीनामा पाठविला.

## ‘ लोकसेवेचें निशाण उभारलें ! ’

चित्राप्रमाणेंच चांगल्या ग्रंथांचाहि प्रसार करावा, या हेतूनें शास्त्री-

बुवांनीं " किताबखाना " नांवाचें पुस्तकाचें दुकान १८७९सालीं काढलें. ध्येयवादी शिक्षण स्वस्त दरांत फैलावावें म्हणून ता. १ जानेवारीं १८८० रोजीं " न्यू इंग्लिश स्कूल " काढलें व " गुलामगिरीच्या बेड्या तोडून लोक–सेवेचें निशाण उभारलें." या कामीं त्यांना टिळक–आगरकरां-सारख्या नरश्रेष्ठांचें सहकार्य मिळालें. त्यामुळें आरंभीं जेथें दीडशें विद्यार्थी होते, तेथें पांच महिन्यांत पांचशें विद्यार्थी जमले–ते परीक्षेंतील मानाचे तुरे पटकावू लागले. " देशस्थिति सुधारण्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञानसंपन्न करणें हा होय " असा शास्त्रीबुवांचा सिद्धांत होता. त्यासाठींच त्यांनीं ' निबंधमाला ' सात वर्षें चालविली, चित्रशाळा काढली, किताबखाना उघडला व न्यू इंग्लिश स्कूल स्थापन केलें. यानंतर वाढत्या प्रमाणांत लोक–शिक्षण करण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं १८८१ च्या जानेवारीत दोन वृत्तपत्रें काढलीं—एक मराठी व एक इंग्रजी–एकाचें नांव ' केसरी ' व दुसऱ्याचें ' मराठा '. ' केसरी 'नें आपल्या निर्भय गर्जनेनें महाराष्ट्राला गदगदा हालवून सोडलें व स्वराज्य मिळविण्यास प्रवृत्त केलें. सरकारच्या कानावर जनतेच्या तक्रारी घालण्यासाठीं 'मराठा' हें इंग्रजी पत्र त्यांनीं सुरू केलें. ' अज्ञान–ध्वंसनाविषयीं केवळ वज्रच ' या दृष्टीनें शास्त्रीबुवा आपल्या पत्राकडे पहात. हीं वृत्तपत्रें, पुस्तकालय, चित्रालय व विद्यालय अशा लोक–शिक्षणाच्या चतुर्विध संस्था स्थापून व प्रगतिपथावर ठेवून, विष्णुशास्त्री यांनीं १८८२ सालीं ता. १७ मार्च रोजीं आपला देह ठेवला !

## शारदेची वैजयंतीमाला !

चौसष्ट वर्षांच्या आयुष्यांतहि कैक थोरांना जें कर्तृत्व दाखवितां येत नाहीं, तें अवघ्या बत्तीस वर्षांच्या जीवनांत गाजवून शास्त्रीबुवांनीं " दिव्य यश भूमंडळावर मिरविलें. " त्या कामीं त्यांनीं अनेक तरुण देशभक्तांचें सहकार्य संपादन केलें. ' निबंधमाला ' मात्र त्यांनीं एकट्यानें एकटाकी लिहिली. ती महाराष्ट्र–शारदेची वैजयंतीमालाच ठरली !

" गेल्या दशकांत कागदाला टाक लागल्याव्यतिरिक्त आमचे फारच

थोडे दिवस गेले असतील. " असें अखंड लेखन शास्त्रीबुवांनीं केलें, त्यातही सरकारी नोकरींतून सुटल्यावर तर ते अगदीं मोकळेपणानें लिहूं लागले—पिंजऱ्यांतून सुटलेल्या पोपटाप्रमाणें तें स्वच्छंद भराऱ्या मारूं लागले. त्या मुक्ततेचा आनंद वर्णन करतांना निबंधमालेंत तेच लिहितात, " या वेडगळ काचांतून आम्हीं सुटलों. आतां इंग्रेज ग्रंथकार, संस्कृत ग्रंथकार व मराठी ग्रंथकार आहेत आणि आम्हीं आहों ! तिसरा कांटा म्हणून आतां कोणताही उरला नाहीं. " परक्याची ताबेदारी नाहीं, परक्याचा छापखाना नाहीं, स्वतंत्र विचार मांडण्यासाठीं स्वतंत्र मासिक, स्वतंत्र साप्ताहिक, स्वतंत्र विद्यालय—अशा स्वातंत्र्याचा उपभोग शास्त्रीबुवांना शेवटींशेवटी घेतां आला. हें सारें स्वातंत्र्य त्यांनीं स्वतःच्या करणीनें मिळविलेलें होतें.

## झोकदार भाषा

अनेक तेजस्वी नक्षत्रांचा जो एक पट्टा आकाशांत दिसतो, त्याला आकाशगंगा म्हणतात, त्याचप्रमाणें स्वदेशाभिमान, स्वभाषाभिमान व स्वधर्माभिमान या उदात्त गुणांचा समूह म्हणजे निबंधमाला, स्वत्त्व हाच तिचा प्राण. जें जें म्हणून 'स्व' आहे त्याचा उत्कर्ष करावयाचा–प्रसार करावयाचा हेंच मालेचें ब्रीद. त्यासाठीं बहुश्रुतपणा, कळकळ, आवेश, विनोद, उपरोध वगैरे अनेक साहित्यगुणांचा उपयोग शास्त्रीबुवांनीं केलेला आहे. त्यांनींच एके ठिकाणीं ' लोकमान्य ग्रंथाची ' भाषा–पद्धति कशी असावी, हें सांगितलें आहे. तें निबंधमालेंतील वर्णन निबंधमालेच्या भाषेलाच जास्त शोभून दिसते. शास्त्रीबुवा लिहितात, " वाक्यरचना सरळ असावी, अर्थ चांगला खुलासेवार–मजेदार रीतीनें लिहिलेला असावा—असा कीं, तो सहज मनांत भरून वाचण्याची सारखी हौसच वाटत जावी, आणि एकंदर लिहिण्यांत आवेश किंवा झोकदारपणा असावा. " अशी मजेदार व झोंकदार भाषा ' निबंधमालेची ' खास आहे.

## सुवर्णमय द्वारका

' निबंधमालेचे ' सात वर्षांत ८४ अंक निघाले. ते पाहून महाराष्ट्र तर

वेडा होऊन गेलाच, पण खुद्द मालाकारांनाही खरी धन्यता वाटली. ते आत्मविश्वासानें लिहितात, "चतुरशीतिमालेकडे पाहून आम्हांसच काय, पण प्रत्येक भाषाहितेच्छूला व देशहितेच्छूला आनंद झाल्याशिवाय रहाणार नाही, असें आम्हांस वाटतें." दुसऱ्या कोणापाशीं 'एक छदाम किंवा एक ओळही न मागतां', ऐन पंचविशींतील या तरुणानें, साहित्याची ही जी एकखांबी द्वारका उभी केली; ती खचित 'सुवर्ण'मय आहे. "गेल्या ध्यार वर्षांत सदरील पुस्तकाचा जो आम्ही अव्याहत उद्योग केला त्याला आमच्याच देशांत काय, पण पाश्चात्य देशांतहि तोड सांपडणार नाहीं असें म्हटलें असतां गर्वोक्ति केल्याचा दोष माथीं येईल असें आम्हांस वाटत नाहीं." हें शास्त्रीबुवांनीं केलेलें निवेदन गर्वाचें नाहीं, सत्याचेंच आहे.

## विषय अनेक, धोरण एक

मालेच्या पहिल्या अंकाचा विषय "मराठी भाषेची सांप्रतची स्थिति" हा होता आणि शेवटच्या अंकाचा विषय "आमच्या देशाची स्थिति" हा होता. (शेवटचा निबंध तीस वर्षांनंतर ब्रिटिश सरकारनें जप्त केला. नंतर स्वराज्य सरकारनें तो मुक्त केला.) भाषेपासून देशाकडे मालाकारांची लेखणी हळुंहळू वळत गेली असें दिसत असलें, तरी आरंभापासून शेवट-पर्यंत स्वदेशीच्या एकाच सूत्रांत माला गुंफलेली आहे हें खास. विषय लेखन शुद्धीचा असो किंवा कवित्वाचा असो, गर्वाचा असो किंवा लोकभ्रमाचा असो—प्रत्येकाचें प्रतिपादन करतांना शास्त्रीबुवांची देशभक्ती जागरूक असाव-याचीच. साऱ्या विषयांची बैठकच मुळीं ती. इतिहासावर तीन व वक्तृत्वा-वर सहा अंक त्यांनीं खर्चीं घातले आहेत. "इंग्रजी भाषा" हा निबंध चार अंकांत चालला होता; तर डॉ. जॉन्सनचें चरित्र आठ अंकांत लिहून चरित्रलेखनाचा उत्कृष्ट नमुनाच त्यांनीं घालून दिला. "जें जें आपलें तें तें सारें तुच्छ," असें लिहिणाऱ्या "लोकहितवादींचा" समाचार घेण्यासाठीं त्यांनीं बारा अंक खर्चीं घातले आहेत. शास्त्रीबुवांच्या टीका-शैलीचे सारे गुण या लेखांत नुसते उसळत आहेत. सर्वांत मोठा निबंध म्हणजे मोरोपंतांचा. तेरा अंकांत चाललेला हा निबंध पुस्तकाच्या

आकाराचीं मोठीं दोनशें पानें व्यापणारा झाला आहे. विषय कोणताहि असो, शास्त्रीबुवांचा निबंध बुद्धीला व भावनेला हलविणारा असावयाचाच– आणि स्वाभिमानाला तर जागृत करावयाचाच.

## झुंझार टीकाकार

" असत्यरूप व भ्रांतिरूप धुकें जें या देशभर आजपर्यंत पसरून राहिलें आहे, त्याचें निरसन करून सत्यरूप सूर्याचा व ज्ञानाचा स्फार ३८५ अजूनहि व्हावा, " हा शास्त्रीबुवांच्या साऱ्या लेखनाचा हेतु. त्यासाठीं त्यांना कांहीं कांहीं वर्गांवर कडाडून हल्ले करावे लागले. मिशनरी, सुधारक, पाश्चात्यांचे अंधभक्त वगैरे आपल्या देशाचे व धर्माचे जे जे कोणी शास्त्रीबुवांना शत्रु वाटले, त्या सर्वांवर त्यांनीं आपलें तिखट शस्त्र सपासपा चालविलें. ते गरजून सांगतात, " आम्ही तर आमचा कृत्यसंकल्प येथें स्पष्ट लिहून कळवितों कीं, आमच्या महाराष्ट्र–भाषेंत जेवढे म्हणून कठोर शब्द आहेत व तिच्या अंगीं निंदा–व्यंजकत्व जेवढें म्हणून आहे, तेवढ्या सर्वांचा असल्या महापातकी मनुष्यावर वर्षाव केल्याखेरीज आम्हीं कधीं राहणार नाहीं ! " सनातनी धर्माभिमान्यांवरहि टीका करण्यास ते कचरले नाहींत. प्रसंग पडला तेव्हां, स्वतःच्या साक्षात् वडिलांवरहि त्यांनीं, अर्जुनाच्या आवेशानें, शरसंधान केलें. आंधळ्या पितृभक्तीचा उपहास करतांना ते लिहितात. " आपले राज्यकर्ते जें जें करतील त्यांस नेहमीं मान डोलवीत जायची ही जर राजनिष्ठा, इंग्रज ग्रंथकारांच्या पेनांतून जें जें निष्पन्न होईल तें तें शिरसावंद्य करायचें ही जर सत्यनिष्ठा, पाद्रीसाहेब जें जें सांगतील त्यास ' आमेन् ' ( तथास्तु ) या एक्या पदानेंच उत्तर करायचें ही जर धर्मनिष्ठा, तर मग ' बाबावाक्यं प्रमाणम् ' हेंच पितृभक्तीचें परमस्वरूप होय ! या कडकडीत मताची दीक्षा घेऊन तें आजन्म अबाधित पाळण्याचा ज्यांचा कृतसंकल्प असेल व त्यांत ज्यांस धन्यता वाटत असेल, त्यांस ती सुखेनैव वाटो."

आपल्या विद्वान पित्याचा गौरव कसा करावा हें शास्त्रीबुवाच जाणोत. कृष्णशास्त्री यांच्यासंबंधीं त्यांनीं पुढील आदराचे उद्‌गार, त्यांच्या-

वर टीका करण्यापूर्वीं काढले आहेत. " ज्या महापंडितांचा पितृनामानें निर्देश करण्याचा अधिकार जगदीशाच्या कृपेनें आमच्याकडे आहे, ज्याचें पूर्ववय गदाधरादिकांच्या समागमें जाऊन उत्तर वय मिल्लप्रभृति पाश्चात्य तत्वज्ञांच्या संगतीनें गेलें, रविकरगतकमला—न्यायानें ज्याच्या विकासप्रद सान्निध्याचा अमूल्य लाभ आजपर्यंत इतका काळ आम्हांस लाभला, आणि ज्याचें स्वभाषावृद्धीचें व्रत आज पांच वर्षें यथाशक्ति चालवून देशोन्नतीच्या धुराकर्माचा अंगीकारहि ज्याच्या पद्धतीस अनुसरून आम्हांस करणें अवश्य आहे—त्या विख्यात पुरुषाचा प्रस्तुत प्रकरणीं कसा अभिप्राय पडता याची आम्हांस पूर्ण खात्री आहे. "

## तीक्ष्ण उपरोध

" मनुष्यानें जीं जीं म्हणून बौद्धिक शस्त्रें शोधून काढलीं आहेत त्या सर्वांत तीक्ष्ण शस्त्र म्हणजे व्हॉल्टेअरनें केलेला उपहास " असें मेकॉलेनें म्हटलें आहे. तेंच वर्णन मराठीमध्यें जर कोणाच्या लेखणीला शोभत असेल, तर फक्त विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याच. त्यांच्यानंतर शिवराम-पंत परांजपे यांनीहि आपल्या लेखन-शस्त्राला उपहासाची धार अधिकच पाजली पण पहिला मान शास्त्रीबुवांचा. साध्या तारायंत्राच्या जलद सोयीचें वर्णन करावयाचें असलें तरी शास्त्रीबुवा आपलीं वाघनखें कशीं वापरतात पहा. " मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या डोक्यांवरून सफाई हात फिरवून लॉर्ड डलहौसीसाहेब जेव्हां थकलेभागले होत्साते हरि हरि म्हणावयाला परत निजधामास गेले, व लंडनांतल्या तारागृहांतून त्यांनीं हिंदुस्थानाची अलवेली विचारली, तेव्हां अर्जुनाच्याच कृतीचा नमुना उतरला नाहीं काय ? "

खिस्ती राज्यकर्ते येशू खिस्ताचा शांति-मंत्र पायाखालीं तुडवून परतंत्र हिंदुस्थानांत नंगा नाच घालीत होते. त्यांना " दुष्ट, निर्दय, पापी, अन्यायी, " अशा सरळ विशेषणांची कितीही लाखोली वाहिली तरी होणार नाहीं, इतका परिणाम शास्त्रीबुवा आपल्या उपरोधिक लेखणीनें करतात. त्यावेळीं इंग्रजसरकारविरुद्ध ब्र काढण्याची चोरी असे. तेव्हां

उपरोधानें, अन्योक्तीनें, रूपकानें, छद्मी भाषेनें, आडपडद्यानें टीका करणेंच शक्य होतें. असा " गनिमी कावा " लढविण्याची बुद्धि व ताकद या " मराठीच्या शिवाजी "पाशीं भरपूर होती. खिस्ती राज्यकर्त्यांच्या पापाबद्दल मिस्किलपणानें शास्त्रीबुवा म्हणतात,

" पंढरपुरच्या विठोबानें दामाजीपंताबद्दल जशी एकदम भरपूर रसद पोंचवून दिली, त्याप्रमाणें वरील प्रभूनें आपल्या रक्तानें आपल्या क्रोधाग्नि पित्यास संतुष्ट करून, पुढच्या व मागच्या सर्व पापांबद्दल साऱ्या मनुष्यजातीची हमी भरून, भरभक्कम ऐवज स्वर्गाच्या दरबारीं एकदम पटवून दिला आहे. तेव्हां आतां खिस्तभक्तांच्या आचरणांत वैगुण्य काढण्याची प्रत्यक्ष आकाशांतील बापाचीहि पुण्याई नाहीं. "

## बोलक्या सुधारकांची शोभा

राज्यकर्त्यांशीं सामना करण्याचें राजकारण टाळून जे विद्वान पदवीधर केवळ सामाजिक सुधारणेचें काम करीत राहिले किंवा त्या कामाचा नुसता पुकारा करीत राहिले, त्या सुधारकांची शोभा करतांना शास्त्रीबुवा लिहितात, " आमच्या देशांतील नव्या नव्या उमेदवार विद्वानांनीं व पंडितांनीं पहिल्यानें खूप कंबर बांधली; पण हळुहळू त्यांचा आवेश व उत्साह कमी कमी होत जाऊन लवकरच चोहोंकडे अगदीं सामसूम होऊन गेलें. लोककल्याणाची उष्णता जी कांहीं थोडा वेळ २१२ अंशावर अगदीं टळटळीत येऊन पोंचलीशी दिसत होती, ती लवकरच खालीं जावयाला लागून जातां जातां ३२ च्याहि कांहीं अंश खालीं गेली! विधवांच्या मनोरथास नुकता अंकुर जों कुठें फुटूं लागतो न लागतो, तोंच चोहोंकडे गारठा पसरावयाला लागून तो जागच्या जागीं कोमेजून गेला ! "

या सुधारकांनीं स्वामी दयानंदांची हत्तीवरून मिरवणूक काढली. पण लोकांनीं ती मिरवणूक उधळून लावली. या प्रसंगाचें उपरोधिक वर्णन शास्त्रीबुवा गालांतल्या गालांत हंसत पुढीलप्रमाणें करतात. " ज्या

गजेंद्रानें स्वामीची वरात सुशोभित करून आपलें जीवित धन्य करून घेतलें, त्याची कोणी शेपूट ओढून, कोणी सोंड ओढून व महातास तिसऱ्या ठिकाणीं फुकटाफुकट प्रायश्चित्त मिळून पुण्याच्या दुष्ट व दांडग्या ब्राह्मणांनीं गाढवासारखा माघारी पार पळवून लावला; ज्या दीपिका या शहरांतील शंभर दीडशें वर्षे साचलेल्या मूर्तिजन्य अंधकारासच जणों काय दूर करीत होत्या, त्याहि एकदम मालवून दिवस्थांस पलायन करण्यांतच निभवणूक दिसली; बाजेवाल्यांनी व तासेवाल्यांनीं तोच मुक्तीचा मार्ग पसंत केला;— इतक्यांत पोलिसचे शिपाई धांवत आले. ”

## एकच वाक्य !

शास्त्रीबुवांच्या लेखणीचें कौशल्य कोणाची शोभा करणें व कोणाची टर उडविणें यांतच नव्हतें, आपल्या सिद्धांताचें प्रतिपादन शांतपणें, युक्तिवादानें व गांभीर्यानें करण्याचें सामर्थ्यहि तिच्या अंगीं पुरेपूर आहे. इंग्रजांच्या अंमलाखालीं आपल्या देशाची दुर्दशा कशी झाली आहे आणि तरीहि आपले विद्वान भलत्याच कामांत कसे चूर आहेत, याचें शब्दचित्र त्यांनीं हृदय पिळवटून काढलें आहे. एकाच पल्लेदार वाक्यांत ते लिहितात, “ आमची अन्नान्नगत झाली आहे, दुष्काळाचा कडाका उडाला म्हणजे लाखों लोकांची चांदी उडते आहे, सरकार—देण्याखालीं रयतेचा चुराडा होत आहे, लोकांस आपल्या सामान्य हक्कांचें व सामान्य गोष्टींचेंसुद्धां ज्ञान नसून त्यांच्या अभावीं त्यांची स्थिति पशुवर्गासारखी होऊन गेलेली आहे; येवढा हा संपन्न देश असतां, येथील लोकसंख्या येवढी असतां, लोकांची बुद्धी येवढी प्रखर असतां, व आहे तेथें अर्थसंचयहि विपुल असतां, कल्पवृक्षाखालीं उपवास या न्यायानें इतकी प्रजा व्यर्थ हाल सोसते आहे,—ही स्थिती सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे; आणि देशोन्नतीचे धुरंधर वरील विपत्तींच्या प्रतिकारार्थ उद्योग काय करीत आहेत म्हणाल, तर एक आकाशांतील बापास आरोळी देत आहेत, दुसरे आपल्या लेडीकरवीं कोणा गौरकाय अधिकाऱ्याचें हस्तपीडनपूर्वक स्वागत करताहेत, कोणी पार्लमेंटच्या गर्दींत गुंग होऊन गेले आहेत, कोणी अर्वाचीन

सोमरसांत तल्लीन होऊन जातिभेदरूप महान् अनिष्टाचा उपशम होऊन या देशास आराम पडावा म्हणून अर्वाचीन ऋषींचा तांडा जुळवून गवालंबाचें अनुष्ठान करीत आहेत, कोणी सरकारी अधिकाऱ्यांचें प्रतिदिवशी उंबरठे पुजून त्यांच्यापुढें निरंतर लांगूलचालन करीत आहेत, इ० इ० ! हा सर्व प्रकार आम्हांस तर केवळ लज्जास्पद दिसतो. ''

## आत्मविश्वासाची ज्योत !

शास्त्रीबुवांनीं आपल्या लेखनानें जर कोणती मोठी कामगिरी केली असेल, तर ती म्हणजे आपल्या लोकांमध्यें निर्माण झालेली पराभवाची व नैराश्याची भावना नष्ट करणें. ' लोकहितवादी ' सारख्या त्यांच्यापूर्वीच्या लेखकांनीं '' आम्ही टोणपे, इंग्रजांच्या राज्यांत पांचशें वर्षें तरी आम्ही राहिलें पाहिजे '' अशी हीनपणाची खोटी जाणीव निर्माण केली होती, ती नष्ट करण्यासाठीं शास्त्रीबुवा पुनः पुनः ठासून सांगतात, '' आमच्या देशास कांहीं एक झालें नाहीं. त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्यासारखा कांहींएक विकार नाहीं. यास्तव आमच्या अर्वाचीन पंडित मंडळीनें डॉक्टरी पद्धतीस अनुसरून एकावर एक जालीम दवे करून व शस्त्रक्रियेचें तीव्र प्रयोग करून त्याची जी हलाखी मांडली आहे व विनाकारण विटंबना आरंभली आहे, ती सर्व सोडून देऊन साधारण पौष्टिक उपचार त्याजवर सुरू केले असतां तो लवकरच पुनः पहिल्यासारखा सशक्त व तेजस्वी होईल त्याविषयीं आम्हांस बिलकुल संशय नाहीं. ''

## प्रगतीची आशा

शास्त्रीबुवांचा आशावाद केवळ आपल्या देशापुरताच मर्यादित नव्हता. सर्व जगाचीच प्रगति होत आहे—सुधारणा होत आहे, असा त्यांना ठाम विश्वास वाटत होता. सगळ्या जगाचा इतिहास पाहून ते म्हणतात, '' अगदीं प्राचीन राष्ट्रांची मूळची स्थिति कशी होती, व ती पुढें क्रमाक्रमानें कालगत्या कशी पालटत गेली, आणि असें होतां होतां

हल्लींच्या काळीं जग कोणत्या स्थितीस येऊन पोंचलें आहे, याचा जो यथास्थित विचार करील त्यास एकंदर जगाच्या रहाटीचा रोख सुधारणेकडे आहे असें खास दिसून येईल."

जगांतील निरनिराळ्या देशांचे इतिहास शास्त्रीबुवांनीं वाचले होते. त्यामुळें त्यांच्या लेखनाला बहुश्रुतपणाचे पैलू पुष्कळ पडलेले दिसतात. ग्रीक, रोमन, इंग्रज, फ्रेंच वगैरे लोकांनीं आपआपल्या राष्ट्रांचा व संस्कृतींचा कसा उत्कर्ष केला याचे उल्लेख "मालेंत" सर्वत्र विखुरलेले आहेत. मराठ्यांचा इतिहास तर त्यांच्या डोळ्यांपुढें सांगोपांग खडा असे. तो किती विविध बाजूंनीं लिहिला जावा याची दिशा दाखवितांना शास्त्रीबुवा लिहितात, "मराठ्यांचा इतिहास म्हणजे शिवाजीचे, बाजीरावाचे, किंवा यशवंतरावाचे पराक्रम वर्णिले किंवा नाना फडणविसाच्या राजकारणाचें वर्णन केलें म्हणजे झालें नाहीं; तर वरील वीरांच्या मोहिमींबरोबर व मुत्सद्यांच्या मसलतींबरोबरच रामशास्त्रीबोवांचा न्यायमनसुबा, रामचंद्रबाबाची जमाबंदी, बखतरामाची कारागिरी, दयारामाची सावकारी, गंगाविष्णूची वैद्यक्रिया, काशीनाथोपाध्यायांचा धर्मसिंधु, भवदेवमिश्रांचें पांडित्य, अमृतरायाचें कीर्तन, मोरोपंताची आर्यावाणी, जोशीबोवांचा तमाशा, व्यंकटनरसीचें गाणें, बाळंभटदादाची कुस्तेगिरी, वगैरे सर्व प्रकार त्यांत इत्यंभूत आले पाहिजेत."

## स्वदेशाचा अभिमान

उलट, त्या वेळच्या इंग्रजांनीं लिहिलेल्या इतिहासांत मराठ्यांची किती नालस्ती असे आणि त्या इंग्रजांच्या ओंजळीनें पाणी पिणारे आपलें महाराष्ट्रीय लेखकही कसे एकांगी इतिहास लिहीत हें शास्त्रीबुवांनीं चव्हाट्यावर मांडलें आहे. राज्यकर्त्या इंग्रजांचें सर्वच कांहीं चांगलें आणि पराजित झालेल्या आपल्या राष्ट्रांचें सर्वच कांहीं वाईट, अशा भावनेची मूर्च्छा त्या वेळेस बहुतेक सर्वांना आली होती. ती घालविण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं आपल्या निबंधांतून आत्मविश्वासाची मात्रा वारंवार उगाळून दिलेली आहे. एके ठिकाणीं ते इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांच्या

निसर्गांची तुलना करतांना म्हणतात, " जेथें बारा महिने अठरा काळ पाऊस धुकें, बर्फ यांनीं पिच्छा पुरवून सूर्यदर्शनहि कधीं चांगलेंसें होऊं देऊं नये, अशा लोकांस इकडच्या समृद्ध व सुखकर देशाचें वैभव सहन न होऊन त्याकडे नाक मुरडण्याचा त्यांनीं आव घालावा ही केवढी मौज आहे! आणि त्यांतून ज्या वीतभर लांब व वीतभर रुंद देशांत सृष्टीची रचना इतकी ठेंगणी व तोकडी आहे कीं, तिकडचे मोठे गगनचुंबित पर्वत म्हणजे इकडचीं टेपाडें, व टेम्ससारख्या महाप्रचंड नद्या म्हणजे इकडच्या एकाद्या ओहोळाबरोबर, जेथील खाणींतील मोटी अमूल्य संपत्ति म्हटली म्हणजे शिसें व कथील, मोठीं स्वादिष्ट फळें म्हणजे इकडील रानफळांसारखीं, व दारिद्र्याधिदेवतेची ज्या देशावर इतकी पूर्ण कृपा कीं, इकडील संपत्तीचा येवढा पूर आज शेंकडों वर्षें तिकडे चालत असतां लक्षावधि लोकांस नुसते बटाटे फांकावे लागतात, त्याच देशाच्या लोकांनीं खुद्द हिंदुस्थानाशीं संपत्तींत टक्कर मारूं पाहावी म्हणजे केवढें अचाट साहस आहे!"

## काव्यमय वर्णन

मराठी भाषा गचाळ आणि तिच्यांतील जुनी कविता तर अगदींच टाकाऊ, अशा तुच्छता–बुद्धीनें बरेचसे नवे इंग्रजी शिकलेले लोक बोलत असत. त्यांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याचें काम शास्त्रीबुवांइतकें दुसऱ्या कोणीच केलें नाहीं. " मोरोपंतांची कविता " हा विषय घेऊन त्यांनीं मयूर काव्याचें रम्यत्व व महत्व मोठ्या रसिकतेनें व मार्मिकतेनें पटवून दिलें आहे. ती कविता पाहतांच रसिकमंडळीं किती व कशी चकित झाली, याचें सुंदर शब्दचित्र त्यांनीं जें रंगविलें आहे तें असें:— " गीर्वाणवाणीच्या सुवर्णसूत्रांनीं जागोजाग विणून काढलेलें व अनुप्रासानें स्थलविशेषीं विचित्रित केलेलें असें उज्ज्वल वस्त्र परिधान केलेली वरील अभिनव कविता जनमनःप्रांगणीं जेव्हां नटीप्रमाणें अवतीर्ण झाली असेल, तेव्हां तिचा अलंकारांचा थाटमाट पाहून व चरणांत रुणझुणणाऱ्या यमकरूप पैंजणांचा कर्णमनोहर नाद ऐकून जोशीबुवांसारखी मंडळी तल्लीन होऊन गेली यांत काय आश्चर्य? "

मयूरकाव्याची मोहिनी सदैव रसिकांवर राहील हा आपला अभिप्राय शास्त्रीबुवा किती डौलदार शब्दांनीं व लयबद्ध वाक्यांनीं निवेदन करतात पहा—" जोपर्यंत हजारों महाराष्ट्रीयजनांच्या हृदयांत आमच्या सरस्वतिप्रिय मयूराचा टाहो भेदून जात आहे, जोंपर्यंत त्याचा सारा पिसारा उभारलेला पाहून त्यांच्या अप्रतिम वैचित्र्यानें जनसमूह चाकित होऊन रहात आहे, जोंपर्यंत मेघदर्शनजनित हर्षभरांत जो नृत्य करीत असतां वाग्देवीच्या नूपुरांचा मंजुळ रव रसिकजनांस त्यांच्या कर्णांची धन्यता वाटवीत आहे, तोंपर्यंत कितीही रेवरेंडसाहेबांचे, मुल्लासाहेबांचे किंवा रावबहादुरांचे अभिप्राय त्यास प्रतिकूल पडले तरी त्यास तिळमात्रहि धाक बाळगायला नको. "

## कवींचा सत्कार

मोरोपंतांच्या कवितेवर त्यांनीं सर्वांत मोठा निबंध लिहिला, आणि तोहि मोठ्या हौसेनें, बहारीनें व आवेशानें. मयूरकवीच्या विविध रामायणांतील चमत्कृति वर्णन करतांना शास्त्रीबुवा लिहितात, " राजाधिराजांचें जसें ऐश्वर्य दृष्टीस पडतें कीं, चंदनाचा महाल तर जिकडे तिकडे चंदनच, बिलोरी महाल तर येथून तेथून बिलोरच, संगमरवरी दगड तर चोहोंकडे तोच, त्याप्रमाणें लव्वक्षर रामायण म्हटलें कीं सारी एकमात्रक अक्षरांचीच गर्दी, निरोष्ठ रामायण म्हटलें कीं खुशाल विडा खाऊन वाचावें, दाम रामायणांत पाहावें तों आर्यार्धाचे शेवटले वर्ण व पुढच्याचे आद्य वर्ण शेवटपर्यंत सारखे गुंफलेले,–याप्रमाणें हव्या त्या तऱ्हेवर ज्या नाट्याचार्यानें वाग्देवीस नर्तकीप्रमाणें नाचवावी, त्याचें काव्यचातुर्य काय वर्णावें ? "

तुकाराममहाराजाच्या अभंगांचा जीर्णोद्धार करण्याचें काम कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं अंगावर घेतल्याचें कळतांच शास्त्रीबुवांना आनंदाच्या गुदगुल्या झाल्या. तो आनंद त्यांनीं ज्या खुमासदार पद्धतीनें प्रगट केला आहे, त्यांत त्यांच्या लेखनशैलींचे बहुतेक सारे गुण एकत्र चमकतांना

दिसतात. शास्त्रीबुवा डोळे मिचकावीत व गालांतल्या गालांत हंसत उभे आहेत असेंच त्या उताऱ्यावरून वाटतें. तो उतारा असा—

" जो बिचारा शूद्रकवि आपल्या लंगोटेबहाद्दर व घोंगडीवाल्या भक्तमंडळींतच रमायचा किंवा फार झालें तर हरदासांच्या कथाप्रसंगीं सत्कार पावायचा, त्यास एकाएकीं, अरबी गोष्टींतील अबू हसनासारखें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें ! इंदुप्रकाश मुद्रणालयांतील मुक्ताफळें अंगभर उधळलेलीं, महावस्त्रांत शरीर लपेटलेलें व युनिव्हर्सिटीचे शानदार झगे घातलेले तरुण विद्वान् डोक्यावर मोरचलें उडवताहेत व चवऱ्या ढाळताहेत अशा थाटानें 'तुकाराममहाराज' फारां दिवसांनीं आपल्या अभिधानाची सार्थता पावून विराजमान झाले. महाराष्ट्र देशाच्या पहिल्या अधिपतीनें* पाठविलेलें ऐश्वर्य परत लावून वरील कवीनें जी आपली हानि करून घेतली होती, तिची भरपाई दोन शतकांनंतर त्याच देशाच्या परद्वीपस्थ प्रभूनें करण्याचें मनांत आणलें कीं काय कोण जाणें ! "

## निरपेक्ष देशसेवा

याप्रमाणें स्वभाषा, स्वधर्म व स्वदेश यांची मोठी सेवा शास्त्रीबुवांनीं आपल्या अल्प आयुष्यांत केली. ती करीत असतांना त्यांनीं कशाचाही लोभ व कोणाचीही भीति मनांत ठेवली नाहीं. एक कर्तव्य म्हणूनच ते हें कार्य करीत राहिले. " आधीं केलें मग सांगितलें " या समर्थाच्या न्यायाप्रमाणें, ते एके ठिकाणीं आपल्या लेखकबंधूंना जाणीव देतात कीं, " आमच्या धनहीन व ज्ञानहीन देशांत ग्रंथरचनेपासून फलनिष्पत्ति कितपत होण्याचा संभव आहे हें जाणून मुख्यतः देशहित करण्याच्या बुद्धीनेंच आपलें काम आपण बजाविलें पाहिजे. भाषारूप उपवनास आपल्या ज्ञानोदकाचें सेचन निदान आरंभीं तरी त्यांनीं केवळ निरपेक्ष बुद्धीनें केलें पाहिजे. कालेंकरून त्यांच्या श्रमाचा परिपाक कीर्तिरूप सुमनांनीं व अर्थरूप फलांनीं प्रकट होईलच होईल; पण या अदृष्ट लाभावर

* शिवाजीमहाराजांनीं.

नजर न देतां पहिल्यानें केवळ आपलें कर्तव्यच म्हणून त्यांनीं हातांत लेखणी धरली पाहिजे." हा उपदेश आपल्या आचरणानें शास्त्रीबुवांनीं सार्थ केला. त्यामुळेंच त्याच्यानंतर सत्तर वर्षांनीं, आतां मराठी भाषेचें उपवन फुलाफळांनीं संपन्न झालेलें दिसत आहे. शास्त्रीबुवांचें हें ऋण कोण अमान्य करील ?






# लो. टिळक : : : ७

महाराष्ट्रांतील मेलेलीं मनें जिवंत करण्याचें काम केलें चिपळूणकरांनीं आणि तीं मनें शक्तिशाली व कृतिशाली केलीं टिळकांनीं. चिपळूणकरांचें शस्त्र म्हणजे 'निबंधमाला'; तसें टिळकांचें हत्यार म्हणजे 'केसरी.' चिपळूणकरांनीं आपल्या तेजस्वी लेखनानें महाराष्ट्रीय तरुणांमध्यें आत्मविश्वास निर्माण केला; तर आत्मविश्वासानें रसरसणाऱ्या त्या तरुणांना स्वराज्याची प्रेरणा दिली व दिशा दाखविली टिळकांनींच.

## युग-प्रवर्तक ग्रंथकार

'केसरी' कोणाचा ? तो काढला चिपळूणकरांनीं, पहिलीं सात वर्षें संपादिला आगरकरांनीं आणि पुढेंहि त्याला बरेच संपादक लाभले. पण

त्या सर्वांत " केसरीकार म्हणजे टिळक " असेंच समीकरण बसून गेलें. कृष्ण हा वसुदेवाचा, तो वाहिला नंदाला आणि तो पुढें जीव की प्राण झाला असंख्य भक्तांचा. पण त्याचेविषयीं अर्जुनाचा जिव्हाळा कांहीं आगळाच. तसेंच नातें केसरी व टिळक याजमध्यें होतें. सुमारें पस्तीस वर्षें त्यांनीं केसरी संभाळला, वाढविला व पराक्रमी बनविला–तो इतका कीं, त्याच्या प्रत्येक गर्जनेनें परक्या सरकारच्या छातींत धडकी बसत असे आणि स्वकीय जनतेच्या हृदयांत नवचैतन्य संचरत असे. शिवाजी-महाराजांची जशी भवानी तलवार, तशी टिळकांची केसरीची लेखणी. " माझी लेखणी लेचीपेची नाहीं. तिच्यांतून असेच ग्रंथ निर्माण होतील कीं, जे शेंकडों वर्षें टिकून राहतील. ' * हे लोकमान्य टिळकांचे उद्‌गार म्हणजे त्यांच्या अलोट आत्मविश्वासाचे तुषारच होत. त्यांतील पूर्वार्ध जसा केसरीनें सिद्ध केला, तसा उत्तरार्ध ' गीतारहस्य ' हा युगप्रवर्तक ग्रंथ निर्माण करून त्यांनीं खरा करून दाखविला.

## संस्कृतची गोडी

" बाळ गंगाधर टिळक " हेंच लोकमान्यांचें नांव महाराष्ट्रभर, नव्हे हिंदुस्थानभर, किंबहुना सर्व जगभर गाजलेलें आहे. पण त्यांचें पाळण्यांतील नांव होतें केशव. रत्नागिरी जिल्ह्यांतील, दापोली तालुक्यामधील, चिखलगांव नांवाच्या खेड्यांत टिळकांचा जन्म आषाढ वद्य षष्ठी शके १७७८ ( बुधवार ता. २३ जुलै १८५६ ) रोजीं झाला. त्यांचे वडील गंगाधरपंत हे शिक्षण–खात्यांत नोकरी करीत होते. चिपळूणकरांचे वडील जसे पंडित व ग्रंथकार होते, तसेच टिळकांचे वडील हेहि व्यासंगी व लेखक होते. प्रथम ते पांच रुपये पगारावर मराठी शाळेंत शिक्षक होते. शेवटीं ते असिस्टंट डेप्युटी इन्स्पेक्टर झाले. त्यांचें गुणवर्णन करतांना डॉ. भांडारकर एकदां म्हणाले, " गंगाधरशास्त्री म्हणजे व्याकरणाचा सांठा, मराठी भाषेचा संग्रह व गुरुभक्तीचें भांडार होत. " गंगाधर-

---

* " I am not a Kachha reed, I am actuated with the spirit of some century work, for the age I live in. "

शास्त्र्यांनीं इंग्लंडचा इतिहास, अंकगणित, लघु-व्याकरण इत्यादि शालोपयोगी पुस्तकें लिहिलीं.

वडिलांनीं मुंजीपूर्वी टिळकांकडून निम्मा अमरकोश पाठ करून घेतला होता. रूपावली, समासचक्र वगैरे संस्कृतची प्राथमिक तयारीहि त्यांनीं करून घेतली होती. वयाच्या दहाव्या वर्षीच टिळक सर्वसामान्य संस्कृत श्लोकांचा अर्थ स्वतः लावीत. वयाच्या पंधराव्या वर्षीं टिळकांचें लग्न झालें. त्यांच्या पत्नीचें नांव सत्यभामा. सोळाव्या वर्षीं टिळक 'मॅट्रिक' झाले. संस्कृतची आवड त्यांना दांडगी होती बाणाची कादंबरी हा संस्कृतमधील किती अवघड ग्रंथ ! पण तो टिळकांनीं आपल्या वडिलांजवळ वाचावयास मागितला. वडिलांना आनंद वाटला. त्यांनीं एका अटीवर तो ग्रंथ बक्षिस देण्याचें कबूल केलें. ती अट म्हणजे गणितांतील एक कठीण उदाहरण सोडविणें. टिळकांनीं तें गणित सोडविलें आणि वडिलांच्या हातून बक्षिस पटकावलें. संस्कृत व गणित या दोन्ही विषयांत त्यांची बुद्धि लीलेनें खेळत असे. टिळकांची आई त्यांचे वयाचे दहाव्या वर्षीं वारली, आणि सोळाव्या वर्षीं तर वडीलहि निधन पावले.

## स्वराज्याचा निदिध्यास

कॉलेजचें शिक्षण घेण्याकरितां टिळक पुण्यास आले. त्यावेळीं तेथें एकच कॉलेज होतें. तें म्हणजे डेक्कन कॉलेज. त्यांत टिळकांनीं १८७३ सालीं नांव घातलें. तेथें त्यांनीं आपलें शरीर खूपच कमावलें. पहिल्या वर्षीची परीक्षा ते हरले. तेव्हां दुसऱ्या वर्षीं त्यांनीं सपाटून तालीम केली आणि मेवामिठाईचा रतीबहि लावला. यामुळेंच त्यांचें शरीर पुढें अनेक आपत्तींना तोंड देऊं शकलें म्हातारपणीहि ते सिंहगड एकाच दमांत चढून जात, तसेंच काशीची गंगाहि पोहून जात. कॉलेजांतील ज्ञान तर ते लुटीतच होते. पण १८७४सालींच निघालेली 'निबंधमाला' त्यांच्या कानीं देशाची हांक घालीत होती. शास्त्रीबुवांच्या निबंधमालेनें तरुणांचीं हृदयें पेट घेत होतीं. असे पेटलेले दोन तरुण म्हणजे टिळक व आगरकर. दोघेहि एकाच वयाचे,दोघेहि सारख्याच निर्मळ वर्तनाचे, निःस्वार्थी वृत्तीचे आणि ध्येयवादानें

वेडे झालेले. देशाचा उद्धार कसा करावा, याची भवति-न-भवति करण्यांत त्यांच्या रात्रींच्या रात्री उजाडत. 'आधीं सामाजिक सुधारणा कीं राजकीय सुधारणा ?' हा वाद दिवसन् दिवस ते खेळत. "घर सुधारा" असा डांगोरा आगरकर पिटीत, तर टिळक म्हणत, "अहो आगरकर, घर सुधारा म्हणतां पण मला तर घरच नाहीं." हें घर मिळविण्यासाठीं, स्वराज्य कमावण्यासाठीं परक्या सरकारशीं झगडा आधीं केला पाहिजे, असा आग्रह टिळक धरीत.

टिळक–आगरकरांचा हा वाद शुष्क नव्हता, "तुटे वाद संवाद" अशा श्रेष्ठ कोटींतील तो वाद होता. तो कंठशोष करणारा नव्हता, तत्त्वबोध करणारा होता. नुसता तत्त्वबोधच नव्हे तर प्रत्यक्ष कृतीस जन्म देणाराही होता. "समाजाला सर्वांगीण शिक्षण देणें." ही कृती एकमतानें मान्य झाली. ते न्यायमूर्ति रानडे यांना भेटले, मालाकार चिपळूणकरांना भेटले आणि विद्यालय व वृत्तपत्रें या दोन्ही साधनांनीं आपल्या समाजाला शिक्षण देण्याचें त्यांनीं ठरविलें. फकिरी पत्करून राष्ट्रसेवा करण्याचें व्रत त्यांनीं घेतलें.

## शिक्षण-प्रसाराचें कंकण

टिळक १८७६ सालीं बी. ए. झाले. एम्. ए. ला त्यांना अपयश आलें. पांच वर्षांनीं ते पुनः एम. ए. ला बसले, पण पुनः त्यांना अपयशच आलें. त्यांनीं वकिलीचा अभ्यास केला आणि १८७९ मध्यें ते एल् एल्. बी. झाले. ही पदवी पदरांत पडल्यावर टिळक सरकारी नोकरीच्या मागें न लागतां शास्त्रीबुवांच्या छावणींत जाऊन दाखल झाले. ता. १ जानेवारी १८८० रोजी 'न्यू इंग्लिश स्कूल' स्थापन झालें. त्या दिवशीं चिपळूणकर व टिळक हे दोघेच शिक्षक शाळेंत हजर होते. या शिक्षकांचें त्यावेळचें ऐश्वर्य काय सांगावें ? आदल्या दिवशीं शाळेच्या खोल्या सारविण्याचें काम एल् एल्. बी झालेल्या टिळकांनीं स्वतः केलें ! रात्र फार झाली म्हणून शाळेंतच फळे आंथरून व उशाला उपरणें घेऊन ते झोपले. त्यांना पगार ठरला होता तीस रुपये. पण तोहि त्यांनीं बरींच वर्षें घेतला नाहीं.

कळीचें फूल व्हावें, त्याप्रमाणें या शाळेंतून कॉलेज निघालें. ता. २ जानेवारी १८८५ रोजीं फर्ग्युसन कॉलेज उघडलें. शाळेंत व कॉलेजांत टिळक आस्थेनें शिकवीत असत. त्यांचे निःस्वार्थी जीवन पाहूनच नामदार गोखले त्या संस्थेस मिळाले. दुसरेहि अनेक त्यागी विद्वान् त्या राष्ट्र-कार्यांत सहभागी झाले. त्या सर्वांनीं खतपाणी घातल्यामुळें शाळा-कॉलेजाचा वृक्षवेल झपाट्यानें वाढत गेला, ही आनंदाची गोष्ट. पण दुःखाची गोष्ट अशी कीं, त्यामुळेंच संस्थेंत मतभेद झाले, कलह माजले आणि त्याचा शेवट म्हणून १८९० सालीं टिळकांनीं त्या संस्थेस रामराम ठोकला.

## केसरीचें संगोपन

शाळेंतील ज्ञानदानाचें कार्य संपलें, तरी राष्ट्राच्या शिक्षणाचें कार्य अफाट होतें. तें टिळकांना दिसत होतें. शास्त्रीबुवांनीं १८८१ सालीं ‘ केसरी ’ पत्र सुरू केलें होतें व आगरकरांना त्याचें संपादक नेमलें होतें. त्याचवेळीं त्यांनीं “ मराठा ” हें इंग्रजी साप्ताहिकहि सुरू केलें होतें. त्याचे संपादक टिळक होते. तरी ते केसरींत पाहिल्यापासून लिहीत. नुसतें लिहीत एवढेंच नव्हे, तर केसरीचें पडेल तें काम ते करीत. प्रारंभीं दर आठवड्यास दोन तीन हजार पत्ते लिहिण्यासाठीं टिळक वगैरे मंडळी बसत. केसरीचा पहिला अंक घरोघर वाटण्याचेंहि काम टिळकांनीं केलें. पुढें तर एकदां छाप-खान्यांतील टाइपांच्या पेट्याही त्यांनीं खांद्यावरून वाहिल्या. आणि त्यांच्या संपादकीय कचेरीचें वैभव तर असें कीं, घोंगडीवर बसावयाचें आणि चळकटीवर कागद ठेवून लिहावयाचें !

## तीनदां तुरुंगवास

सामाजिक–राजकीय हा कॉलेजांतील वाद आतां विकोपास पोहोंचला. वर्तमानपत्रांत लेख लिहावयाचे म्हणजे सर्व विषयांवर आपली ठाम मतें स्पष्टपणें तत्काळ मांडावीं लागतात. टिळक-आगरकरांमधील मतभेद अधिकाधिक वाढत गेले. त्याचा परिणाम म्हणजे आगरकरांनीं १८८७ सालीं केसरीसंस्थेचा राजीनामा दिला. आपलीं सामाजिक मतें स्वतंत्रपणें

मांडण्यासाठीं त्यांनीं १८८८ सालीं ‘ सुधारक ’ नांवाचें साप्ताहिक काढलें. यावेळीं ‘ केसरी ’ कर्जांत होता. तरी तो टिळकांनीं आपल्या हातीं घेतला. ‘ केसरी ’साठीं टिळकांनीं आगरकरांबरोबर तुरुंगवासहि सोसला. १८८२ सालीं मुंबईजवळील “ डोंगरीच्या तुरुंगांत एकशें एक दिवस ” या दोघां संपादकांनीं काढले. पुढें १८९७ सालीं टिळकांना केसरींतील लेखांमुळेंच दीड वर्षांची शिक्षा झाली. १९०८ सालीं तर सहा वर्षे काळेपाण्याची शिक्षा टिळकांना ठोठावण्यांत आली ! आपल्या तन–मन–धनाचा कणन् कण टिळकांनीं केसरीसाठीं खर्च केला. सुमारें चाळीस वर्षे त्यांत त्यांनीं सतत लेखन केलें. त्यांत त्यांनीं आपलें हृदयच ओतलें.

## निर्भय टीका

पण नुसतें लेखन करून स्वस्थ बसणारे शब्दशूर टिळक नव्हते; आपल्या शब्दाला कृतीची जोड देणारे ते कर्मवीर होते. त्यांनीं शिवाजी–उत्सव सुरू करून साऱ्या महाराष्ट्रांत स्वराज्याचा घोष दुमदुमविला. तसेंच सार्वजनिक गणेशोत्सव काढून हिंदूंचीं संघटना उभारली. राजकीय क्रांतीचें वारें पसरविण्याचें कार्य त्यांनीं ‘ केसरीच्या द्वारें केलें. प्लेग, दुष्काळ यांसारख्या आपत्तीच्या वेळीं त्यांनीं लोकांची सेवा केली आणि जुलमी अधिकाऱ्यांवर टीकेचे घाव निर्भयतेनें घातले. अधिकाऱ्यांच्या जुलमाचा अतिरेक झाला. तेव्हां पुणें येथें १८९७ च्या जूनमध्यें रँड या अधिकाऱ्याचा खून झाला. त्याबरोबर सरकारनें अशी कांहीं भयंकर दडपशाही चालविली कीं, त्यामुळें सरकारविरुद्ध ब्र काढण्याची कोणास छाती होईना. पण घनदाट अंधारांत आकाशांतील वीज कड् कड् कड् कड् असा आवाज करीत व तेजाचा लोळ सोडीत जशी चमकून जाते, तशी टिळकांची लेखणी सरकारला धाक व जनतेला धीर देत होती. “ अजून तरी आमचे सरकारचे डोळे उघडतील काय ? ” असे सौम्य सवाल तें पूर्वीं केसरींतून टाकीत असत. पण आतां सरकारचा रौद्र अवतार पाहिल्यावर, त्यानें न कचरतां, उलट दुप्पट धैर्यानें, टिळकांनीं ‘ केसरी ’ मधून सरकारलां छेडलें, “ सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय ? ” आणि दुसऱ्या अग्रलेखांत

रामशास्त्र्यांच्या छातीठोकपणानें सरकारला बजाविलें, " राज्य करणें म्हणजे सूड उगविणें नव्हे. " सरकारला त्यावेळीं असा कोणी दाबता—दटावता पाहिजेच होता. कारण टिळकांनीं म्हटल्याप्रमाणें, " एखादा मोठा हत्ती पिसाळला असतां ज्याप्रमाणें तो वाटेल तशी धूळधाण करीत सुटतो, तद्वत् आमच्या सरकारची स्थिति झाली आहे व खुन्यास जो खून चढावयाचा तो आमच्या सरकारास चढून सरकारची नजर अगदीं फिरून गेली आहे. "

## ओजोगुणाचा उत्कर्ष

अशा प्रसंगीं लोकमान्यांच्या लेखणींतून साक्षात् वीररसच वाहूं लागे. जणूं कांहीं ज्वालामुखीच्या लाव्हामध्येंच आपली लेखणी बुडवून टिळक लिहीत. मराठी भाषेचा ओजोगुण टिळकांच्या लेखनांत अगदीं उत्कर्ष पावला आहे. वाचकांच्या अंतःकरणाला धक्के देण्याचें जें सामर्थ्य रामदासांच्या वाणींत होतें, तेंच टिळकांमध्यें नवीन स्वरूपांत प्रगट झालें. टिळकांना अशा निर्भय लेखनाबद्दल पारतंत्र्यांत पारितोषिक कोणतें मिळणार ? तर, तुरुंगवास !—अत्यंत खडतर असा तुरुंगवास ! ! १८९५ सालीं टिळक पुणें म्युनिसिपालीटींत व मुंबई विधिमंडळांतहि निवडून आले, पण, राजद्रोहाच्या लेखावरून त्यांना सरकारनें तुरुंगांत धाडलें आणि त्यामुळें " नगरपिते " व " नामदार " या दोन्ही नात्यांनीं लोकसेवा करण्याची संधि टिळकांना फार काळ लाभली नाहीं. या दोन्ही पदव्यांपेक्षां " लोकमान्य " हीच अपूर्व पदवी खास त्यांच्यासाठीं समाजानें राखून ठेवलेली होती. लोकांनीं आपल्या या " अनाभिषिक्त सम्राटाचा " सत्कार वेळोवेळीं अपार उत्साहानें व अलोट भक्तीनें केला.

## प्रेरणा देण्याचा नमुना

टिळकांची दृष्टी केवळ पुण्यापुरती, किंवा फक्त महाराष्ट्रापुरती राहिली नव्हती—सर्व हिंदुस्थानला व्यापण्याइतकी ती विशाल बनली होती. पायांत कांटा मोडला तर डोळ्यांतून पाणी यावें, त्याप्रमाणें सरकारनें १९०५ सालीं बंगालची फाळणी केली तर त्या दुःखाची कळ महाराष्ट्रास

—म्हणजे टिळकांस—आली. स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीचा घोष टिळकांनीं इतक्या मोठ्या जोरानें केला कीं, तसा बंगाली पुढाऱ्यांनींहि केला नसेल. टिळकांची मराठी भाषा यावेळीं आगीच्या ठिणग्या टाकीतच चालली होती. त्याचा एक नमुना पहा "सध्यांची स्थिती जर तुम्हांस असह्य झाली नसेल तर हें राष्ट्र जितक्या लवकर मरेल तितकें बरें. कृतघ्न लोकांनीं या भूमीला भार होण्यापेक्षां दुसरें कोणी येऊन ती सनाथ करतील. भ्याडपणा टाकून दिला पाहिजे. मी नेमस्त, तूं जहाल हा वाद काय? नेमस्तपणानें कार्य होत असल्यास तें नको आहे असें नाहीं, पण तें होत नाही हें उघड आहे. इच्छेचे ज्ञानतंतु हाताच्या बोटांत उतरत नाहींत. हें होण्याकरितां घस सोसली पाहिजे. त्याला तुरुंगांत जावें लागेल—हद्दपार व्हावें लागेल. त्याला तुम्ही तयार असलें पाहिजे. सोन्याचा कस आगींतच लागत असतो. तो कोणी भोजनाच्या ताटावर लावीत नाहीं! शेंकडों लोक तुरुंगांत गेले आहेत. यानें जर तुमचें मन निग्रही होत नसेल तर तुमची गणना पशूंत करावी लागेल!"

कधीं जनतेपुढें आशेचा दीप पाजळत ठेवून तिकडे धाव घेण्यास तिला तयार करण्यासाठीं टिळक म्हणत, "स्वराज्याचा इष्ट हेतु जो विश्वेश्वर तो स्वातंत्र्य-गंगेच्या कांठीं जें मंदिर आहे त्यांत मांडिलेला आहे. तो कायम ठेवा. संकटें येतील, कित्येकांचें प्राणहि खर्ची पडतील, पण असे प्राण गेले तरी आपल्या वासनेला त्या गंगेंत स्नान करावयाचा कधींना कधीं प्रसंग येईल हें लक्षांत ठेवा."

## नर-सिंहाची गर्जना

१९०७ सालच्या डिसेंबरांत सुरत येथें कॉंग्रेस भरली. तेव्हां ती मवाळ पक्षाच्या हातून काढून राष्ट्रीय पक्षाच्या हवालीं करावी, असा प्रयत्न टिळकांनी केला. त्या हिसकाहिसकींत कॉंग्रेस मोडली. सभेंत दंगल झाली, मारामारी झाली, पण खवळलेल्या समुद्रांतील दीपस्तंभाप्रमाणें, टिळक अचल राहिले. त्यांच्या धैर्यानें दिपले गेलेले भारतीय तरुण त्यांच्या

मताकडे धांव घेऊं लागले. टिळकांची ही वाढती लोकप्रियता सरकारला सहन होईना. सरकारनें त्यांच्यावर खटला भरला आणि केसरींतील दोन अग्रलेखांवरून त्यांना सहा वर्षे काळेपाण्याची शिक्षा दिली ! तारीख २२ जुलै १९०८ रोजीं, म्हणजे टिळकांच्या वयाला बरोबर बावन्न वर्षें पूर्ण झालीं त्या दिवशीं, ही काळेपाण्याची कुऱ्हाड टिळकांच्या मस्तकावर पडली. वार्धक्यांतील या वज्राघातानें टिळकांचें मन चळलें काय ? उलट सरकारची सारी उग्रता गिळून टाकणारी नरसिंहाची वाणीच त्यांच्या मुखांतून हायकोर्टांत निघाली. त्या वेळचे त्यांचे उद्‌गार म्हणजे धीरोदात्तपणाचें गौरीशिखरच ! " पंचांनीं कसाही निकाल दिलेला असला तरी मी पूर्णपणें निरपराधी आहें, असेंच मी मानतों. " असा आपला ठाम विश्वास प्रगट करून टिळकांनीं सरकारी न्यायमूर्तींना ईश्वरी न्यायाची आठवण करून दिली. एवढेंच नव्हे तर " तुम्ही माझा कितीही छळ केलात तरी त्या छळांतूनही माझें कार्य यशस्वीच होईल. " असा अकुंठित आशावादहि त्यांनीं व्यक्त केला. लोकमान्यांचीं तीं वाक्यें विजेच्या तंतूंनीं विणलेलीं आहेत असेंच वाटतें.

सहा वर्षें काळें-पाणी भोगण्याकरितां टिळकांना ब्रह्मदेशांतील मंडाले येथें ठेवण्यांत आलें !

## कर्मयोगाची ज्योत !

एक छोटी कोठडी. बरोबर बोलावयाला कोणी सहकारी नाहीं कीं वाचावयाला पुस्तक-पत्र नाहीं. वेड लागावयाचें एखाद्याला अशा एकांत-वासांत ! पण टिळकांची वृत्ति गीतेंतील स्थितप्रज्ञासारखी. वयाच्या सोळाव्या वर्षापासून गीतामाउलीची ते सेवा करीत आले होते. तिनें त्यांना अंतर दिलें नाहीं. तिचा प्रसाद त्यांचें मन तेथेंहि प्रसन्न ठेवूं शकला. त्या प्रशांत व प्रसन्न मनःस्थितीचें फल म्हणजे " गीता-रहस्य " हा युग-ग्रंथ. अवघ्या पांच महिन्यांत तो टिळकांनीं लिहून काढला. अर्थात आधीं तीस-पस्तीस वर्षें त्यांचें मनन-चिंतन चालू होतेंच. " ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगच गीतेंत सांगितलेला आहे." असें त्यांनीं या ग्रंथांत सिद्ध केलें

आहे. संस्कृत व इंग्रजी भाषेंतील तत्त्वज्ञानांचे आधार देऊन त्यांनीं आपला सिद्धान्त नऊशें पानांच्या या ग्रंथांत मांडला आहे.

आधींच टिळकांना अलंकारिक लिहिण्याची आवड कमी, आणि त्यांत हा तर तत्त्वज्ञानावरचा ग्रंथ. तरी मधूनमधून लालित्याचें जरतारी काम त्यांत चमकतांना दिसून येतें. गीतेचे स्वरूप सांगतांना ते लिहितात,— " कर्म, भक्ति व ज्ञान या तीन स्वतंत्र निष्ठांची खिचडी. किंवा कापूस, रेशीम व जर यांच्या चिंध्या शिवून तयार केलेली गोधडी नसून, कापूस, रेशीम व जर यांचे निरनिराळे धागे यथास्थानीं योग्य रीतीनें बसवून दिल्यावर कर्मयोग नांवाचें मौल्यवान व मनोहर असें हें गीतारूपी सणंग अव्वलपासून अखेरपर्यंत अत्यंत योगयुक्त चित्तानें, सलग विणलें आहे असें दिसून येईल. "

## ज्ञानी पुरुषाचा धर्म

गीतारहस्यांतील अध्यात्म या प्रकरणांत, बुद्धीच्या प्रकाशांत परमार्थाची वाट जेवढी दाखवितां येणें शक्य आहे तेवढी टिळकांनीं दाखविलेली आहे. आणि तीहि अशा नम्रतेनें कीं, " हे सिद्धांत शब्दामध्यें ग्रथित करण्याचें काम सुदैवेंकरून ज्याला दोन अक्षरांचें ज्ञान झालेलें आहे असा आमच्या-सारखा कोणीही मनुष्य करूं शकेल. त्यांत कांहीं विशेष नाहीं. " " सिद्धावस्था व व्यवहार " या प्रकरणांत खुद्द टिळकांच्याच जीवनाचें प्रतिबिंब पडलें आहे असा भास होतो. " देशकालपरिस्थितीप्रमाणें ज्यांना जें योग्य असेल त्याचाच त्यांत उपदेश करून व स्वतःच्या निष्काम कर्तव्याचरणानें सद्वर्तनाचा यथाधिकार प्रत्यक्ष धडा घालून देऊन, सर्वांस हळूं हळूं यथासंभव शांतपणें पण उत्साहानें उन्नतीच्या मार्गास लाविणें, हाच ज्ञानी पुरुषांचा खरा धर्म आहे. " हा टिळकांचा उपदेश स्वानुभवाचाच वाटतो. " भक्तिमार्ग " हें प्रकरण मधुर भावनांनीं गोडावलेलें आहे. त्या प्रकरणाच्या शेवटीं लोकमान्य लिहितात, " श्रीमद्भगवद्गीतारूपी सुवर्ण-पात्रांतील ' भक्ति ' हा शेवटचा गोड घांस होय. प्रेमाचा हा घांस घेतला. आतां आपोष्णी घेऊन उठायच्या तयारीस लागूं. "

" श्रीमद्भगवद्गीता हा आमच्या धर्मग्रंथांपैकीं एक अत्यंत तेजस्वी व निर्मल हिरा आहे " असें वर्णन टिळकांनीं ' गीतारहस्याच्या ' पहिल्याच वाक्यांत केलें आहे. तेंच वर्णन त्यांच्या गीता-रहस्य ग्रंथास लागू पडणारें आहे. मराठी भाषेंतील हा तेजस्वी व निर्मल हिरा ' पूर्ववयांतील ' " होतकरू वाचकांच्या हवालीं " करतांना, लोकमान्य आंतडें पिळवटून प्रेमभरानें आदेश देतात, " तुम्ही मात्र निष्कामबुद्धीनें कर्ते व्हा म्हणजे झालें. " लोकमान्यांचा महाराष्ट्राला हा मंगल आशीर्वाद आहे, स्फूर्तिदायक मंत्र आहे, जीवनभर पुरणारें पाथेय आहे. वाडवडिलांची तळघरांतील जिंदगी जमवून-जुळवून-वाढवून वंशजांच्या हातीं देणाऱ्या आजोबांची ममता या उद्गारांत आहे.

## राष्ट्रीयत्वाचे मंत्र

केसरींतील लेख व गीतारहस्य हा ग्रंथराज या दोनच देणग्या टिळक मराठी भाषेला देऊं शकले. 'ओरायन' व 'आर्क्टिक होम इन् दी वेदाज्' हे संशोधनात्मक ग्रंथ त्यांनीं इंग्रजींत लिहिले. आणखी किती तरी ग्रंथ त्यांच्या डोक्यांत घोळत होते. पण स्वराज्याच्या रणधाईत त्यांना फुरसद कशी ती सांपडलीच नाहीं. मंडालेहून सुटून येतांच त्यांनीं ' पुनश्च हरिःओम् ' अशी गर्जना करून " होमरूल लीग " काढली आणि तिचा प्रचार धूमधडाक्यानें केला. स्वराज्याचा मंत्र खेड्यांपाड्यांतून, दिवसारात्रीं, सभा-परिषदांतून घुमवीत असतांनाच लोकमान्यांच्या मुखांतून पुढील राष्ट्रीय ऋचा बाहेर पडली--

"स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, आणि तो मी मिळवणारच."

या प्रचारांतच बोलतां बोलतां सहजस्फूर्तीनें त्यांना एक शब्द सुचला आणि तो मराठीच्या जामदारखान्यांत हिऱ्याप्रमाणें ठेवला गेला. तो शब्द म्हणजे " नोकरशाही "--ब्युरॉक्रसी या इंग्रजी शब्दाचें भाषांतर. " आम्हांला नोकर पाहिजेत, पण त्यांची सत्ता नको, शाही नको, " असें बोलतां बोलतां नोकरशाही हा शब्द तयार झाला.

स्वराज्याच्या चळवळीचें लोण इंग्लंडपर्यंत पोंचविण्यासाठीं टिळक

१९०८ मध्यें विलायतेस गेले. तेथें तेरा महिने राहून त्यांनीं हिंदी लोकांची बाजू इंग्रज सरकारपुढें व जनतेपुढें मांडली. तेथून ते हिंदुस्थानांत परत आल्यावर ता. २२ मे १९२० रोजीं त्यांना तीन लाखांची थैली जनतेनें भक्तिभावानें अर्पण केली. यापूर्वीं १९१६ सालीं, टिळकांना साठ वर्षें पूर्ण झालीं म्हणून, एक लाख रुपयांची थैली महाराष्ट्रानें कृतज्ञतेनें दिलेली होतीच. जन्मभर राष्ट्राच्या सेवेसाठीं, स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं, जनतेच्या उद्धारासाठीं चंदनाप्रमाणें झिजविलेला आपला देह लोकमान्य टिळकांनीं ता. ३१ जुलै १९२० रोजी, रात्रीं बारा वाजून चाळीस मिनिटांनीं, मुंबई येथें धरणीवर ठेवला—आणि कीर्तिरूपानें ते अमर झाले !

## नवी परिभाषा

सतत चाळीस वर्षें टिळकांनीं आपली वाणी व लेखणी लोककल्याणा-सार्टी झिजविली. परक्या सरकारशीं भांडून व आपल्या लोकांना जागे करून स्वराज्य संपादण्याचा त्यांनी जन्मभर उद्योग केला. त्यासाठीं त्यांनीं वापरलेली मराठी भाषा, रणमैदानावर उभ्या राहिलेल्या सेनापतीच्या वीर वाणीसारखी, आवेशाची व तेजस्वी आहे. त्यांनीं एक नवीनच राजकीय परिभाषा बनविली असें म्हटलें तरी चालेल. राजकारणांतील नव्या नव्या कल्पना समजावून देण्यासाठीं टिळकांनीं मराठी शब्द बनविले. त्याचप्रमाणें धार्मिक परिभाषाहि " गीतारहस्यांत " त्यांना निश्चित करावी लागली. केवळ मराठी जाणणाऱ्या वाचकाला, भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञान समजावून घेण्यास, ' गीतारहस्या 'सारखें दुसरें साधन, मराठी भाषेंत अजूनही नाहीं. अध्यात्मांतील अद्ययावत् विचार मराठींत सुबोध करून या ग्रंथांत टिळकांनीं मांडले आहेत.

## सूक्ष्म विचाराचा आविष्कार

धर्माचें तत्त्व कितीही सूक्ष्म—अतिसूक्ष्म असो, तें शब्दांनीं स्पष्ट करून सांगण्याची शिकस्त टिळकांनीं केली आहे. " जीं ध्येयें व्यवहारांत आणतां येत नाहींत, त्यांचा विचार कशाला करावयाचा ? " अशा कोत्या आक्षे-पांना उत्तर देतांना, टिळकांनीं " परमावधीची शुद्ध नीति कोणती ? " हें

ठरविणें अगत्याचें कां आहे, हें युक्तिवादानें पटवून दिलें आहे, आणि शेवटीं असा दाखला दिला आहे कीं, " बाजारांत उपयोगीं येणारीं वजनें-मापें नेहमीच थोडीं कमी जास्त असतात, या सबबीवर, राजदरबारीं सर्वांस प्रमाणभूत म्हणून ठेवलेलीं वजनें-मापेंहि जर होतील तितकीं चोख न ठेवलीं तर आपण त्याबद्दल अधिकाऱ्यांस दूषण देणार नाहीं काय? कर्मयोग-शास्त्रास हाच न्याय लागू आहे. नीतिधर्मांचें पूर्ण, शुद्ध व नित्य स्वरूप कोणतें याचा शास्त्रीय निश्चय करण्यासाठींच नीतिशास्त्राची प्रवृत्ति झालेली आहे. "

नीतिशास्त्राचें अंतिम व शुद्ध स्वरूप समजावून न घेणें किती चुकीचें आहे, हें सांगतांना टिळक म्हणतातः—" दिशा दाखविणारें होकायंत्र किंवा ध्रुव तारा यांचेकडे दुर्लक्ष्य करून अफाट समुद्रावर लाटा आणि वारा या दोहोंचें तारतम्य पाहून गलबतावरील खलाशी दर वेळी आपल्या गलबताचें सुकाणूं धरूं लागले, तर त्यांची जी स्थिती होईल तीच नीति-नियमांचें परमावधीचें स्वरूप लक्षांत न आणितां केवळ देशकालाप्रमाणें वागणाऱ्या मनुष्यांची झाली पाहिजे."

मन, बुद्धी, इंद्रियें, आत्मा इत्यादि शरिरांतील पदार्थांचें ज्ञान करून देणें किती बिकट; पण देह हा एक कारखाना आहे, आणि मन हा तेथील एक कारकून आहे असें रूपक बसवून टिळक लिहितात, " बाहेरचा माल आंत घेण्यास व आंतला माल बाहेर पाठविण्यास ज्याप्रमाणें एखाद्या कारखान्यास दरवाजे असतात, त्याप्रमाणेंच मनुष्य-देहाची ज्ञानेंद्रियें हीं बाहेरचा माल आंत घेण्याचीं व कर्मेंद्रियें हीं आंतील माल बाहेर पाठविण्याचीं द्वारें आहेत."

## व्यावहारिक दृष्टांत

प्रकृति व पुरुष यांचें नातें तत्त्वज्ञानांत नक्की काय मानलें जातें हा एक गूढ प्रश्न आहे. पण तो अगदीं सामान्य माणसालाहि समजावा म्हणून 'रहस्यकार' अशा व्यवहारांतील उपमा देतात, " लंगडा व आंधळा यांची जोडी जमल्यावर आंधळ्याच्या खांद्यावर लंगडा बसून दोघेहि

ज्याप्रमाणें वाट चालू लागतात, त्याप्रमाणें जड प्रकृति व सचेतन पुरुष यांचा संयोग झाला म्हणजे सृष्टींतील कर्मे सुरू होत असतात; आणि नाटकांत ज्याप्रमाणें प्रेक्षकांच्या मनोरंजनार्थ एखादी नटी आतां एक तर घटकाभरानें दुसरें, याप्रमाणें सोंगें घेऊन नाचते, त्याप्रमाणें पुरुषाच्या फायद्यासाठीं ( पुरुषार्थाकरितां ), पुरुष कांहींएक मोबदला देत नसतांहि, प्रकृति सत्त्वरजतमांच्या कमीजास्तपणानें अनेक सोंगें घेऊन त्यापुढें एक-सारखी नाचत असते ! ”

सृष्टि निर्माण कशी होते याचा उलगडा करतांना टिळकांनीं व्यवहारांतील एक साधा दाखला दिला आहे; तो असा–“ वडीचा पंखा मिटलेला असतां तो ज्याप्रमाणें हळूहळू उघडण्यांत येतो, तशी सत्त्व, रज आणि तम यांच्या साम्यवस्थेंत पडलेली प्रकृतीची घडी हळूहळू खुली होत चालली म्हणजे सर्व व्यक्त सृष्टि निर्माण होते. ”

मानवसमाजाला धर्मबंधनाची जरूरी किती आहे, हें वाचकांच्या मनावर ठसविण्यासाठीं ‘ रहस्य ’ कार पुढील दाखले देतात. “ धर्म सुटला म्हणजे समाजाचीं बंधनें तुटलीं असें समजावें. समाजाचीं बंधनें तुटलीं म्हणजे आकर्षणशक्तीखेरीज आकाशांतील सूर्यादिक ग्रहमालेची किंवा सुकाणाखेरीज समुद्रावर तारवाची जी स्थिति व्हावयाची, तीच समाजाचीहि होत असते. ’

## घेघमाराची भाषा

गीतारहस्य हा ग्रंथ तात्त्विक–एकांतवासांत, एकाच विषयावर शांतपणें लिहिलेला.––त्याचें लेखन म्हणजे प्रशांत सरोवरांत नौकाविहार करण्या-सारखेंच. पण टिळकांचें बहुतेक लेखन झालें ‘ केसरींत ’. आणि ‘केसरी’ म्हणजे स्वराज्याचें रणमैदान ! इतरहि आर्थिक, सामाजिक, भाषिक वगैरे विषयांचीं झुंजें त्यांत नित्य चालावयाचीं. निरनिराळे पक्ष, व्यक्ती, संस्था यांच्याशीं सामने करण्याचे प्रसंग वर्तमानपत्रकाराला दररोजच. त्यांतहि टिळक म्हणजे ‘ राष्ट्र–जनक ’. राष्ट्राचें जुनें स्वरूप नष्ट करून त्याला नवें तेज, नवें बळ, नवें ध्येय देणें हें त्यांचें जीवित–कार्य. जीर्णाचा विध्वंस

करण्यांतच टिळकांची पुष्कळ लेखनशक्ति खर्ची पडली आहे. त्यामुळें त्यांच्या बहुतेक लेखांत घेघेमारच ऐकूं येते. भीमाच्या गदेचें सामर्थ्य त्यांच्या लेखणींत आहे. तिला मऊपणा, मिळमिळीतपणा, अर्धवटपणा कसा तो माहीतच नाहीं. इंग्रज सरकार अन्याय, जुलूम, दडपशाही यांची आग हिंदी जनतेवर अखंड ओतीत होतेंच. तेव्हां त्याचा प्रतिकार म्हणून तितक्याच जळजळीतपणें सरकारचा निषेध करणें हेंहि टिळकांचें कर्तव्यच होऊन बसलें होतें. ' हा लेख सौम्य शब्दानें लिहावयास पाहिजे होता, असें कित्येकांचें म्हणणें आहे. ' असा पूर्वपक्ष करून टिळक आपल्या लेखनाची भूमिका ठणठणीतपणें सांगतात कीं, ' आम्हांस हें मत कधींच ग्राह्य वाटलें नाहीं. कांटा काढणें तों कांट्यानेंच काढला पाहिजे, तो चिंधीच्या बोळ्यानें निघत नाहीं. ' बंदुकींतून सटासट् गोळ्या उडाव्या त्याप्रमाणें टिळकांच्या लेखांतून जळते शब्द बाहेर पडत. ' चालू द्या, होईल तितका जुलूम चालू द्या ! परंतु लक्षांत ठेवा कीं, हिंदी लोक गरीब झाले तरी ते किती जुलूम सोसतील याला कांहीं तरी मर्यादा आहे. ' १९०७ सालांतील ही भाषा आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे.

## टीकेचा जळजळीतपणा

संतप्त माणूस आवेशानें जसें तडातडा बोलतो, तसें टिळक लिहीत. " जुलूम तो जुलूम, मग तो कायदेशीर असो किंवा बेकायदेशीर असो. कायदेशीर जुलूम असला तर शांततेनें व हाल सोसण्याच्या दृढनिश्चयानें त्याचा प्रतिकार केला पाहिजे, तो बेकायदेशीर असला तर बेकायदेशीर रीतीनें त्याचा प्रतिकार केला पाहिजे. कांहींच्या हालअपेष्टा झाल्या तरी हरकत नाहीं; पण काळ सोकावूं देतां कामा नये." असें उंच स्वरांतील टिळकांचें सारें बोलणें. आणि जसें ते बोलत, तसेंच लिहीत. यांतील ' प्रतिकारां 'त पुढील सत्याग्रहाचीं बीजें दिसतात. तीं पाहून टिळकांच्या दूरदर्शीपणाचें कौतुक कोणास वाटणार नाहीं ?

जुलूम म्हणावयाचें कशास ? अशी शंका वाचकांचे मनांत उत्पन्न होईल. तर केसरी लगेच उत्तर देतो, " ज्यांवर ' जुलूम ' असा छाप

प्रजा मारील तो जुलूम." बस्स ! 'एक घाव दोन तुकडे' असें सडेतोड लिहिणें. कार्याची प्रेरणा देण्याचें सामर्थ्य टिळकांइतकें दुसऱ्या कोणाच्या लेखणींत क्वचितच असेल. तुरुंगालाच काय, पण कृतांतालाही न डगमगणारी निर्भयता त्यांच्या शब्दांशब्दांतून रसरसत आहे. लॉर्ड कर्झन "मदोन्मत्त हत्तीप्रमाणें बंगाली राष्ट्राच्या लोकमतास गवतासारखें तुडवून टाकीत आहेत." हें पहातांच महाराष्ट्रांतील हा केसरी खवळून उठतो आणि सरकारला बेडरपणें बजावतो, "बंगाल्यांतील लाखों लोकांस जी गोष्ट पसंत नाहीं ती जुलुमानें, सक्तीनें आणि आग्रहानें त्यांच्यावर लादून त्यांचा जीव घेण्याचा प्रयत्न करणें हें निर्दयपणाचेंच नव्हें, तर मुत्सद्याचे दृष्टीनेंहि अत्यंत असमंजसपणाचें कृत्य होय." दडपशाही करणाऱ्या सरकारविरुद्ध टिळकां-इतकें रोखठोक बोलण्याची छाती किती संपादकाजवळ असेल? आणि नुसता सरकारचा धिक्कार करून ते थांबत नसत, तर लोकांनाहि ते जीव तोडून सांगत, "शब्द नकोत, कृति पाहिजे; आणि तीहि निश्चयाची कृति पाहिजे" जनतेला कार्याची टोंचणी लावतांना ते म्हणतात, "नाक धरल्याखेरीज तोंड उघडत नाहीं, आणि सरकारस झोंबेल अशी जर कांहीं गोष्ट आमच्या हातून घडणार नाहीं, तर सरकारचा दर्प कधींहि उतरणार नाहीं."

## गुण-ग्राहक वृत्ति

असे खणाखणीचे प्रसंग जेव्हां नसतील, तेव्हां 'केसरीं'तहि टिळक कधींकधीं तात्त्विक चिकित्सा करून युक्तिवादाचे लेख शांतपणें लिहीत. महाभारत किंवा अबलोन्नति लेखमाला अथवा ब्रह्मसीमांसा, पंचागशोधन, मराठी भाषा लेखनपद्धति इत्यादि विषयांवर त्यांनीं लिहिलेल्या कित्येक लेखमाला पांडित्यपूर्ण व समतोल अशाच आहेत. त्यांतहि मृत्युलेखाचे वेळीं तर प्रतिपक्षासंबंधानेंहि ते मोठ्या उदार भावनेनें लिहीत. जिवंतपणीं ज्यांना त्यांनीं राजकीय कारणासाठीं "सळो कीं पळो" करून सोडलें असेल, त्यांचे गुण घेण्याचा मोठेपणाहि टिळक प्रांजळपणें दाखवीत. "हा म्हातारचळ कीं पोरखेळ?" या शब्दांनीं ज्यांच्यावर त्यांनीं टीकेचें

शरसंधान केलें, त्याच न्यायमूर्ति रानडे यांच्या मृत्युलेखांत त्यांचे गुण टिळकांनीं मुक्तकंठानें गायिले त्यांच्या थोरवीचें रहस्य शोधून वाचकांपुढें मांडतांना ते म्हणतात, " महाराष्ट्र देश म्हणजे त्यावेळीं एक थंड गोळा होऊन पडला होता. या थंड्या गोळ्यास कोणत्या तऱ्हेनें ऊब दिली असता तो पुनः सजीव होईल व हातपाय हालवूं लागेल, याचा रात्रंदिवस एकसारखा विचार करून अनेक दिशांनीं, अनेक उपायांनीं, अनेक रीतींनीं त्यास पुनः सजीव करण्याचें दुर्धर काम अंगावर घेऊन त्याकरितां जिवापाड जर कोणी मेहनत केली असेल तर ती प्रथमतः माधवरावजींनींच केली असें म्हटलें पाहिजे........ घाटांतून एकदां कुशल इंजिनियरानें आगगाडीची लाइन मारल्यानंतर त्यांत सुधारणा करणारे जरी पुष्कळ लोक निघाले, तरी ज्याप्रमाणें मूळ इंजिनियरच्या कल्पकपणास कमीपणा येत नाहीं; तद्वतच रावसाहेब रानडे यांची स्थिती होती. "

## जुळे पुढारी

आगरकरांचा मृत्युलेख तर त्यांनीं डोळे पुशीत पुशीतच लिहिला ! दोघांचाही जन्म एकाचं वर्षीं, दोघांचेंहि शिक्षण एकाच कॉलेजांत झालेलें, दोघांनींहि रात्री न् रात्रीं चर्चा करून आपल्या आयुष्याचें एकमेव ध्येय ठरविलेलें. त्या ध्येयासाठीं विद्यालय व वृत्तपत्र या दोन्ही आघाड्यांवर खांद्याला खांदा लावून ते लढलेले. या लढाईतील जखमा म्हणून दोघांनींहि एकत्र तुरुंगवास भोगलेला—असें जवळचें व जिव्हाळ्याचें ज्यांचें नातें; त्या जुळ्या भावांचीं तोंडें पुढें दोन दिशांस झालेलीं, किंबहुना एकमेकांशीं दोन हात करण्याचेहि प्रसंग वारंवार आलेले, दोघेहि तीव्र भावनेचे व तडफदार वृत्तीचे असल्यानें त्यांनीं एकमेकांवर दांतओंठ खाऊन हल्ले केलेले—असें असूनहि दोघांना एकमेकांच्या मनाची थोरवी व हृदयांतील प्रेमळपणा पुरा पुरा माहीत. यामुळेंच टिळकांचा आगरकरांवरील मृत्यु-लेख मराठी भाषेंत अद्वितीय ठरणारा वठला. हा लेख लिहितांना आपली स्थिति किती कारुण्यपूर्ण झाली हें टिळकांनींच पुढील शब्दांनीं वर्णन केलें आहेः—" पहिल्यापासून एक उद्देश मनांत ठेवून, तो सिद्धीस नेण्याच्या

साधनांचा विचार करण्यांत व तीं प्राप्त करून घेण्यांत, कित्येक वर्षें एकमेकांस जीं सुखदुःखें अनुभवावीं लागलीं, त्यांच्या पुनः पुनः स्मरणानें आमचें चित्त अगदीं उदास व अस्वस्थ होऊन आयुष्याची अशाश्वतता आमच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभी रहात आहे !" हा मृत्यु-लेख लिहितांना 'मन विषाद आणि दुःख यांनीं भरून जाऊन' टिळकांची "बुद्धि व लेखणी गोंधळून" गेली होती.

पुढें एकदां आगरकराचे गुण टिळकांनीं मनमोकळेपणानें घेतले आहेत. "परिस्थितीचा गुलाम न बनतां परिस्थितीला यथासंभव, यथाशक्ति व यावच्छक्य आपल्या ताब्यांत आणण्यास जो मनोनिग्रह, स्वार्थत्याग, निर्लोभीपणा आणि धैर्य लागतें, तें ज्याच्या अंगांत आहे आणि दुःखाची अथवा संकटाची भीति अगर पर्वा न बाळगतां जो आपल्या ठायीं असणाऱ्या या सद्गुणाचा लोकोपयोगार्थ उपयोग करतो तोच मोठा म्हणावयाचा." असा सिद्धांत सांगून त्या कोटींत आगरकरांना टिळकांनीं बसविलें आहे.

## सूक्ष्म चिकित्सा

टिळकांची कुशाग्र बुद्धि कोणत्याहि विषयांत शिरे व त्याची चिकित्सा करी. पुढारीपणाला कोणते गुण लागतात हें सांगतांना टिळक म्हणतात

"समाजाचे पुढारी होण्यास विद्वत्तेपेक्षां सदाचरण, धर्मनिष्ठा आणि स्वार्थत्याग यांची अधिक जरूर लागत असते...राजकारणी माणसाच्या अंगांत दोन गुण पाहिजेत. एक तर त्याच्या हृदयांत प्रखर आग पेटलेली पाहिजे; आणि दुसरा म्हणजे त्या हृदयाच्या वरच्या बाजूस डोकें बर्फासारखें थंड असलें पाहिजे. हे दोनहि गुण एकसमयावच्छेदेंकरून ज्या पुरुषाजवळ उत्कटतेनें वास करीत असतील तो पुढारी होण्यास योग्य होय...सतारीची अगर तंबूरीची तार नुसती वाजविल्यानें जसा तिजपासून आवाज निघत नाहीं, पण तीच तार भोपळ्यावर चढविली म्हणजे तिजमधून कर्णमधुर ध्वनि बाहेर पडतो, तद्वत्‌च देशांतील पुढारी विद्वानांचा व लोकमताचा संबंध आहे."

## संजीवक विचार

असा विशाल लोकमताचा भक्कम पाठिंबा मिळवून आणि पोटांत आग पण माथ्यांत बर्फ ठेवून, लो. टिळकांनीं या राष्ट्राचें पुढारीपण धर्मनिष्ठ स्थितप्रज्ञाप्रमाणें केलें. या त्यांच्या निष्काम कर्मयोगाचें फल म्हणजे आजचें आपलें स्वातंत्र्य. या स्वातंत्र्यकालांतहि जनता जागरूक, निर्भय व प्रतिकारशाली राहण्यास आणि एकजुटीनें व संघटितपणें कार्य करण्यास समर्थ बनविण्याची शक्ति लो. टिळकांच्या संजीवक साहित्यांत आहे. त्यांची वाणी म्हणजे केवळ तेजोगंगा आहे.





# प्रिं. आगरकर : : : ८

पांच पदवीधर तरुण—एका विचारानें राष्ट्रकार्य करण्यासाठीं एकत्र आलेले—जसे कांहीं पांच सख्खे बंधुच ! सात वर्षें ' निबंध–माला ' चालवून शास्त्रीबुवा स्वर्गवासी झाले, तेव्हां त्यांच्या बाकीच्या सहकाऱ्यांना किती दुःख झालें ! पण हातीं घेतलेलें काम तडीस नेण्याची त्यांची उमेद दांडगी ! ' शास्त्रीबुवांचीच कथा काय, पण आम्हांपैकीं एक जरी तळावर असला, तरी तो, आम्ही सर्वांनीं आरंभिलेला उद्योग अविच्छिन्न चालविण्यास होईल तितकी खटपट करील ' अशी आत्मविश्वासाची व महत्वाकांक्षेची घोषणा आगरकरांनीं ' केसरीं 'त केली.

आगरकरांनीं ' केसरीचे ' संपादक म्हणून पहिलीं सात वर्षें काम केलें

आणि त्यानंतर पुढील सात वर्षे 'सुधारक' नांवाचें साप्ताहिक स्वतंत्रपणें चालविलें. ह्या दोन्ही वृत्तपत्रांत आगरकरांनीं जे लेख लिहिले त्यांच्यांतील गाढ कळकळ, सत्याचा कडकडीत अभिमान आणि अन्यायावर तुटून पडण्याचा दुर्दम्य आवेश हे गुण अलौकिक आहेत. विशेष हें कीं, आगरकरांना गरिबीचे हाल सोसावे लागले, दम्याच्या यातना भोगाव्या लागल्या व कलहाच्या कांटयाकुटयांवरून चालावें लागलें, तरी त्यांच्या जिव्हेंतून व लेखणींतून अलंकारपूर्ण व विनोदपूर्ण अशाच भाषेचा झरा आमरण वहात राहिला.

## विद्यादेवीची पायीं यात्रा

गोपाळ गणेश आगरकर ह्यांचा जन्म १८५६ सालीं सातारा जिल्ह्यांतील टेंभू ह्या गांवीं झाला. गरिबी तर त्यांच्या पांचवीसच पुजलेली होती. त्यांचें आजोळ कऱ्हाड येथें होतें. तेथें ते लहानपणीं रहात. बाराव्या वर्षी इंग्रजी तीन इयत्तांपर्यंत त्यांचें शिक्षण कसेंबसें झालें. बुद्धि तरतरीत असल्यामुळें शाळेंत त्यांचें नांव गाजे—शाळेबाहेरहि निबंधांच्या स्पर्धेत गोपाळ बक्षिस मिळवी. केवढें? दोन रुपयांचें! पण अशीं ठिगळें लावून कां कोठें गरिबीचें फाटकें वस्त्र सांधलें जाणार? तीन इयत्ता झाल्यावर गोपाळला शाळा सोडावी लागली—शिकण्याची इच्छा व पात्रता असतांना सोडावी लागली. वयाच्या तेराव्या वर्षी त्यानें कऱ्हाड येथील मुनसफ—कचेरींत नोकरी पत्करली. पण त्याचें मन तेथें रमत नव्हतें. आपण शिकावें—खूप खूप शिकावें—शिकतांना आपलें नांव वर यावें व शिकल्यावर आपण मोठें व्हावें, अशा उंच उंच आशा—आकांक्षा त्याच्या मनांत उचंबळत होत्या. त्यामुळें त्यानें ती नोकरी ताड्दिशी सोडली, आणि रत्नागिरी येथील आपल्या चुलत्याकडे जाण्याचें ठरविलें.

ठरविलें पण जावयाचें कसें? कऱ्हाड ते रत्नागिरी म्हणजे दीडशें मैलांचा प्रवास. तो करण्यास त्याच्याजवळ पैसा कोठला? पण हिम्मत मोठी. तो सारा प्रवास ह्या तेरा वर्षांच्या मुलानें पायीं केला! डिवचलेल्या राम-शास्त्र्यांचें उत्तरेकडे काशीस जाणें आणि महत्वाकांक्षी गोपाळनें दक्षिणेकडे

रत्नागिरीस जाणें—दोन्हींचें महत्त्व सारखेंच ! दोघांनींहि विद्येच्या क्षेत्रांत उंच भरारी मारली, दोघांचीहि सत्यनिष्ठा जाज्वल्य आणि निःस्पृहपणा व निर्भीडपणा ह्या गुणांचें बाबतीतहि दोघे जुळे भाऊ शोभणारे !

रत्नागिरीस ह्या रत्नाचें कौतुक झालें काय ? लहान वयांत केवळ विद्येसाठीं पायीं चालून आलेल्या गोपाळच्या पाठीवरून त्याच्या चुलत्यानें प्रेमानें हात फिरविला काय ? ते शाळा खात्यांतील दिपोटी होते. पण त्यांच्या पोटांत विद्येचें प्रेम नव्हतें. त्यांनीं गोपाळला आसरा दिला नाहीं. तरीहि गोपाळ निराश झाला नाही. त्यानें लोकांच्या घरीं जेवणाचे वार लावले, त्यांच्या घरचीं कामें केलीं आणि दोन इयत्ता कशाबशा पदरांत पाडून घेतल्या. पण नोकरी व अभ्यास दोन्ही जमणे अशक्य झाल्यामुळें गोपाळनें हात टेकले—बिचारा निराश होऊन कऱ्हाडला परत आला.

## पहिला टप्पा गांठला

सोळा वर्षांचें वय ! एका दवाखान्यांत कंपौंडरची नोकरी मिळालेली, बाटल्या धुण्याचा व भरण्याचा गोपाळला कंटाळा आला. दवाखान्यांतील प्रेतांची चिरफाड पाहून त्याच्या अंगावर कांटा आला. त्याला अन्न नकोसें झालें. त्याच्या स्वप्नांत प्रेतें नाचूं लागलीं. त्यानें ती नोकरी सोडली. गोपाळचे एक मामा वऱ्हाडांत अकोला येथें होते. तिकडे गोपाळ गेला. तेथें महाजनी गुरुजी भेटले. त्यांनीं गोपाळची काळजी प्रेमानें वाहिली. त्यांना गोपाळची चपळ बुद्धी, मनमिळाऊ स्वभाव व उद्योगी वृत्ति ह्या गुणांचें मोठें कौतुक वाटे. महाजनींचीं शिफारसपत्रें घेऊन गोपाळ पुण्यास गेला. कऱ्हाडास नाहीं तर रत्नागिरीस, रत्नागिरीस नाहीं तर अकोल्यास आणि अकोल्यासहि शिक्षणाची सोय होत नाहीं, तर ती पुण्यास तरी खास होईलच होईल, अशा आशेनें गोपाळ—तो सरस्वतीचा वारकरी—तो विद्येचा मधुकरी—तो ज्ञानाचा भिक्षेकरी पुण्यास आला.

पुणें म्हणजे विद्येचें आगर व उदार पुरुषांचें माहेरघर हें खरें, पण पुण्यपुरीनेंहि त्याला थारा दिला नाहीं. गोपाळची भयंकर निराशा झाली. हिरमुष्टी मनानें व खालच्या मानेनें गोपाळ अकोल्यास परत गेला. तीन

वर्षें त्यानें तेथें कष्टानें काढलीं. शेवटीं १८७५ सालीं तो मॅट्रिक झाला. उंच डोंगर चढूं पाहणाऱ्या माणसानें, वर चढत व खालीं पडत, ठेचांनीं व जखमांनीं रक्ताळलेल्या पायांनीं, रक्ताचे व घामाचे बिंदु ढाळीत ढाळीत त्या डोंगराचा पहिला टप्पा गांठावा आणि मग ' हुश्श ' करून कपाळावरील घाम हातांनीं पुसावा तसा विसावा गोपाळला मॅट्रिक झाल्यानंतर वाटला. त्याच्या उत्सुक डोळ्यांना पुढील टप्पे दिसत होते—डोंगराचें शेवटचें शिखर दिसत होतें —त्या शिखरांवरील हिरवीगार वनश्री दिसत होती. कांहींहि करून तो शेवटचा मुक्काम गांठण्याचा निश्चय त्यानें केला. " तुम्ही कॉलेजचा नाद सोडा " असाच सल्ला गोपाळरावांना त्यांच्या साऱ्या आप्तांनीं दिला, पण खुद्द त्यांच्या अंतःकरणाचा सल्ला निराळा होता तोच त्यांनीं ऐकला.

## गरिबीचें निशाण

गोपाळराव पुण्यास गेले व डेक्कन कॉलेजांत दाखल झाले. त्यावेळीं त्या कॉलेजांत विद्यार्थ्यांस दरमहा २०–२५ रुपये खर्च येई. पण तेवढे पैसे तरी कोठून आणावयाचे ? गोपाळरावांनीं ' वऱ्हाड–समाचारां 'त लेख लिहावयास सुरवात केली. त्यांचा मोबदला म्हणून दरमहा पांच रुपये मिळत. अभ्यास चांगला असल्यामुळें त्यांना शिष्यवृत्तीहि मिळाली. ह्याशिवाय कोठें निबंध-स्पर्धा असली, वक्तृत्व-स्पर्धा असली कीं, त्यांत गोपाळराव भाग घेत व बक्षिसें पटकावींत. महाजनींनीं साठ रुपयांची देणगी त्यांना दिली होती. पण अशा पै-पैशांनीं काय होणार ? थंडी निवारण्यास फाटकें पांघरूण जसें पुरें पडत नाहीं, तसें गरिबी चुकविण्यास हें तुटपुंजें साहाय्य पुरें पडेना. एकच सदरा ! गोपाळराव तो रात्रीं धूत व वाळत टाकीत. दिवस उजाडला कीं तो सदरा अंगांत घालून ते डेक्कन कॉलेजांत जात. एकदां परीक्षा आली—तिची फी आली. ती गोपाळराव कोठून, कशी भरणार ? फीचे पैसे उभे करण्यासाठीं त्यांनीं एक नाटक लिहिण्यास घेतलें. ही कुणकुण प्रा केरुनाना छत्रे ह्यांच्या कानीं गेली. त्यांना या विद्यार्थ्याच्या बुद्धिमत्तेचें मोठें कौतुक वाटे. त्यांनीं गोपाळरावांची

फी स्वतः भरली. गोपाळरावांना अभ्यासास वेळ मोकळा मिळाला. ते पहिल्या वर्षाच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले.

## परोपकाराची प्रतिज्ञा

कॉलेजांत गोपाळरावांचे आवडीचे विषय म्हणजे इतिहास, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान. पाश्चात्त्यांच्या तत्त्वज्ञानानें, त्यांतील प्रवृत्तिवादानें व सामाजिक सुधारणेच्या विचारानें गोपाळरावांच्या मनावर पगडा बसविला. मिल्ल व गिब्बन ह्या ग्रंथकारांचे ते जणु भक्त बनले. राजकीय तत्वज्ञानाचाहि त्यांनीं अभ्यास केला. त्यांनीं राजकीय विषयावर एक स्वतंत्र प्रबंध लिहिला. तो दाखविण्यासाठीं ते ' मालाकार ' चिपळूणकरांकडे गेले होते. चिपळूणकरांनीं आगरकरांचें तेज ओळखलें आणि आगरकरांनीं चिपळूणकरांचें नेतृत्व जोखलें. अशा प्रकारें ज्ञानाचे खजिने लुटत लुटत गोपाळराव १७७८ साली बी. ए. झाले. नंतर त्यांना फेलो नेमण्यांत आलें. त्याबद्दल त्यांना दरमहा ७५ रुपये मिळत. इतकी सुखाची स्थिति सबंध आयुष्यांत गोपाळरावांना कधीं लाभली नव्हती. ते एम्. ए.चा अभ्यास उत्साहानें करूं लागले. त्यावेळीं त्यांना कोणती हांव होती ? कोणती महत्त्वाकांक्षा त्यांच्या डोळ्यापुढें नाचत होती ? गरिबीच्या गाळांत गळ्यापर्यंत रुतून बसलेल्या आपल्या आईला एक पत्र लिहून त्यांनीं आपल्या जीवनाचें ध्येय कळविलें होतें. त्या पत्रांत गोपाळराव लिहितात, " आपल्या मुलाच्या मोठाल्या परीक्षा होत आहेत, आतां त्याला मोठाल्या पगाराची चाकरी मिळेल आणि आपले पांग फिटतील, असे मोठाले मनोरथ, आई ! तूं करीत असशील. पण मी आतांच सांगून टाकतों कीं, विशेष संपत्तीची हांव न धरतां, मी फक्त पोटापुरत्या पैशावर संतोष मानून, सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार."

## सहकारी भेटला

" संपत्तीची हांव न धरतां सर्व वेळ परहितार्थ खर्च करणारा " असा दुसरा एक पदवीधर त्याचवेळीं त्या कॉलेजांत आलेला होता. तो म्हणजे

बाळ गंगाधर टिळक ! दोघांनींहि देशभक्तीच्या वाटाघाटींत रात्रींच्या रात्रीं घालविल्या–" सरकारी नोकरी न पत्करतां देशसेवेंत आयुष्य घालविण्याचा " निश्चय केला आपल्या देशाचें पारतंत्र्य व दारिद्र्य नष्ट करण्यासाठीं शिक्षण व उद्योगधंदे ह्यांचा प्रसार केला पाहिजे, असा मार्गही त्यांनीं आपल्या मनांत आंखला तें ध्येय, तो मार्ग, आणि आपली त्यागाची तयारी–हें सारें त्या दोघा तरुण पदवीधरांनीं न्या. रानडे ह्यांच्या कानांवर घातलें. मालाकार चिपळूणकर ह्यांचाहि सल्ला त्यांनीं घेतला. मालाकार तर काय ? स्वातंत्र्याच्या अमृतवेली लावण्यास सिद्ध होते,–नव्यानव्या संस्था स्थापण्यास उत्सुक होते. त्यांना असे त्यागाचे व तडफेचे तरुण मिळतांच त्यांनीं आपल्या कार्याचें निशाण उभारलें. ता. १ जानेवारी १८८० रोजीं शास्त्रीबुवांसकट पांच देशभक्तांनीं ' न्यू इंग्लिश स्कूल ' ही राष्ट्रीय संस्था काढली. आगरकर एम. ए. च्या परीक्षेत एकदां गटंगळी खाऊन १८८० च्या नोव्हेंबरांत परिक्षेच्या पैलतीरास पोंचले. एम. ए. हें शिक्षणाचें शिखर त्यांनी एकदांचें गांठलें ! कऱ्हाड येथें तीन इयत्ता-नंतरच शिक्षणाला रामराम ठोकण्यासारखी ज्याची परिस्थिति, त्यानें चिकाटीचें चिलखत अंगांत घालून आणि कष्ट व धैर्य ह्यांची ढाल-तलवार हातीं घेऊन, इंचाइंचानें रणभूमि जिंकीत, विद्या–क्षेत्रांतील विजय–श्री सर केली, ही बहादुरी किती तारीफ करण्यासारखी !

## केसरीचें संपादकत्व

न्यू इंग्लिश स्कूलमधील शिक्षकाचें काम आगरकर मोठ्या आस्थेनें करीत. पुढच्याच वर्षीं, १८८१ च्या जानेवारीत, शास्त्रीबोवांनीं 'केसरी' साप्ताहिक सुरू केलें, आणि त्याचे संपादक आगरकरांना नेमलें. ' कोठें जुलमाचा, अन्यायाचा, अडचणींचा किंवा त्रासाचा प्रकार दिसून आल्यास लोकांच्या, सरकारच्या आणि विशिष्ट अधिकाऱ्यांच्या नजरेस तो आणावा ' असा उद्देश ' केसरी ' काढण्यांत होता. केसरी काढून वर्ष सव्वा वर्ष होतें न होतें, तोंच विष्णुशास्त्री दिवंगत झाले. ' महाराष्ट्रीयांनीं अद्वितीय रत्न गमाविलें ' असें शोकाचे उद्गार आगरकरांनीं केसरींत

काढले. शास्त्रीबुवा हे 'सत्याचा कैवार घेऊन शुद्ध अंतःकरणानें लोकहितासाठीं भांडणारे' होते, असे जें वर्णन आगरकरांनीं केलेलें आहे, तें खुद्द त्यांनाहि लागू पडण्यासारखेंच आहे.

## तुरुंगांतील साहित्य-सेवा

शास्त्रीबुवांच्या निधनानंतर बरोबर चारच महिन्यांनीं आगरकर-टिळकांना शिक्षा झाली. केसरी–मराठ्यांत कोल्हापूरच्या छत्रपतीचा कैवार घेऊन तेथील दिवाणावर टीका करणारा कांही मजकूर आला. त्यामुळे चार महिने कैदेची शिक्षा ह्या तरुण संपादकांना भोगावी लागली. मुंबईजवळील डोंगरीच्या तुरुंगांत त्या दोघांनीं त्या शिक्षेची मुदत घालविली. त्या कालांतील जीवनाचें शब्दचित्र रंगविणारें एक लहानसें पुस्तक आगरकरांनीं लिहलें. त्याचें नांव ' डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे १०१ दिवस ', ह्याशिवाय आगरकरांनी तुरुंगांत शेक्सपीअरच्या ' हॅम्लेट ' ह्या नाटकाचें भाषांतर केले ' विकार–विलसित ' ह्या नांवानें तें प्रसिद्ध झालें आणि नटश्रेष्ठ श्री. गणपतराव जोशी ह्यांच्या रंगभूमीवर तें खूप गाजलें. अजूनहि त्याचे प्रयोग प्रेक्षकांच्या हृदयाचा ठाव घेतात.

## शाळा-कॉलेजांतील कामगिरी

' न्यू इंग्लिश स्कूल ' ह्या संस्थेचा एकसारखा उत्कर्ष होत होता. पांच वर्षांतच त्या शाळेच्या चालकांनीं कॉलेज उघडलें. १८८५ सालच्या जानेवारी महिन्यांत फर्ग्युसन कॉलेज निघालें. इंग्रजी व इतिहास हे विषय आगरकर कॉलेजांत शिकवीत––ते इतक्या तल्लीनतेनें कीं, तासाची घंटा झाल्याचें भानहि त्यांना रहात नसे. विनोद करीत करीत, हंशा पिकवीत पिकवीत ते तासन् तास शिकवीत. त्या कॉलेजचे पहिले प्राचार्य आपटे व दुसरे आगरकर. १८८५ सालीं आगरकर न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिटेंडेंट झाले आणि १८९२ सालीं ते फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल झाले. तीन वर्षें प्रिन्सिपलशिपचें काम त्यांनीं केलें. तेवढ्या थोड्या काळांतहि त्यांनीं आपला ठसा त्या कॉलेजवर उमटविला. गरीब

किंवा अस्पृश्य अशा विद्यार्थ्यांना ते मदत करीत. मुंबई विद्यापीठाचे फेलो म्हणूनहि आगरकरांनीं काम केलें.

## मतभेद व मार्गभेद

पण आगरकरांचें खरें कार्य, महान् यश, जिवंत स्मारक म्हणजे त्यांचें " सुधारक " पत्र ! समाजसुधारणेचा प्रश्न आधीं हातीं घेतला पाहिजे—आपल्या समाजांतील दुष्ट रूढींचा व वेडगळ कल्पनांचा विध्वंस केला पाहिजे––त्यासाठीं न भितां, न कचरतां समाजावर कडाडून हल्ले चढविले पाहिजेत––त्यापायीं त्याचा रोष, त्याची अप्रियता, त्याचा छळ, जें जें वाट्यास येईल तें तें सारें भोगलें पाहिजे ही आगरकरांची विचार-सरणी. उलट टिळकांचें ठाम मत असें कीं, आपल्या सर्व दुःखांचें मूळ म्हणजे राजकीय पारतंत्र्य–तें नष्ट करणें हें आपलें आद्य कर्तव्य–त्यासाठीं समाजांतील बारीकसारीक दोषांकडे दुर्लक्ष करावें–त्यांतील भेद तूर्त विसरावेत आणि एकजुटीनें परक्या सरकारच्या अन्यायावर तुटून पडावें. टिळक–आगरकरांचे हे मतभेद दिवसेंदिवस वाढत गेले. त्याचा परिणाम म्हणजे १८९० सालीं टिळकांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटी सोडली. आणि आगरकरांनी १८८७ सालींच केसरी सोडला.

## विचार–स्वातंत्र्याची भूमिका

" इष्ट दिसेल तें बोलणार व शक्य असेल तें करणार " असा दणदणीत बाणा जाहीर करून आगरकरांनीं आपलें स्वतःचें " सुधारक " नांवाचें साप्ताहिक १८८८सालीं दसऱ्याच्या मुहूर्तावर काढलें. " लोकमतांतील दोषस्थळें दाखविण्याचें आणि अप्रिय परन्तु पथ्यकारक विचार मांडण्याचें " कठीण व्रत त्यांनीं घेतलें. " क्षुद्र लोकांच्या अवकृपेला, रागाला किंवा उपहास्यतेला यत्किंचित् न भितां आपल्या मनास योग्य वाटेल तें लिहावें, बोलावें व सांगावें . त्यांतच जगाचें हित आणि जन्माची सार्थकता आहे. " ह्या भूमिकेवरून आगरकर " सुधारकां "त लिहीत.

स्त्री-शिक्षण, प्रौढाविवाह, अस्पृश्यतानिवारण वगैरे सामाजिक सुधारणांचा

पुरस्कार त्यांनीं धडाडीनें केला. कोणाची भिडभाड न ठेवतां, समाजांतील घाणेरड्या चालीरीतींवर त्यांनीं कोरडे ओढले. त्यामुळें जुन्या मतांचे लोक त्यांचेवर साहजिकच खवळले. त्यांनीं आगरकरांना खुनाची धमकीहि दिली, एवढेंच नव्हे तर, एकदां तर ते जिवंत असतांनाच त्यांची खोटी प्रेतयात्राहि काढली! ती प्रेतयात्रा त्यांच्या घरावरून चालली असतां जुन्या मताचे लोक त्यांच्या नांवानें शिमगा करीत होते. तरी आगरकरांची वृत्ति अत्यंत शांत राहिली होती. त्यांना त्या अडाणी लोकांच्या वेडगळपणाची कींवच येत होती.

## चित्ताची शांतता

पल्लेदार, अलंकारिक, उपरोधिक व आवेशपूर्ण अशा लेखनाचा वारसा जसा त्यांनीं चिपळूणकरांपासून मिळविला होता, तसाच सामाजिक उदार मताची, तर्कनिष्ठ बुद्धिवादाची आणि शांत–सहिष्णु मनोवृत्तीची जिंदगी त्यांनीं न्या. रानडे ह्यांचेकडून घेतली होती. जगांत जे जे समाज-सुधारक झाले, धार्मिक क्रांतिकारक झाले, विशिष्ट ध्येयाचे हुतात्मे झाले; ते सर्व अशाच अढळ शांतीचे पुतळे होते. त्या वृत्तीच्या मुशींतच आगरकरांचें मन तयार झालेलें होतें. त्या प्रशांत ध्येयनिष्ठ वृत्तीनें—'मिशनरी' बाण्यानें सतत सात वर्षें "सुधारक" पत्र चालवून ता. १७ जून १८९५ रोजी आगरकरांनीं आपली जीवनयात्रा संपविली. त्यांचें सारें जीवन म्हणजे एक उदात्त झगडाच होता. बालपणीं गरिबीशीं झगडा, तारुण्यांत सहकाऱ्यांशीं झगडा आणि शेवटीं सनातन्यांशीं झगडा—असें झगडणारें, झुंजणारें, झिजणारें आयुष्य निष्कामपणें व निर्भयपणें घालवून वयाच्या अवघ्या ३९ व्या वर्षीं त्यांनीं इहलोकाचा निरोप घेतला.

## बुद्धि गदगदा हालविली

आगरकरांनीं जशी हिंदु समाजाची, तशीच मराठी भाषेची मोठी सेवा केली. त्यांच्या दूरदृष्टीला असें ध्येय दिसत होतें कीं, "फार थोड्या काळांत पूर्वपश्चिम सुधारणांतील अत्यंत हितकारी भाग जींत सामील झाले

आहेत, अशा एका नामी सुधारणेची येथें स्थापना होऊन, भारतीय आर्य अननुभूतपूर्व अशा आधिभौतिक व आध्यात्मिक सुखाचा उपभोग घेऊं लागतील असा आमचा तर्क आहे !" हें दूरचें ध्येय हस्तगत करण्यासाठीं ते आपल्या समाज-बांधवाना हांका मारून, ओरडून, धक्के देऊन जागे करीत होते, उठवीत होते, त्यांचे डोळे उघडवीत होते. "बांधवहो, विचार–कलहाला तुम्ही इतके कशासाठीं भितां ?" असे आवेशाचे सवाल टाकून ते वाचकांची बुद्धि गदगदा हलवीत. निजलेलीं मुलें आपल्याला उठविणाऱ्याच्या अंगावरच जशीं खेकसतात–कावतात, तशीं सनातनी विचाराचीं माणसें आगरकरांवर रागावत–गागावत–धमकावत. पण आगरकर रणशूराच्या धैर्यानें म्हणत, "कोण स्वस्थ बसणार ? सुधारक अं ? टाकांतून अर्थबोधक अक्षरें काढण्याचे सामर्थ्य असेल व तीं वाचण्यास निदान एक इसम तयार असेल, तोंपर्यंत तरी हें स्त्रैण कर्म "सुधारका"ला स्पर्श करूं शकणार नाहीं." अशा प्रतिज्ञेनें रसरसलेले लेखांमागून लेख आगरकर "सुधारकांत" लिहीत होते.

सामाजिक सुधारणांना विरोध करणाऱ्या हिंदु लोकांनी पूर्वी निमूटपणें अन्याय सोसले, याची आठवण देतांना आगरकर त्वेषानें लिहितात की,

"भेकड व प्रतिष्ठाखोर हिंदु लोकांनो, ज्या वेळेस पोर्तुगीज लोकांनीं ख्रिस्ती धर्म स्थापण्यासाठीं कोंकणपट्टींत तुमचे अनान्वित हाल केले, त्या वेळेस तुमचा धर्माभिमान कोठें गेला होता ? विषयलंपट, निःशक्त, वाचाळ बाबूंनो, जेव्हां महंमदीयांनीं हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंका-पर्यंत साऱ्या हिंदु लोकांस आपल्या धर्मवेडानें जर्जर करून सोडलें व तुम्हां हिंदूंच्या मानांवर असिधारा ठेवून, तुम्हांकडून तुमच्या शेंड्या काढविल्या आणि तुम्हांस गोमांस चारिलें, तेव्हां तुमच्या धर्मरक्षणासाठीं आतांप्रमाणें तुम्हीं नुसता आरडा तरी करावयाचा होता ! धिक्कार असो तुम्हांला, तुमच्या धर्माला आणि तुमच्या हक्काला !"

## रूढीचा अत्याचार

"बाल-विवाहाला बंदी ! पुनर्विवाहासाठीं अट्टाहास ! विधवांच्या

केश-वपनासाठीं टाहो !–हे कसले विषय ? ” असें आजचा एकादा पुरोगामी तरुण खांदे उडवीत म्हणेल ! पण या एकेक रूढि म्हणजे शेंकडो वर्षांचा एकएक किल्ला होता तो एकेक किल्ला सर करणें हेंच तेव्हांच्या सुधारकांचें कर्तव्य होतें. १८२९ सालीं सती जाण्याची चाल सरकारानें बंद केली आणि १८५६ सालीं विधवा-विवाहाचा कायदा केला. तरी लोकमत कोठें अनुकूल होतें ? विष्णुशास्त्री पंडितांनीं १८७४ सालीं विधवा-विवाह केला. त्यांना आपल्या घरीं जेवावयास न्या. रानडे यांनीं बोलावलें, यामुळें न्यायमूर्तींचे वडील घर सोडून परगांवीं जाण्यास निघाले. न्यायमूर्तींच्या बहिणीच्या सासरकडील मंडळींनीं त्यांची व बहिणीची ताटातूट केली. ठरलेलीं लग्नेंहि मोडलीं. फार काय, ब्राह्मण नोकरांनींहि न्यायमूर्तींवर बहिष्कार टाकला. माणुसकीची अशी विटंबना या महाराष्ट्रांत शंभर वर्षांपूर्वी होत होती हें कोणास खरें वाटेल ? पण खरी परिस्थिति याहूनहि भीषण होती.

“ आंब्याच्या झाडाचा बुंधा करून एक ढोली तयार करा. तिच्यांत या बालविधवेला बसवा. बाहेरून गवत-पाचोळा पेटवा. आणि बरीच धग लागल्यावर तिला बाहेर काढा. नंतर तिचें वपन करा आणि शेवटीं सहस्र ब्राह्मणांना जेवण घाला.” असा शास्त्रार्थ शंकराचार्यांनीं नगर येथें १८५४ सालीं सांगितला. जोन ऑफ आर्कसारख्या कोंवळ्या मुलीला चिता पेटवून जिवंतपणें जाळणाऱ्या इंग्रज लोकांच्या निर्घृणतेला आम्ही कां हंसावें ? आमची उदार संस्कृति, आमचा सहिष्णु धर्म आणि आमची सात्विक मायभूमि यांची शीतळ छाया स्त्रियांना आणि अस्पृश्यांना कधींच लाभत नव्हती.

शंकराचार्यांनीं कांहीं विधवांना वपनाची आज्ञा दिली. त्यांनीं ती जुमानला नाहीं. तेव्हां शंकराचार्यांनीं नगरांतील कांहीं न्हाव्यांना बोलावून आज्ञा केली, “ या बायांच्या मुसक्या बांधून त्यांचा केशभार उतरून टाका.” विधवांनीं खडखडीत जबाब दिला, “ ही मोगलाई नाही, जुलूम जबरदस्ती कराल तर आम्ही फौजदारांकडे दाद मागूं. मग आपणांस येथून धडपणें बाहेरहि जातां येणार नाहीं.” नवयुगाचे हे पहिले किरण डोळ्यांवर पडतांच शंकराचार्य गांगरले. विधवांवर बहिष्कार टाकून ते स्वस्थ राहिले.

## अडाण्यांचें शहाणपण

खुद्द आगरकरांच्या तिन्ही मावश्या बालविधवाच होत्या. धर्माच्या नांवाखालीं चाललेले हे अमानुष प्रकार पाहून आगरकरांच्या अंगाची लाही लाही होत असे. आंतडें पिळवटून ते लिहितात, "हे दयार्द्र ब्राह्मणांनों, ग्यासें तुमचें प्रेम ! खासी तुमची दया ! ! आणि ग्वासा तुमचा न्याय ! ! ! जिवंतपणीं बायकोचें दुसऱ्याशीं बोलणें किंवा दुसऱ्याकडे पहाणें हेंदेखील ज्याला फारसें खपत नाहीं, त्याला आपल्या पाठीमागें आपल्या बायकोस आणि न्हाव्यास कोणी तरी एका खोलींत कोंडून घालून, ती गाईप्रमाणें हंबरडा फोडीत असतां, व आपणांकडून होईल तेवढा प्रतिकार करीत असतां तिच्या अंगास स्पर्श करून तिचे केस वस्तऱ्यानें उतरूं द्यावे यांत कांहींच वाटूं नये, हें खऱ्या स्त्रीप्रेमाचें चिन्ह नव्हे."

शहाण्यांचें हें वेडेंपण, पांढरपेशांचें हें काळें कृत्य, धर्ममार्तंडांचें हें अधर्माचरण बंद पाडण्यासाठीं खुद्द न्हावीलोकच माणुसकीच्या भावनेनें, स्वतःचें नुकसान होत असतांनाहि, पुढें झाले. ता. १४ एप्रिल १८८८ सालीं मुंबई येथें चारपांचशें न्हाव्यांची सभा भरली व विधवांचें वपन करूं नये असा ठराव संमत झाला. अडाण्यांचें हें शहाणपण, मागासलेल्यांचें हें पुढारलेंपण इंग्लंडपर्यंत जाऊन पोहोंचलें. कांहीं इंग्रज स्त्रियांनीं मुंबईच्या न्हाव्यांनीं हें सदय कार्य हातीं घेतल्याबद्दल अभिनंदनाचें पत्र पाठविलें. अजूनसुद्धां ही अमानुष चाल पूर्णपणें बंद पडली आहे असें म्हणतां येत नाहीं.

## शब्दांची टांकसाळ

त्यावेळीं असे नवे विचार मांडण्यास भाषेची पहिली अडचण येत असे. राजकीय किंवा सामाजिक नव्या नव्या कल्पना व्यक्त करण्यासाठीं जरूर ती शब्दसंपत्ति मराठींत त्यावेळीं नव्हती—आजहि पुरेशी नाहीं. ती निर्माण करण्याचें मोठें श्रेय आगरकर–टिळक या "एडिटोरिअल प्रोफेसर्स" किंवा "प्रोफेसोरिअल एडिटर्स" यांना आहे आर्टिकल, बँक, कौन्सिल वगैरे शब्द इंग्रजींतून जसेच्या तसे त्यावेळीं मराठींत वापरले जात.

कांहीं अंशीं विनोदानें "सरमन्", "व्हाल्मे", "फाईलें", "रेव्हरंडे" वगैरे शब्दहि दत्तक घेतले जात. पण मुख्य कटाक्ष असे, तो इंग्रजी शब्दांच्या अर्थाचा वाहक असा मराठींत प्रतिशब्द बनविण्यावर. अंतःकरणांत नव-शब्दनिर्मितीची उसळी पण वरून भाषानियमांचें दडपण, या दोहोंच्या मध्यें सांपडूनच शब्द–हीरक तयार होत असतात. Order and Progress ( स्थिति आणि प्रगति ), Divide and rule ( दुही माजवा व राज्य करा ) अशा शब्दसमूहांनादेखील त्यावेळीं मराठी प्रतिशब्द तयार झालेले नव्हते. ते आगरकरांनीं आपल्या टांकसाळींत पाडले. त्या टांकसाळींतील सारींच नाणीं आज चलनांत आहेत असें म्हणतां येणार नाहीं. पण त्यानीं हेतुपुरस्सर प्रयत्न केला, हें कृतज्ञतेनें आज आठवावयास हवें. लोकशिक्षण ( Public Education ) मृताक्षर ( Dead letter ) उत्क्रांति (Evolution ) इत्यादि अनेक शब्द आगरकरांनीं घडविले.

## अलंकारांचा डौल

उपमादि अलंकार आपल्या भाषासुंदरीवर चढविण्यांत आगरकर कधीहि कसूर करीत नसत. एकाद्या गायकाला शोक झाला तरी तोदेखील ताला-सुरांत प्रकट व्हावयाचा, तसें आगरकरांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील तापदायक मतभेदाचें व कलहांचें वर्णन पुढील सर्वांगीण रूपकानें वर्णिलेलें आहे, "खलाशी आपआपसांत तंटा करूं लागतील तर त्यांच्या हातांत असलेलें तारूं कधींहि नीट चालावयाचें नाहीं; पण त्यांच्यांत सख्य असूनहि त्या सर्वांची, विशेषतः त्यांतील तांडेलादि अधिकाऱ्यांची, डोक्यावर नीट नजर नसेल तर त्यावर येणाऱ्या दुर्घट संकटापासून त्याचा निभाव लागणार नाहीं. डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या जहाजावर नोकरीस रहाणारा प्रत्येक खलाशी व अधिकारी संसारदिशादर्शक होक्याच्या ज्ञान आणि नीति या दोन कांट्यांवर सारखी नजर ठेवून आपलें कर्तव्य करील तर त्याला हवें तसलें वादळ व खडक चुकवितां येऊन इष्ट बंदरीं आपलें तारूं सुखरूपपणें नेऊन लावतां येईल !"

"वृद्ध हें समाजनौकेचें भरताड होत, तरुण शिडें होत ! पहिल्याशिवाय समाजांत स्थिरता राहाणार नाहीं आणि दुसऱ्याशिवाय त्याला गति येणार

नाहीं." असली अलंकारांनी नटलेलीं वाक्यें आगरकर भराभर फेकीत जातात. "तारवास जसें सुकाणूं, समुद्रपर्यटन करणारास जसें दिङ्गति-निर्णायक यंत्र, सुवर्णकारास जशी निकष-शिला, अंधास जशी यष्टी व इमारतीस जसा पाया तशी सामाजिक रचनेस, व्यवस्थेस व स्थित्यंतरास हीं तत्त्वें आहेत." अशा अलंकारांची रासच्या रास ते उभी करतात. खऱ्या सुधारकाला सुधारणेचा किती हव्यास असतो हें पटविण्यासाठीं त्यांनीं पुढील रूपकांची पुष्पमाला गुंफली आहे. "समुद्राला नद्यांचा, चितेला प्रेतांचा, लोभ्याला द्रव्याचा, दुर्वासाला अन्नाचा, कर्णाला दानाचा व धर्माला शांतीचा." "जात करणें म्हणजे कां चिखलाचें पार्थिव करून दोन घटकांनीं फेंकून देणें, कीं नदीला गढूळ पाणी आलें असतां, तिच्या कांठावर वाळूंत झरा उकरणें, का उन्हाळ्यासाठीं घरापुढलें अंगण खणून सारवून स्वच्छ करणें, का चार दिवसांच्या उत्सवासाठीं लव्हाळ्यानें आच्छादिलेला मंडप घालणें कीं आहे तरी काय ?" असें ते विचारतात.

माळ म्हटली कीं तींत कांहीं फुलें सुगंधी तर कांहीं गंधहीन—आणि फुलांपेक्षां हिरव्या पानांचीच गर्दी जास्त, असें घडणें स्वाभाविक असतें. त्यांतहि वर्तमानपत्राची साप्ताहिक भट्टी घाईघाईनें ज्याला चालवावयाची आहे, त्याच्या लेखनांत तोल, औचित्य व संयम राहणें फार कठिण असतें.

## सुधारकांचें बिकट कार्य

समाजाकडे आगरकर कोणत्या दृष्टीनें पहात होते ? तर "देशांतील विचारी लोक हे कल्पक सुवर्णकार होत व समाज हा त्यांच्या हातीं दिलेला पैलूदार खडा होय. या खड्यावर सरकारी साहाय्य, स्वतःचा प्रयत्न वगैरे हत्यारांनीं काम करून ते त्यास मोहकपणा आणितात. ज्या कामास ज्या वेळीं जें हत्यार पाहिजे असेल तें घेतलें पाहिजे."

अशा समाजामध्यें जुने विचार काढून नवीन विचार घालणें किती अवघड आहे, या आपल्या अंगीकृत कार्यांतील अनुभव निवेदन करतांना आगरकर म्हणतात, "खच्चून भरलेल्या व सुतळीनें तोंड शिवलेल्या पोत्यांचे दोन तीन टांके तोडून त्यांतलि दोन पायली धान्य बाहेर काढल्याशिवाय ज्याप्रमाणें त्यांत नवीन धान्य सांठविणें शक्य नसतें, त्याप्रमाणें वेड्या-

वांकड्या विचारांनीं ज्याच्या मनांतील तिळनतिळ जागा व्यापून टाकली आहे, त्याच्या मनांतील वंतनदार होऊन बसलेल्या कांहीं विचारांस हुसकून लावल्याशिवाय तेथें नवीन विचारांची डाळ मुळींच शिजत नाहीं !"

सनातनी समाज सत्याच्या सूर्यापुढें जाण्यास कसा भितो हें सांगण्यासाठीं आगरकरांनीं पुढील दोन मार्मिक दाखले दिले आहेत.

"एखाद्या दिवाळखोर कर्जबाजाऱ्यास ज्याप्रमाणें आपल्या प्राप्तीचा आंकडा आपल्या खर्चाच्या आंकड्याशीं ताडून पाहण्याचें धैर्य होत नाहीं, किंवा ज्यांची जीविताशा फार प्रबळ झाली आहे त्यांना आपल्या रोगाची चिकित्सा सुप्रसिद्ध भिषग्वर्याकडून करवत नाहीं, त्याप्रमाणें श्रद्धाळु धार्मिकास आपल्या धर्म–समजुती व त्यांवर अवलंबणारे आचार यांस बुद्धिवादाच्या प्रखर मुशींत घालण्याची छाती होत नाहीं."

## शास्त्रीय चिकित्सा

त्यांची बुद्धि चिकित्सक असल्यानें वर्गीकरण करून आपलें विवेचन ते मुद्देसूत करीत. त्याचीं दोन उदाहरणें पहाः—

"विचार करणारे, उपभोग घेणारे व काम करणारे असे जे सांप्रतकाळीं प्रत्येक देशांत तीन ठळक वर्ग दृष्टीस पडतात, ते कायमचे नव्हत. हळूहळू प्रत्येक व्यक्तीस विचार, उपभोग आणि काम हीं सम प्रमाणानें करावीं लागून, साऱ्यांच्या सुखानुभवाची इयत्ता सारखी होत जाणार आहे; व जों जों ती तशी होत जाईल तों तों खरी उन्नति होऊं लागेल"

"केवळ नियामक उद्योग करणारांची संख्या अगदीं अल्प असून, थोडासा नियामक व पुष्कळ उत्पादक उद्योग करणारांची मोठी संख्या ज्या देशांत असते, तो विशेष सुखी असतो. अंमलदार वाजवीपेक्षा अधिक झाल्यानें उत्पादक रयतेचें दोन प्रकारांनीं नुकसान होतें. एक त्यांच्या पगारासाठीं तिला आपल्या प्राप्तीचा बराच वांटा द्यावा लागतो. दुसरें, त्यांच्या जुलुमामुळें केलेलें उत्पन्न आपल्या हातीं लागेल किंवा नाहीं अशाविषयीं तिला संशय येऊं लागतो, व या दोन कारणांमुळें उत्पन्न करण्याची इच्छा मंदावते आणि तसें झालें म्हणजे सर्वांचेंच नुकसान होतें. हाच परिणाम सरकारी अंमलदाराशिवाय इतर प्रकारचे अनुत्पादक लोक

वाढल्यानेंहि होतो. फाजील धर्माधिकारी, फाजील नीतिप्रसारक, फाजील शिल्लक फाजील अडते, फाजील लेखक ( पत्रकर्ते, पुस्तककर्ते वगैरे ) फाजील वकील, फाजील राज्यकारस्थानी, या सर्वांच्या फाजीलपणांत म्हणजे त्यांची वाजवीपेक्षां संख्या ज्यास्त होण्यांत कष्टाळू रयतेचा फार तोटा आहे. ”

## संगमरवरी राजवाडा

चिपळूणकर, केळकर किंवा परांजपे यांच्याप्रमाणें आपल्या वाङ्मयाची मूर्ति कलाकुसरीनें सावकाश व बारकाईनें घडविण्याइतकी फुरसत व स्वस्थता आगरकरांना फारशी लाभली नाहीं. देहांत दमा, कार्यांत कलह आणि समाजाचा ससेमिरा—अशा भुंग्यांनीं पोखरलेले असूनहि आगरकर उत्साही, आनंदी व विनोदीहि असत. त्या त्यांच्या उत्साहाचें, आनंदाचे व विनोदाचें प्रतिबिंब त्यांच्या साहित्यसृष्टीत मधूनमधून पडलेलें आढळतें. त्यामुळें संध्याकाळीं सूर्याचे सोनेरी किरण पडल्यामुळें शोभिवंत दिसणाऱ्या संगमरवरी राजवाड्याची चारुता आगरकरांच्या साहित्यसृष्टीला लाभलेली आहे. “ इंग्रजी राज्याची उलट बाजू ” या लेखांत त्यांनीं केलेलें मुंबा-पुरीचें भरघोस वर्णन “ रागिणी”सारख्या कादंबरीलाहि सहज साधणारें आहे. त्यांतील कांही भाग पहाः—

“ मुंबई शहराचा अफाट विस्तार; राजवाड्यांच्या तोडीच्या तेथील मोठमोठ्या खाजगी व सरकारी हवेल्या,...आपआपल्या कामावर जाणाऱ्या सरकारी व खाजगी नोकरांची, घड्याळाकडे पहात, कमी अधिक होणारी घाईची चाल,...गिरण्यांच्या चिमण्यांतून निघणाऱ्या काळ्या धुराचे लोळ आणि इमारतीच्या उदरांत चाललेली मोठमोठ्या यंत्रांची गडबड...संध्या-काळच्या सुमारास विजेच्या दिव्यांचा, ग्यासच्या दिव्यांचा, व साध्या दिव्यांचा जिकडे तिकडे लखलखाट, सर्व दिवसभर नभाचें आक्रमण करून भागलेला रवि पश्चिम समुद्रांत स्नान करण्यासाठीं क्षितिजावर येऊन ठेपला असतां, समुद्राच्या कांठीं त्याच्या समांतर किरणांत हवा खाण्यास व सहल करण्यास गाड्यांतून, घोड्यावरून व पायांनीं जातयेत असलेलीं हरएक जातीचीं व पदवीचीं सडीं किंवा सवत्स स्त्रीपुरुषें, अनेक कारणास्तव, अनेक

देशांतून आलेल्या अनेक प्रकारचे पेहराव करणाऱ्या, अनेक पद्धतींच्या लोकांचे जागोजाग दृष्टीस पडणारे थवे....... ”

## सुधारणेच्या मर्यादा

‘ सुधारकाच्या ’ पहिल्याच अंकांत आगरकरांनीं हिंदुस्थानच्या इतिहासाचा जो बहुरंगी चित्रपट विणला आहे, तो कोणाचेहि नेत्र व चित्त वेधून घेणाराच आहे. आमचें जीवन खुंटलेलें आहे—लाकडासारखें किंवा हाडकासारखें निर्जीव झालेलें आहे, त्याची टसटशीत जाणीव देऊन त्या “ शिलावस्थें”तून बाहेर पडण्याचा मार्ग आगरकरांनीं पहिल्याच लेखांत सांगितला आहे. तो असा—“ मूळ प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व न सोडतां पाश्चिमात्य नवीन शिक्षणाचा व त्याबरोबर ज्या नवीन कल्पना येत आहेत त्यांचा आम्ही योग्य रीतीनें अंगीकार करीत गेलों, तरच आमचा निभाव लागणार आहे. ” “ तुमचें ध्येय काय ? ” असा प्रश्न कोणी केला, तर आगरकर उत्तर देत “ मनुष्यतेचें ऐहिक सुखवर्धन. ” देव, परलोक, भुतेंखेतें, श्राद्ध, जातिभेद सोवळेंओवळें, अदृष्ट-इत्यादि साऱ्या कल्पना झूट आहेत असें आगरकरांना वाटे. मानव–जातीचें इहलोकचें कल्याण साधावें आणि त्यासाठीं भौतिक ज्ञानाचा व बुद्धिवादाचा प्रसार करावा असें त्यांचें जीवित–ध्येय होतें. तें त्यांनी आपल्या तळमळीच्या शब्दांनीं व्यक्त केलें आहे. ते म्हणतात, “ स्वभूमींत, स्वलोकांत स्वधर्मांत आणि स्वाचारांत राहून, अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छळास न भितां, त्यांच्याशीं कधीं भांडून, कधीं लाडीगोडी लावून, अथवा सामर्थ्य असल्यास कधीं त्यांना दटावून त्यांची सुधारणा करणें यांतच खरी देशप्रीति,खरी बंधुता,खरा देशाभिमान,खरें शहाणपण व खरा पुरुषार्थ आहे.”

## भाषेंतील आवेश

आवेश व ओज हे गुण तर आगरकरांच्या लेखनांत प्राणवायुसारखे सदैव संचरत आहेत. शनिवारवाड्यापुढील उच्च व्यासपीठावरच जणु कांहीं उभे राहून समोर बसलेल्या सहस्रावधि स्त्रीपुरुषांना उद्देशून एकादें जाहीर भाषण ते तळमळीनें करीत आहेत असा भास त्यांचे लेख वाचतांना होतो.

'बांधवहो!' अशीं संबोधनें ते मधूनमधून योजतात आणि 'यामुळें होतें काय कीं', 'तात्पर्य काय कीं', 'म्हणजे काय कीं', 'तेव्हां लक्ष्यांत काय गोष्ट ठेवावयाची की'—असे सहज बोलण्याचे वाक्प्रचार पुष्कळच आढळतात. लेखांचीं नांवेंहि 'हिंदुस्थान देश ठार बुडाला हो ठार बुडाला!' अशी आवेशपूर्ण आहेत. 'रास्त गोष्टींस भितो कोण?' किंवा 'होऊं द्या तर दोन हात' या लढाऊ मथळ्यावरून आगरकरांची निर्भय वृत्ति ध्यानीं येते.

## अंतःकरणाची कोमलता

वीराप्रमाणेंच करुणरसहि त्यांच्या लेखनांत मधून मधून आढळतो. समाजांतील दुष्ट रूढीमुळें अडाणी स्त्री-पुरुषांचे जे अनन्वित हाल होतात ते पाहून त्यांचें अंतःकरण पिळवटून जात असे. खुंट्या पिळलेल्या सतारीतून जसे बोल निघावेत, त्याप्रमाणें त्या पिळवटलेल्या अंतःकरणांतून आर्त उद्‌गार बाहेर पडत. बालवधूंची, विधवांची, अस्पृश्यांची अनुकंपनीय स्थिति आगरकर मोठ्या हळुवारपणें रेखाटीत. त्यांतहि विधवांच्या केशवपनासारख्या राक्षसी रूढीचे शोचनीय परिणाम वर्णिताना त्यांच्या लेखणींतून करुणरस पाझरत असे. प्रो. केरूनाना छत्रे किंवा प्रिं. वामनराव आपटे यांचे मृत्युलेख लिहितांना तर त्यांच्या कोमल अंतःकरणात कारुण्याच्या ऊर्मिच उसळत होत्या असें दिसतें. स्वतःसंबंधीं मधूनमधून त्यांनीं काढलेले प्रांजळ उद्‌गार हे तर वाचकांच्या अंतःकरणाची कालवाकालव करणारेच आहेत. "महाराष्ट्रीयास अनावृत पत्र" या लेखांत त्यांनी आपलें निष्कलुषित अंतःकरण जणू फाडूनच दाखविलें आहे! एखाद्या कांचेच्या कपाटांत मानवी शरीराचा सांगाडा ठेवतात. तसें या लेखाच्या तावदानी पेटींत आगरकरांचें सरळ व कोमल हृदयच ठेवलेलें दिसतें.

## प्रांजळ मनोवृत्ति

वज्रासारख्या कठोर अशा ह्या ध्येयवादी व सत्यनिष्ठ महात्म्याचें मन फुलाप्रमाणें कोमल होतें. त्यांनीं लिहिलेल्या या "अनावृत पत्रांत" ते आर्जवाच्या व अजिजीच्या भाषेंत कळवळून लिहितात, "ज्याला व ज्याच्या निरपराधी स्त्रीला शिव्यांचा व शापांचा प्रचंड भडिमार एक-

सारखा सोसावा लागत आहे आणि अत्यंत ममताळू व पूज्य आप्तांचाहि दीर्घ रोष ज्यानें आपणांवर करून घेतला आहे—अशा मनुष्याच्या लेखांत कितीहि प्रमाद होत असले व केवढीहि कटुता असली, तरी ते समंजस मनुष्याच्या स्वल्प आदरास, निदान थोड्याशा अनुकंपेस तरी पात्र झाले पाहिजेत." किती प्रांजल हें मन! किती नम्र ही वृत्ति!! ती पाहून कोणाहि सहृदय माणसास गहिंवर आल्याशिवाय रहाणार नाहीं. आपल्या डोळ्यांतील कृतज्ञतेचे अश्रु तसेच ठेवून तो आगरकरांना असें आश्वासन देईल कीं, "अहो, थोडीशी अनुकंपाच काय पण आदरभाव–आणि तोहि अपार आदरभाव–आमच्या चित्तांत आपल्याबद्दल सांठविलेला आहे. आपल्याला शतशः प्रणाम!!"





## प्रा. परांजपे . : : : १

कांहीं कवि देशभक्त असतात तर कांहीं देशभक्त कवि असतात, पण देशभक्ति व काव्यशक्ति ह्यांचा उत्कर्ष ज्यांमध्यें झाला अशीं माणसें विरळा. अशा विरळ विभूतींपैकीं प्रा. शिवरामपंत परांजपे हे होत. " विद्वत्तेच्या अंकावरतीं देशभक्ति खेळते." हें वर्णन ज्या थोड्या महाराष्ट्रीयांस शोभून दिसते, त्यांपैकी शिवरामपंत हे एक होत. विद्वत्त्व व कवित्त्व ह्यांच्यामध्यें छत्तिसाचा आंकडा असतो असें म्हणतात; पण शिवरामपंतांच्या साहित्यांत हे दोन्ही गुण मित्राप्रमाणें हातांत हात घालून चाललेले दिसतात. आणि त्या दोन्ही गुणांचा प्राण आहे एकच--व तो म्हणजे प्रखर स्वातंत्र्यलालसा. विद्वत्ता, कवित्त्व व राष्ट्रप्रेम या गुणांचा त्रिवेणी-संगम शिवरामपंतांच्या साहित्यांत झालेला आहे.

## स्वातंत्र्याचीं स्तोत्रें

" हे लेख म्हणजे स्वतंत्रतेच्या अमृताचे झरे आहेत. स्वतंत्रता–देवीचीं मंदिरें आहेत, स्वातंत्र्य-लक्ष्मीचीं तीं पावन स्तोत्रें आहेत." अशी प्रशंसा शिवरामपंतांनीं इटालीचा देशभक्त मॅझिनी ह्याच्या लेखांची केलेली आहे. त्याच शब्दांनीं कोणा मराठी लेखकाची प्रशंसा करणें शक्य असेल, तर तो लेखक म्हणजे शिवरामपंत परांजपे हेच होत ! " अंगांत स्वातंत्र्याचा संचार करून देणारे महामंत्र " असे प्रतिभेनें बहरलेले व स्वातंत्र्य-प्रेमानें रसरसणारे सुमारें एक सहस्र लेख शिवरामपंतांनीं लिहिले.

## शिवरायाची स्फूर्ति

काव्य–देवता व स्वातंत्र्य–देवता ह्या उभयतांचे वरदहस्त आपल्या शिरावर घेऊनच शिवराम महादेव परांजपे ता. २७ जून १८६४ रोजीं जन्मास आले. रत्नागिरी जिल्ह्यांतील महाड हें त्यांचे गांव ! वडिलांना तीन रुपये पगाराची नोकरी; पुढें वकिलीचा अभ्यास त्यांनीं केला. चित्रकला व मूर्तिकला यांची वडिलांना आवड. शिवरामपंतांचें बालपण गरिबीच्या खोपटांत गेलेलें. पण शिवरायाचा रायगड त्यांच्या हृदयांत देशप्रेमाची दौलत उधळून देत होता. " मराठीच्या शिवाजी"चाहि सहवास त्यांना लहानपणीं घडला. १८७८ सालीं ते रत्नागिरी येथील हायस्कुलांत गेले. त्यावेळीं तेथें विष्णुशास्त्री चिपळूणकर शिक्षक होते व शिक्षक राहून " निबंधमाला " चालवीत होते. पुढें शास्त्रीबुवांनी सरकारी नोकरीची रुपेरी बेडी ताडकन तोडली आणि ते पुण्यास गेले. तेव्हां त्यांच्या पाठोपाठ जे विद्यार्थी रत्नागिरीहून पुण्यास गेले, त्यांपैकी शिवरामपंत हे एक होत. मॅट्रिकच्या परीक्षेनें त्यांना एकदां अपयशाचा तडाखा दिला. पण त्याचा वचपा त्यांनीं पुढील वर्षीं भरून काढला. १८८४ सालीं ते मॅट्रिक झाले—संस्कृतांतील " जगन्नाथ शंकर शेट" ही बहुमानाची शिष्यवृत्ति पटकावून त्या परिक्षेंत उत्तीर्ण झाले.

## लो. टिळकांचें शिष्यत्व

बालपणीं जसा शिवरायाचा संस्कार त्यांच्या भावनांवर घडला, माला-

कारांचा प्रभाव जसा बुद्धीवर पडला, तसा हायस्कूलमध्यें शिक्षण घेत असतांना टिळक-आगरकरांच्या त्यागाचा व ध्येयवादाचा ठसा त्यांच्या मनावर उमटला. कॉलेजचें पहिलें वर्ष त्यांनीं फर्ग्युसनमध्यें काढलें. पण पुढें ते डेक्कन कॉलेजमध्यें गेले. तेथें संस्कृत व इंग्रजी ह्या भाषांतील काव्यांचें आकंठ पान त्यांनीं केलें. स्वतः काव्यहि ते रचीत. १८९० सालीं ते बी. ए. झाले आणि "दक्षिणा फेलो" त्यांना नेमण्यांत आलें. 'भामिनी-विलास' ह्या ग्रंथाचें भाषांतर त्यांनीं केलें. १८९५ सालीं ते एम्. ए. झाले—"झाला" वेदान्त पारितोषिक संपादन करून त्यांनीं शिक्षणाचें शिखर गांठलें. ह्या पारितोषिकाचे ९०० रु. त्यांना मिळाले. ते सर्व त्यांनी आपल्या आईच्या चरणीं वाहिले. त्यांची मातृभक्ति निःसीम होती. पण मातेचें अंत्यदर्शन त्यांना अंतरलें. त्यांच्या परीक्षेतील यशामुळें प्रोफेसरीची नोकरी त्यांच्याकडे चालत आली. १८९६ सालीं ते 'महाराष्ट्र कॉलेजात' प्राध्यापक म्हणून काम करूं लागले.

## लोकसेवेचा श्रीगणेशा

लो. टिळकांच्या मार्गानेंच परांजपे जात होते. 'सार्वजनिक सभेचे' चिटणीस म्हणून ते काम करूं लागले. रायगडावरील शिवाजी-उत्सवांत आणि पुण्यांतील गणेशोत्सवांत त्यांचीं भाषणें गाजूं लागलीं. लो. टिळकांनी सुरू केलेल्या ह्या दोन्ही उत्सवांत भाग घेऊन ते जनता-जागृति करूं लागले. देशभक्ति व प्रोफेसरी दोन्ही संभाळणें कठीण आहे असें दिसतांच त्यांनीं प्रोफेसरीचा पाश झुगारून दिला. 'सार्वजनिक सभे'तर्फे ठाणें-अलिबाग जिल्ह्यांत दुष्काळी जनतेला मदत करण्यासाठीं ते हिंडूं लागले. त्यांतूनच त्यांची 'खडी फोडणाराची गोष्ट' निघाली. इंग्रजांचें राज्यच येथून हाकललें पाहिजे आणि संपूर्ण स्वातंत्र्य आपण मिळविलें पाहिजे असे विचार त्यांच्या अंतःकरणांत पेटूं लागले; आणि ते विचार प्रगट करण्यासाठी त्यांनीं एक लखलखीत साधनहि निर्माण केलें. तें म्हणजे 'काळ" हें साप्ताहिक ! ता. २५ मार्च १८९८ रोजीं पाडव्याच्या मुहूर्तावर "काळ" पत्राचा पहिला अंक निघाला आणि महाराष्ट्राच्या तरुण हृदयांतून विजेचा संचार होऊं लागला.

दर शुक्रवारीं ताजा ' काळ ' घेण्यासाठीं उत्सुक वाचकांच्या रांगा कचेरी-पाशीं पहाटेपासून लागू लागल्या.

## ' काळा 'ची लोकप्रियता

" लोकांत दृढमूल व रूढ झालेल्या कित्येक राजकीय कल्पनांच्या उच्छेदनासाठींच ' काळ 'चा जन्म आहे. " अशी रोखठोक प्रतिज्ञा ' काळ ' कर्त्यांनीं जाहीर केली. " लोकांचे खरे विचार आम्ही खऱ्या शब्दांनीं लिहितों " असें " काळ " कर्ते बजावून सांगतात. प्रौढ भाषा, तेजस्वी विचार, काव्यमय शैली व स्वातंत्र्याचा निर्भय पुरस्कार ह्या गुणां-मुळें ' काळ ' पत्र झपाट्यानें लोकप्रिय झालें—तरुणांच्या उड्या त्यावर पडत. स्वातंत्र्यवीर सावरकरांसारख्या युवकांना तर ' काळा'पासूनच स्फूर्ति मिळाली. त्यांच्याच काय पण " तीन पिढ्यांच्या राजकीय जीवनां-वर क्रान्तिकारक ठसा " उमटविण्याची कामगिरी ' काळा''नें केली अशी साक्ष बॅ. सावरकर देतात. प्रारंभीं ' काळा'चे वर्गणीदार ६०० होते, ते सहा वर्षांत १२ हजार झाले आणि १९०८सालीं तर तो आंकडा २२ हजारांवर गेला.

## जिवंतपणीं मृत्यु !

लोकमान्यांचा 'केसरी' व शिवरामपंतांचा 'काळ' ह्या गुरु-शिष्यांच्या वृत्तपत्रांची जणूं शर्यतच लागली होती. आकाशांतील गुरु-शुक्राच्या युतीचेंच तेज त्या वेळीं महाराष्ट्रांत पसरत होतें. टिळकांच्या लेखनाला व्यावहारिक विचारांची मर्यादा पडे; पण शिवरामपंतांच्या कल्पनेला अंतरिक्षापर्यंत उड्डाण करण्यास मोकळीक ! सशस्त्र क्रान्तीचाही पुरस्कार ते पर्यायानें करीत. गुप्त-मंडळ्या स्थापून, बॉंब–पिस्तुलें जमवून, स्वराज्यप्राप्तीसाठीं कट करण्याची ज्वलंत प्रेरणा ते आपल्या लेखांतून देत. सरकारच्या अन्यायावर ते आपलें वक्रोक्तीचें वज्र चालवीत. कधीं पौराणिक दाखले देऊन तर कधीं उपरो-धिक भाषा वापरून, ते सरकारच्या अंगाची लाही लाही करण्यासारखी टीका करीत. त्यांचें ' काळ ' पत्र सरकारच्या डोळ्यांत सलूं लागलें,

डोक्यांत भ्रमूं लागलें, हृदयांत खुपूं लागलें आणि म्हणून १९१० सालीं सरकारनें तें बंद पाडलें—" काळांतील निवडक निबंधांचीं " पुस्तकें त्यांनी जप्त केलीं. त्यावेळीं आपल्याला किती दारुण दुःख झालें हें शिवरामपंत पुढील शब्दांनीं सांगतात, " देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा देऊनसुद्धां मला जितका धक्का बसला नसता, तितका सरकारनें माझा प्रतिप्राण असणारें दहा वर्षांतलें वाङ्मय जप्त करून दिला व हाच माझा तरुणपणचा जिवंत मृत्यु होय ! ! "

## वाणीचा विलास

वाळल्या गवताच्या गंजीमागून गंजी पेटवीत जावें, त्याप्रमाणें शिवरामपंत लोकांचीं मनें परक्या सरकारविरुद्ध धडाडून पेटवीत होते. त्या कामीं त्यांना त्यांच्या लेखणीइतकाच त्यांच्या वाणीचाहि उपयोग होत असे. " हजारांत एक " ( वक्ता दशसहस्रेषु ) शोभावा असा तो " बडा वक्ता " होता. मोहक मुद्रा, मधुर स्वर, मनाजिंकी भाषाशैली, प्रसन्न प्रतिभा आणि जळजळीत स्वातंत्र्यलालसा ह्या गुणांमुळें त्यांचें भाषण श्रोतृवर्गाला मोहित करी, अंकित करी, देहभान विसरावयास लावी. दोन-दोन, तीन-तीन तास ते आपल्या व्याख्यानाच्या विमानांतून श्रोत्यांना उंचउंच आकाशांतून हिंडवून आणत. खरोखर त्यांच्या जिव्हाग्रावर देवी सरस्वतीच नृत्य करीत असे. त्यांच्या आवाजाच्या चढ-उताराबरोबर श्रोत्यांचीं हृदयें वर-खालीं होत असत आणि आवाजाच्या कंपाबरोबर तीं कंपित होत. ते अभिनय असा फारसा करीत नसत. पण भाषणाच्या शेवटीं शेवटीं ते आपलें बोट वरवर नेत आणि त्यासरशीं श्रोत्यांचीं अंतःकरणेंहि वरवर जात. आपण व्याख्यान ऐकत आहोंत ह्याचें मुळीं भानच श्रोत्यांना न रहावें, इतके ते त्यांना मंत्रमुग्ध ( मेस्मेराईज् ) करीत. कांहीं काळ तर त्यांनीं, सरकारचा निर्बंध चुकविण्यासाठीं, व्यासपीठावर बसून, महाभारताची पोथी पुढें ठेवून पुराणेंहि सांगितलीं—पण तीं अशा खुबीनें कीं, श्रोत्यांना द्रौपदीच्या ठायीं भारतमाता दिसावी आणि तिचें वस्त्रहरण करणाऱ्या दुःशासनाच्या जागीं जुलमी इंग्रज अधिकारी

खडा व्हावा. शिवरामपंतांचें पुराण असो, भाषण असो,—लोकांची अलोट गर्दी लोटावयाचीच !

## वाढदिवसाचा सत्कार !

शिवरामपंतांचें हें दुहेरी तेज परक्या सरकारच्या जुलमी डोळ्यांना सहन होईना. त्यांनीं तें तेज कोंडून ठेवण्यासाठीं शिवरामपंतांना ता. १९ जून १९०८ रोजीं अटक केली आणि मुंबई येथें खटला भरला. आपला तेजस्वी शिष्य व देशभक्त सहकारी संकटांत सांपडल्याची वार्ता कळतांच लो. टिळक नाशिकाहून तडक मुंबईस धांवत गेले आणि तेथें शक्य तें सर्व साहाय्य त्यांनीं त्यांना दिलें. ता. २७ जूनचा दिवस उजाडला. शिवरामपंताचा तो ४४ वा वाढदिवस. त्यानिमित्त त्यांचा कोणता सत्कार–समारंभ झाला? पारतंत्र्यांत राष्ट्रभक्तांचा व्हावयाचा तोच ! राजद्रोहाचा खटला सुरू झाला. १९ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा त्यांना ठोठावण्यांत आली. पुढें लवकरच टिळकांवरहि ती घोरपड सरकारनें टाकली. ता. ५ ऑक्टोबर १९०९ रोजीं शिवरामपंत तुरुंगांतून सुटले. लोकांनीं त्यांचा जयजयकार केला. मुंबईत तर त्यांची गाडी माणसांनीं ओढली ! पण शिवरामपंतांनीं लोकांना सांगितलें, "खरा आनंद टिळक बंधमुक्त झाल्यानंतरच होणार आहे." टिळकांविषयीं त्यांच्याठायीं गाढ गुरु–भक्ति होती.

## शारदेच्या दरबारांतील मानकरी

साहित्याच्या क्षेत्रांतील मान–सन्मान शिवरामपंतांना साहजिकच लाभले. नाट्य–संमेलन, शारदोपासक–संमेलन इत्यादि सभा–परिषदांचें अध्यक्षस्थान त्यांना सहजच मिळालें. १९२९ सालीं बेळगांव येथें जें साहित्यसंमेलन भरलें, त्याच्या अध्यक्षपदाचा मुगुट त्यांच्या शिरावर ठेवण्यांत आला. १९२० सालीं त्यांनीं "स्वराज्य" नांवाचें साप्ताहिक सुरू केलें. त्यांतून गांधीवादाचा प्रचार ते करीत. टिळक–विद्यापीठांत प्राध्यापक म्हणूनहि त्यांनीं काम केलें. १९२२ सालीं मुळशी सत्याग्रहांत भाग घेऊन सहा महिन्यांचा तुरुंगवास त्यांनीं पुनः भोगला.

अखेर तो घातक 'शुक्रवार' आला! ता. २७ सप्टेंबर १९२९ रोजीं हा प्रतिभासंपन्न वक्ता व तेजःसंपन्न लेखक "काल" वश झाला. त्यांचे "काळांतील निबंध" ३६ वर्षांनंतर स्वराज्य-सरकारनें बंधमुक्त केले आहेत. त्याशिवाय मानाजीराव, पहिला पांडव इत्यादि नाटकें व विंध्याचल, गोविंदाची गोष्ट वगैरे कादंबऱ्याहि त्यांनीं रचिल्या आहेत. "कालिदासानें न लिहिलेलें नाटक," "सूर्याच्या गैरसोयी" इत्यादि त्यांचीं छोटीं पुस्तकें तर केवळ गद्यकाव्यच होत.

## वीज कडाडली!

'काळ' जन्मास आला तोच मुळीं भयंकर परिस्थितींत! पारतंत्र्याचे चटके तर सर्व देशाला सतत बसत होतेच. पण 'काळा'च्या जन्मापूर्वीं वर्ष दीडवर्ष महाराष्ट्र प्लेग व दुष्काळ ह्यांच्या वणव्यांनी भाजून निघाला होता. प्लेगच्या धामधुमींत गोऱ्या सोल्जिरांनी लोकांचा इतका अमानुष छळ केला कीं, रँड नांवाच्या सरकारी अधिकाऱ्याचा खून ता. २२ जानेवारीं १८९७ रोजीं झाला. मग तर काय? सरकार पिसाळलेच. लो. टिळकांना १८ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा त्या वर्षीच्या सप्टेंबर महिन्यांत झाली. द्राविड-बंधूचे खून झाले, चाफेकर बंधू फांसाकडे ओढले गेले. सारे महाराष्ट्रीय लोक "दे माय धरणी ठाय" म्हणूं लागले. अशा वेळीं स्तंभांतून गुरगुरणाऱ्या नारसिंहाप्रमाणें निर्भयतेचा व सूडाचा आवाज काढण्यास एकटा 'काळ'च पुढें सरसावला. दडपशाहीच्या कांटेरी कुंपणांतूनहि मार्ग काढीत शिवरामपंत लोकांना धीराची व आशेची साथ देत होते. 'काळा'च्या पहिल्याच निबंधांत काळाचें सामर्थ्य वर्णन करतां करतां शिवरामपंत आवेशानें लिहितात,

"रावणानें सीतेला चोरून नेलें आणि दुःशासनानें द्रौपदीला भर सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न केला, त्यावेळीं रामाच्या आणि भीमाच्याहि आधीं मोठ्यानें गर्जना करून 'सूड! सूड!' हे शब्द हाच ओरडला. हिरण्यकशिपूचें पोट ह्यानेंच फोडलें, बळीचें डोकें यानेंच ठेचलें, आणि रावणाचे गळेहि यानेंच कापिले."

## सत्याचा निर्भय प्रसार

शिवरामपंताच्या लेखनांत अशी निर्भयता असे, कारण त्यांच्या अंतः-करणांत निःस्पृहता होती. ते कोणाचेहि अंकित नव्हते, मिंधे नव्हते. त्यांनीं आपल्या आयुष्याचेंच धोरण असें ठेवलें होतें कीं, "खरें असेल तेंच बोलावें. उदात्त असेल तेंच लिहावें. उपयोगी असेल तेंच शिकवावें. देशाचें हित ज्यांत असेल तेंच करावें आणि परमेश्वराचें जें सत्यस्वरूप असेल तेंच चिंतीत जावें."

एका परमेश्वराची भीति बाळगावयाची आणि एका स्वातंत्र्याची चिंता वहावयाची हेंच शिवरामपंताच्या जीवनाचें ध्येय. त्यांच्या 'काळ' पत्राला सरकारी खटल्यांत गोवणारा लेख मुंबईच्या 'टाइम्स' पत्रानें लिहिला असतांना त्यांनीं जें 'हृदयाविष्करण' केलें, तें अत्यंत हृदयस्पर्शी आहे. त्यांत त्यांच्या निर्मल अंतःकरणाचें स्वच्छ प्रतिबिंबच पडलेलें आहे. अजूनहि आपण लो. टिळकांचे नम्र शिष्य आहों असें सांगून परांजपे लिहितात— "आपल्या देशाला परम पावन आणि अत्यंत आवश्यक अशीं सत्य मतें प्रतिपादन करतांना आम्हीं कोणत्याही मानवी साहाय्याची आशा धरलेली नाहीं! या सत्य–मत–प्रसाराच्या कामीं आमच्यावर लहानमोठी, बरी-वाईट कोणतींहि संकटें आली तरी त्यांतून आम्हांला सोडविणारा आमचा परमेश्वर पूर्ण समर्थ आहे! आमचा वकील परमेश्वर! आमची फी परमेश्वर! आमचा जामीन परमेश्वर आणि आम्हांला संकटांतून सोड-विणाराहि परमेश्वरच!"

## पारतंत्र्याचा तिटकारा

पारतंत्र्याच्या वेदना शिवरामपंतांना 'विंचू चावल्याप्रमाणें' होत आणि त्या वेदना नानारूपांनीं त्यांच्या वाङ्मयांतून व्यक्त होत. कोणी कुस्ती जिंकलेली असो कीं कोणी सनई वाजवीत असो, कोठें घोड्याच्या शर्यती असोत वा कोठें बैलगाडी खड्ड्यांत पडलेली असो, त्या सर्वांवर लिहितांना शिवरामपंत आपल्या राष्ट्राच्या पारतंत्र्याची आठवण दिल्याशिवाय लेख संपवीतच नाहींत. ते आंब्याच्या झाडाला विचारतील, देशाच्या स्वातंत्र्या-

बद्दल आणि पिंजऱ्यांतील पोपटाला गोष्टी सांगतील स्वातंत्र्याच्याच. " तूं पिंजऱ्यांत सांपडलास म्हणून मी तुला नीच किंवा अधम म्हणत नाहीं. पण तूं पिंजऱ्यांत कोंडला गेला असूनहि नाचतोस आणि उड्या मारतोस म्हणून तूं नीच आणि अधम आहेस." असें ते पोपटाला—आणि त्याच्या द्वारें पारतंत्र्यांत सुख मानणाऱ्या लोकांना–बजावतात. इंग्रज सरकारच्या नोकरींत गर्क झालेल्या ऐषआरामी व्यक्तीचें शब्द–चित्र त्यांनी अनेक निबंधांत मोहक पण भेदक वाणीनें काढलें आहे. ' भोंवरीचें फूल ' या छोट्या पण छानदार लेखांत ते म्हणतातः—" त्या भोंवरीच्या फुलांचा झेंडलोबा करून ' झेंडलोंबाच्या रे गोंडलोबा,' हें गाणें म्हणत मी त्याच्या-भोंवतीं लहानपणीं नाचत असें, त्या वेळेस मला किती सुख होत असे ! आणि आतांहि मी साहेब लोकांच्या भोंवतीं अक्षयीं नाचतों आहें आणि ' झेंडलोबाच्या रे गोंडलोबा.' ह्याच्याइतकीच अर्थरहित आणि वेडगळ अशीं त्यांची गाणीं गात आहें. तरी पण दोहोंतल्या सुखदुःखांत केवढें तरी मोठें अंतर हें ! "

## टीकेचा सडेतोडपणा

अशा किताबवाल्या व पैकेवाल्या खुशालचेंडूवर कधींकधीं ते उघड टीकेचें सरळ हत्यारहि चालवीत. वक्रोक्ति किंवा उपहास यांचा आड-पडदा न धरतां ते ऐदी श्रीमंतांवर कडाडून लिहितात—" एकेक जण बसल्या बैठकीला शंभर शंभर रुपयांच्या दारूच्या बाटल्या रिकाम्या करून टाकतो. जणूं काय जगांत भुकेनें तळमळत पडलेला कोणी माणूस नाहींच. कोणी हजारों रुपये किंमतीचा झगा नेसतात किंवा शाल पांघरतात, जणूं काय जगांत थंडीनें हातपाय वांकडे झालेला कोणी मनुष्यच नाहीं. कोणी हस्तिदंती दांडा सोन्यानें मढवून त्यावर हिरे बसविलेली छत्री आपल्या एकस्याच्या हातांत धरतो, जणूं काय जगांत सूर्याच्या तापानें करपणारा आणि पोळणारा कोणी मनुष्य नाहींच."

साहेबांची थुंकी झेलण्याच्या वृत्तीवर टीका करण्यासाठीं चित्रांचा आधार शिवरामपंतांनीं घेतला आहे. ते म्हणतात,

" आपल्या देवळांत किंवा घराच्या देवघरांत किंवा रंगमहालांत खुद्द साहेबांनीं येणें हें जितकें आपल्याला गैरशिस्त वाटेल, तितकेंच त्यांचें चित्र तेथें असणें हें वाटलें पाहिजे. मन उदात्त करणें हा जर चित्रांचा एक उपयोग असेल, तर साहेब खुर्चीवर बसलेले व आपण त्यांच्या खुर्चीमागें उभे राहिलेलें असल्या चित्रांनीं मन उदात्त कसें होणार ?"

सरकारी नोकरीचा पट्टा गळ्यांत अडकवून एट मिरविणाऱ्या अधिकाऱ्यांची रेवडी शिवरामपंतांनी 'विष्रासाठीं कंठशोष' या कथेंत किती मौजेनें उडविली आहे ! आगगाडीच्या 'सर्व्हंटस्'चे डब्यांत बसण्यासाठीं धावपळ करणाऱ्या व साहेबाच्या एकेक लाथेसरशीं आपला नोकरपणा सिद्ध झाल्याचा आनंद मानणाऱ्या चपराश्याची गुलामी धांदल पहातांना वाचक हसूनहसून बेजार होतो आणि हसतां हसतां गुलामी वृत्तीवर संतापत जातो.

## अंतःकरणाची तळमळ

परतंत्र झालेल्या आपल्या मायभूमींतील प्रत्येक वस्तु परक्याच्या सुखासाठीं कशी वापरली जात आहे, हें सांगतांना शिवरामपंत तळमळून म्हणतात " हीं शेतें दुसऱ्यांच्याकरितां पिकत आहेत ! ह्या नद्या दुसऱ्यांच्या साठीं वहात आहेत ! ह्या गाई परकीयांच्या क्षुधा—शमनासाठीं पुष्ट आणि मांसल होत आहेत ! आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंगांतील तल्लखपणा शिकारीच्या योगानें वृद्धिंगत करण्यासाठीं हीं हरणें चपलपणाची संवय करीत आहेत ! आकाशतलालाहि आपलें मस्तक नेऊन भिडवावयाचें अशी उच्चत्वाविषयीं ज्यांची महत्त्वाकांक्षा अशा ह्या मोठमोठ्या विस्तीर्ण वृक्षांच्या पोटांमध्यें दुसऱ्याच्या चैनीचे पलंग, खुर्च्या आणि त्यांच्या वैभवशाली इमारतीचे खांब ! "

एका वठलेल्या-मोडलेल्या झाडाकडे पहातांच त्यांना वाटतें, आपल्या देशाचीहि अशीच दुर्दशा झालेली आहे. वृक्ष व देश यांची तुलना ते पुढीलप्रमाणें करतातः—

" या वृक्षाच्या पानांप्रमाणें माझ्या देशाचेहि सर्व चांगले गुण झडून गेलेले आहेत ! माझ्या देशांत जे पूर्वीं शहाणे, शूर आणि गुणी लोक होते

ते या वृक्षावरील पक्षांप्रमाणें आतां कोणीकडे उडून गेले कोण जाणे ! या वृक्षाचीं पानें ज्याप्रमाणें दहिवराचें थेंब खालीं टाकीत आहेत; त्याप्रमाणेंच माझ्या देशांतील लोक; कोणी अन्नासाठीं तर कोणी वस्त्रासाठी; कोणी थंडीसाठीं तर कोणी वाऱ्यासाठीं अश्रु टाकीत आहेत. ह्या वृक्षाप्रमाणें माझ्या देशाच्याहि खांद्या आपला भात शिजविण्यासाठीं कोणीं तोडून नेल्या आहेत ! येथल्याप्रमाणें माझ्या देशांतहि जेथें आरामाच्या जागा होत्या तेथें हल्लीं वाळलेला पातेरा पडलेला आहे, त्यावर हल्लीं धुरळा बसलेला आहे, आणि तेथें हल्लीं मुंग्यांचीं मोठमोठीं वारूळें वाढलेलीं आहेत ! ह्या वृक्षाच्या बुंध्याप्रमाणें माझाहि देश हल्लीं चोहोंकडून सोंलला गेला आहे ! ह्या वृक्षाच्या खांद्यावरून जसे अनेक विषारी प्राणी खेळत आहेत, त्याचप्रमाणे माझ्या देशांतील लोकांच्या खांद्यांवर अनेक विषारी आणि प्राणघातक व्यसनें स्वतंत्रपणानें खेळत आहेत ! आणि ह्या सगळ्या वृक्षाच्या अग्रभागीं जसें हें घुबड दिवसाढवळ्या बसून आपला भयसूचक शब्द करीत आहे, त्याचप्रमाणें माझ्या देशांतील सर्व विचारांच्या अग्र-भागीं नास्तिकपणाचें घुबड बसून निर्भयपणें दिवसाढवळ्या भयंकर शब्द उच्चारीत आहे ! ”

## संतापाचा अतिरेक

परक्या सरकारच्या लुटारूपणामुळें येथें दुष्काळामागून दुष्काळ पडूं लागले व त्यांत लाखो हिंदी माणसें माशा-मुंग्यासारखीं पटापट मरूं लागलीं. तरी दुष्काळ निवारण्याचे मूलगामी उपाय न योजतां सरकार फक्त चौकशी–कमिशनें नेमूं लागलें. याची चीड येऊन शिवरामपंतांनीं पुढील तीन दाखले दिले आहेत. लोखंड तापलें तर लाल दिसतें. पण तें फार तापलें तर पांढरें दिसूं लागतें. तशा ‘ श्वेत उष्णतेनें ’ तापून शिवरामपंत लिहितात—“ दुसऱ्याच्या भाकरींतील निम्मी भाकरी रोज खाऊन उलट त्यालाच “ तात्या, आतांशा तुम्ही अगदीं रोड कां बरें दिसत चाललां ? ” असें विचारणें, किंवा रेल्वेच्या डब्यांत दुसऱ्याच्या जागेवर बसून उलट त्यालाच “ कांहो तात्या, तुम्हांला उभें रहावें लागतें याचें कारण काय बरें असावें ? अलीकडे या आगगाड्यांचे डबे फार लहान करूं लागले आहेत. हें ह्याचें

कारण आहे काय ? " असें विचारणें, किंवा दुसऱ्याच्या छत्रींत शिरून उलट त्यालाच ' अरेरे ! काय हो हें तात्या ! तुमचें सारें अंग कीं हो पावसानें भिजविलें आहे ! याचें काय बरें कारण असावें ?......अलीकडे पाऊस आकाशांतून खाली न पडतां जमिनींतून तर वर येत नसेलना ? " असें विचारणें आणि दुष्काळाच्या कारणांची चौकशी करण्याकरितां कमिशनें नेमणें सारखेंच ढोंगीपणाचें आहे. "

## विरोधाभासाचें वर्णन

परक्या अंमलाखाली पोट भरण्यासाठीं कांहीं लोक लाचारीनें वागत असले तरी त्यांच्या हृदयांतहि स्वदेश-प्रेमाचे झरेच कसे वहात असतात हें पुढील विरोधाभासानें शिवरामपंत सांगतात, " ते बाहेरून हंसतांना आंतून जळत असतील बाहेरून माना वांकवितांना आंतून त्यांचें हृदय दुभंग होत असेल. ते राजनिष्ठेची नवीन शपथ घेत असतांना त्यांना आपल्या जुन्या स्वतंत्रतेची आठवण होत असेल व आपली शस्त्रें इंग्रजांच्या स्वाधीन करण्याकरितां आपल्या हातांतून खालीं ठेवीत असतांना ' हीं आपण फिरून केव्हां हातांत घेऊं ! ' असें त्यांना वाटत असेल. "

खरा देशभक्त सरकारी नोकरींत गुंतलेला असला, तरी कसा वागतो, किंवा कसा वागेल, याचें शब्द-चित्र शिवरामपंतांनीं पुढीलप्रमाणें काढलें आहे—

" ते सुग्रास अन्न जेवीत असतांना, दुष्काळानें उपाशी मरणारे लोक त्यांच्या डोळ्यांपुढें दिसत; व त्यामुळें त्यांना जेवण गोड लागत नसे. ते मऊ बिछान्यावर निजले असतांना घरादारावांचून आणि वस्त्रावांचून उघड्या हवेंत थंडीनें कुडकुडणाऱ्या लोकांची त्यांना आठवण होई; व त्यामुळें त्यांना साऱ्या रात्रभर झोंप येत नसे. ते कोर्टातील आपल्या न्यायाधीशाचे खुर्चीवर अकरा वाजतां येऊन बसले, म्हणजे त्या दुपारच्या वेळीं उन्हातान्हांतून काबाडकष्ट करणारे लोक, आणि भाकरीच्या तुकड्यासाटीं दारोदार हिंडणारे भिक्षेकरी, हे त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागत; व त्यामुळें त्यांना बराच वेळपर्यंत कांहीं कामकाज सुचत नसे. "

परतंत्र हिंदुस्थानची स्थिति ते पुढील मोजक्या शब्दांनीं सारांशरूपानें मांडतात—" हिंदुस्थान देश ही परदेशांतील दरवडेखोरांची उतारपेठ, परदेशांतील वाटमाऱ्यांची धर्मशाळा, परदेशांतील लुटारूंचें सदावर्त आणि परदेशांतील चांचे लोकांचें अन्नछत्र, अशी स्थिति पुष्कळ दिवसांपासून चालत आलेली होती."

## उपरोधाचें तीक्ष्ण शस्त्र

समोरासमोर घाव घालून दोन तुकडे करण्याचा हा लो. टिळकांचा गुण प्रा. परांजपे यांच्या लेखनांत आढळत असला, तरी क्वचित्च. मूर्खाला 'मूर्ख' म्हणण्यापेक्षां 'आपण फार शहाणे आहांत' असें उपहासानें बोलण्याची शिवरामपंतांना मोठी हौस. वक्रोक्तीच्या करवतीनें ते प्रतिपक्ष्याचीं अंतःकरणें न कळत पण पार कापून काढीत. स्वार्थासाठीं इंग्लंडनें हिंदुस्थानाला गुलाम केलें—लुटलें—कुटलें; पण त्याचें वर्णन शिवरामपंतांची उपरोधिक लेखणी कशी करते पहा—" हिंदुस्थान ब्रिटनचें गुलाम नाहीं; तर ब्रिटन हें हिंदुस्थानचें गुलाम आहे ! ब्रिटन हिंदुस्थानच्या सेवेसाठीं रात्रंदिवस राबत आहे ! इंग्लंड हिंदुस्थानासाठीं किती हालअपेष्टा सोशीत आहे त्याची कोणाला कल्पनाहि नाही ! इंग्लंड हिंदुस्थानांतील मोठमोठ्या पगारांच्या सर्व जागांवर आपले लोक नेमण्याला किती श्रम घेत आहे ! हिंदुस्थानचा व्यापार अगदीं संकुचित, बेताबेताचा, टापटिपीचा मुडसुडीत आणि व्यवस्थित करून ठेवण्याला इंग्लंडला किती शीण पडत आहे ! हिंदुस्थानांतून जवळ जवळ एक अब्ज रुपये निरनिराळ्या रूपांनीं स्वदेशीं रवाना करून देण्याला इंग्लंडला किती शीण पडत असेल ! ह्याशिवाय हिंदुस्थानांतील शिक्षण नेमस्त करण्याला, लोकांच्या मनाची वाढ खुंटविण्याला, लोकांच्यावरील कर वाढविण्याला, व याचसारख्या दुसऱ्या अनेक राज-कारस्थानाच्या गोष्टी करण्याला इंग्लंडला किती मेहनत पडत असेल हें कोणाच्या स्वप्नींहि कधीं येत नसेल. आणि इतकें हें सगळें कशासाठी ! तर फक्त देवासाठीं ! इंग्लंडनें हिंदुस्थान जिंकलें, देवासाठीं ! आणि इंग्लंड हिंदुस्थानांतून अलोट पैसा नेत आहे, तोहि देवासाठीं ! "

शेतकरी व सावकार या दोन्हीहि वर्गांना बुचाडणाऱ्या इंग्रज सरकाराचा कावा ‘ काळ ’ कर्त्यांनीं पुढील छझी शब्दांनी उघड केला आहे. " आपला दोष सावकाराचे माथ्यावर घालून सरकार दयाळू, ममताळू कनवाळू आणि मायाळू बनलें ! शेतकऱ्यांच्या खांद्यावर सावकार बसलेले आणि सावकाराच्या खांद्यांवर सरकार बसलेलें, अशा समाजरचनेच्या चित्राची कल्पना आपल्या डोळ्यांपुढें आणा ! अशा स्थितींत ‘माझ्यावर अतिशय भार पडून मी मरतों ’ अशी ओरड खालचा शेतकरी करतो तेव्हां, त्याला सरकार सांगतें कीं, " बाबा, तूं म्हणतोस तें अगदी खरें आहे. तुझी कंबर अगदीं मोडून गेली असेल ह्यांत शंका नाहीं. तुझ्या खांद्यावर हा केवढा लठ्ठ सावकार बसला आहे. त्याच्या वजनाखालीं तूं अगदी चुरून गेला असशील, मला तुझी फार दया येते ! आतां तुझ्यावर पडणारें ओझें कमी करण्याकरतां ह्या सावकाराच्या अंगावर उंची वस्त्रें, सोनें, रत्नें, मोतीं वगैरे कांहीं जड वस्तु आहेत, त्या मी त्याच्या अंगावरून काढून, हे शेतकऱ्या, तुझें ओझें थोडेंसें तरी हलकें व्हावें येवढ्याखातर मी आपल्या अंगावर घालून घेतों." असें म्हणण्यासारखेंच वरील कृत्य होतें."

## उपहासाची आग

हिंदुस्थानचा व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन हा कर्दनकाळ होता. त्याचे दोष गुणांच्या रूपानें शिवरामपंत कसे रंगवितात पहा—

" आपल्या राज्यांतील राजकीय हक्क आणि मोठमोठीं हुद्याचीं कामें हिन्दु व मुसलमान ह्या दोघांनाहि सारखींच द्यावयाचीं नाहीत असें धोरण ठेवण्यामध्यें आपण जो निःपक्षपातीपणा दाखविला आहे तो खरोखर वर्णनीय आहे. परंतु याशिवाय आपल्या निःपक्षपातीपणाचें दुसरें एखादें उदाहरण कोणाला क्वचितच माहीत असेल. भाषण आणि कृति ह्यांच्यामध्यें कधींही मेळ ठेवावयाचा नाहीं, हें व्रत चालविण्यामध्यें आपण दाखविलेला करारीपणा प्रशंसनीय आहे. "

पारतंत्र्याची जळजळीत चीड उपहासाच्या गुलाबदाणींतून शिवरामपंतांची लेखणी कशी टाकीत चालली आहे !—

" हिंदुस्थानचे राजे एक होऊन त्या वेळेपासून हिंदुस्थान स्वतंत्र राहतें, तर क्लाइव्हसाहेबांनीं उमीचंदासाठी केलेले खोटे कागद आणि वाटसन-साहेबांची केलेली खोटी सही, हेस्टिंग्ससाहेबांनी घेतलेले लांच आणि केलेले जुल्म, डलहौसीसाहेबांनी गिळलेली राज्यें आणि ओकलेलें बंड ह्यांना मात्र आपण सर्वस्वीं मुकलों असतों. आपली विलायतेला कच्चा माल पुरविण्याबद्दलची जी ख्याति आहे ती झाली नसती. आपल्या गव्हाबद्दल विलायतेतील लोक जी तारीफ करितात ती कोणी केली नसती. जीं मुलें दुष्काळानें फुकट मरून गेलीं असतीं, अशा अल्पवयी मुलांना देखील खिस्ती धर्माची जीं अत्युदात्त तत्त्वें आज सहज कळत आहेत, ती त्यांना त्यांच्या उतारवयांत आणि मोठ्या परिश्रमानेंहि समजलीं नसती, व दुष्काळाच्या दिवसांत आपल्यांतील हजारों लोक रिलीफ कामावरून एकत्र जमून कोठें रस्ते बांध, कोठें तळी खण, अशा प्रकारचीं जीं आज परोपकाराची आणि लोकोपयोगीं कामें करीत आहेत तीं त्यांच्या हातून कधींहि घडलीं नसती. पैशाच्या योगानें मनुष्य उन्मत्त होतो. म्हणून तो नसल्यामुळें आपल्या अंगामध्यें आज जो स्वाभाविक नम्रपणा आलेला आहे तो आपल्याला लाभला नसता. गुलामगिरीला, दारिद्र्याला आणि दुष्काळाला राहण्याला अशी ऐसपैस जागा दुसरीकडे न मिळून त्यांची फार गैरसोय झाली असती. " इंग्रज सरकारला सरळ कितीहि शिव्या दिल्या, तरी वाचकाच्या अंतःकरणांत जी आग पेटणार नाहीं, ती अशा उपरोधिक लेखनानें प्रदीप्त होत असे. जोड्यांतील खडा, किंवा हृदयांतील शल्य हें जसें सारखें टोंचतें, पण बाहेर तर फेकून देतां येत नाहीं, तशी शिवरामपंतांची उपरोधिक टीका परक्या सरकाराचे जिव्हारीं जाऊन बसे, पण तिचा प्रतिकार कांहीं करतां येत नसे.

## रूपकाचें पांघरूण

इंग्रजांच्या राज्यकारभारावर पशूंच्या साम्राज्याचें एक रूपक रचून ' काळ ' कर्ते लिहितात—"राष्ट्रांतील एकंदर खजिन्याचें आणि हिशोबाचें काम लांडग्याकडे सोंपविण्यांत आलें, व कोल्हा हा त्याच्या हाताखालीं सेक्रेटरी म्हणून नेमण्यांत आला. सर्व फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करण्याच्या

कामावर खबुतरांची नेमणूक करण्यांत आली. कायद्याच्या कलमाप्रमाणें एखादी गोष्ट न्याय्य म्हणून ठरली तरी नीतिशास्त्राच्या नियमाप्रमाणें ती न्याय्यच आहे कीं नाहीं, हें पाहण्याचें काम वाघाकडे दिलें गेलें. पातिव्रत्याविषयींचें नियम शेळ्यांनीं अमलांत आणलेले पहावे असें ठरलें. देशाचें संरक्षण करण्याचें शिपाईगिरीचें काम सशांकडे सोंपविलें, आणि त्या शिपायांची अन्नसामग्री वगैरे उचलून नेण्याच्या कामावर सिंह आणि हत्ती ह्यांची योजना झाली. परदेशच्या राजांच्या दरबारांतून या पशूंच्या साम्राज्याच्या वतीनें कोणी तरी वकील पाहिजे होते, त्या कामावर गाढवाची रवानगी करण्यांत आली. आणि अशा रीतीनें सुरू केलेली ही राज्यपद्धति बरोबर आहे किंवा नाही हें वरच्यावर तपासून पाहणें अत्यंत आवश्यक असल्यामुळें एकंदर राज्यकारभारावरील इन्स्पेक्टर जनरलच्या हुद्यावर मुंगीची स्थापना करण्यांत आली." "इंग्रजी राजवटीत किती अन्याय, लुटारूपणा व दडपशाही होत असे, याचें हें चित्र कोणा देशभक्ताचें काळीज जाळल्याशिवाय सोडील ?

एका दरोडेखोराचे तोंडून शिवरामपंत युरोपियन राज्यकर्त्यांना विचारतात—"दुसऱ्या राजांचे मुकुट तुम्ही आपल्या प्रदर्शनांतून मांडतां, ते मुकुट तुम्ही त्यांचीं मुंडकीं उडविल्यावांचून तुमच्या हाती लागले कसे ? ते नुसते मुकुट तेवढे तुम्ही दाखवितां पण त्या मुकुटांच्या खालची डोकीं कोठें आहेत ? तुमच्या प्रदर्शनांतून तुम्ही दुसऱ्यांची नुसतीं शस्त्रें दाखवितां पण तीं शस्त्रें धरणारे हात कोठें आहेत ? दुसऱ्यांचीं चिलखतें आणि शिरस्त्राणें तुमच्या संग्रहालयांत दृष्टीस पडतात; परंतु तीं धारण करणाऱ्यांचीं त्यांच्याखालील शरीरें कोठें आहेत ?"

## उपमाहि त्याचसाठीं !

केवळ सृष्टि–वर्णन ! पण तें करतांनाहि वाक्यांवाक्यांतून शिवरामपंत पारतंत्र्याचीच जाणीव वाचकांना करून देत आहेत. ग्रीष्मऋतूचें शब्द–चित्र एकाद्या कवीप्रमाणें त्यांनीं रेखाटलें आहे; पण तें रेखाटतांना ते म्हणतात,

"वैशाखाच्या महिन्यांत दोन प्रहरच्या वेळीं एखाद्या राजाच्या सत्ते-

प्रमाणें सूर्याच्या उन्हाचा कडक अमल सर्व भूमंडळावर बसलेला असतो. एखाद्या जुलमी राजाच्या जुलमाप्रमाणें सूर्याच्या प्रखर उन्हानें सर्व मनुष्यांच्या अंगाची लाही लाही होत असते. लढाईंत घायाळ झालेल्या शिपायांच्याप्रमाणें सर्व लोकांच्या अंगांतून रक्ताप्रमाणें घामाच्या धारा वाहत असतात. डोळ्याला गार वाटण्यासाठीं किंवा तृषा शांत करण्यासाठीं एक थेंबभर पाणी पाहिजे असलें, तर कंगाल मुलखांतील द्रव्याप्रमाणें मिळण्याची चोहोंकडे मारामार झालेली असते. निष्ठुर मनुष्याच्या अंतःकरणाप्रमाणें सर्व जलाशय कोरडे ठाक पडलेले असतात. बेबंदशाहींतील वयोवृद्ध माणसाप्रमाणें झाडांचीं पिकलेलीं पानें सर्वत्र गळून पडलेलीं असतात, व अराज्यकावस्थेमधील दयेप्रमाणें छायेचें नांवदेखील कोठें उरलेलें नसतें. एखाद्या निर्घृण राजाप्रमाणें सूर्य आपल्या हजारों करांनीं पृथ्वीवरील लोकांचें जीवन आकर्षण करून घेण्याला उद्युक्त झालेला असतो. लोभाविष्ट लोकांच्या धनतृष्णेप्रमाणें सूर्याच्या उष्णतेनें चोहोंकडे कहर करून सोडलेला असतो. हलक्या लोकांप्रमाणें ज्याची जोड्याशींच असण्याची योग्यता, असले रजःकणसुद्धां आपलें स्थान सोडून वर येऊन डोळ्यास त्रास देऊं लागतात. चोहोंकडे उष्णतेचा पूर्ण अमल बसतो, व खालीं तळ आणि वर पृष्ठभाग अशा रीतीचे पाण्यानें भरलेले जे अनेक महासागर पृथ्वीच्या पाठीवर आहेत त्यांच्यांतून विपरीत, म्हणजे वर तळ आणि खालीं पृष्ठभाग अशा रीतीनें उपडा केलेला हा आकाशांतील उष्णतेचा महासागर ह्या भूमंडळावर ओतून, त्यांत आपणां सर्वांना गाडून टाकण्याचा प्रयत्न हा सूर्य करीत आहे कीं काय, असा पाहणाराला भास होत असतो. ''

## स्वातंत्र्याची लालसा

केवळ पारतंत्र्याची जाणीव देऊन, वाचकांच्या चित्ताची लाही लाही करून, शिवरामपंत थांबले नाहींत. त्यांनीं स्वातंत्र्याची आशाहि फुलविण्याची शिकस्त केली आहे. आधीं जमीन भाजून काढली, म्हणजे मग तिच्यांत बीं पेरावें हें योग्य नव्हे काय ? परिस्थितीचा पाऊस नंतर पडतोच, पण मानवी प्रयत्न दुहेरी चालू असले पाहिजेत. स्वातंत्र्याची

आकांक्षा शिवरामपंतांनीं नाना रीतींनीं पेरली आहे. ‘ मी स्वतंत्रच होणार’ हा एकच एक सूर त्यांच्या विविध विषयांवरील लेखांतून उमटतो.

कधीं ते सरळ विचारतात, “ मानस सरोवरांमध्यें आकंठ बुडालेले असून आपण तृषाक्रान्त झालेले आहोंत. कल्पवृक्षाच्या झाडाखालीं बसलेले असतांहि आपण प्रत्यहीं हताश होत आहों. अन्नपूर्णेच्या सन्निध असून आपण उपाशीं मरत आहों. सूर्याची आपल्यावर कृपादृष्टि असतांनाहि आपण थंडीनें कुडकुडत आहों. अश्विनीकुमार आपल्याला अनुकूल असूनहि आपण व्याधिग्रस्त झालों आहों आणि अमृताच्या डोहांत पोहत असतांनाहि आपण मरणोन्मुख झालों आहों. अशी आपल्या राष्ट्राची स्थिति कोणी केली ? तें आपलें सुख काय झालें ? ते आपले पूर्वींचें सुख आपल्याला फिरून मिळेल काय ?”

‘काळा’तील लेख वाचणारा भावनाशील तरुण असेंच गुणगुणत असें कीं, “ समुद्राला ओहोटी लागली तर त्याला फिरून भरती येते, चंद्राच्या कलांचा कृष्णपक्षांत क्षय झाला तरी फिरून शुक्र पक्षांत त्यांची वृद्धि होते; पण माझ्या देशाचा सूर्योदय कधीं येईल ? त्याच्या वैभवाला ओहोटी रोजच लागलेली आहे, पण त्याला भरती कधीं येणार ? माझ्या देशांतील कलांचा कृष्णपक्ष आज कित्येक वर्षें चालला आहे, तो संपून त्याच्या शुक्र पक्षाला सुरवात कधीं होणार ? ”

यांतील अलंकारांच्या कांतीनें वाचकाचें मन प्रथम प्रसन्न झालें, तरी त्यांतील विचार हृदयाला अंकुशच मारीत असतो. इतिहासाची आठवण देऊन ‘ काळ ’कर्ते विचारतात, “ गंगेच्या कांठीं, सरस्वतीच्या कांठीं, हिमालयाच्या शिखरावर, विंध्याचलाच्या गुहेंत, नर्मदेच्या पाण्यांत, कावेरीच्या लाटांत, रामेश्वराच्या सेतुबंधनांत, गंगोत्रीच्या पहाडांत, प्रतिष्ठान शहरांत, धारा नगरांत, काशी विश्वेश्वराच्या पुरींत, लाहोरांत, अयोध्येंत, पाटलीपुत्रांत, नागपुरांत, पुण्यनगरींत, सातार्‍यांत, रायगडावर, विजयनगरांत, जिंजीच्या किल्ल्यांत, तंजावरच्या शहरांत आणि तिरुमल नाईकाच्या राज्यांत, आपल्या पूर्वजांच्या आनंदाचे डोह भरलेले होते— तेथील आनंद कोणीकडे गेला ? ”

## प्रतिभेची गगन-भरारी

याहिपेक्षां टसठशीतपणें इतिहासाचा उपयोग शिवरामपंतांनीं केलेला आहे. बालपणापासून त्यांच्या डोळ्यापुढें खडा असलेला रायगड किल्ला त्यांच्या अंतःकरणांत शिवाजीमहाराजांची मूर्ति उभी करीत होता. जशी श्रीकृष्णाची गीता, तशीच शिवरायाची स्वातंत्र्य-कथा प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या रक्ताचा बिंदुन् बिंदु नाचविण्यास समर्थ आहे. आणि शिवरामपंतांची ती प्रतिभाशाली लेखणी ! तिनें 'शिवाजीचें पुण्याहवाचन' व 'शिवाजीची एक रात्र' हे जे दोन काव्यपूर्ण व स्वदेशभक्तीनें ओथंबलेले लेख लिहिलेले आहेत, त्यांना तोड सांपडणें मराठींत तरी कठीण !

एके दिवशीं मोठ्या पहाटेस उठून शिवाजी सह्याद्रीच्या एका उंच शिखरावर चढला. तेव्हां त्याच्या स्वातंत्र्य-युद्धाला साहाय्य करण्यासाठीं कोण कोण आलें हें सांगतांना शिवरामपंत लिहितात,

"इतके सूड त्या परकीय लोकांच्या असह्य जुलमाविरुद्ध रात्रंदिवस विव्हळत होते, कण्हत होते, कुंथत होते, ओरडत होते आणि त्वेषाच्या किंकाळ्या फोडीत होते. त्यांतून कित्येक जखमी झाले होते, कित्येक रक्तबंबाळ झाले होते, कित्येक लंगडे होऊन पडले होते, कित्येक डोळे काढलेले होते, कित्येक माना मोडलेले होते आणि कित्येक प्रेतवत् पडलेले होते; तरी पण ते सगळे आपल्या देशाच्या परकीय शत्रूंची खोड मोडण्याला अतिशय उतावीळ झालेले होते. आपल्या देशाच्या शत्रूंचा नाश करण्यासाठीं तोडलेले पायहि धावून जाऊं पहात होते, कापलेले हातहि तरवारी उपसून जखमा करण्याला इच्छित होते, फोडलेले डोळेहि अतिशय त्वेषानें पहात होते, आणि मारलेलीं अंतःकरणेंहि प्रेतवत् पडलेल्या अवयवांमधून चैतन्याचा आणि सामर्थ्याचा संचार करविण्याचा प्रयत्न करीत होतीं."

"स्वदेशाच्या-स्वातंत्र्याच्या कल्पनांनीं शिवाजीचें ( आणि शिवरामपंतांचेंहि ) डोकें भणाणून गेलेलें होतें." एके दिवशीं संध्याकाळीं शिवाजी एकटाच बसला असतां त्याचें लक्ष आकाशांतील ताऱ्यांकडे आणि नक्षत्रांकडे वेधलें. त्यांना उद्देशून शिवाजी ( म्हणजेच शिवरामपंत ) म्हणतो—

" तुमच्यापैकीं मंगळ लढवय्या आहे, बुध बुद्धिमान आहे, गुरु उत्कृष्ट मंत्री आहे, शुक्र अत्यंत कुशल आहे, आणि शनिसारखा उच्छेद करून टाकणारा दुसरा कोणी आढळणारच नाहीं. मग हे मंगळबुधादिक ग्रहांनो, स्वराज्य आणि स्वतंत्रता यांच्याकरितां लागणारे सर्व आवश्यक गुण तुमच्या अंगांत असतांना तुम्ही असे रात्रीचे, अंधारांत आणि निर्मानुष जागेंत चोरट्यासारखे गुप्त खल करण्याकरतां कां जमतां ? हे शनैश्वरा, तूं गरिबांच्या पाठीस लागून त्यांना आपल्या साडेसातींत बुडवून टाकतोस, तें तुझें विध्वंसक सामर्थ्य या जुलमी राजावर तूं उपयोगांत कां आणीत नाहींस ? तुझी आज्ञा शिरसावंद्य मानून तुझ्याभोंवतीं सदोदित घिरट्या घालीत असणाऱ्या आपल्या सर्व उपग्रहांसहवर्तमान तूं या जुल्मी राजांना आपल्या पूर्ण दृष्टीच्या आकर्षणामध्यें आणून त्यांना रसातळाला कां नेऊन पोहोंचवीत नाहींस ? "

## दाखले बोलके केले

पारतंत्र्याची चीड पेटवून व स्वातंत्र्याची आकांक्षा फुलवूनच शिवरामपंत थांबले नाहीत. तर प्रत्यक्ष स्वातंत्र्यांतील ऐश्वर्याचीं, सामर्थ्याचीं, महत्त्वाकांक्षेचीं उत्साहवर्धक दृश्येंहि त्यांनीं कवीच्या कुंचल्यानें रंगविलीं आहेत. कोंकणांतील साधीं पोरेंच, पण स्वराज्यांत किती पराक्रमी निघालीं हें किती आनंदानें व आवेशानें शिवरामपंत सांगतात पहाः—

" परमेश्वराची इच्छा कांहीं निराळीच होती. त्याच्या मनांतून ह्या माडावर चढणाऱ्या मुलांना राज्यपदावर चढवावयाचें होतें. त्याच्या मनांतून श्रीवर्धनाच्या किनाऱ्यावर या डोंगरापासून त्या डोंगरापर्यंत वाऱ्याप्रमाणें भटकत फिरणाऱ्या या मुलांना त्यांच्या हातांत विजयश्रीचे भगवे झेंडे देऊन साऱ्या हिंदुस्थानभर फिरवावयाचें होतें. त्याच्या मनांतून श्रीवर्धन हें नांव अन्वर्थक करावयाचें होतें. कारण, त्यानें तेथील हीं मुलें हातीं धरून साऱ्या हिंदुस्थानच्या विजयश्रीचें वर्धन केलें. सदाशिवराव-भाऊहि कोंकणांत राहून हल्लीं जसें कित्येक लोक करूं शकतात, त्याप्रमाणें फार तर माडावरील ताजा नारळ बुक्कीनें कोडूं शकला असता; पण सदाशिवरावभाऊंचा जन्म त्याकरितां नव्हता. त्यांचा जन्म जुनें बादशाही

तक्त बुक्कीनें फोडण्याकरितां होता, व तें कृत्य सदाशिवरावभाऊंनीं केलें. ”

## रहस्यग्राही दृष्टि

सदाशिवरावभाऊंनीं दिल्लीचें तक्त फोडलें याचें रहस्य काय व तें आपल्या काळाला कसें लागू करावयाचें हें मर्म एकटे शिवरामपंतच जाणोत ! “ ही कल्पना, हा प्रसंग, हें चित्र, हें संविधानक किती आल्हादजनक, किती स्वदेशप्रीतिजनक आणि किती रोमहर्षक आहे ” हें पटवून देतांना शिवरामपंत लिहितात—

“ भाऊसाहेबांनीं हें दिल्लीचें तक्त फोडलें नव्हे, तर हिन्दुस्थानच्या गुलामगिरीचें डोकेंच फोडलें. गुलामगिरीचीं जोखडें हिन्दुस्थानांतील सर्व लोकांच्या माना दाबून टाकण्याकरितां तेथूनच तयार करून बाहेर पाठविलीं जात असत.......सर्व ठिकाणच्या हिंदु प्रजेला जखडून टाकण्यासाठीं गुलामगिरीच्या शृंखला येथेंच घडविल्या जात होत्या. अखंड भरतखंडां-तील लोकांच्या अंतःकरणाला चावून चावून त्यांना रात्रीचीहि झोंप येऊं न देणारे गुलामगिरीचे साप आणि विंचू याच वारुळांतून बाहेर पडत होते. सर्व तरतरीत लोकांच्या उमेदी आणि महत्त्वाकांक्षी मनुष्यांच्या आशा करपवून टाकणाऱ्या गुलामगिरीच्या ज्वाला ह्याच अग्निकुंडांतून निघून सर्व हिंदुस्थानभर सैरावैरा धांवत होत्या. आणि काश्मिरांतील हिमालयाच्या शाखा, माळव्यांतील सातपुडा आणि दक्षिणेंतील सह्याद्रि अशा मोठमोठ्या उंच पर्वतांनाहि बुडवून टाकणाऱ्या गुलामगिरीच्या प्रचंड लाटा ह्याच समुद्रापासून उसळत होत्या. ”

किती काव्यमय वर्णन ! पण ‘ काळ ’ कर्ते हे केवळ कवि नव्हते, नुसते कादंबरीकार नव्हते किंवा कोणतेंहि आख्यान रसाळपणें लावणारे कीर्तनकार नव्हते. ते स्वातंत्र्यासाठीं वेडे झालेले कडवे देशभक्त होते. म्हणून ते “ दिल्लीचें तक्त आणि भाऊसाहेबांचा घण ” या लेखांच्या अंतीं असा निष्कर्ष वाचकाचे चित्तावर ठसवितात कीं, “ लोखंडाचे घण सोन्याचीं आणि हिऱ्यांचींहि तक्तें फोडूं शकतात ह्यांत कांहीं शंका नाहीं. आणि असले घणहि नेहमीं तयारच असतात. ते घण उचलणारीं मनगटें

मात्र पाहिजेत. तीं असली म्हणजे कोणतेंहि तक्त असलें तरी तें फुटलेंच पाहिजे." अशीं मनें व मनगटें तयार करण्याचा कारखाना म्हणजेच शिवरामपंतांचें 'काळ' पत्र.

## क्रांतीचें तत्त्वज्ञान

केवळ काव्यमय वर्णनें किंवा ऐतिहासिक दाखले यांनीं पारतंत्र्याची चीड व स्वातंत्र्याची आशा निर्माण करूनच 'काळ' कर्ते थांबत नसत. स्वातंत्र्यप्राप्तीचे मार्गहि ते दाखवीत. आपल्या कालांत इतर देशांत ब्रिटिशांचें जोखड झुगारून देण्याचे प्रयत्न कसे झाले, हें सांगून आपण आपल्या देशांत ऐक्य, संघटन, जागृति उत्पन्न करणें कसें अगत्याचें आहे हें ते परोपरीनें पटवीत. कार्याची प्रेरणा आपल्या देश–बांधवांना देतांना ते म्हणतात,

"मातीचे कण आपल्या अनेक उपयुक्त राजकीय वस्तूंचें संरक्षण करीत आहेत, पाण्याचे थेंब अवाढव्य लोखंडी चाकांना गरगर फिरवित आहेत,वायूचे परमाणु गलबताना हाकून नेत आहेत आणि चंद्राचे किरण सर्व प्राण्यांना प्रकाश देत आहेत. प्रत्येक वस्तु आपल्या सामर्थ्याचा कांहीं तरी उपयोग करीत आहे."

राजकीय क्रांतीचा सिद्धांतहि ते लोकांच्या व सरकारच्या निदर्शनास आणतात. ते लिहितात, "प्रत्येक गरिबाची भूक त्याच्या झोपडीच्या पडक्या भिंतीच्या आंत आहे तोंपर्यंत ठीक आहे. पण सर्व गरिबांची भूक रस्त्यावर येऊन उभी राहिली आणि ओरडूं लागली, म्हणजे मात्र ती काय करील आणि काय न करील, याचा नेम नाहीं. राज्यावर आलेलें परचक्र पुरवेल, पण राज्यांत उत्पन्न झालेलीं भूक पुरवणार नाहीं. भुकेला अन्नसामग्री ज्या प्रमाणानें कमी, त्या प्रमाणानें ती अधिक भयंकर होते. पाण्यानें सर्व अग्नि विझतात, परंतु वडवाग्नि हा पाण्यानें न विझतां उलट वृद्धिंगतच होतो; त्याचप्रमाणें अन्नसामग्रीच्या कमतरपणामुळें जरी सर्वांचा जोर कमी होतो, तरी या क्षुधारूपी रिपूला त्यामुळें कमजोरपणा न येतां उलट त्याचा जोर अधिकच वृद्धिंगत होतो."

## आशेचा संदेश

एका ध्येयानें एकत्र आलेला मानवसमाज केवढ्याहि बलाढ्य साम्राज्य–सत्तेशीं टक्कर देऊं शकेल, असा विश्वास निर्माण करण्यासाठीं 'काळ'कर्ते म्हणतात,

" हा समुद्राप्रमाणें ज्याच्यावर वळेल त्याला सफाई बुडवून टाकील, आणि पर्वताप्रमाणें ज्याच्यावर कोसळेल त्याला सपशेल चिरडून टाकील. हा समुदाय जें मनांत आणील तें करील. लाख लोकांच्या नजरेला काय अदृश्य असणार ? लाख लोकांच्या एकवटलेल्या बुद्धीला काय अगम्य असणार ? लाख लोकांच्या पायांना काय अनुल्लंघनीय असणार ? आणि लाख लोकांच्या हातांना काय अप्राप्य असणार ? इतक्या लाखो लोकांनीं मनावर घेतलें तर जेथें समुद्राचे खळगे आहेत तेथें दुसरे पर्वत रचतील, आणि जेथें पर्वतांचे उंचवटे आहेत, तेथें समुद्राएवढाले खोल खळगे ते खणतील. जेथें जंगलें आहेत तेथें शहरें उभारतील, आणि शहरांचीं जंगलें करून सोडतील. अशा समुदायांच्या अद्‌भुत सामर्थ्याला कोण भिणार नाहीं ? आणि अशा सामर्थ्यवंत समुदायाला संतुष्ट ठेवण्यासाठीं आपल्या हाडाचीं काडें कोण करणार नाहीं ? "

## राजकीय विवेचन

साम्राज्य हें निसर्गाच्याच विरुद्ध कसें आहे आणि स्वदेशभक्तीला तें मारक कसें आहे, हें वाचकांच्या चित्तावर ठसवितांना शिवरामपंत म्हणतात,

" देवानें घालून दिलेल्या सरहद्दी मोडून साम्राज्य वाढविणारा मनुष्य देवाचें मन तर क्षुब्ध करतोच, परन्तु त्याच्या हातून मनुष्यांचीं मनें क्षुब्ध करण्यासारखींहि कृत्यें होत असतात. साम्राज्य म्हटलें म्हणजे त्यामध्यें निरनिराळ्या देशांमध्यें जे स्वदेशाभिमानाचे पर्वत असतात आणि जे स्वदेशप्रीतीचे समुद्र असतात, त्यांचाहि समूळ नाश होतो. एक साम्राज्य म्हणजे अनेक स्वदेशप्रीतींचा उच्छेद होय. साम्राज्यांत सामील झालेल्या प्रत्येक देशांतील लोकांनीं आपली स्वदेशभक्ति विसरून गेलें पाहिजे आणि दुसऱ्याच्या देशावर भक्ति करावयाला लागलें पाहिजे. पण हें तरी होणार कसें ? "

## एक अमोल रत्न

शुद्ध काव्य-रसानें ओथंबलेले निबंधाह शिवरामपंतांनीं किती तरी लिहिले ! " सांपडलेलें संपुष्ट," " सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति," " रायगडवरची दौलत " इत्यादि लेख जणुं गद्य-काव्येंच होत. आणि तो अद्वितीय लेख–" भासाची भवितव्यता ! " हा एकच एक निबंध लिहून जरी शिवरामपंत दिवंगत झाले असते, तरी त्यांची कीर्ति मराठी भाषेमध्यें अजरामर झाली असती. सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी भास नांवाच्या लेखकानें संस्कृतांत नाटकें रचलीं पण पुढें तीं कोणी जाळून टाकलीं, एवढ्या एका तंतूंतून पंधरा पानांचा पट त्यांनीं विणला आहे–आणि तो किती हृदयद्रावक रीतीनें ! खुद्द शिवरामपंतांचेच निबंध सरकारनें जप्त केले होते. त्यामुळें सहसंवेदना पावून, भासाच्या अंतरात्म्यांत शिरून, आपली सारी चडफड शिवरामपंतांनीं या लेखांत काव्यमय वाणीनें प्रगट केली आहे. सर्वच लेख मुखोद्गत करण्यासारखा आहे. डौलदार शब्दयोजना, लयबद्ध वाक्यरचना, कवि-मनाचें सूक्ष्म दर्शन, चौफेर बहुश्रुतपणा तरल कल्पना–तरंग आणि मुख्य म्हणजे सह–अनुभूति–या गुणांमुळें हा निबंध म्हणजे मराठी गद्याची वैजयंतीमालाच होय. ता पाहून आद्यकवि ज्ञानेश्वरांनींहि " साधु ! साधु ! " म्हणून मान डोलावली असेल !

" हे हतभाग्य भासा ! तूं असें काय पातक केलें असावेस कीं, ज्यासाठीं तुझ्या इतक्या अनेक नाटकांपैकीं कांहींहि अवशिष्ट राहूं नये " असा करुण प्रश्न प्रारंभीं विचारून शिवरामपंत स्वतःचे विचार गुप्तपणें प्रगट करीत आहेत. " तुझीं काव्यें जाळणारे ते लोक काळेगोरे कसले होते, ते तरी तूं पाहिले होतेस काय ? " " काळा "तील निबंध जप्त करणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यांना शिवरामपंतांची ही शापवाणीच नव्हे काय ? " तुझीं नाटकें जळलेलीं पाहून तूं रडला असशील, ओरडला असशील, हळहळला असशील. तळमळला असशील ! " हा स्वतःच्याच दुःखाचा अनुभव शिवरामपंत सांगत नाहींत काय ? " या उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ जाळूं नका हो नका ' असें कोणी म्हटलें नाहीं ? " हा सवाल शिवरामपंतांच्या

आत्म्यानेहि महाराष्ट्रांतील तेव्हांच्या पुढाऱ्यांना टाकला नसेल काय ?
"आर्द्र अंतःकरणाच्या मेघांनी" आणि "वनदेवतांनीं व जलदेवतांनीं" पर्जन्य, वादळें, धरणीकंप उत्पन्न करून भासाचे ग्रंथ कां वाचविले नाहीत ? या शिवरामपंतांच्या सूचनेंत तरुणांना कोणती भीषण प्रेरणा होती ? शेवटीं, श्रुति तारणाऱ्या, सीतेला अग्नींतून वाचविणाऱ्या व तुकारामाचे अभंग इंद्रायणीतून काढणाऱ्या परमेश्वरावर विश्वास ठेवून 'काळ' कर्ते आश्वासन देतात, 'हे भासाच्या आत्म्या, तूं निराश होऊं नको' आपलेहि निबंध कालाच्या कृपेनें निर्बंधमुक्त होतील अशी आशा शिवरामपंत उराशीं बाळगून होते. ती त्यांची आशा स्वराज्यांत पुरी झाली. आतां त्यांच्या निबंधांचा सारा जामदारखाना सर्वांना खुला झाला आहे. त्यांतील हिरेमाणकें व जडजवाहर पाहून "रसिकांच्या चर्या बदलल्या आहेत, त्यांचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत आणि त्यांचीं मनें प्रसन्न झालीं आहेत."





## श्री. केळकर : : : १०

टपोऱ्या मोत्यांच्या बारा सरांचा हार आपल्या इष्टदेवतेच्या कंठांत घालणाऱ्या भक्ताला आपण काय म्हणूं? तसाच थोर अधिकार केळकर यांचा आहे. हजार पृष्ठांचा एक—असे बारा ग्रंथ, एका आकाराचे, एका रांगेनें मांडून ठेवतां येतील, इतकें त्यांचें लेखन विपुल आहे. असे विपुल लेखन करणारे दुसरे साहित्यिक मराठी भाषेंत अजिबात नाहींत असें नाहीं, पण पुनः पुनः वाचावें आणि तें संग्रहीत करावें, अशी गुणवत्ता मात्र केळकरांच्या साहित्यांत दिसून येते. त्यांचें वाङ्मय जसें विपुल आहे, तसें विविध आहे आणि वाचनीय पण आहे. निबंध, टीका, इतिहास, चरित्र, नाटक, नाट्यछटा, कादंबरी, लघुकथा, प्रवासवर्णन, कविता अशा वाङ्मयाच्या सर्व

शाखांवर त्यांनीं आरोहण केलें आहे. त्यामुळें त्यांना त्यांचे चहाते ‘ साहित्य–सम्राट् ’ अशी पदवी अर्पण करून मानाचा मुजरा करतात.

## विद्यामंदिरांतील यश

श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचा जन्म ता. २४ ऑगस्ट १८७२ रोजीं झाला. मिरज संस्थानांतील मोडलिंब हें त्यांचें जन्मगांव. सातव्या वर्षापासून ते मिरजेच्या सरकारी शाळेंत शिकूं लागले. त्यांची बुद्धि तरतरीत होती. वर्गांत त्यांचा क्रमांक पहिला–दुसरा असे. श्री. खरेशास्त्री यांच्यासारखा इतिहास–संशोधक व नाटककार शिक्षक म्हणून त्यांना लाभलेला होता. ते कधी आपलें एखादें नाटक विद्यार्थ्यांकडून वाचून घेत किंवा कधीं सस्कृत श्लोक रचून घेत. १८८८ सालीं केळकर मॅट्रिक झाले व १८९१ सालीं बी. ए. ची परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले. फर्ग्युसन, राजाराम व डेक्कन या तीन कॉलेजांचा लाभ त्यांना घडला. डेक्कन कॉलेजांत त्यांनी टेनिस, क्रिकेट व नौकाविहार हे खेळ खेळून आपलें शरीर निकोप व खंबीर बनविलें. कॉलेजांतील मृच्छकटिक या संस्कृत नाटकाच्या प्रयोगांत केळकर व कोल्हटकर या भावी नामांकित नाटककारांनीं नट म्हणून काम केलें. १८९४ सालीं केळकर एल्‌एल्. बी. ची परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले.

## इंग्रजी पत्राचें संपादन

दोन पदव्यांचे तुरे मस्तकीं धारण करून व हातांत वकिलीची सनद घेऊन, वयाच्या तेविसाव्या वर्षी केळकर सातार्‍यांत शिरले. तेथें त्यांनीं वकिली सुरू केलीसुद्धां. पण लोकमान्य टिळकांच्या लोहचुंबकानें त्यांना पुण्यास ओढून नेलें. त्या वेळीं टिळकांना आपला वकिलीचा वर्ग व ‘ मराठा ’ हें इंग्रजी पत्र चालविण्यासाठीं एका मदतनिसाची गरज होती. केळकर हौसेनें तिकडे गेले. विष्णुशास्त्र्यांच्या त्या संस्थेंत त्यांनीं पाऊल ठेवलें तें शास्त्रीबुवांच्याच पुण्यतिथीच्या दिवशीं. ता. १७ मार्च १८९६ रोजीं केळकर टिळकांकडे गेले. त्यांचे घरींच राहिले, जेवणखाणही कांहीं दिवस त्यांच्याकडेच त्यांनीं केलें. या वेळीं ते ‘ मराठा ’ पत्रांत इंग्रजी

लेखन करीत असत. १८९७ सालीं टिळकांवर राजद्रोहाचा खटला झाला. त्यामुळें त्यांनीं केळकरांनाच 'केसरी' व 'मराठा' या दोन्ही पत्रांचे संपादक म्हणून काम पहाण्यास सांगितलें. १९०८ सालापर्यंत केळकर 'मराठ्याचे' संपादक होते व इंग्रजी लेखन करीत होते. पण त्यांना हौस मराठी लेखनाची.

## 'केसरी' लोकप्रिय केला

१९०८ सालापर्यंत त्यांनीं 'केसरींत' तीसपस्तीस लेख तरी स्वेच्छेनें लिहिलें. १९०८ सालीं टिळकांना शिक्षा दिल्याबद्दल मुंबई हायकोर्टावर केळकरांनीं 'मराठ्यांत' कांही टीका केली. त्यामुळें हायकोर्टाची बदनामी झाली, असें म्हणून केळकरांवर खटला झाला. त्यांत चौदा दिवसांची शिक्षा भोगून केळकर बाहेर आले आणि १९१० सालीं ते 'केसरीचे' संपादक झाले. त्या वेळीं टिळक मंडालेस होते. देशांत दडपशाहीचें थैमान चालू होतें. अशा बिकट काळांत केळकरांनीं 'केसरी' कौशल्यानें चालवून आकर्षक केला. राजकीय जहालपणाची उणीव साहित्यिक लालित्यानें त्यांनीं बरीच भरून काढली. १९३२ सालापर्यंत केळकर 'केसरीचे' संपादक होते. या उच्च स्थानाचा लाभ त्यांच्या साहित्यनिर्मितीला नाना प्रकारांनीं झाला. तसाच त्यांच्या साहित्य-गुणांचा लाभ 'केसरी'च्या लोकप्रियतेला उपयोगी पडला. दर आठवड्यास त्यांना निरनिराळ्या विषयांवर लिहिणें भागच होतें. ते चटकदार भाषेनें व माहितीपूर्ण मांडणीनें लिहीत असत. त्यामुळें इतर वर्तमानपत्री लेखांप्रमाणें त्यांचें लेखन क्षणभंगुर न ठरतां चिरंजीव झालें. प्रासंगिक विषयांवर लिहिले तरी चिरकालिक महत्त्व यावें असे त्यांचे लेख असत.

## चौफेर अनुभव

हा लेखनाचा रतीब जसा अखंड चालू होता, तसाच विविध अनुभवांचा खुराकही त्यांना मिळत होता. पुणें नगरपालिकेचे ते सुमारें पंचवीस वर्षें सभासद होते. त्यांतील सहा वर्षें तर ते अध्यक्षच होते. तसेंच दिल्लीच्या मध्यवर्ती विधि–मंडळाचे सभासद म्हणूनहि त्यांनीं सहा वर्षें काम केलें.

त्यांचें कार्यक्षेत्र पुणें, मुंबई किंवा दिल्ली एवढेंच मर्यादित न राहतां, थोडा वेळ कां होईना, पण तें लंडनपर्यंत पोहोंचलें. १९१७ सालीं लोकमान्य टिळकांबरोबर 'स्वराज्य संघाच्या शिष्टमंडळांचे' सभासद म्हणून ते इंग्लंड-कडे निघाले. त्यासाठीं त्यांनीं "हिंदी स्वराज्याची कैफियत" या नांवाचें माहितीनें भरगच्च भरलेलें इंग्रजी पुस्तक झटपट लिहिलें. पण इंग्रज सरकारनें या शिष्टमंडळाला कोलंबोपाशींच अडविलें. पुढें १९१९ सालीं केळकर इंग्लंडला गेले. तेथील कॉंग्रेस कमिटीचें मुखपत्र "इंडिया" हें त्यांनीं कांहीं महिने चालविलें. पुढें टिळकांच्या पश्चात १९३२ सालीं केळकर परत इंग्लंडला गेले. या वेळीं ते स्वतंत्रपणें गोलमेज परिषदेचे सभासद म्हणून गेले होते. सुमारें दीड महिना ते तेथें राहिल होते.

निरनिराळ्या प्रांतिक राजकीय परिषदांचे अध्यक्ष म्हणूनहि त्यांना समाजाचे विविध अनुभव घेतां आले. किंबहुना त्यांच्याइतकीं अध्यक्षपदें भूषविणारा दुसरा महाराष्ट्रीय पुढारीच झाला नाहीं, म्हटलें तरी चालेल. हिंदुसभा व संस्थानी परिषद येथपासून संगीत परिषद व कीर्तन परिषद येथपर्यंत शेंकडों सभा–परिषदांचे अध्यक्ष ते झाले. बडोदें येथें १९२१ सालीं भरलेल्या साहित्य–संमेलनाचें अध्यक्षपद त्यांनीं आपल्या अलंकार-प्रचुर व विद्वत्तापूर्ण भाषणानें संस्मरणीय करून ठेवलें आहे. दररोज शेंदीडशें पृष्ठांचें नवें वाचन, थोडेंबहुत तरी नवें लेखन आणि निर-निराळ्या संस्थांचा व व्यक्तींचा परिचय–परामर्श, या सर्वांच्या भट्टींतून केळकरांचें जें साहित्य-सुवर्ण बाहेर पडलें, तें वरच्या दर्जाचें आहे यांत वाद नाहीं. त्यांत संशोधन नसेल, स्वतंत्रत्व नसेल, पण कोणताहि विषय घेतला तरी तो सोपा व चटकदार करून त्याचा गंध वाऱ्याप्रमाणें दाही दिशांना दरवळून टाकण्याची त्यांची शक्ति अलौकिक आहे हें निश्चित.

## सर्वमान्यतेचा शिक्का

केळकरांच्या साहित्यांतील गुणसंपदेचें वर्णन इतर थोर थोर साहित्यि-कांनीं एकमुखानें व मुक्तकंठानें करावें, असा अपूर्व योग १९३२ सालीं आला. त्यावेळीं त्यांच्या वयाला साठ वर्षें पूर्ण झालीं; म्हणून निरनिराळ्या संस्थांनीं त्यांचा मोठा सत्कार केला. "भारत इतिहास संशोधक मंडळांत"

" श्री महाराष्ट्र शारदा मंदिरातर्फे " झालेला सन्मान विशेष महत्त्वाचा होता. महाराष्ट्रांतील ठिकठिकाणच्या चाळीस साहित्य-संस्था, ऐंशी साहित्य-सेवक आणि पस्तीस संपादक या सर्वांच्या वतीनें त्यांना या प्रसंगीं मानपत्र अर्पण करण्यांत आलें. त्यांत त्यांच्या साहित्यसेवेचें यथार्थ गुण-वर्णन केलेलें आहे. ' आपणांवर आम्हां साहित्यसेवकांचा जितका हक्क आहे, तितका दुसऱ्या कोणाचाहि नाहीं, ही गोष्ट आपणांसहि मान्य होईल. कारण आपण प्रथम साहित्यप्रणेते व नंतर इतर सर्व कांहीं आहां." असा आपला अग्रहक्क शाबीत करून साहित्यिकांनीं त्या मानपत्रांत केळकरांची अशी प्रशंसा केली आहे कीं, " आपली वाङ्मयसेवा सर्वांगीण व सर्वमान्य आहे. "

केळकरांचें साहित्य सर्वमान्य कां आहे, याची कारणमीमांसाहि या मानपत्रांत केलेली आहे. सदभिरुचि, औचित्य व प्रसाद या केळकरांच्या तीन लेखनगुणांचा गौरव या मानपत्रांत केलेला आहे. ' सात्त्विकपणा, उदात्तपणा, रंजकता, बोधपरता व ज्ञानसंग्राहकता हे अभिजात वाङ्मयाचे प्रधान गुण आपण निर्मिलेल्या वाङ्मयांत चहूंकडे दृष्टीस पडतात." असें स्तुतिस्तोत्र या " अष्टपैलु ग्रंथकाराचें " त्या मानपत्रांत गाइलेलें आहे.

## अखेरपर्यंत साहित्य-भक्ति

असे मानसन्मान घेत, त्यांत समाधान मानीत व कृतकृत्य झालों असें समजून केळकरांनीं १९३७ सालीं केसरी संस्थेचा-आणि त्याबरोबरच्च महाराष्ट्रांतील चाळीस पन्नास संस्थांचा-संबंध सोडला. अशी आपखुषीची निवृत्ति त्यांनीं स्वीकारली, तरी ते वाचन-लेखनांत आमरण सदैव गुंग असतच. पण या शेवटच्या आयुष्यांत त्यांची वृत्ति " आज मी अत्यंत समाधानाच्या मनःस्थितीत आहें, मन शांत आहे—हात जोडले आहेत—हांकेची वाट पहात आहे." अशी होती. ती हाक त्यांचे कानीं १९४७ च्या १४ नोव्हेंबर रोजीं आली. त्या रात्रीं मृत्यूवर दोन कविता करून शांत चित्तानें ते जे निजले, ते कायमचेच ! त्या दोन लहानशा कवितांतहि त्यांची तर्कशुद्ध विचारसरणी व अलंकारपूर्ण भाषासरणी यांचा सुंदर मेळ पडलेला दिसून येतो. ते श्लोक असे—

दिसो लागे मृत्यू परि न भिववूं तो मज शके ।
तयाच्या भेटीचें असत मजला ज्ञानचि निकें ॥
प्रवेशें रानीं जो धरुनिच शतघ्नी (=बंदूक) निज करीं ।
न भी तो वाघाला, परि हसुनि सुस्वागत करी ॥ १ ॥
मला जन्मा येतां तनुभरण—कार्या कणकण ।
दिलें पांचाभूतीं परत करणें तें निज ऋण ॥
तदाधारें सौख्यें सतत जगलों तें मज पुरे ।
तनु—त्यागाऐसा इतर अनृणा मार्गचि नुरे ॥ २ ॥

हातांत बंदूक घेऊन रानांत शिरणारा शिकारी वाघाला भीत नाहीं, त्याप्रमाणें सत्यज्ञान घेऊन मृत्यूच्या भेटीस केळकर सस्मित मुद्रेनें गेले. सौख्याचें जीवन जगून मग पांचा भूतांचा देह पांचाभूतांना त्यांनीं देऊन टाकला.

## वाङ्मयापासून आनंद कां ?

वाचकाला वाङ्मयापासून आनंद कां वाटतो याची मीमांसा केळकरांनीं बडोदें येथील साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केली. त्यांत ते म्हणतातः—

" आपली तर भूमिका सोडावयाची नाहीं, पण बसल्या बैठकींत इतर भूमिकांचाहि अनुभवानंद सेवावयाचा, ही गोष्ट प्रतिभाच घडवूं शकते. आपण नवरसांचेंच उदाहरण घेऊं. रसपूर्ण असें काव्य वाचतांना जो आनंद होतो तो आत्मौपम्यबुद्धीमुळेंच. कोणत्याहि रसाचा स्थायिभाव क्षणभर दुसऱ्याचा घेऊन आपलासा केल्याशिवाय रसप्रतीति होत नाहीं. प्रत्यक्ष आपली मुलगी सासरीं चालली असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण बोलतों तें आपणाला काव्य नव्हे तो आत्मभूमिकेवरचा एकेरी अनुभव. पण तेंच शाकुन्तलाच्या चौथ्या अंकांतील कण्वावरचा कन्या-विरहप्रसंग वाचीत असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण वाचतों, ते मात्र आपणाला काव्य किंवा वाङ्मय—कारण एथें एकाऐवजीं दोन भूमिका होतात. वाचक आपली भूमिका न सोडतां मनानें दुसऱ्या भूमिकेवर संक्रमण करतो व प्रतिभेनें अनुभव घेतो. म्हणून तें दुःख नसून रसास्वादाचा आनंद होय. खरी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय."

## साहित्यांतील जुळीं भावंडें

वाङ्मयांतील गद्य व पद्य यांचें साम्य व वैषम्य केळकरांनीं गद्य-पद्य या दोन्ही प्रकारांनीं वर्णिलें आहे. तें असें:—

" दोन जुळ्या भावंडांतील भेद दाखविण्यासारखेंच गद्य व पद्य यांतील भेद दाखविणें सोपें—किंवा अवघड—म्हणाल तसें आहे. गद्य व पद्य या जुळ्या भावंडांचें शब्दरूपी गोत्र तेंच. एकाच वाङ्मयरूपी कुळांत तीं जन्मलेलीं असतात. एकाच रसरूपीं आईबापांचे रक्तपिंड त्यांच्या अंगांत असतात. पण त्यांचे चेहरे, विशेषतः त्यांचे स्वभाव व गुण हे सारखेच असतात असें नाहीं. आणि त्यांचे पेहराव व नांवें तर वेगळीं असावीं लागतात. तसेंच गद्य व पद्य यांचेंहि आहे या जुळ्या भावंडांपैकीं गद्य हा मुलगा आहे व पद्य ही मुलगी आहे...कित्येक लेखक गद्यच इतकें सरस लिहितात, किंवा कित्येक लेखक पद्यच इतकें नीरस लिहितात की, संसारांत अनेक वेळां जें अनुभवाला येतें, त्याप्रमाणें दादाला अक्का व अक्काला दादा म्हटलें तर शोभेलहि."

## साहित्याचें मोजमाप

वाङ्मयाचें महत्त्व त्याच्या गुणावर हें तर उघडच आहे; पण त्याचें मोजमाप किंवा लांबीरुंदीहि विचारांत घेतली जाते, हा विचार केळकर किती खुमासदारपणें मांडतात पहा:—

" बावनकशीं सोनें झालें म्हणून एका कणाची किंमत एका चिपेच्या किंवा लगडीच्या किंमतीबरोबर होऊं शकत नाहीं. तेजाच्या दृष्टीनें दोन मोत्यांची बरोबरी झाली, तरी त्यांतल्या त्यांत जें मोतीं वजनानें अधिक चव भरेल तें किंमतीलाहि अधिक भरणार ! कोहिनूरच्या तोंडांत मारील अशा तेजाची एखादी हिरकणी असूं शकेल. पण 'तुझें वजन किती कॅरेट ? व कोहिनूरचें किती ?' असें विचारल्यास हिरकणीच्या गालावर लाजेची गुलाबी चमकलीच पाहिजे ! शुक्राच्या चांदणीचें आपण कौतुक करतों त्या मानानें सूर्यचंद्राचेंहि करीत नाहीं. पण एखादा पाणीदार लहान मुलगा पाहिला म्हणजे त्याचें कौतुक आपण करतों, त्यांतलाच हा प्रकार आहे.

शुक्राची टिकली व हाताच्या तळव्याएवढा तळपणारा पौर्णिमेचा चंद्र हे दोन डोळ्यापुढें आणून त्यांची तुलना केल्यास चंद्रालाच कोणीहि अधिक किंमत देईल. तुटक सुभाषितें वाङ्मयाच्या जातीचीं खरीं, पण समग्र ग्रंथ किंवा काव्य किंवा महाकाव्य यांच्या मानानें त्यांची किंमत क्षुद्रच ठरणार!"

## प्रतिभेचा गुण

सतत स्फुरण पावण्याचा गुण प्रतिभेच्या अंगीं पाहिजे, हें तत्त्व सांगतांना केळकर पुढील अलंकारपूर्ण वाक्यें लिहितातः—

" असा एकहि हतभाग्य मनुष्य झाला नसेल कीं, ज्याची प्रज्ञा एकाद्या ना एकाद्या वेळी तरी स्फुरण किंवा उन्मेष पावली नसेल. पण, त्याच प्रज्ञेला प्रतिभा म्हणतात कीं, जी प्रतिक्षणीं नवीन नवीन स्फुरण किंवा नवा नवा उन्मेष पावूं शकते. द्रौपदीच्या स्थालींतून एक वेळ जितकें अन्न निघे, तितकें अन्न एकदां केव्हां तरी निघणारी मडकीं घरोघर असतातच. पण, तीच द्रौपदीची स्थाली कीर्तिमान् कीं, जिच्यांतून सगळें अन्न काढून घेतलें, तरी ती पुनः फिरून पूर्वींप्रमाणें समृद्धच. प्रतिक्षणीं रेडियमच्या अंगांतून जितकी चित्शक्ति बाहेर पडते, तितकी शक्ति वीज भरलेल्या एकाद्या बॅटरींतून निघूं शकेल. पण ती बॅटरी लगेच फिरून नव्यानें भरावी लागेल. याच्या उलट रेडियमचा एक कण घेतला, तर तो इतका चित्शक्तिपूर्ण असतो कीं, तो ' अखंड–स्फुरण–गुणशाली ' असें म्हणतां येतें. "

## कला व नीति

साहित्य ही एक श्रेष्ठ कला आहे. तिनें जीवनाशीं किती संबंध ठेवावा? नीतीची मर्यादा किती पाळावी? हे वाद एके काळीं मराठींत फार गाजले. त्यांत केळकरांचें धोरण समतोल, मध्यमक्रमाचें म्हणजे ' सुवर्णमध्या 'चें असे. ते म्हणत, " कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलिस लावून दिला, तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. वाङ्मयाला नैतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा भात म्हणणें, हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत

कलेच्या दृष्टीनें निरनिराळे आकार बनविणें यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां तर तें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून, अथवा तीन तीन कमानीची जोडीच कां शोभते तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रह्मा-विष्णु-महेश्वराची आठवण होते म्हणून, असें म्हणणें बरोबर होईल काय ? ताजमहालाच्या पांढऱ्याशुभ्र दगडांत रंगीबेरंगी कुसर बसविली आहे, तिचा नैतिक हेतु शोधून काढणारानें ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरें. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवतो, तेव्हां त्याचा हेतु कलेच्या दृष्टीनें सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो, कीं नीतिबोध करण्याचा असतो ? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूनें नव्हे. शिकारी क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करतो, तो एक दिवस चांगलें मांस खावयास मिळावें म्हणून करीत नाहीं ! गवई दीपराग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वांचविण्यासाठीं नव्हे.''

केळकरांचा हा अनुकूल कौल मिळालेला पाहून एकादा कलासक्त माणूस त्यांना बिलगूं पाहील, तर लगेच केळकर त्याचा कान पकडून त्याला सुनावतील कीं, '' कलेमध्यें हीनत्वाचा दोष नसावा, कलेचा उद्गार क्षोभ-कारक नसावा. नीतीला निष्कारण नाक खाजविणारी कला नसावी, जिचा सामाजिक दुरुपयोग होण्याचा संभव आहे अशी कला-निर्मिति नसावी.'' हाच आपला अभिप्राय त्या कलावंताला कलात्मक शैलीनें सांगतांना केळकर म्हणतात, '' ( नवमताच्या ) पाहुण्यानें लक्षांत ठेवण्याची नाजूक गोष्ट म्हटली म्हणजे यजमानाच्या घरच्या पडतपोशीला त्यानें होईल तितकें संभाळलें पाहिजे. एकाच शब्दांत सांगावयाचें तर, नवमताच्या पाहुण्यांनीं सदभिरुचि सांभाळली पाहिजे.''

## उपमेंत हातखंडा

सभेचे अध्यक्ष, तसेच ग्रंथांचे प्रस्तावनाकार म्हणूनहि केळकरांनीं विक्रम केला आहे. या प्रस्तावनांत त्यांनीं आपले वाङ्मयविषयक विचार विखरून दिले आहेत. कोल्हटकरांच्या ' सुदाम्याचे पोहे ' या विनोदी ग्रंथाला

आपली गंभीर प्रस्तावना विसंगत दिसेल काय, अशी शंका आपणच निर्माण करून, तिचा परिहार करण्यासाठीं केळकरांनीं पुढील उपमांचा चौकडा सजविला आहेः—

" ज्या घाटाची मूर्ति त्याच घाटाची तिला बैठक—किंवा ज्या घाटाची तरवार त्याच घाटाची तिला मूठ शोभेल, इतर शोभणार नाहीं, हें खरें; पण विषम वस्तूंच्या संयोगानेंहि कित्येक वेळां जगांत कार्य साधण्यासारखें असतें. धनुष्यावरून सोडल्या जाणाऱ्या तीराचें तोंड म्हणजे लोखंडी फळ किती जड असतें, तथापि त्याचें पुच्छ म्हणजे पीस किती हलकें असतें! उलट पक्षीं, चवरीचा दांडा जड असतो पण तिचें कार्यकारीमुख केशमय अर्थात् हलकें असतें. " केळकरांचें सारें बळ उपमेंत असे. युक्तिवादासाठीं असो किंवा खंडनासाठीं असो, आनंद फुलविण्यासाठीं असो किंवा क्रोध व्यक्तविण्यासाठीं असो, केळकर शस्त्र उपसीत तें म्हणजे उपमेचें. ते एकाद्यावर खूष झाले तरी ते बहाल करणार उपमा, व दुसऱ्यावर संतापले तरी त्यावर उगारणार उपमाच! ' उपमा कालिदासस्य ' हें जितक्या अर्थानें संस्कृत वाङ्मयांत खरें आहे, तितकेंच मराठींत ' उपमा नरसिंहाची ' हें वचन सार्थ आहे.

केळकर इंग्लंडला निघाले, तेव्हां एके दिवशीं स्पेनचा किनारा त्यांना जहाजावरून दिसला. किनाऱ्यावरील डोंगरावर बर्फ पडलेलें होतें. डोंगराच्या माथ्यावर बर्फ पडलेलें त्यांनीं तें प्रथमच पाहिलें. तें पहातांच त्यांच्या बुद्धीला तीन उपमा सुचल्या. डोंगर काळा, बर्फ पांढरें हा विरोध दाखविण्यासाठीं त्यांना काळ्या शिव-पिंडीवरील पांढरीं फुलें आठवलीं, म्हाताऱ्या माणसाच्या डोक्यावरील पांढरे केस दिसले आणि......घरच्या बायकामुलांना कळेल अशी तिसरी उपमा त्यांना सुचली व तीच समर्पक म्हणून त्यांनीं दिली—" जसें कांहीं वांगीभाताच्या ढिगावर खिसलेलें खोबरें पसरलेलें आहे. "

आपल्या साठी—समारंभाला त्यांनीं दिलेली ' टाइपरायटर ' वरील 'घंटेची' उपमा अशीच समर्पक होती! " या घंटेचा नाद गोड असतो,

घंटा वाजल्यावरहि चारदोन अक्षरें लिहितां येतील इतकी जागा असते. यामुळें त्या मंजुळ घंटा–नादाला धोक्याचें–निदान सावधगिरीच्या सूचनेचें–स्वरूप येतें. ” असें केळकरांनीं त्या समारंभाचें वर्णन केलें.

## साहित्यिकांचीं शब्द-चित्रें

अशा विविध क्षेत्रांतील, चपखल बसणाऱ्या, समर्पक उपमा देण्यांत केळकरांचा हात अर्वाचीन लेखकांत कोणीच धरूं शकणार नाहीं. त्यांनीं ज्या शेंकडों प्रस्तावना लिहिल्या, त्यांत कोठें एकादा वाङ्मय-विचार तर कोठें एकाद्या वादाची चिकित्सा; कोठें नव्या-जुन्यांची तुलना तर कोठें साहित्य-प्रकारांची मीमांसा, कोठें परभाषांतील साहित्याची तोंडओळख तर कोठें स्वभाषेंतील साहित्यिकांची गंमतीनें काढलेलीं नखचित्रें–असा अजबखाना दिसून दृष्टि दिपते. गोविंदाग्रजांच्या काव्याचें स्वरूप वर्णन करतांना त्यांनीं पुढील विस्तृत दृष्टांत दिला आहेः—

“ गडकरी यांचें काव्य लक्षांत आणल्याबरोबर, आपण पहाडांत व जंगलांत हिंडत असून कड्यावरून बेधडक उड्या घेणाऱ्या उद्दाम जल-प्रवाहाचें पाणी मधून मधून पीत आहों, वाचा फुटलेल्या वृक्षलतांशीं व पशुपक्ष्यांशीं बोलत आहों, या दगडावरून त्या दगडावर उड्या मारीत आहों, क्वचित् भुतांसमंधाशीं गुजगोष्टी करीत आहों, क्वचित् दगडाखालीं टपून बसलेले वक्रोक्तीचे विंचू हंसतमुखानें आपल्या पायाला नांग्या मारीत असून ‘ हें दुःख सौख्य कीं झालें ’ या कव्युक्तीची आठवण करून देत आहेत, अंधार तर पडूं लागला आणि बाहेर निघण्याची वाट तर सांपडत नाहीं, अशा स्थितींत असतांहि आपण धाडसी प्रवासी आहों या जाणिवेनें मनाला धीर वाटत आहे असा भास होतो. ”

इतर कवींचींहि क्षण–चित्रें अंगुष्ठमात्र जागेंत त्यांनीं कशीं काढलीं आहेत पहा—

“ तांब्यांच्या कवितेची सगुण मूर्ति कल्पिली तर मला ती कडेवर मूल घेतलेल्या प्रौढ व प्रेमळ तरुणीप्रमाणें दिसते. केशवसुत यांची कविता मला

दांभणकांठी पंचा नेसलेल्या, कोरीव मिशांच्या, सुदृढ शरीराच्या, अस्सल चित्पावन ब्राह्मणाप्रमाणें दिसते. गिरीश यांची कविता मला, ब्राह्मण स्त्रीनें मुद्दाम गुरविणीचा वेश घेतल्याप्रमाणें दिसते. चंद्रशेखर यांची कविता या कानापासून त्या कानांपर्यंत आडवें गंध लावलेल्या शास्त्र्याप्रमाणें दिसते; टोंबरे यांची कविता झाडाच्या पल्लवांत लपून किलबिल करणाऱ्या पक्षाप्रमाणें मनोरम वाटते. माधव ज्युलियन यांची कविता बरींच वर्षें महाराष्ट्रांत राहिलेला पठाण आपल्या बरोबरीच्या स्त्रीशीं जसा बोलतो तशी वाटते. अत्रे यांची कविता म्हणजे आपल्या शेजारीं उभें राहून आपल्याला गुद्गुल्या करून क्वचित प्रसंगीं आपल्या डोळ्यांतून पाणी काढावयास लावणाऱ्या अस्वलाप्रमाणें आहे."

## कल्पकतेची कमाल

लो. टिळकांचें शब्द-चित्र रेखाटण्यांत व त्यांचें नातें कोंकणच्या जन्मभूमीशीं जोडण्यांत केळकरांनीं आपल्या कल्पकतेची कमाल केली आहे. टिळक चरित्राच्या प्रारंभींच केळकर लिहितातः—"कोंकणस्थ तांबूस व स्निग्ध मातीच्या तेजाचें अनुकरण टिळकांच्या डोळ्यांनीं केलें. समुद्रापासून त्यांनीं खोल स्वभाव व सर्वसंग्राहकपणा घेतला होता. समुद्राच्या बाहेर जितकी सृष्टि, तिच्याहून समुद्राच्या उदरांत अधिक सृष्टि असते असें म्हणतात. या न्यायानें टिळकांचेंहि अर्ध्याहून कमी असेंच राजकीय अंतरंग प्रकट होत असे. त्यांचें सर्व अंतरंग कोणींच जाणलें नाहीं! कोंकणच्या सह्याद्रि पर्वतापासून टिळकांनीं आपल्या आकांक्षांचा उत्तुंगपणा घेतला होता. कोंकणी खडकाळ कातळापासून त्यांना निश्चयी मनाचा कठोरपणा मिळाला होता. खडक फुटेल; पण टिळकांचा निश्चय ढळणार नाहीं याचा अनुभव सर्वांसच असे. कोंकणच्या किंचित् पित्तकर पण एकंदरीनें निरोगी अशा हवेचें अनुकरण त्यांच्या स्वभावानें केलें होतें. नारळाप्रमाणें त्यांच्या अंतरंगांतील गुणग्राहकतेचें व कृपेचें मधुर जल त्यांच्याशीं निष्ठापूर्वक वादाची टक्कर खेळणारासच अधिक मिळे; वरवर लोभाच्या किंवा हांजीहांजीखोरपणाच्या तोंडदेखल्या गोष्टी बोलणारास

प्रसाद-समर्पणाच्या बाबतींत ते टणकच होते. फणसाप्रमाणें त्यांची रीतभात करून खडबडीत होती. पण कांटेरी फणसांत जसे रसाळ गरे असतात, तसेच त्यांच्या पोटांत शिरणाराला सरळ युक्तिवाद व प्रेमळ भावना सांपडत असत. शेवटीं एकच अस्सल कोंकणी पदार्थ सांगावयाचा राहिला. व तें विहिरीचें रहाट-गाडगें !......लो. टिळकांच्या सर्वसंग्रहांतील मंडळीत रहाटाच्या मडक्यांप्रमाणें कोणांत कांहीं न्यून तर कोणांत कांहीं न्यून असें; पण त्यांनीं त्या सर्वांना आपल्या राजकीय वळणाच्या वळलेल्या जोरकस दोरावर बांधून त्यांच्याकडून ओंजळ ओंजळ पाणी, काय मिळेल तें, घेऊन त्यांतूनच राष्ट्रीय चळवळीचा अखंड जलप्रवाह निर्माण केला व देशकार्याचा मळा शिंपून घेतला."

## टिळक-गोखले यांचें वर्णन

एके ठिकाणीं केळकरांनीं टिळकांच्या गुणांची माला पुढीलप्रमाणें गुंफून दाखविली:—

"टिळक सद्वर्तनी होते, म्हणून त्यांच्या विद्वत्तेचें चीज झालें. ते विद्वान होते म्हणून त्यांच्या स्वार्थत्यागाचा उपयोग झाला. स्वार्थत्यागी होते म्हणून त्यांच्या उद्योगाचें चीज झालें. उद्योगी होते म्हणून पराक्रमाचें चीज झालें. पराक्रमामुळें धैर्याचें चीज झालें व टिळक स्वतः धैर्यवान् होते म्हणून लोकांना उपदेश करण्याची त्यांना पात्रता आली."

ना. गोखले हे लो. टिळकांचे प्रतिपक्षी. पण केळकरांना गोखल्या-विषयींहि ममत्व वाटे. त्यामुळें गोखल्यांचे दोष दाखवितांनाहि ते गुणाच्या स्वरूपांत त्यांनीं पुढीलप्रमाणें रंगविले आहेत. "त्यांच्या अंगीं धारिष्ट नव्हतें, पण धैर्य उत्तम प्रकारचें होतें. तीव्र मत-भेद-पात्रता होती, पण भांडखोर पणा नव्हता. शब्दांत गोडी किंबहुना मवाळी होती, पण त्यांनीं तोंड-देखलेपणा अगर तोंडपुजेपणा केल्याचें कोणासच माहीत नाहीं. वस्तुमात्रास होणारा त्यांचा शब्दस्पर्श मृदु होता, पण तत्वाला ते कठोर होते. त्यांनीं हातांत मखमलीचे हातमोजे घातलेसे वाटेल, तरी त्यांच्या आंत वळलेली मूठ

लोखंडी किंवा पोलादी असे. ते अत्यंत सुविनीत असत पण कोणासहि भिऊन वागत नसत. " अशा अनेकानेक स्वभाव-चित्रांचा आरसे-महाल टिळक-चरित्रांत केळकरांनीं उभारलेला आहे.

## साहित्य-सौंदर्याचें मूळ

केळकरांचें साहित्य इतकें सुंदर, इतकें आकर्षक व इतकें परिणामकारक कसें झालें ? याचें मूळ कारण म्हणजे स्वच्छ विचारसरणी. तर्कशुद्ध विचार ते करीत व प्रमाणबुद्ध रीतीनें तो मांडीत. तो मांडतांना जास्तीत जास्त सोपा करण्याची कोशीस ते करीत. अलंकाराचा किंवा माहितीचा साज-शृंगार नंतर. पण प्रथम भर सुगमपणावर. लोकशाहीचीं विविध स्वरूपें किती छोट्याछोट्या वाक्यांनीं त्यांनीं सांगितलीं आहेत पहा—" पाहावें तर बोलूनचालून राजा राज्य करतो. पण तोच जर राजा रामचंद्रासारखा म्हणजे लोकाराधनाविषयीं तत्पर असला, तर तो सत्ता-प्रकार राजशाहीचा म्हणावा कीं लोकशाहीचा म्हणावा ? अशाच रीतीनें नांव एक व अनुभव दुसरा असे इतर सत्ताप्रकार सांगतां येतील. राज्य नांवानें लोकांचेंच म्हणजे लोकशाहीचेंच. पण खरी सत्ता केव्हां मूठभर शहाण्यांच्या हातीं ! किंवा मूठभर बलिष्ठांच्या हातीं ! किंवा एखाद्या शिरजोर व्यक्तीच्या हातीं ! किंवा फक्त जन्मानें स्वतंत्र अशा सरसकट लोकांचे हातीं ! किंवा सरमिसळ श्रीमंतगरीब, शिष्टअशिष्ट, अभिजात किंवा उपरि, निरनिराळ्या वंशांच्या धर्मांच्या किंबहुना स्थानिक व परकीय अशाहि लोकांच्या हातीं ! "

## चटकदार प्रारंभ

' नामी सुरवात म्हणजे अर्धीअधिक मात ' हें युद्ध-तंत्र केळकरांनीं अचूक हेरलें होतें. सलामीलाच वाचकांचीं मनें जिंकण्यासाठीं ते आपल्या लेखाचा प्रारंभ चटकदारपणें करीत. कधीं भर्तृहरीचीं सप्त शल्येंच सांगतील, तर कधी एकादी म्हण वा कथा वा अलंकार यांनीं झोकदार आरंभ करतील. ' मराठे व इंग्रज ' हा ग्रंथ बोलूनचालून इतिहासाचा. पण त्याची सुरवात एकाद्या कादंबरीकाराप्रमाणें करून ते म्हणतात, " मराठा पाहून इंग्र-

जाला वाटलें असेल कीं, " मांडचोळणा, पायघोळ अंगरखा व विचित्र पगडी घालणारा हा कोणी तरी अर्धवट रानटी मनुष्य असावा. " उलट इंग्रजाची ती शिपतरी टोपी, तो अवाढव्य गळपट्टा व गोरा रंग पाहून मराठा मनांत म्हणाला असेल " कोण विचित्र ध्यान हें ! "

तसेंच 'भारतमातेची' बदनामी करणाऱ्या मिस् मेयोच्या पुस्तकावर तीन रागाचे टीका-लेख लिहितांनाहि प्रारंभीं केळकरांनीं असे गंमतीचे वाग्बाण सोडले आहेत कीं. " छापखानेवाल्यांनीं कागदाचे गठ्ठे सोडले, पुस्तकविक्र्यांनी पैशाच्या थैल्या सोडल्या, वाचकांनीं धीर सोडला आणि हें सर्व कशामुळें घडलें ? तर एका गोऱ्या कातडीच्या स्त्रीनें लाज सोडली म्हणून ! "

## बातमीपत्रांतहि काव्य !

आपल्या गद्य निबंधांत केळकर काव्य-कल्पनेचे बारीक बारीक सुवर्ण-कण अधूनमधून पसरून देतात. सिमला येथें ते विधिमंडळाचे सभासद म्हणून गेलेले. तेथील बातमीपत्रें त्यांनीं जीं पाठविलीं, त्यांत पुढील काव्य-सुंदर वर्णन येऊन गेलेलें आहे:—

" विजेची रोषनाई मात्र सिमल्याला भरपूर आहे. दुरून रात्रीं बच्च्या सिमल्याकडे पाहिलें म्हणजे हिरे-मोत्यांचीं ताटेंच्या ताटें भरून तीं लीलेनें वर उधळून द्यावीं असा दाट विखुरलेल्या विजेच्या दिव्यांचा लखलखाट दिसतो. आणि दूर बाजूच्या टेकड्यांवर पसरलेले तुरळक दिवे पाहिले, म्हणजे आपण एखाद्या मोठ्या बंदरांत उभे असून, समोर रात्रीच्या वेळीं समुद्रांत नांगरलेल्या शेंकडों आगबोटींचा काफिला पाहत आहों असा भास होतो. तारायंत्री तारांच्या जाळ्यांचा विस्तार पाहिला म्हणजे बिन-वापराच्या जागेंत कोळ्यांनीं केलेल्या विणकामाची आठवण होते ! "

## दरींतील पिंजारी

हिमालयाच्या या 'बच्च्या'च्या डोक्यावर ढग आलेले पाहून केळ-करांचें कवि-मन म्हणतें,

" पूर्वी गिरिशिखरांवरील बर्फ कपाळावरील भस्माच्या किंवा पांढऱ्या गंधाच्या पट्ट्यासारखें दिसे, त्या ठिकाणीं आतां पांढऱ्या–काळ्या ढगांची गर्दी पाहून या आद्य योगिराजानें स्नानानंतर वाळण्याकरितां जटांचा संभार विसकटून सोडला आहे असें वाटतें. हल्लीं हजारों आकार धारण करणाऱ्या पांढऱ्याशुभ्र ढगांचे लहानमोठे तुकडे दाही दिशांना खेळ मांडून धांवतांना पाहून मन प्रसन्न होतें. एखादे वेळी असा भ्रम पडतो कीं, या दरींत कोणी अदृश्य असा अवतारी पिंजारी इंद्रधनुष्यानें अभ्रमंडलाचा कापूस पिंजीत बसला आहे व त्यामुळें तलम पोकळ रुईच्या टिकाऊ चांदव्यांनीं सूर्य कायमचा झाकून जाणार ! "

अशीच कल्पकता बादशहांचे काका हिंदुस्थानांत आले असतांना त्यावर लिहिलेल्या लेखांत केळकरांनीं दाखविली आहे. ड्यूकसाहेबांचें कृत्रिम व भाडोत्री स्वागत कवडीमोल आहे हें दाखवितांना ते म्हणतात–

" लोकांनीं खऱ्या प्रेमानें केलेल्या स्वागत–समारंभाची गोष्ट कांहीं वेगळीच आहे. पैसा खर्चून सरकारला विजेचे वाटेल तितके दिवे लावतां येतील, पण पाहुण्याला पाहून प्रेम–कुतूहलानें स्त्री–पुरुषांचे ओंठ फुलून गेल्यामुळें आंतून झळकणाऱ्या शुभ्र दंतपंक्तींच्या चिराखदानाची शोभा हजारों विजेच्या दिव्यांनींहि येणार नाहीं. युनियन जॅकचीं निशाणें पैशाला पांसरीभर मिळूं शकतात, व तोरणें लावण्याकरितां ओरबडण्यास लागणाऱ्या वृक्षपल्लवांचीहि वाण या देशांत नाहीं. पण लोकप्रिय पाहुण्याला डोळाभर पाहून घेण्याकरितां जनतेच्या भुवयांनीं ज्या कमानी उभारल्या जातात तींच खरीं तोरणें ! "

## विरोधाभासाचें वर्णन

१९०८ सालांतील आंदोलनानें जनतेंत किती क्रांति झाली हें केळकरांनीं पुढील विरोधाभासात्मक वर्णनानें सांगितलें आहेः—

" मूक वक्त्यांना वाचा फुटली. आळशी बुद्धिवानांना सरस्वतीनें

आपल्या मयूरपिसांच्या स्पर्शानें गुदगुल्या करून लेखन-कलेचा अभ्यास करण्यास शिकविलें. कवीची दिव्य प्रतिभा स्फुरूं लागली. तिजोऱ्यांतून व बँकांतून डांबून ठेवलेल्या धनिकांच्या गूढ संपत्तीला परोपकारी पाय फुटले. भित्रे लोक धीट बनले. संगतीनें संशयात्म्यांचा संशय फिटला. मोठेपणा व कर्तृत्व ही वयावर अवलंबून नसून अंतःकरणाच्या तेजावर अवलंबून आहेत अशी भावना प्रगट झाली. मिसरूड न फुटलेलीं मुलें दाढीमिशा पिकलेल्या म्हाताऱ्याशीं कर्तेपणांत स्पर्धा करूं लागलीं. घातक व मारक साधनांचें कौतुक उत्पन्न झालें. आणि रिकामे हात प्रतिकारार्थ चाळा करूं लागले. ''

## जुनें व नवें पांडित्य

'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' या लेखमालेंत जुने शास्त्री व आजचा व्यवहार याविषयीं ते लिहितात—

"समाजांतील अष्टपैलू व्यवहारांत शहाणपणाच्या चलनी नाण्याची मोड पुष्कळशी लागते; तेथें चवल्यापावल्याच काय पण पैसा, पै व कवड्याहि लागावयाच्या. जसा पदार्थ भेटेल तशा योग्यतेचें नाणें दुकानदाराच्या अंगावर टाकायला लागतें. जुन्या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपण पुष्कळ असे खरें; पण तें सगळें मोहरापुतळ्या किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्यांच्याजवळ परचुरण नाहीं; आणि दुकानदारास तर त्यांची मोहोर घेऊन खपायची नाहीं व पचायची नाहीं. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीहि घेतल्याशिवाय हात हालवीत परत यावें लागणार ! बरें, भाजी मिळालीच तर अंगापासून केव्हांहि दूर न होणाऱ्या जरीकांठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबुवा ती घरीं आणणार ! "

इंग्रजी शिकलेल्या व नाना विद्यांची नुसती तोंडओळख झालेल्या नव्या पंडिताचें शब्द चित्र केळकर पुढीलप्रमाणें रंगवितात—

" गुलाबदाणीच्या कारंजांतून निघाल्याप्रमाणें आधुनिक विद्वानांच्या मुखांतून प्रसंगोपात्त विद्येच्या सहस्रधारा एकाच वेळेस स्रवत असून, शिवाय प्रत्येक धारेस निरनिराळाच सुगंध येत आहे. आधुनिक विद्वानांच्या ज्ञानाची लांबीरुंदी फार विस्तृत; पण त्याची खोली फार थोडी असते. वादाचा विषय बदलला असतां जुन्या पंडिताप्रमाणें त्याला पाण्याबाहेर काढून टाकलेल्या मत्स्यासारखें चुकल्या चुकल्यासारखें होऊन तो तडफड-णार नाहीं, कारण तो जलचर व स्थलचर म्हणजे उभयचर आहे खरा. बकाप्रमाणें तो जमीन असेल तेथपर्यंत चालेल व पाणी भेटतांच पोहूं लागेल, पण त्याची गति खोल पाण्यांत मात्र होणार नाहीं. यामुळें विद्यासमुद्राच्या तळाशीं बुडी मारून मोती वर आणणें हें त्याला दुष्कर होय. फार तर त्यानें सरस्वतीदेवीच्या क्रीडासरोवरांतील कमळांबरोबर उथळ पाण्यांत खेळावें, कोणताहि विषय तळहातावरील आवळ्याप्रमाणें त्याला चोहोंकडून दिसेल; पण आवळ्याच्या पोटांतल्या बीची कल्पना मात्र त्याला होणार नाहीं ! " खुद्द केळकरांच्या साहित्य-गुणांचेंच हें वर्णन नाहीं काय ?

## चटका लावणारी जादू

" हात लावला कीं सोनें " अशी किमया केळकरांपाशीं आहे. विषय कितीहि नीरस असो, रुक्ष असो; क्लिष्ट असो; अवघड असो; तो सोपा, सरळ, सुटसुटीत करून मांडण्याची त्यांची हातोटी कांहीं विलक्षण आहे. या सुबोधपणालाच चटकदारपणाचीहि जोड ते देत असतात. त्यांच्या विद्वत्तेला विनोदाचें अस्तर लावलेलें आहे. त्यांचा कल्पनामिश्रित बहुश्रुतपणा आणि विनोदमिश्रित रसिकता यामुळें त्यांचा कोणताहि लेख वाचकाच्या बुद्धीला गुदगुल्या करतो. चादण्या रात्रीं निवडुंगालाहि कमळाची शोभा यावी, त्याप्रमाणें व्याकरण, हुंडणावळ, इतिहास, इत्यादि कांटेरी विषय-सुद्धां केळकरांनीं मनोरम करून सोडले आहेत. सुबोधता व सरसता या दोन गुणांच्या पोटांत समतोल विचारसरणी, प्रमाणबद्ध मांडणी व बुद्धि-स्वातंत्र्याची तर्कशुद्धता हे गुण केळकरांनीं भरलेले आहेत. तर्कावर आधार-

लेली विद्वत्ता व विनोदांतून व्यक्त होणारी रसिकता हे त्यांचे गुण त्यांच्या कोणत्याहि लहानमोठ्या लेखांत दिसून आल्याशिवाय रहात नाहींत. त्यांनीं लिहिलेलें टिळक चरित्र, हास्य-विनोद–मीमांसा, मराठे व इंग्रज आणि तोतयाचें बंड हे चार ग्रंथ म्हणजे मराठी भाषेचें शाश्वत धनच होत.





# प्रिं. वा. म. जोशी : : : ११

महाराष्ट्राला प्रिं. आगरकर जसे आदरणीय, तसेच प्रिं. वा. म. जोशीहि. ह्या दोघांहि प्राचार्यांनीं शिक्षण–क्षेत्रांत तर नांव केलेंच, पण त्याशिवाय मराठी भाषेची व महाराष्ट्र–समाजाची सेवाहि मोठी केली. मराठी निबंधावर जसा आगरकरांचा ठसा उमटलेला आहे, तसाच जोशी यांचाहि आहे. मराठी वाचकांना तर्कशुद्ध विचार करण्यास ज्या थोड्या लेखकांनीं शिकविलें, त्यांमध्यें गोपाळराव व वामनराव ह्यांचें स्थान वरचें आहे. बुद्धिवादी विवेचन, डौलदार भाषा, मार्मिक विनोद व अष्टपैलू व्यासंग या गुणांची जोड मराठी भाषेला मिळवून देण्यांत आगरकर, केळकर व जोशी ह्या तिघांचा वांटा मोठा आहे. शुद्ध तर्कांबरोबर शेवट-

पर्यंत धावत जाण्यांत वामनराव कोणासच हार जाणार नाहीत. केवळ विचारांची धाव पाहिली, तर कांहीं कांहीं बाबतींत वामनराव आगरकरांच्याहि पुढें गेलेले दिसतात. काळाचा फरक हें एक त्याचें कारण असू शकेल, पण वामनरावांचा पिंडच मुळी तत्त्वज्ञान्याचा. शुद्ध, सोलीव तत्त्वज्ञानच त्यांना प्रिय. तार्किक दृष्टीनें, तात्विक भूमिकेवरून, एखाद्या भौतिक शास्त्रज्ञाप्रमाणें, ते निर्भेळ शुद्ध रीतीनें विचार करीत.

## दोन ऋषि !

" साधी राहणी व उच्च विचारसरणी " हें ब्रीद ज्यांनीं आमरण अखंड पाळलें, असे आगरकर व जोशी हे दोघे आधुनिक काळांतील ऋषिच होते. दोघेहि त्यागी व परोपकारी होत ! आगरकराचा कॉलेजांतील तो सुप्रसिद्ध एकच सदरा ! आणि स्वतःच्या "प्रेत-दहनार्थ " ठेवलेली ती तीस रुपयांची पुरचुंडी ! दारिद्र्याची ती निशाणी पाहतांच ना. गोखले यांना किती भडभडून आलें ! वामनरावांनीं तर किती तरी दिवस प्रत्यक्ष उपासमारींत काढले. एका जाहीर भाषणांतच ते म्हणाले, " वर्षानुवर्षे मी हा एकच काळा कोट घालीत आहें. तेव्हां माझें मन कांहींसें कष्टी होतें, पण तें लगेंच मला म्हणतें, ' अरे ! तुला एक तरी कोट आहे. पण ज्यांना एकहि कोट नाहीं असे लाखो-क्रोडो देश-बांधव या तुझ्या देशांत आहेत ना ?" ह्या चार वाक्यांत वामनरावांची साधी राहणी, मनुष्यमात्राविषयींची गाढ अनुकंपा, दोन्ही बाजूंनीं विचार करण्याची समतोल पद्धति, मनांतील भलेबुरे विचार प्रकट करण्याची प्रांजलता इत्यादि किती तरी गुण व्यक्त होतात, नाहीं ? तर्कशुद्ध विचार करण्यास, मानवप्रेमी सुजन बनण्यास व कोणत्याहि स्थितींत समाधानी रहाण्यास वामनरावांनीं महाराष्ट्रास शिकविलें.

## तर्कशुद्ध विचार

आगरकरांइतकीच सामाजिक सुधारणेची तळमळ वामनरावांना होती. पण आगरकरांच्या भाषेंतील जळजळीतपणा व एकांतिकपणा वामनरावांच्या लेखणींत नाहीं. तेज तेंच, पण रंगीत कांचेंतून बाहेर आल्यामुळें सौम्य

झालेलें. तत्वज्ञानाच्या रंगीत हंड्यांतून वामनरावांच्या विचारांची ज्योत आपलें तेज प्रगट करते. त्यांचीं मतें निश्चित होतीं. पण तीं ठामपणें सांगून वाचकावर लादणें हा त्यांना अत्याचार वाटे—बौद्धिक गुलामगिरी वाटे. म्हणून ते त्या मताच्या दोन्ही बाजू वाचकांपुढें सूक्ष्म—अतिसूक्ष्म चिकित्सा करून मांडीत आणि त्यांतून काय उचलावयाचें ह्याचा निर्णय करण्याचें स्वातंत्र्य वाचकांना देत. स्त्री-पुरुषांची समानता, जन्मजात उच्च-नीचता, ईश्वराचें अस्तित्व इत्यादि जे कूट—प्रश्न समाजापुढें दीर्घकाळ उभे आहेत, त्यांची छाननी आगरकरांनीं सेनापतीच्या आवेशानें केली आहे, तर वामनरावांनीं न्यायाधिशाच्या शांतपणानें केली आहे. निबंध असो, टीका असो, कादंबरी असो किंवा नाटक असो, सर्वत्र वामनराव हंसतमुखानें, हळुवार भावनेनें व चिकित्सक वृत्तीनें वाद करीत आहेत, विचार करावयास शिकवीत आहेत, नवीं नवीं तत्त्वें न कळत सुचवीत आहेत, बिकट समस्यांचा गुंता सहज सोप्या भाषेनें, हलके हलके, हंसत हंसत उकलून दाखवीत आहेत आणि सर्वांना उन्नत व प्रसन्न करून सोडीत आहेत, असेंच दृश्य डोळ्यांपुढें उभें राहतें. वैचारिक सचोटीची देणगी वामनरावांनीं महाराष्ट्राला मोठ्या प्रमाणावर दिली; आणि तशीच दुसरी देणगी म्हणजे सौजन्याची.

## अमर्याद सौजन्य

वामनरावांचें प्रत्यक्ष वर्तन इतकें सौजन्याचें असें कीं, त्याला सौम्य, मृदु, किंबहुना मवाळ असेंहि कांहींजण म्हणत. कांहींजण कशाला ? खुद्द वामनरावांनाच आपल्या सौजन्यपूर्ण स्वभावाच्या प्रिय बोलण्याचा कधीं कधीं दुरुपयोग होत आहे असें वाटे. ' स्मृति-लहरी ' या जवळ जवळ आत्मचरित्र असलेल्या आपल्या अखेरच्या कादंबरींत कांहींशा विनोदानें ते आपल्या जीवनाचें असें फिकें चित्र रंगवितात—" आपण कांहीं शिवाजी किंवा नेपोलियन आहों तर आपल्या आठवणी मोठमोठ्या प्रसंगांच्या असतील ? आमच्यासारख्यांच्या आठवणी क्षुल्लक गोष्टींच्याच असावयाच्या. आमच्यावर बिकट ' प्रसंग ' यायचे म्हणजे बेचव चहा पिण्याचे किंवा

अशाचसारखे किरकोळ; आमच्या लढाया रुसव्या बायकोशीं किंवा हट्टी पोरांशीं; आमच्या मोहिमांना माजघरांत आरंभ होऊन सैंपाकघरांतल्या रणक्षेत्रावर त्यांची अखेर व्हावयाची; सकाळीं महायुद्ध होऊन दुपारी दहा वाजतां जेवणाच्या वेळेस आमचा तह झाला, तरी उभय पक्ष संध्याकाळीं चहाच्या वेळेस शस्त्रास्त्रें काढण्यास कचरावयाचे नाहींत. त्यांतून आमच्या-सारख्या प्रोफेसरांच्या आयुष्यांत तर सारेच ' प्रसंग ' मिळमिळीत आणि पचपचीत. ''

## तळ्यांतील कमळ

वामनराव म्हणजे कोंकणच्या तळ्यांतील एक कमळ. माणगांव तालु-क्यांतील तळें ह्या गांवीं हें आठ पाकळ्यांचें सुगंधी श्वेतकमळ फुललें—१८८२ च्या जानेवारीमध्यें त्यांचा जन्म झाला. 'निबंधमालाकारांचा' अस्त ज्या वर्षी, त्याच वर्षी ह्या निबंधकाराचा उदय. त्यांचें प्राथमिक शिक्षण गोरेगांवी झालें. दहाव्या वर्षी वडील वारले. मोठ्या भावांनीं त्यांचें पुढील शिक्षण केलें. मराठी पांचवी यत्ता झाल्यानंतर वामनराव पुण्यास आले. नगरला तीन वर्षें त्यांनीं काढलीं. कारण त्यांचे बंधु तेथील हायस्कूलचे हेडमास्तर होते. त्या हायस्कुलमधून ते मॅट्रिकला बसले, पण त्यांना अपयश आलें. पुनः बसले आणि १९०० सालीं ते मॅट्रिक उत्तीर्ण झाले.

## स्वातंत्र्याची तळमळ

मॅट्रिकनंतर ते पुण्यास डेक्कन कॉलेजांत गेले. कॉलेजांतील सर्व परीक्षा ते दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाले. टेनिस खेळण्याचा त्यांना मोठा नाद. त्यांत त्यांनीं प्रावीण्यपदहि मिळविलें. शिवाय कॉलेजच्या मासिकांत ते मराठी, इंग्रजी लेखहि लिहीत. ''वामाक्षी'' ह्या एका शब्दावरून ''बाय-कांना उजव्या डोळ्यानें दिसत नाहीं'' ह्या नांवाची एक गमतीची गोष्ट त्यांनीं लिहिली. इंग्रजी निबंधाबद्दल त्यांना शंभर रुपयांचें बक्षीस मिळालें. एकदां कॉलेजचे युरोपिअन प्रिन्सिपल ह्यांच्याशीं बोलतांना वामनराव

स्पष्टपणें म्हणाले, "इंग्रजांच्या राज्यामुळें हिंदुस्थानचा मुळींच फायदा झालेला नाहीं. एक वेळ अराजकता पत्करेल, पण ब्रिटिश राजवटींतील ही शांतता व सुव्यवस्था आम्हांला नको." गांधीजींची १९४२ सालांतील ही भाषा वामनरावांनीं त्या टिळक-युगांत काढली आणि तीहि आपले वरिष्ठ असणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्याच्या तोंडावर! तर्कशुद्ध विचार-पद्धतीचें व तत्त्वनिष्ठ धैर्याचें हें वारें वामनरावांच्या सर्व जीवनांत ओतप्रोत भरून राहिलें होतें.

## स्वभावाचें पृथक्करण

महाविद्यालयांत वामनरावांचे आवडते विषय म्हणजे तत्वज्ञान, इंग्रजी, संस्कृत व गणित. इतिहास व भाषाशास्त्र ह्या विषयांचाहि व्यासंग ते करीत. १९०४ सालीं ते बी. ए झाले आणि १९०६सालीं एम. ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्या पदवीच्या चावीनें प्रोफेसरीचें कुलुप उघडणें तेव्हां सोपें होतें, पण वामनराव केवळ शिक्षक किंवा साहित्यिक नव्हते, समाज-सुधारक होते आणि राजकारणाचे उपासकहि होते. त्यांच्या स्वभावाचें व परिस्थितीचें बारीक पृथक्करण करून श्री. श्री. कृ. कोल्हटकर म्हणतात, " त्यांची राजकीय मतें, अध्यापकाच्या जागेस पाहिजेत तितकीं नेमस्तपणाचीं नव्हतीं. त्यांचीं मतें राजकीय व सामाजिक बाबतींत सारखींच जहाल असल्यामुळें संपादकीय खुर्चीवरहि त्यांचें आसन स्थिर झालें नाहीं. त्यांची बुद्धी सृष्टींतील गूढ तत्व-शोधनाच्या कामीं जितकी तीव्र आहे, तितकीच त्यांची कल्पनाशक्ति ही नूतन सृष्टी निर्माण करण्याच्या कामीं कुशल आहे. "

## राष्ट्रीय शिक्षक

योगायोग असा कीं पुण्याच्या वामनरावांना कोल्हापूरमध्यें कार्यक्षेत्र लाभण्याचा वाङ्निश्चय झाला कलकत्त्यांत. तेथें १९०६ सालच्या डिसेंबरांत राष्ट्रीय सभा भरली होती. तिला हजर रहाण्यासाठीं वामनराव गेले होते. त्यासाठींच कोल्हापुराहून प्रो. अण्णासाहेब विजापूर-

कर हेहि गेले होते. प्रो. विजापूरकर म्हणजे राष्ट्रीय शिक्षणाचे कट्टे पुरस्कर्ते. त्यांनीं त्या वर्षीच जून महिन्यांत कोल्हापूर येथें ' समर्थ विद्यालय ' काढलें होतें. त्या राष्ट्रीय शाळेंत शिक्षक म्हणून काम करण्यास अण्णासाहेबांनीं वामनरावांना बोलाविलें. वामनरावांनीं चटकन् होकार दिला. १९०७ सालीं हें विद्यालय पुण्याजवळ तळेगांव येथें नेण्यांत आलें. मालाकार चिपळूणकरांप्रमाणें विजापूरकरांनीं विद्यालय काढलें आणि तशीच एक ' ग्रंथमाला 'हि बारा वर्षें चालविली. त्यानंतर ' विश्ववृत्त ' नांवाचें एक मासिक त्यांनीं काढलें. त्याचे संपादक १९०८ सालापासून वामनरावच होते. विजापूरकर बाहेर दौऱ्यावर असत आणि वामनराव मासिकाचें सर्व काम पहात. संपादक म्हणून विजापूरकरांचें व सहसंपादक म्हणून वामनरावांचें नांव मासिकावर छापलें जाई. एका अंकांत पं. सातवळेकर ह्यांचा ' वैदिक प्रार्थनांची तेजस्विता ' हा लेख प्रसिद्ध झाला. त्याच अंकांत विजापूरकरांनीं बॉंबगोळ्यासंबंधीं एक स्फुट लिहिलें होतें. तो काळ पारतंत्र्याचा. त्यामुळें ते दोन्ही लेख राजद्रोह पेटविणारे व खुनास उत्तेजन देणारे आहेत असा आरोप सरकारनें ठेवला.

## कैदेची शिक्षा

वास्तविक तो लेखहि वामनरावांचा नव्हता आणि तें स्फुटहि वामनरावांचें नव्हतें, पण सरकारी दडपशाहीच्या जात्यांत ते जोरानें भरडले गेले. त्यांना ३ वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली. विजापूरकरांना ३ वर्षें साधी शिक्षा झाली. वामनराव काय किंवा विजापूरकर काय, दोघेंहि पापभीरु व सात्विक. त्यांच्यावर खुनाचा भयंकर आरोप ! तो ऐकून रागावण्याऐवजीं वामनरावांना हंसूच आलें. " आतां जगाच्या मूर्खत्वाकडे व दैवाच्या विचित्र लीलांकडे पाहून हमावयाचें नाहीं तर काय करावयाचें असा प्रश्न त्यांचें तत्वज्ञानी मन त्यांना करूं लागलें. जगांत भौतिक वादळाने किती तरी झाडें फळामुळासुद्धां उन्मळून खालीं पडतात, त्यांतलाच हा मानवी जगांतील प्रकार मानावा झालें " असें म्हणून त्यांचें विचारी मन समाधान पावलें.

## तुरुंगांतील कष्ट

कोल्हापूरच्या तुरुंगांत ह्या विद्वान कैद्याला कोणतें काम देण्यांत आलें ? तर 'दशकुमारचरित' ह्या संस्कृत ग्रंथाचें मराठींत भाषांतर करण्याचें. कांहीं महिने त्यांनीं तेथें काढल्यावर सरकारनें त्यांना दूर भिरकावून दिलें. सिंधमधील हैदराबादच्या तुरुंगांत त्यांना डांबण्यांत आलें. भिन्न प्रांत, भिन्न भाषा, भिन्न धर्म ह्यांच्या एकलकोंडेपणांत त्यांना फेकण्यांत आलें ! तेथें त्यांचे हाल नाना तऱ्हांनीं झाले. " हालअपेष्टा आणि अपमान ह्यांनीं एकेकाळीं निखाऱ्याप्रमाणें भाजलें असलें किंवा सुयांप्रमाणें टोचलें असलें तरी ते चटके, ते फोड, ती सूज, त्या जखमा, सगळें कांहीं गेलें आहे " असें म्हणून वामनराव आपल्या तुरुंगांतील हालअपेष्टांवर पडदा टाकीत. किंबहुना सिनेमांतल्या आगीच्या देखाव्याप्रमाणें " त्या हालांची आठवण सुखदायकच होते " असें ते सांगत. रॉकेलचा डबाभर धान्य ( २० शेर ) रोज वामनरावांना दळावें लागे. हें चक्की पिसण्याचें काम चालू असतां एक पठाण वॉर्डर त्यांना हव्या त्या शिव्या देई. पण त्याच्या हृदयांतील माणुसकीला वामनरावांनीं आपल्या सौजन्यानें पाझर फोडला. चरख्यावर लोकर कातणें, बुटाचे तळ करणें वगैरे कामेंहि वामनरावांना करावीं लागलीं. तुरुंगांतील ग्रंथालयांतून शेक्सपीअरचीं नाटकें आणून वामनरावांनीं वाचून काढलीं, बायबल वाचलें, कांहीं इंग्रजी कादंबऱ्याहि वाचल्या. शिक्षेचें माप कांठोकांठ भरल्यानंतरच वामनरावांची सुटका झाली. कोल्हापूरचें तिकीटहि काढून देण्यांत आलें, पण वामनरावांचें नशीब असें कीं, सुटका झाल्यानंतरहि त्यांच्याबरोबर असलेल्या एका पोलिसानें त्यांना एका खोलींत कोंडून यथेच्छ बडविलें. कारण काय ? तर निव्वळ गैरसमज. " थांबलास कां ? चालू दे ! " असें वामनराव शांतपणें त्या बडविणाऱ्या पोलिसाला म्हणत होते. शेवटीं त्यांची त्या मारांतून सुटका झाली.

## महिला विद्यापीठाचे प्रमुख

राजकीय कैद्यांचें आश्रयस्थान कोणतें ? तर लो. टिळकांचें ' केसरी कार्यालय. ' तेथें वामनराव गेले. ' मराठा ' ह्या इंग्रजी पत्राचे सहसंपादक

म्हणून त्यांनीं दोन वर्षे काम केलें. केसरींतहि कांहीं लेखमाला लिहिल्या. पुढें मुंबईच्या ' मेसेज् ' ह्या इंग्रजी दैनिकांत त्यांनी सहसंपादक म्हणून काम केलें. त्यानंतर स्थिर व्यवसाय हातीं असावा म्हणून वामनराव १९१८ सालीं प्रि. कर्वे ह्यांच्या ' अनाथ बालिकाश्रमास ' जाऊन मिळाले. त्या संस्थेचे ते आजीव सभासद बनले. सस्थेच्या " महिला विद्यापीठां ' त प्राध्यापक म्हणून ते काम करूं लागले. तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, इंग्रजी व मराठी हे विषय ते मौजेनें शिकवीत. ' अनाथ बालिकाश्रमाचे ' सुपरिंटेंडेंट व ' महिला विद्यापीठाचे ' प्रिन्सिपल ह्या अधिकार–स्थानावरूनहि त्यांनीं काम केलें. " तात्यां "चा तास म्हणजे विद्यार्थिनींना काव्यशास्त्रविनोदाची मेजवानीच वाटे.

## साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष

शाळा-कॉलेजांतील शिकविण्याचें काम करतां करतां वामनरावांनीं तत्त्वज्ञानाचे ग्रंथ व कादंबऱ्या रचल्या. त्यामुळें त्यांना मोठी लोकप्रियता व प्रतिष्ठा प्राप्त झाली. त्यांच्या साहित्य-सेवेचे चीज साहित्यिकांनीं १९३० सालीं केलें. त्या वर्षी गोव्यांतील मडगांव येथें साहित्य संमेलन भरलें. त्याच्या अध्यक्षपदाची माळ वामनरावांच्या गळ्यांत पडली. १९४३ सालीं त्यांच्या वयाला साठ वर्षे झालीं. म्हणून त्यांचा सत्कार पुणें, मुंबई, कोल्हापूर, नगर वगैरे शहरीं प्रेमानें झाला. त्यांनीं सेवानिवृत्त होण्याचें ठरविले. पण काळानें त्यांना ह्या जगापासूनच निवृत्त केलें. ता. २० जुलै १९४३ रोजीं हा सुजन साहित्यिक, तत्वज्ञ कादंबरीकार व त्यागी देशभक्त दिवंगत झाला.

## समतोल दृष्टि

समतोलपणा हा वामनरावांच्या निबंधाचा आत्माच म्हणतां येईल. विषय कोणताहि असो आणि त्याविषयीं आपलें मत कांहींहि असो, त्याच्या उलटसुलट दोन्ही बाजू यथास्थितपणें मांडणें हा वामनरावांचा मोठा गुण. या बाबतींत त्यांची बरोबरी एकटे तात्यासाहेब केळकर काय ते करूं शकतात.

केळकरांच्या लेखणींतील लालित्याचा डौल आणि कल्पकतेचा रंग वामनरावांच्या कलमांत कमी असेल, पण चिकित्सेच्या व समतोलपणाच्या बाबतींत वामनराव केळकरांनाहि हार जात नाहींत. "ज्ञान हें विष कीं अमृत?" हा त्यांचा साठ पानांचा एक लेख जरी कोणी वाचला; तरी वामनराव पूर्वपक्ष व उत्तरपक्ष किती कौशल्यानें करतांत हें सहज कळून येण्यासारखें आहे.

## ज्ञानाचा उच्च आनंद

'ज्ञानामुळें जगांतील काव्य नाहींसें होतें, धर्माचें व नीतीचें अधिष्ठान डळमळीत होतें, सद्भावनांच्या पाकळ्या चुरगळल्या जातात आणि धैर्य, क्रियाशीलता व देशाभिमान हे सद्गुणहि कमजोर होतात, किंबहुना धर्मविषयक ज्ञान अधर्मप्रवर्तक ठरतें, म्हणून ज्ञान हें रावणासारखें आहे. तें सौंदर्याचा, नीतीचा, चित्त–स्वास्थ्याचा छळ करतें' अशा आशयाचा पूर्व-पक्ष वामनरावांनी त्या निबंधांत, एखाद्या हुशार बॅरिस्टराप्रमाणें, केला आहे. तो वाचीत असतांना त्यांतील प्रत्येक विधान सामान्य वाचकाला पटतच जातें, इतकें तें युक्तिवादानें व पुराव्यानें बळकट करून मांडलें आहे. पण पुढील तीन लेखांकांत त्यांनीं जो उत्तर-पक्ष केलेला आहे; तो त्याहून खात्री पटविणारा आहे. ज्ञानवृद्धीमुळें काव्यानंदाची वाढच होते आणि धर्माला व नीतीला ज्ञान हें पोषकच आहे, हा वामन-रावांचा सिद्धांत सहज गळी उतरतो. जो ज्ञानाचा भुकेला आहे त्या जिज्ञासु जिवाला सगळें जग प्रश्नचिन्हांकित दिसतें, असें सांगून वामनराव म्हणतात, "फुलामध्यें ज्याप्रमाणें केसर लपलेले असतात, त्याप्रमाणें मानसिक व्यापारांत हरतऱ्हेचे प्रश्न लपलेले दिसतात......गुदगुल्याप्रमाणें किंवा बायकोच्या रागाप्रमाणें किंवा मित्रांनीं केलेल्या स्नेहगर्भ कुचेष्टेप्रमाणें, हे प्रश्न सुखकर, स्फुरणदायी, आकर्षक व उत्तेजक असतात. प्रश्न सुटल्यामुळें जें ज्ञान माणसाला मिळतें तें आनंददायी असतें. ज्ञानापासून होणारा उच्च सात्त्विक आनंद जो आहे, त्याची योग्यता फार मोठी आहे" असा निष्कर्ष वामनरावांनीं स्पष्टपणें वाचकांपुढें ठेवलेला आहे:

## मतांचा निश्चय

असे निःसंदिग्ध निष्कर्ष जेथें सांगण्यासारखे असतील, तेथें वामनराव सांगत असत. पण पुष्कळ वेळां तशीं निश्चित मतें सांगणें विचारी माणसाला शक्यच नसतें. “ भगवंताच्या स्वरूपाप्रमाणें सत्य हें अनेकांग आहे ” हा उदार विचार वामनरावांच्या मनांत सतत जागृत असे. त्यांनीं स्वतःच एकदां एका सभेंत विनोदानें असें सांगितलें होतें, “ आज मी माझें निश्चित मत सांगतों आणि तें हें कीं, जगांत निश्चित असें कांहींहि सांगतां येत नाहीं.” यांत थोडा विनोद असला, तरी सत्य बरेंच आहे. “ मी आणि माझीं पुस्तकें ” या विषयावर त्यांनीं एक नभोभाषण केलें होतें. त्यांत आपल्या विचारसरणीचें वर्णन करतांना ते म्हणतात, “ कांहीं प्रश्नांबद्दल निश्चित उत्तर देणेंच सध्यांच्या ज्ञानाच्या स्थितीत शक्य नाहीं. दुसरें उत्तर असें आहे की, कांहीं ठिकाणीं मीं आपलीं मतं सौम्यपणें दिग्दर्शित केलीं आहेतच. पण ठासून, आदळआपट करून, आरडाओरड करून जो सांगेल त्यालाच मतं आहेत आणि जो सूचित, दिग्दर्शित, ध्वनित करील त्याला मतं नाहीत, असं मानण्याची जगाची विपरीत रीत आहे. त्याविरुद्ध ओरड न करतां, अशी ‘ विपरीत रीत ’ आहे एवढंच सौम्यपणें सांगतों.”

## उदार विचार

पक्षांध प्रचारकाचा एकांतिक अभिनिवेश वामनरावांच्या लेखांत चुकूनसुद्धां सांपडणार नाहीं. त्यांच्या समतोलपणांतून विचारांचा उदारपणा उगम पावतो. “ पक्ष-भेद आणि पक्ष-द्वेष ” हा सत्तावीस-पानी लेख त्यांनीं १९१५ सालीं लिहिला. तो सुमारें चाळीस वर्षांनंतर आजहि आपल्या समाजाला मार्गदर्शक होण्यासारखा आहे; फार काय यापुढील चाळीस वर्षांनंतरसुद्धां तो तितकाच मार्गदर्शक ठरेल. ते म्हणतात, “आपलें मत कसेंहि असो, विरुद्ध पक्षाचें म्हणणें तरी काय आहे हें सहानुभूतिपर दृष्टीनें पाहणें फार श्रेयस्कर आहे. दुसऱ्याचें खरें हृद्गत कळल्याशिवाय त्याविषयीं खरा आदर वाटणार नाहीं व खरा आदर वाटल्याशिवाय खरा समेट होणार नाहीं. ”

" मतापेक्षां मनाकडे पहा, पक्षभेद असले तरी पक्षद्वेष करूं नका." अशी उदार शिकवण ते देतात. पण ते " दाटून उपदेश " करीत नाहींत. तो त्यांना वावडाच आहे. ते म्हणतात, " लेखकाचा खरा संदेश त्याच्या जीवनांत असतो, त्याच्या पुस्तकांत प्रतिबिंबित झालेल्या त्याच्या मनांत असतो. त्याचीं विशिष्ट मतें मला मान्य नसतील, पण मला त्याचं मन कदाचित् आदरणीय वाटेल. लेखकाचे विचार बरोबर असतील किंवा चूक असतील; त्या विचारांत त्याचा खरा संदेश नाहीं, तर त्याच्या विचार करण्याच्या पद्धतींत, त्या विचारांना आधारभूत असलेल्या आणि त्यांना प्रेरणा देणाऱ्या त्याच्या वृत्तींत, त्याचा खरा संदेश गर्भित असतो. मॅक्स-मुल्लरच्या उपपत्ति तज्ज्ञांना आतां संशयास्पद वाटत असतील, पण त्याची ४० वर्षांची अखंड ज्ञानपिपासेची तपश्चर्या हा त्याच्या जीवनाचा अलिखित संदेश कोण विसरेल ? टिळकांची उत्तर ध्रुवावरील आर्यांच्या वसतिस्थाना-बद्दलची उपपत्ति कदाचित् चूक ठरेल, पण फावल्या वेळांत विद्याव्यासंग चालू ठेवावा हा त्यांचा कधीं न दिलेला संदेश कायम टिकेल. त्यांची राजकीय धोरणें बरोबर होतीं का चूक होतीं हें भविष्यकाळ ठरवील; पण आपल्या ध्येयासाठीं तुरुंगासारख्या आपत्तींना धैर्यानें तोंड द्यावें हा त्यांच्या जीवनांतला गर्भित संदेश हाच त्यांचा खरा संदेश आणि तो मात्र नित्य सत्य ठरेल. असले संदेश कोणी देत नाहींत, पण घेतां येतात. कोणी सांगत नाहीं, पण समजतात."

राष्ट्रांत निरनिराळे पक्ष असणें स्वाभाविक आहे, किंबहुना अवश्यहि आहे. पण त्या सर्वांचा फायदा राष्ट्राला केव्हां होईल ? जर सर्व पक्षांच्या अनुयायांमध्यें समतोलपणा व उदारपणा येईल तेव्हां. त्या गुणांची शिकवण देतांना वामनराव म्हणतात, " शहाणपणाचा सर्व मक्ता आपल्याकडेच आहे, स्वार्थत्याग आपल्याच घरीं पिकतो, देशाभिमान आपल्या हृदयांतच स्फुरतो, राष्ट्राच्या प्रगतीची मख्खी आपल्यालाच ठाऊक आहे, इतर सर्वांनीं माझ्या मार्गानेंच चालावें, नाहींतर ते स्वतः खड्ड्यांत पडतील व देशाला रसातळाला नेतील, अशा प्रकारची भावना अस्वाभाविक व

अनिष्ट आहे. आपलीं मुलें आणि आपलीं मतें जशीं आपणाला प्रिय असतात, तशीं लोकांनाहि आपापलीं मुलें आणि मतें प्रिय असतात."

## कंसांत मजकूर कां ?

प्रत्येक प्रश्नाच्या दोन्ही बाजू पाहाण्याच्या या संवयीमुळें वामनरावांच्या लेखांत कंसांकित मजकूर पुष्कळ वेळां आढळतो. एकदां रँ. परांजपे यांनीं "श्री. देव" ( Mr. God. ) असा उल्लेख करून लोकांच्या भावना दुखविल्या. हा दोष समजला पाहिजे, असें आपलें मत वामनराव मांडतात न मांडतात, तोंच त्यांना परांजप्यांच्या त्या उल्लेखांतहि गुण दिसूं लागला. म्हणून वामनराव कंस करून लिहितात, "विचारांच्या दृष्टीनें निद्रिस्त झालेल्या लोकांना धक्का देऊन जागें करण्याचें काम कोणी तरी केलेंच पाहिजे आणि हें काम करणाराकडे वाईटपणा आला तरी दूरदृष्टीनें त्यानें समाजहित साधलेलें असतें हेंहि ध्यानांत धरलें पाहिजे." 'इंदु काळे व सरला भोळे' ही वामनरावांची पत्ररूप कादंबरी. तिच्यांतील स्त्रियांच्या पत्रांची भाषा स्त्री-सुलभ नाहीं. हा दोष त्यांनींच दाखविला. पण लगेच कंसांत ते म्हणतात, 'अलीकडे स्त्रियांच्या पत्रांची भाषा पुरुषी वळणाची होत चालली आहे असें माझें मत होत चाललें आहे." एवढें खंडन करूनच वामनराव थांबले नाहींत, तर त्या खंडनाचेंहि खंडन करण्यासाठीं ते लिहितात, "पण तें पूर्णपणें बरोबर नाहीं, हेंहि मी ओळखून आहें." केसाचे पापुद्रे किंवा साखरेच्या साली काढण्यासारखा हा चिकित्सकपणा कोणास निरर्थक वाटेल. पण सध्यांच्या समाजाला अशी चिकित्सक दृष्टी जितकी मिळेल तितकी पाहिजेच आहे, सध्याच्या समाजाची दृष्टी म्हणजे कोळशाच्या वखारींतील काटा !—शेर-अच्छेर इकडे काय अन् तिकडे काय ? पण वामनरावांची चिकित्सक दृष्टी म्हणजे सराफाच्या दुकानांतील ताजवा—एका केसानेंहि पारडें खालींवर व्हावें.

## मानव-धर्माचा संदेश

"विवेकाशीं आपण स्वयंवर केलें आहे. आपणांस विवेक-सहधर्मधारी व्हावयाचें आहे." हें वामनरावांच्या विचारांचें अधिष्ठान. त्यांच्या

निबंधांचे विषय तात्त्विक, सामाजिक व साहित्यिक असेच मुख्यतः असत. गीतेंतील 'योगक्षेम' म्हणजे काय ? कार्याकार्य–निर्णयाची कसोटी कोणती ? वगैरे त्यांचे तत्वज्ञानात्मक लेख त्यांच्या विचारांची सूक्ष्मता व व्यासंगाची व्यापकता दाखवितात. नवमतवादाविषयींचे त्यांचे सामाजिक विचार आजहि पुरोगामीच ठरणारे आहेत. " पूर्वसंस्कारारूढ वा. म. जोशी " आणि " नवमननारूढ वा. म. जोशी " असा भेदहि त्यांनीं एके ठिकाणीं केला आहे आणि आपले टोकाचे तात्त्विक विचार निःशंकपणें मांडलेले आहेत. सामाजिक किंवा राजकीय विषयांचें विवेचन करून वामनराव आपल्या वाचकाला मानवधर्माकडे वळवीत असतात. "मनुष्य परक्या जातींतला, धर्मांतला किंवा देशांतला ही वृत्ति नष्ट होऊन जो नीतिदृष्ट्या वाईट तो परका, आणि जो नीतिदृष्ट्या चांगला तो आपला, अशी वृत्ति बळावत चालली पाहिजे." अशी गुणलुब्ध मनोवृत्ति वामनरावांची होती. " मानवाभिमान " वाढीस लागला " तरच मानवजातींतील भांडणें, मारामाऱ्या आणि युद्धें–महायुद्धें बंद होतील, एरव्ही नाहीं." असें आपल्या अनुभवाचें व विचाराचें सार वामनरावांनीं वाचकांपुढें ठेवलेलें आहे.

## नीतीची प्रतिष्ठा

साहित्याच्या गंगा-प्रवाहांत वामनरावांनीं अशा चिकित्सेची जल-क्रीडा यथेच्छ केलेली आहे. कला व नीति या वादांत एखाद्या न्यायाधीशाप्रमाणें त्यांनीं आपलें मत निर्विकारपणें दिलेलें आहे. " कलेची नीति ही मोलकरीण नाहीं, त्या बहिणीबहिणी आहेत. कोणी क्षुद्र नाहीं, श्रेष्ठ नाहीं. त्यांची एकवाक्यता आहे. " असा तत्त्ववेत्त्याला शोभेसा निष्कर्ष वामनरावांनीं काढलेला आहे.

कला व नीति या कलहाचा कलकलाट जेव्हां फार माजला, तेव्हां दोन्ही हात उभारून वामनरावांनीं असा समतोल निर्णय दिला कीं, " कलेचा आणि साहित्यकलेचा मी भक्त असलों, तरी मी अनन्य भक्त नाहीं. मला केव्हांहि हें विसरतां येत नाहीं कीं, मनुष्याचा जन्म केवळ कलेचा आनंद लुटण्याकरितां नाहीं. कला नसेल तर मनुष्याच्या जीवनांत

तें मोटेंच वैगुण्य होईल, पण जीवन हें केवळ कलामय नाहीं. जीवनांत ज्या अत्यंत रम्य आणि वंद्य गोष्टी आहेत, त्यांत कलेबरोबर नीतीचा आणि सत्याचाहि समावेश होतो आणि यांचें जर एकमेकांत पटलें नाहीं तर जीवनांतली ती मोठीच आपत्ति म्हटली पाहिजे. जीवनांत कला नसेल तर तें बेचव, नीरस, कलाहीन होईल हें खरें,पण सत्य नसेल तर तें लुळें, आंधळे, पांगळें होईल, आणि नीति नसेल तर तें रोगट, कुजकें नासकें होईल.''

## सौंदर्य, सामर्थ्य, साधुत्व

कला-नीतीच्या वादांत व पुढें एका वैयक्तिक वादंगांत दोन मोठ्या साहित्यिकांची झुंज चालली असतांना, त्या दोघांहि मतंगजांना मागें खेचण्याचा अधिकार वामनरावांचा होता व तो त्यांनीं आपल्या सौजन्यपूर्ण रीतीनें बजावलाहि. अशा तात्त्विक प्रश्नांप्रमाणेंच साहित्यांतील वादाला नवीन नवीन ग्रंथ हेहि निमित्त होत. 'दुटप्पी कीं दुहेरी ?' 'शामसुंदर', 'प्रेम कीं लौकिक ?', 'सत्त्वपरीक्षा', 'भंगलेलें देऊळ', 'बंधनाच्या पलीकडे' इत्यादि पुस्तकांचें परीक्षण करण्याच्या निमित्तानें वामनराव वाङ्मयीन तत्त्वें वाचकांपुढें मांडीत. नाटक किंवा कादंबरी यांचें तंत्र काय आहे, याचें विवेचन अशा परीक्षणामध्यें ते सखोल रीतीनें करीत. साहित्यांत सौंदर्य हवें, सामर्थ्येंहि हवें, हें ते सांगत. पण साधुत्व अवश्य हवें यावर त्यांचा कटाक्ष विशेष.

''सत्य, सौजन्य व सौंदर्य यांची उपासना हेंच जीविताचें ध्येय आहे'' असें वामनरावांचें जीवित-विषयक तत्त्वज्ञान होतें आणि साहित्य हें जीवनाशीं निगडित असावें असें त्यांचें मत होतें.: '' सरस्वतीची भक्ति करूं पाहणाऱ्यानें स्वतःस केवळ सारस्वतांत गुरफटून घेऊं नये '' असा उपदेश करून वामनराव साहित्यिकांना संदेश देतात कीं, '' आपण वाङ्मय–भक्तांनीं वारुळांतल्या मुंग्याप्रमाणें शब्द–क्षेत्रांतच डोकें खुपसून शाब्दिक वारूळ निर्माण करण्यापेक्षां सत्यान्वेषणाच्या, सौजन्यपोषणाच्या व सौंदर्योपासनेच्या बाबतींत पौरुष, तेज, स्वतंत्रता, नवनिर्मिति, कुशलता इ. गुण दाखविले, तर आपण सरस्वती–मातेला प्रिय होऊं. ''

## आत्म-शांतीचा झरा

सौजन्यावर वामरावांच्या लेखणीचा मुख्य भर. " कोणतेंहि शारीरिक किंवा मानसिक कौशल्य अथवा पाटव घ्या; सौजन्याचा त्याला आधार नसेल, तर त्याची रमणीयता किंवा आश्चर्यकारकता इंद्रधनुष्याप्रमाणें पोकळ समजावी. " याचें कारण वामनरावांनीं असें दिलें आहे कीं, "या रमणीयतेमध्यें आत्मा प्रसन्न करण्याचें सामर्थ्य नाहीं !......जे कांहीं करावयाचें तें केवळ सर्वांत अधिक सुखकर असून उपयोगी नाहीं, तर त्या योगानें अंतरात्मा संतोष पावला पाहिजे, प्रसन्न झाला पाहिजे. सौजन्यानें आत्मा प्रसन्न होतो, दुसऱ्या कशानें नाहीं. " वामनराव विद्वान होते आणि विद्वत्तेचे मोटे भक्तहि होते. पण, " तुम्हांला विद्वत्ता हवी कीं सुजनता हवी ? " असा प्रश्न त्यांना कोणी केला असता, तर त्यांनीं सुजनताच स्वीकारली असती हें खचित. कारण " सौजन्य हें आत्म्याचें उत्तमांग गणले पाहिजे" असें त्यांचें ठाम मत होतें; ते निश्चितपणें सांगतात,

" विद्वत्त्वाचा व सौजन्याचा संबंध कसाहि असो, सौजन्यविरहित विद्वत्त्व आत्म्याला शांति देत नाहीं. पण विद्वत्त्वरहित सौजन्य आत्म्याला शांति देऊं शकतें, असें म्हणण्यास कोणतीहि हरकत नाहीं. आत्मिक शांतीला जसा सौजन्याचा आधार, तसा सौजन्याला नीतिमत्तेचा आधार आणि या नीतिमत्तेला आधार मानवप्रेमाचा. " या मानवी प्रेमाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून वामनरावांनीं आईची माया सांगितली आहे. तिचें सामर्थ्य वर्णन करतांना ते लिहितात, " माता ज्या बुद्धीनें मुलाचे लाड पुरविते, ती बुद्धि त्याच्या अंतरात्म्याच्या अंतरात्म्याला जाऊन भिडते व तेथे प्रेमाचा झरा उत्पन्न करते. हा प्रेमाचा झरा विद्वत्तेच्या किंवा सदुपदेशाच्या कठोर कुदळीनें खणून किंवा मारहाणीचे सुरुंग लावून अंतःकरण-क्षेत्रांतून काढतां येत नाहीं."

## पौरस्त्य व पाश्चिमात्य ज्ञान

तात्त्विक चिकित्सा अलंकारिक भाषेनें सजवून व सोपी सोपी करून मांडण्याची वामनरावांची हातोटी कांहीं असामान्य आहे. या त्यांच्या अलौकिक गुणांचा उत्कर्ष " नीति–शास्त्र–प्रवेश " या ग्रंथांत दिसून येतो.

" प्रवेश " असें विनयाचें नांव या ग्रंथास वामनरावांनीं दिलेलें असलें, तरी त्याचें स्थान मराठी निबंध–ग्रंथांत वरचें आहे. " अफाट सागरांत जाण्याकरतां नदीमुख जसें जलचरांना उपयोगी पडतें, त्याचप्रमाणें नीति-शास्त्र–सागरांत अवगाहन करूं पाहणाऱ्या जिज्ञासूंना आपण उपयुक्त व्हावें, एवढीच या प्रवेश-ग्रंथाची महत्त्वाकांक्षा आहे." अशी नम्रतेची भूमिका ग्रंथकारानें स्वीकारलेली आहे. पण या ग्रंथांत भारतीय व पाश्चात्य अशा दोन्हीं तत्त्वज्ञानांचा संगम किती सुंदर झालेला आहे याची साक्ष अनेक विद्वानांनीं दिलेली आहे. " रा. जोशी यांनीं आपल्या वाङ्मयांतील नीति-विषयक कल्पनांच्या हिरकण्यांना युरोपांत तयार झालेल्या शास्त्रीय पद्धति-रूपी कोंदणाच्या मराठी साच्यांत बसवून दिलें आहे." असा गौरव प्रिं. भाटे यांनीं प्रस्तावनेंत केला आहे. आणि प्रा. रामभाऊ रानडे यांनीं तर " या ग्रंथाची स्तुति करावी तितकी थोडीच होणार आहे " असें म्हणून स्तुतीची सीमाच गांठली आहे ! " रा. वामनराव जोशी यांचा तत्त्व-ज्ञानाचा अभ्यास, त्यांची लिहिण्याची शैली, ज्या गोष्टी व जे विचार आजपर्यंत मराठी भाषेंत प्रगट झाले नव्हते, ते प्रगट करण्याची त्यांची हातोटी, या सर्व गोष्टींबद्दल ते सर्व लोकांच्या आदरास पात्र आहेत." अशी प्रशंसा श्री. रानडे यांनीं केली आहे.

## सुगम केलेलें तत्त्वज्ञान

या ग्रंथांत धर्मनिष्ठा व नीतिनिष्ठा यांतील फरक आरंभीं सांगून वामन-रावांनीं साधुत्त्व, सौंदर्य आणि सत्य यांची मीमांसा केली आहे. नीतीचा देह कोणता व आत्मा कोणता? नीतिदृष्ट्या चांगलें–वाईट कशाला म्हणावयाचें? कार्याकार्य ठरविण्याची कसोटी कोणती? आत्मस्वातंत्र्य, आत्म्याचें अमरत्व–इत्यादि प्रश्नांची सूक्ष्म छाननी सुगम भाषेंत या ग्रंथांत केलेली आहे. ज्ञानाचा विकास झाला म्हणजे भिन्नभिन्न शास्त्रें अस्तित्वांत येतात, हें त्यांनीं किती सुंदर दृष्टांतानें सांगितलें आहे पहा. " लहानशा केळीच्या अंकुरामध्यें एका अर्थीं केळीचीं पानें, केळफुलें व केळीं सुप्त असतात; पण त्या वृक्षाचा बराच विकास झाला म्हणजेच हीं विशिष्ट अंगें

भेदरूपानें दिसूं लागतात. त्याचप्रमाणें मनुष्यजातीच्या ज्ञानाचें जसजसें विकसन होत जाईल तसतसे भिन्नभिन्न शास्त्रांचे कळे त्याला लागतील."

## धर्मनिष्ठेचें स्वरूप

" धार्मिक " कोणास म्हणावें ? याचा ऊहापोह वामनरावांनीं खूपच केला आहे. शेवटीं ते सांगतात, " सदय, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल ज्यास संशय राहिलेला नाहीं, जगांत ज्या गोष्टी होत आहेत त्या सर्व ईश्वरेच्छेनें होत आहेत व त्या सर्व एकंदरींत हितपरिणामी आहेत अशी ज्याची श्रद्धा आहे किंवा असा ज्याचा युक्तिवादानें वगैरे निश्चय झालेला आहे, तो केवळ नीतिनिष्ठ नव्हे, तर तो धर्मनिष्ठहि आहे असें समजावें. "

ही धर्मनिष्ठा सक्तीच्या उपदेशानें निर्माण करतां येत नाहीं; प्रत्यक्ष उदाहरणानेंच ती पाहणाराच्या अंगीं बिंबते. हा सिद्धान्त मांडतांना वामनराव म्हणतात, " धार्मिक शिक्षण देण्याचा मुख्य मार्ग म्हणजे धर्मनिष्ठ शिक्षकाचें उदाहरण मुलांच्या नजरेसमोर नेहमीं ठेवणें हा होय... धर्मनिष्ठा ही पुष्पाच्या सुवासाप्रमाणें दुरूनहि हृदयाला हलवूं शकते. नाकांत किंवा घशांत फूल कोंबल्यानें त्याचा वास नष्ट मात्र होतो, तशीच गोष्ट धर्मनिष्ठेचीहि आहे "

## सर्वांगीण आत्म-विकास

मनुष्याचा सर्वांगीण आत्मविकास कसा होऊं शकतो याची साधक-बाधक चर्चा करून वामनरावांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं," सत्कर्में जेव्हां ज्ञानपूर्वक व भक्तियुक्त अंतःकरणानें करावींत; जेव्हां भावना उत्कट, उत्साहपूर्ण, शुद्ध, व सात्त्विक असतात आणि मनुष्य त्यांना वश झालेला नसतो; जेव्हां फलासक्ति तर नसते, पण सत्कर्म करण्याविषयींचा उत्साह कायम असतो आणि तें करतांना घ्यावी लागणारी काळजी घेण्यांत कसूर मुळींच नसते; जेव्हां कर्म करताना कर्त्याला ओझें वाटत नाहीं, तर उलट त्याचें मन प्रसन्न असतें; आणि जेव्हां मनाच्या प्रसन्नतेला सत्संगति–सुखाची जोड मिळते, तेव्हांच मनुष्याच्या आत्म्याचें सर्वांगांनी विकसन होतें व तेव्हांच त्याचें खरें, सर्वांत शुद्ध, सात्त्विक, उदात्त, सुंदर स्वरूप दृष्टोत्पत्तीस पडतें."

## मनुष्याचा विकास

मनुष्य आणि सृष्टी यांच्यामध्यें द्वैत कसें आहे हें वामनरावांनीं कांहीं उदाहरणें देऊन दाखविलें आहे. तें म्हणतात, " सृष्टि बलिष्ठ खरीच; पण मनुष्य कांहीं कमी नाहीं. तो सृष्टीलाहि कित्येक वेळां वाकावयास लावतो. सृष्टीनें मच्छर केले, तर तो मच्छरदाणी करतो. सृष्टि विजा पाडून घरांचा नाश करते, तर तो कडकडणाऱ्या विजेलासुद्धां हलक्या हातानें घराच्या बाजूला सारून जमिनींत गाडून टाकतो. सृष्टि दुष्काळ पाडते, पण मनुष्य दयार्द्र अंतःकरणानें गुराढोरांचे व गोरगरीबांचे प्राण वाचवितो. सृष्टि भांडावयास व आपल्याच पोळीवर तूप ओढण्यास शिकविते; पण मनुष्य तिचें न ऐकतां आपल्या बांधवांशीं सहकारितेनें वागतो व दुसऱ्यांना यथाशक्ति साहाय्य देतो. "

हें द्वैत नष्ट कसें होऊं शकतें आणि मानवाला अद्वैतानंदाची प्राप्ति कशी होते याचें विवेचन ग्रंथकारानें बारकाईनें केलें आहे. " नीतिचर्चा कर्मप्रवृत्तीला विघातक नाहीं, तर ती उलट संसाररूपी रथ भलत्या मार्गानें जात असल्यास तो सत्पथावर आणण्याला साहाय्यभूत होते, असा अनेक लोकांचा अनुभव आहे. नीतिशास्त्राच्या दीपाचा कार्याकार्यविमूढ झालेल्या लोकांना मोहान्धकारांत किती तरी उपयोग झालेला आहे. किती तरी लोकांना या शास्त्रानें योग्य मार्ग दाखवून अध्यात्म्याच्या शांत उद्यानांत नेऊन सोडलें आहे. " अशी फलश्रुति वामनरावानीं आपल्या ग्रंथाची सांगितली आहे.

## ज्ञान-निष्ठा व सत्य-निष्ठा

असा अपूर्व व विचारपूर्ण ग्रंथ लिहिला, तरीसुद्धां वामनरावांच्या मनाची नम्र व निराग्रही बैठक कधींच सुटली नाहीं. या ग्रंथाचे शेवटीं त्यांची ही बैठक पुढील शब्दांनीं प्रगट झाली आहे. " हेतु हा, कीं, कित्येकांच्या विचारांत जो मला घोटाळा दिसून आला, तसा घोटाळा एखाद्या अप्रबुद्ध वाचकाचा होत असल्यास त्याला विचार करावयाला लावावें. त्यानें माझ्या पक्षाला यावें, असें माझें म्हणणें नाहीं; कारण मला पक्षच नाहीं ! त्यानें विचार करावा, एवढीच माझी इच्छा. "

विचारांचा घोटाळा काढणें, जीवनांतील कोडीं उलगडून दाखविणें आणि आयुष्याला योग्य दिशा लावून मनःशांतीचा मार्ग मोकळा करणें हें तत्त्वज्ञानी माणसाचें कार्य वामनरावांनीं आयुष्यभर आपल्या वाणीनें व लेखणीनें केलें. तें करीत असतांना त्यांचा बाणा असा कीं, " ज्ञानापासून आनंद व मोक्ष ( म्हणजे स्वतंत्रता ) प्राप्त होतो हें तर खरेंच, पण ती प्राप्ति न होतां, ज्ञानापासून नरक मिळणार असला, तरी मीं ज्ञानाचीच वाट धरीन. जरूर तर मी नरकांत जाईन पण सत्याची कास सोडणार नाहीं. " ज्ञाननिष्ठा व सत्यनिष्ठा यांचा प्रसार शुद्ध स्वरूपांत करणारे वामनरावांसारखे लेखक मराठींत विरळाच ! कोणाचीहि भूमिका तुम्ही बरोबर समजावून घेतली कीं, त्याला तुम्ही क्षमाच कराल ( To Understand all is to forgive all ) हा त्यांचा जीवन-मंत्र होता. तो समाजांत सहिष्णुता, ऐक्य व प्रेमभाव निर्माण करण्यास समर्थ आहे. ज्ञानाचा प्रकाश व सौजन्याची माधुरी यांचें सिंचन महाराष्ट्र-भूमीवर सतत आमरण करणारे वामनराव श्रेष्ठ होत !






# 'संदेश' कार कोल्हटकर : : १२

काश्मीर म्हणजे सृष्टिसौंदर्याचें आगर! चारी बाजूंनीं उभे असलेल्या बर्फाच्छादित पर्वतांच्या कोंदणांत तेथें असें एक अद्‌भुत् व रमणीय सरोवर आहे कीं, त्याचे चमचमणारे रंग एका दिवसांत पांच वेळां बदलतात आणि ते पांची रंग एकापेक्षां एक मनोहर असतात. तशीं रम्य स्थळें मराठी साहित्यांत ज्या दोनचारच लेखकांनीं निर्माण केलीं आहेत, त्यांत श्री. अच्युतराव कोल्हटकर यांची गणना होते. देशाभिमान, धर्माभिमान भाषाभिमान व स्वातंत्र्याभिमान या उत्तुंग व धवल पर्वतांच्या चतुःसीमेंत साहित्याचें सुंदर सरोवर जसें प्रा. शिवरामपंत परांजपे यांनीं निर्माण केलें, बॅ. विनायकराव सावरकर यांनीं उत्पन्न केलें, तसेंच 'संदेश'कार

श्री. अच्युतराव कोल्हटकर यांनीं अस्तित्वांत आणलें. विसाव्या शतकांतील हे तिघे गद्यकविच ! आणि तेहि अशा तेजःपुंज प्रतिभेचे व तरल कल्पकतेचे कीं, इतर मी मी म्हणणाऱ्या कवींनीहि त्यांच्यापुढें आदरानें मान लववावी ! काव्य म्हणजे काय ? तर प्रतिभेचा विलास. आणि प्रतिभा म्हणजे काय ? तर प्रतिक्षणाला नवीन व रम्य सृष्टि निर्माण करणें. प्रतिक्षणाला नसली तरी प्रतिदिनाला अशी नवता, अशी चारुता अच्युतरावांनीं आपल्या ‘ संदेशां ’त ओतली आणि मराठी वाचकांना वेड लावलें !

## राष्ट्रपिता हाच पिता !

रा. ब. वामनराव कोल्हटकर हे न्यायाधीश होते. ते अच्युतरावांचे वडील, पण अच्युतरावांचा स्वदेशाभिमान इतका जळजळीत कीं, सरकारी नोकरींत राबणाऱ्या, मवाळ पक्षाकडे झुकणाऱ्या व लो. टिळकांचा द्वेष-तिरस्कार करणाऱ्या आपल्या पित्याचें नांवहि त्यांनीं फेकून दिलें आणि ‘ राष्ट्रपिता ’ असलेले लो. टिळक यांचें नांव आपल्या पितृस्थानीं घालून “ अच्युत बळवंत कोल्हटकर ” या नावानेंच ते जगल व मिरविले. वाई येथें ता. १ ऑगस्ट १८७९ रोजीं अच्युतरावांचा जन्म झाला. लहानपणापासून श्रीसमर्थ रामदासस्वामी व श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांच्यावर त्यांची मनस्वी भक्ती. समर्थांचा दासबोध, करुणाष्टकें वगैरे वाङ्मय त्यांनीं तोंडपाठच केलें. ते बखरींतील स्फूर्तिदायक उतारे पाठ करून ते घडघडा म्हणून दाखवीत. वक्तृत्वाचे अंकुर लहानपणापासून त्यांच्या ठिकाणीं दिसूं लागले. बुद्धि इतकी चपळ कीं, वयाचे पंधराव्या वर्षी १८९४ सालीं ते मॅट्रिक झाले. महाविद्यालयाच्या एकएक पायऱ्या झपाझप चढून ते १९०४ सालीं एल् एल्. बी. झाले. त्यावेळीं लो. टिळकांच्या कर्तृत्वाचा सूर्य माध्यान्हावर येत होता. त्यांच्याप्रमाणेंच आपणहि तेजस्वी राजकारण करावें असे विचार अच्युतरावांच्या मनांत घोळूं लागले. पण त्यांना सातारा येथें दोन वर्षे शिक्षकी करावी लागली आणि नागपूर येथें तीन वर्षे वकिलींत घालवावीं लागलीं.

## संपादकाच्या गादीवर

वकिली करतां करतांच नागपूरच्या ‘ देशसेवक ’ पत्रांत ते लेख लिहूं लागले आणि १९०६ सालीं तर ते त्याचे संपादकच बनले. त्यावेळीं जहाल व मवाळ या पक्षांचें युद्ध ऐन भरांत आलें होतें. त्या धुमश्चक्रींत १९०७ सालीं सुरत येथें कॉंग्रेसची दोन शकलें झालीं. कॉंग्रेसचींच काय, पण घराघरांचीहि शकलें झालीं. एकाच घरांत बाप मवाळ पक्षाचा, तर मुलाचा ओढा जहाल पक्षाकडे. खुद्द अच्युतरावांच्याच घरांत हा पितापुत्रांचा संग्राम चालू झाला. त्याचा शेवट म्हणजे त्यांनीं वडिलांचें नांव टाकलें आणि टिळकांचें नांव घेतलें. नुसतें नांव घेतलें नव्हे, तर टिळकांच्याच झेंड्याखालीं उभें राहून, त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून, त्यांच्याच धैर्यानें, त्यागानें व कष्टानें स्वराज्याच्या संग्रामांत भाग घेतला.

## देशभक्तीच्या धारेवर

१९०८ सालीं लो. टिळकांना सहा वर्षांची शिक्षा झाली. त्यांचे शिष्य अच्युतराव यांनाहि पावणेदोन वर्षांची सजा झाली त्यावेळीं त्यांचा तुरुंगांत अनन्वित छळ झाला. त्यांच्या शरिरांतून रक्ताच्या चिळकांड्या बाहेर पडल्या. हाडें पिचून टाकण्याइतके कष्ट त्यांना करावे लागले. बैलाप्रमाणें त्यांना तेलाच्या घाण्यास जुंपण्यांत आलें. गोणपाटाच्या कपड्यांत त्यांना रहावे लागलें. तथापि राष्ट्रदेवतेचें स्मरण करीत, स्वातंत्र्याचा मंत्र जपीत, लो. टिळकांचें गुरु-चरित्र आठवीत त्यांनीं त्या नरक-यातनाहि आनंदानें सोसल्या आणि शिक्षेचा काळ आशेनें कंठला. शिक्षा भोगून ते तुरुंगाबाहेर आले तेव्हां लोकांनीं त्यांचा केवढा जयजयकार केला! प्रति-‘लोकमान्यच’ ते बनले !!

## ‘ संदेश ’ची जादू

दोन वर्षे मद्रासमध्यें ते अज्ञातवासांत राहिले. टोपण नांव घेऊन एका व्यापारी पेढीवर ते काम करीत राहिले. पैसे त्यांना तेथें भरपूर मिळत होते. पण स्वातंत्र्यासाठीं भुकेलेला त्यांचा आत्मा शांत नव्हता. त्याला

शांति मिळवून देण्यासाठीं, आपलें राष्ट्रीय कर्तव्य पार पाडण्यासाठीं, स्वदेशाच्या, स्वधर्माच्या व स्वभाषेच्या हांकेला ओ देण्यासाठीं ते महाराष्ट्रांत परत आले, मुंबईस राहिले आणि त्यांनीं १९१५ सालीं दोन दैनिकें काढलीं. मराठी दैनिकाचें नांव 'संदेश,' व इंग्रजी दैनिकाचें नांव 'Message'. यापुढें अच्युतरावांनीं किती तरी पत्रें काढलीं. पण अच्युतराव म्हणजे 'संदेश' आणि 'संदेश' म्हणजे अच्युतराव! मालाकार म्हणजे जसे चिपळूणकर, केसरीकर्ते म्हणजे जसे टिळक, काळकर्ते म्हणजे जसे परांजपे, तसे संदेशकार म्हणजे कोल्हटकर. हें समीकरण महाराष्ट्राच्या मनांत कौतुकाचें, प्रेमाचें, आदराचें स्थान मिळवून बसलें. पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीस निघालेल्या 'संदेशांत' युद्धाच्या गरमगरम बातम्या, विलक्षण मथळे घालून व आकर्षक सजावट करून, दिल्या जात, शिवाय साहित्याचा सुगंधहि सर्वत्र दरवळे. त्यामुळें 'संदेश' अत्यंत लोकप्रिय झाला. आर्थिक अडचणींमुळें अच्युतरावांना 'संदेश' पांच वेळां बंद करावा लागला. तरी तो, आपटलेल्या चेंडूप्रमाणें, पुनः पुनः उसळी घेत होता. रोजरोज वृत्तपत्राचा अंक काढावयाचा आणि तो अधिकाधिक चटकदार करावयाचा, ही अद्‌भुत जादू महाराष्ट्रांत तरी एकट्या अच्युतरावांचीच! त्यावेळी मराठींत वृत्तपत्रें थोडीं दैनिकें दोनचारच, तीहि मूठभर विद्वानांनीं वरवर वाचण्याजोगी अशीं होतीं. पण कधीं "बेटा गुलाबच्या कानगोष्टी" सांगून तर कधीं 'वत्सलावहिनींचीं पत्रें' लिहून, कधीं विनोदी कविता रचून, तर कधीं गंमतीदार नाट्यप्रसंग रंगवून, पण सदैव सुंदर साहित्याच्या सुवर्ण–पात्रांतून स्वातंत्र्यप्रेमाचें अमृत अर्पण करून अच्युतरावांनी आपलें 'संदेश' पत्र कमालीचें लोकप्रिय केलें. तें घरोघर वाचलें जाऊं लागलें. तें सर्वांच्या चर्चेचा विषय बनलें. दररोज सकाळीं चहाबरोबर बिस्कीट किंवा चिवडा नसला तरी चालेल, पण 'संदेश' हवाच, अशी चटक राजकारणी विद्वानांनाहि लागली. आणि शाळेंतील विद्यार्थी, गिरण्यांतील कामगार, बाजारांतील मजूर, हॉटेलवाले, सलूनवाले यांच्या तर काय? 'संदेश'वर उडयामागून उडया पडूं लागल्या. त्यांतील लेखन्‌लेख पाठ करण्यांत येऊं लागले.

कादंबरीसारखी सोपी व चटकदार भाषा, काव्यासारखी प्रसन्न प्रतिभा, नाटकासारखी चमत्कृति आणि या आल्हादक व आकर्षक साहित्यांतून स्वातंत्र्याच्या गीतेचे पाठ ! कां नाहीं महाराष्ट्र वेडा होऊन जाणार ? ‘ संदेश ’चा उद्देश, ‘ संदेश ’चें ध्येय, ‘ संदेश ’चें कार्य, अच्युतरावांनीं मनांत काय धरलें होतें, हें त्यांच्यांच शब्दांत देतां येण्यासारखें आहे. तें एके ठिकाणीं म्हणतात,

“ वर्तमानपत्रानें तरच जन्माला यावें कीं, जर त्यानें सुविचार-कुसुमांच्या कुंड्या वाचकांच्या बगीच्यांत लावाव्या, सुविचार-सुधेचे हंडे वाचकांच्या मंदिरांत ठेवून द्यावे. ‘ संदेश ’ असा गर्व बाळगतो कीं, संदेश ही सेवा आहे, संदेश हा हुन्नर नव्हे. संदेशाच्या रूपानें तरच जन्माला यावें कीं, सद्विचारांचीं नीरांजनें जनतादेवीच्यापुढें तेववावीं, सद्विचारांच्या तुलसी जनतारूपी जनार्दनाला वहाव्या, सद्विचाराचें मधुस्नान आणि सद्विचारांचे घृतस्नान घालीत राष्ट्र-वृन्दावनांतील वाचक-वृन्दांची अर्चा करावी ! ”

## साधनांची अनेकता

महाराष्ट्रांत देशाभिमानाचें वारें संचरून द्यावें यासाठीं अच्युतराव जशी आपली लेखणी झिजवीत, तशीच आपली वाणीहि शिणवीत. पावसाळ्यांत ढगांच्या गडगडाटानंतर व विजेच्या कडकडाटानंतर मुसळधार वृष्टी व्हावी, त्याप्रमाणें त्यांच्या खणखणीत आवाजांतून व कल्पनेच्या चमचमाटांतून भावनेची व विचारांची अमृतवृष्टी करणारें असें त्यांचें व्याख्यान होई. जसें लेखन तसें भाषण—आणि तसेंच कीर्तन—तसेंच पुराण—फार काय, नाटकहि !—अशा सर्व साधनांचा उपयोग, एखाद्या पंचहत्यारी सरदारा-प्रमाणें, ते सारख्याच कौशल्यानें व शौर्यानें करीत. ‘ नारिंगी निशाण मंडळी ’ या नांवाची एक नाटक मंडळी १९१८ सालीं त्यांनीं काढली होती. त्यासाठीं स्वतः त्यांनीं नाटकें लिहिलीं, फार काय स्वतः नटाचीं कामेंहि केलीं. व्यासपीठ असो किंवा रंगभूमी असो, सभागृह असो कीं नाट्यगृह असो, अच्युतरावांची बुद्धि आकाशांतील विजेप्रमाणें चम्चम्

करीत कडाडत येऊन आपलें तेज उधळीत जावयाचीच आणि प्रेक्षकांना दिपवून सोडावयाचीच.

## वेदांचा बोध

त्यांनीं नाटकें लिहिलीं, कादंबऱ्या रचल्या, 'तीन आणे मालें 'तील गोष्टीहि रंगविल्या, पण ते हाडाचे वर्तमानपत्रकार होते. मूळचे ते विद्वान असल्यामुळें त्यांच्या बुद्धीनें थेट वेदापर्यंत धांव घेतली. 'श्रुतिबोध' व 'उषा' हीं दोन मासिकें चालवून त्यांनी वेदातील काव्य–सौंदर्य व अध्यात्म–विचार यांचीं हिरे-माणकें, साध्याभोळ्या व गरीब बापड्या मराठी वाचकांच्या पदरांत ओतली. वेदांना इतकें सोपें व रमणीय स्वरूप दुसऱ्या कोणीच दिलें नसेल. 'श्रुतिबोध' मासिक तर इंग्रजी, मराठी, गुजराती व हिंदी या चार भाषांत निघे.

## तीन दैवतें

शिवाजीमहाराजांचा तीनशेंवा जन्मदिन महाराष्ट्रांत गाजविण्यासाठीं त्यांनीं खूप तोंडपिटी व पायपिटी केली. गांधीजींच्या कायदेभंगाच्या चळवळींत १९३० सालीं त्यांनीं भाग घेतला आणि तुरुंगवास भोगला. या दुसऱ्या तुरुंगवासांतून मुक्त झाल्यानंतर पांच महिन्यांनींच, ता. १५ जून १९३१ रोजीं, वयाचे बावन्नावे वर्षीं, अच्युतरावांची जीवनज्योत मालवली.

श्रीछत्रपति शिवाजीमहाराज, श्रीसमर्थ रामदासस्वामी व लो. टिळक या तीन महाराष्ट्रीय विभूति म्हणजे अच्युतरावांचीं दैवतेंच. त्यांच्याबद्दल त्यांना पराकाष्ठेचा अभिमान होता, कमालीचा आदर होता, अपरंपार भक्तिभाव होता. आणि तो हृदयांतील भाव कागदावर सगळाच्या सगळा उतरविण्याचें लेखन–चातुर्यहि त्यांच्या अंगीं होतें. एका चरवींतील दूध बिंदून् बिंदुसह दुसऱ्या चरवींत निःशेष ओतावें, तसे ते आपल्या भावना साहित्यांत उतरवूं शकत. श्रीशिवाजीमहाराजांसंबंधीं ते म्हणतात, " शिवाजीनें महाराष्ट्र उत्पन्न केला, शिवाजीनें मराठी इतिहास बनविला,

शिवाजीनें ‘मराठा’—चैतन्य उत्पन्न केलें, तेव्हां जो शिवाजीला व शिवाजीपासून बाजीरावापर्यंत झालेल्या इतिहास—प्रवाहाला विसरेल तो हाडाचा मराठाच नव्हे ! ती शक्ति, ती स्फूर्ति, तो देशाभिमान, ते शौर्य जर आमच्या महाराष्ट्रीयांच्या अंगीं सळसळलें तर ते ‘मराठा’ ह्या नांवाला योग्य, नाहीं तर ह्या महाराष्ट्रांत त्यानीं राहूं नये, कृष्णेच्या पाण्याला शिवूं नये, सह्याद्रीकडे पाहूं नये, विष्णुशास्त्र्यांनीं नटविलेल्या मराठी भाषेचा उच्चार करूं नये !”

आणखी एक नमुना पहा—

“महाराष्ट्रीयांनों, शिवराजांच्या चरित्रांतील देवी भवानीच्या आशीर्वादाचे प्रसंग कविकल्पना म्हणून अश्रद्धेय मानूं नका. त्यांत अश्रद्धेय कांहीं नाहीं. शिवाजीमहाराजांच्या चरित्रांतील अश्रद्धेय भाग भवानीचे आशीर्वाद हा नव्हे, तर शिवाजीमहाराजाचें चरित्र हाच त्यांचे चरित्रांतील ‘अश्रद्धेय’ भाग आहे !! ह्या असल्या अश्रद्धेय चरित्राची वाहवा करण्याकरितां जगन्माता भवानीला—पार्वतीला, ‘ह्या अत्यंत दुष्ट जनतेशीं एक पळभर संसर्ग घडला तरी हरकत नाहीं, पण तो शिवाजी आहे कसा तो तरी पाहूं या,’ ह्या विचारानें ह्या जगांत प्रकट होण्याकरितां अधीरता वाटली असेल, ह्यांत कांहीं एक नवल नाहीं.”

## सालंकृत वर्णन

राष्ट्रगुरु रामदासस्वामी यांचा जयजयकारहि अशाच उत्साहानें अच्युतराव करतात. रामदासांचें वास्तव्य परळी येथें होतें, म्हणून ते लिहितात,

“परळी हें हिंदुस्थानांतील बोलशेव्हिकांचें ठिकाण आहे. राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा सुमन-हार रामप्रभूचे कंठांत अडकविणाऱ्या पहिल्या बोल्शेव्हिकाचें परळी हें मुख्य ठिकाण आहे. स्वतः उदास राहून आराध्यदेवतेजवळ स्वातंत्र्याचा प्रसाद मागणाऱ्या स्वातंत्र्यभक्ताचें परळी हें महास्थान आहे. देशबांधवांच्या मनोवृद्धीची भिक्षा आपल्या झोळींत एके ठायीं करून महाराष्ट्रांतल्या प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्याचा अंगारा लावणाऱ्या श्रेष्ठ

विभूतींचें परळी हें दिव्य धाम आहे. पारतंत्र्याची सावली झपाट्यानें काळोख करीत असतां तेथें स्वातंत्र्याची "चकमक" झडविणाऱ्या स्वातंत्र्य-शिलेदाराची परळी ही पराक्रम-भूमि आहे. " जय जय रघुवीर समर्थ " म्हणून प्रत्येक दुबळ्या माणसाचे अगांतली स्वातंत्र्याची ज्योत पेटविणाऱ्या सामर्थ्यवान् जादुगाराची परळी ही चमत्कार-वल्ली आहे. ' निराश होऊं नका, निराश होऊं नका ' असें म्हणून स्वातंत्र्याच्या आशेनें सर्व महाराष्ट्राला चेतविणाऱ्या एका बहादर शाहीराची परळी ही तुतारी आहे. इथें स्वातंत्र्याचे चौघडे आहेत, स्वातंत्र्याच्या रणभेरी आहेत, स्वातंत्र्याचे दमामे आहेत. "

## उत्कट वर्णनशैली

अर्वाचीन काळांत अच्युतरावांना विष्णुशास्त्री चिपळूणकर व लो. टिळक यांची बहादुरी विशेष वाटे. मालाकारांच्या कर्तबगारीविषयीं ते लिहितातः—" विष्णुशास्त्री चिपळूणकर महाराष्ट्राच्या सार्वजनिक सेवेंत पडल्याबरोबर महाराष्ट्र-भाषा सुरस झाली, वाङ्मयांत तेज आलें, निःस्वार्थतेला किंमत आली, स्वावलंबन संचरलें, शिक्षण स्वयंप्रेरित झालें, इतिहास नामांकितपणास चढला, काव्य आनंदप्रद झालें, स्वाभिमान शिगेस चढला व स्वदेशभक्ति उल्लसित झाली. विष्णुशास्त्री प्रकाशमान झाल्याबरोबर काय काय उत्कर्ष पावलें नाहीं ? "

## टिळक-आगरकरांचा भेद-अभेद

विष्णुशास्त्र्यांचे दोन हात म्हणजे टिळक व आगरकर. एकानें त्यांचें राजकीय कार्य पुढें चालविलें, तर दुसऱ्यानें त्यांच्या सामाजिक तत्त्वांचा पुरस्कार केला. टिळक-आगरकरांमधील हा भेद—आणि त्या भेदांतहि असणारा अभेद—स्पष्ट करण्यासाठीं अच्युतरावांनीं किती सोपे, विविध व मौजेचे दाखले दिले आहेत पहा. " राष्ट्रसेवा करणें हाच दोघांचा उद्देश होता व दोघेहि विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें दिव्य तत्त्व अमलांत आणण्यासाठीं झटत होते. टिळक हे दिवाणखान्यांत होते तर आगरकर हे बगीच्यांत

होते; टिळक हे दरबारांत होते, तर आगरकर हे देवघरांत होते; टिळक उत्पन्नाची चिंता वहात होते, तर आगरकर मितव्ययानें कसें वागावें हें पहात होते; टिळक खलिते लिहीत होते, तर आगरकर परटीचे कपडे मांडीत होते; टिळक जगावें कसें हें पहात होते, तर आगरकर जेवावें कसें हें शिकवीत होते; टिळक शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या घरांतील माहिती करून घेत होते, तर आगरकर बायकांचें स्वास्थ्य पहात होते; टिळक बाहेरचीं दुःखें निवारीत होते, तर आगरकर घरचीं गाऱ्हाणीं ऐकत होते; टिळक मुत्सद्यांना खेळवीत होते, तर आगरकर मुलांना खेळवीत होते; दोघांचें कार्य एकच, गुरु एकच, देव एकच, एकानें देवाकरितां बाजारांतून अलंकार आणले आणि दुसऱ्यानें घरांतल्या घरांत उपकरणीं खळबळलीं, म्हणून पूजा एकाच देवाची ! ”

## अमर अच्युत–विलाप !

त्यांतहि लो. टिळकांचा राष्ट्रसेवेचा मार्गच अच्युतरावांना रुचलेला होता, पटलेला होता. लो. टिळक हे त्याचे पुढारी होते, गुरु होते, साक्षात् देवच होते. प्रत्यक्ष वडिलांच्या ठिकाणीच ते त्यांना जाहीरपणें मानीत. “ टिळक हे विष्णुशास्त्र्यांच्या कार्याचे पूर्ति होते, विष्णुशास्त्र्यांच्या देश-भक्तीची अवतार-समाप्ति होते, ते विष्णुशास्त्र्यांच्या स्वार्थत्यागांतील विरक्ति होते, ते विष्णुशास्त्र्यांच्या स्वावलंबनांतील दिव्य आत्मशक्ति होते. ” असें वर्णन त्यांनीं केलें. टिळकांची राष्ट्रसेवा, त्यांची स्वराज्याची मोहीम, त्यांची विलायतेंतील कामगिरी या सर्वांचें गुणगान करतांना ‘ संदेश ’ कारांची लेखणी आनंदानें नाचत असे —बेभान होत असे.

आणि तो दारुण प्रसंग जेव्हां ओढवला–ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं लोकमान्यांचा आत्मा जेव्हां परमेश्वरामध्यें विलीन झाला, तेव्हां तर काय ? अच्युतरावांच्या भावना सारे बांध, सारे तट फोडून उसळ्या मारीत बाहेर फुटल्या. पुस्तकाचीं साठ पानें भरतील असा लोकमान्यांचा मृत्युलेख त्यांनीं एका बैठकींत, एका टाकानें, एका भावनेनें लिहिला. तो वाचतांना ज्याचें हृदय हालणार नाहीं, ज्याचा कंठ दाटणार नाहीं,

ज्याचे डोळे ओले होणार नाहींत असा महाराष्ट्रीय सांपडणें अशक्य. " लेखणी थंड पडून हृदय लिहितें. " असा हा प्रसंग तो. अच्युत-रावांनीं ज्ञानेश्वरांच्या कल्पना-वैभवानें, नामदेवांच्या सलगीनें व तुका-रामाच्या आर्ततेनें मराठी भाषेंत कायमचा कोरून ठेवला आहे. त्यांचें हें कोरीव लेणें खरोखर कैलास-लेण्याइतकें विस्मयकारक आहे.

" त्यांच्याशिवाय आमचें अस्तित्व आम्हास अशक्यच वाटतें. " अशी आपली असहाय अवस्था त्यांनीं वर्णन केली आहे. ते म्हणतात, " खरोखर हें लिहीत असतांहि आमच्या डोळ्यांचें पाणी खळत नाहीं, आमची लेखणी लटपटूं लागते, आमच्या हृदयाला कंप सुटतो. कारण लोकमान्य हे आमच्या पित्याच्या ठिकाणीं होते. मातेची वत्सलता त्यांच्या अंगीं होती. भावाचा पाठीराखेपणा ते करीत असत. ते आमचे गुरु होते. ते पंतोजीप्रमाणें हाताला धरून वळण देत, शिक्षकाप्रमाणे छड्या मारीत, प्रोफेसराप्रमाणें ज्ञान देत. ते आमच्यांतील ज्येष्ठ पुरुष होते, श्रेष्ठ पुरुष होते, ते आपल्या पक्षांतील पुराणपुरुष होते. ते आमच्या गळ्यांतील ताईत होते दंडांतील अनंत होते. ते आमच्या मस्तकावरील वैभवाचा मुगुट होते. लोकमान्य हे आमच्या देव्हाऱ्यांतील 'बाण' होते. ते आमच्या देवालयांतील दत्तात्रय होते. ते गेले ह्यांत आमचा कोणता आप्त गेला नाहीं? कोणता नातेवाईक हरवला नाहीं? कोणता स्नेही लोपला नाहीं? लोकमान्यांच्या स्वर्गवासामुळें आमचा कोणता देव्हारा रिकामा पडला नाहीं? " संस्कृतांत जसा अज-विलाप, रति-विलाप किंवा मराठी काव्यांत जसा नामदेव-विलाप किंवा राजहंस-विलाप; तसाच मराठी गद्यांतील हा अच्युत-विलाप अजरामर आहे.

## महाराष्ट्रांतील पांडव

या साठ–पानी मृत्युलेखांत 'संदेश' कारांनीं लो. टिळक यांचा चरित्र-पट उलगडून दाखविला आहे, एवढेंच नव्हे, तर अखिल महा-राष्ट्राच्या स्वातंत्र्य-लढ्याचा इतिहासहि चित्रित केला आहे. तो करतांना त्यांनीं असें रूपक केलें आहे कीं, " ते धर्मराज महर्षि रानडे, तो अर्जुना-

सारखा तिखट आणि कडवा विष्णुशास्त्री, तो धैर्याची गदा लीलेनें पेलणारा तिलक-भीम आणि ते गोपाळ गणेश आगरकर व गोपाळकृष्ण गोखले असे दोघे नकुल-सहदेव, असे महाराष्ट्राचे पांच पराक्रमी पांडव.”

लोकमान्यांच्या त्यागाचें चित्र रेखाटतांना अच्युतराव त्यांना उद्देशून म्हणतात, “ देशाच्या सेवेकरितां तुम्ही आपल्या भाग्याचीं कोठारें लुटूं दिलेलीं आहेत; आपली संपत्ति पुनर्वसुच्या पावसाप्रमाणें धो धो ओतलेली आहे. ह्या देशाकरितां तुम्ही आपल्या बुद्धीचीं कपाटें सताड उघडीं ठेवलेलीं आहेत. ह्या देशाकरितां तुमचा मेंदू झिजलेला आहे; ह्या देशाकरितां तुमचें शौर्य झुंजलेलें आहे, ह्या देशाकरितां तुम्ही आपल्या पंचप्राणाचा होम केलेला आहे. तुम्ही या देशाला काय दिलेलें नाहीं ? त्याच्याकरितां काय संकट आपल्यावर ओढवून घेतलेलें नाहीं ? ”

## विव्हलतेचें शब्द-चित्र

लोकमान्यांच्या वियोगामुळें त्यांच्या भक्तांचीं मनें किती विव्हल झालीं होतीं, याला वाचा फोडतांना अच्युतराव विचारतात, “ लोकमान्य ! तुम्हांला आतां कोठें पाहूं ? तुमची सावळी मूर्ति कोठें अवलोकन करूं ? तुम्हांला कोठें शोधूं ? तुम्हांला कोठें धुंडाळूं ? आमचा जीव तुमच्या जीवाशीं गोठवलेला होता, आमचा प्राण तुमच्या पंचप्राणांचा भाग होता, आमचें अस्तित्व तुमच्या अस्तित्वांत गुरफटून गेलें होतें, आमचें जीवन तुमच्या जीवनांत गुंतलेलें होतें. लोकमान्य ! आतां तुम्ही कोठें सांपडाल ? तुम्ही कोठें दिसाल ? तुम्ही जात असतांना आमच्या जिवाला ओढणी लागलेली आहे, आमच्या प्राणांना क्लेश पडत आहेत. कांट्याच्या जाळ्यावरून ज्याप्रमाणें रेशमी वस्त्राला फरफरां ओढावें, त्याप्रमाणेंच आमच्या हृदयाच्या चिरफळ्या झालेल्या आहेत······तुम्हांला शोधण्याकरितां काय किंमत देऊं ? काय ? त्या यमधर्माच्या पायाशीं देहांतल्या रक्ताचा हौद उत्पन्न करूं ? काय ? त्या यमधर्माच्या पायाजवळ, मानवी कुडीचीं शकलें शकलें करून मांडूं ? काय ? त्या यमधर्माच्या पायांनजीक ह्या मर्त्य देहाचें नीरांजन करूं ? काय ? त्या यमधर्माला दया आणण्याकरितां मृत्युलोकां-

पासून यमलोकांपर्यंत देहदंडाचा दंड करून दंडवत करीत जाऊं? किंवा त्या अधाशी मृत्यूचीं खाखा शमन करण्याकरितां त्याच्यापुढें आम्ही-तुमचे सर्व देशबांधव-आपलीं शिरकमलें उतरून ठेवूं?"

## श्लेषाची मौज

"राष्ट्रमातेच्या कीर्तनांतील मृदंग" असेंच स्वरूप अच्युतरावांनीं आपल्या 'संदेशाचें' ठेवलें होतें. दादाभाई नौरोजी असोत, सर फेरोझशहा मेथा असोत किंवा स्वामी श्रद्धानंद असोत—साऱ्या राष्ट्रीय विभूतींच्या गुणांचे बोल या मृदंगांतून प्रसंगाप्रसंगानें निघत असत. आणि खुद्द राष्ट्रमातेच्या वर्णनाचा किंवा तिच्या स्वातंत्र्याच्या स्तुति-स्तोत्राचा प्रसंग आला म्हणजे मग तर काय? 'संदेश'कारांची लेखणी थयथयां नाचूं लागे. स्वदेशाविषयीं ते अभिमानानें लिहितात, "या हिंदुस्थान देशास पूर्वी 'सुवर्ण-भूमि' असें जें नांव होतें, तें अत्यंत अन्वर्थक होतें. या भूमीचा वर्ण अत्यंत सुंदर आहे. येथील वर्ण-व्यवस्था अत्यंत सुंदर होती. येथील वर्ण-मालिका अजूनहि अत्यंत सुंदर ठरत आहे. आणि सुवर्णाचे निधि, सुवर्णाचे प्रासाद, सुवर्णाचीं अद्रिशृंगें आणि सुवर्ण-तंतूंनीं भूषविलेलीं येथील लोकांचीं महावस्त्रें यांनीं तर या देशांतील सुवर्णाचा सुकाळ सर्वांचे दृष्टोत्पत्तीस आणिलेला होता." एका 'सुवर्ण' शब्दावर किती सुंदर व सार्थ कोट्या!

## सर्व कांहीं देशासाठीं!

या आपल्या हिंदभूमीविषयीं आपलें कर्तव्य काय आहे, हें वाचकांच्या मनावर ठसवितांना अच्युतराव लिहितात, "होय, असेंच कर, पाक परमेश्वरा, असेंच कर. परमेश्वरा, आम्हां सर्वांचीं हृदयें एकरूप कर, आणि त्यांचीं हिंदमातेच्या चरणींचीं नूपुरें बनव! आमचीं सर्वांचीं मस्तकें एकत्र जोड आणि त्यांचीं हिंदमातेच्या चरणींचीं जोडवीं बनव! आमचे सर्वांचे मेंदू एकत्र मिळव आणि त्यांची मेंदी बनवून हिंदमातेच्या नखांना चमकदारपणा आण! आमच्या दिलांची दिलसफाई करून त्यांच्या सुसंगत

संगीत ध्वनींत आमच्या मातेच्या पैंजणांची रुमझुम ओत आणि आमचीं सर्वांचीं लाल रुधिरें एकत्र करून आमच्या हिंद-जननीचे चरणतल असे लालबुन्द दिसूं देत कीं, जणुं कांहीं नुक्तेच समुद्रांतून रविबिम्ब वर येऊं लागलें आहे. जणूं काहीं हिन्दी महासागराचा प्रत्येक जल-कण आपला नीलिमा टाकून गुलशनु गुलाब बनलेला आहे, जणूं कांहीं कमलासना कमलेनें हिंददेवीच्या अभिनंदनार्थ दशदिशांच्या चिपनळ्या करून त्यांत रंगपंचमीचे आनंदी रंग भरलले आहेत ! ”

ही प्रार्थना झाली. पण प्रत्यक्ष आदेशहि, ‘ संदेश ’कार वाचकांना कसा देत आहेत पहा.—“ आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! प्रीतीच्या नद्या कराव्या लागल्या, भावनांचे डोंगर रचावे लागले, श्वासोच्छ्वासाचे भाते फोडावे लागले; तरी आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! आईबापांची शपथ कीं,आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! कुलदेवतेची शपथ कीं, आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! वंशवेलीची शपथ की, आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! खाल्लेल्या अन्नाची, प्यालेल्या पाण्याची, चाललेल्या जमिनीची व चाखलेल्या फलमूलांची शपथ कीं, आम्ही हिंदुस्थान सुखी करूं ! ”

## स्वातंत्र्याचा स्तोत्रपाठ

राष्ट्राच्या स्वातंत्र्याची महती वेळोवेळीं व परोपरीनें अच्युतरावांनीं गायिली आहे. १९२२ सालीं, हिंदुस्थान सरकारच्या अंदाजपत्रकावर टीका करणारा एक लेख त्यांनीं लिहिला. त्यांत शेवटीं तें म्हणतात, “ बादशहाच्या गोष्टींतील २७ तून ९ गेले म्हणजे जसें शून्य राहिलें; त्याप्रमाणें हिंदुस्थान सरकारच्या १३० कोटि रुपयांतून जर स्वातंत्र्य तेवढें गेलें तर आपल्याला बाकी शून्यच राहिलें ! स्वातंत्र्य नसलें आणि नफा झाला तरी तो शून्यच ! स्वातंत्र्य नसलें आणि १४० कोट उत्पन्न झालें तरी तें शून्य ! स्वातंत्र्य नसलें आणि इंद्राचें नंदनवन मिळालें तरी तें शून्य ! स्वातंत्र्य नसलें आणि ऐरावत बसायला मिळाला तरी तो शून्य ! स्वातंत्र्य नसलें आणि कुबेराची संपत्ति मिळाली तरी ती शून्य ! स्वातंत्र्या-शिवाय सौख्य शून्य, स्वातंत्र्याशिवाय आनंद शून्य ! स्वातंत्र्याशिवाय

संसार शून्य, स्वातंत्र्याशिवाय जीवितहि शून्य ! स्वातंत्र्य हें आमचें अस्तित्व आहे, स्वातंत्र्य हें आमचें धन आहे ! ”

## प्राचीन व अर्वाचीन कवि

मराठी कवितेसंबंधीं अच्युतरावांनीं अनेक हृदयंगम लेख लिहिले आहेत. “ हृदयांतील तरंगाचें रूप व्यक्त करून दाखविणें ” हें कवितेचें मुख्य लक्षण ते मानतात. “ मानवी अंतःकरणाच्या किनखापी पिशव्या रसिक समाजापुढें भरभरून ओतून दाखविणें म्हणजेच काव्य ” असा अलंकारिक साज त्या व्याख्येवर ते चढवतात. “मराठी काव्याची प्रभात” या आपल्या पंधरापानी लेखांत त्यांनीं प्राचीन व अर्वाचीन कवींचे गुणदोष खुसखुशीत भाषेनें मांडलेले आहेत. प्राचीन कवीसंबंधीं ते म्हणतात, “ संतकवींना ‘ कालिदास ’ म्हणवून घेण्याची मुळींच हांव नव्हती. त्यांची मुख्य तृष्णा परमेश्वरानें आपणांस आपले ‘ दास ’ म्हणावें एवढीच होती. त्यांना कालिदास म्हणून कोणी कितीहि मान दिला असता तथापि जर ईश्वरानें त्यांना आपलें म्हटलें नसतें, तर त्यांच्या मनाचें समाधान झालें नसतें. अशा थोर विभूतींना ‘ कवि ’ म्हणणें ही एका प्रकारें त्यांची योग्यता कमी करण्यासारखेंच आहे. ते तत्त्वज्ञ, धर्मकर्ते व समाजोद्धारक होते. ते समाज-नियमाची गंगा होते.”

अर्वाचीन कवींच्या त्रोटक काव्यावर टीका करतांना अच्युतरावांनीं किती सुंदर उपमा दिली आहे पहा. “ अर्वाचीन कवींची कविता म्हणजे एखाद्या सुंदर पैठणीवर काढलेली जरीची बुट्टी आहे. ती लहान लहान प्रमाणांत सर्वत्र चमकत असावयाची. परंतु बुट्टी म्हणजे काही पैठणी नव्हे. ती एखाद्या महावस्त्रावर सुंदर दिसते, परंतु ती स्वतः कांहीं महावस्त्राप्रमाणें नेसावयाच्या उपयोगी पडत नाहीं. ”

प्राचीन कवि ‘ हे गूढज्ञानाचे दीप, राष्ट्रकर्तव्यांचे मेरूमणि, विश्वप्रेमाचे सागर ” होते. ते केवळ कवि नव्हते असें सांगून अच्युतरावांनीं कवींचें महत्त्व—मापन पुढील शब्दांनीं समतोलपणें केलें आहे. “ कवी हे कितीहि थोर असले, तथापि ते राष्ट्राचे अलंकार होत, राष्ट्राचे प्राण नव्हत............कवि हे नाकांतील नथा आहेत, खुद्द नाक नव्हत.

राष्ट्रकर्ते पुरुष हेच राष्ट्राचें नाक होत आणि ज्या राष्ट्रांत राष्ट्रकर्ते पुरुष जास्त उत्पन्न होतात त्याच राष्ट्राचें नाक वरती रहातें. ”

## कवितेचीं मूर्त स्वरूपें

रे. टिळकांची कविता, मराठींतील लावण्या, महाराष्ट्र नाट्यकलेचा शृंगार–साज, हे तात्या आणि हे तात्या, इत्यादि वाङ्मयविषयक लेखांत अच्युत-रावांनीं आपला साहित्याचा दृष्टिकोन मांडला आहे. रे. टिळकांच्या कवितेचें वर्णन ते पुढील रूपकानें करतात, “ टिळकांची कविता म्हणजे खेडेगांवांतील पाटलाची मुलगी होय. उच्च कुळ, परंतु फार श्रीमंत नाहीं, गांवांत दरारा, परंतु फार अधिकार नाहीं, सर्व अवयव गोंडस, पण फार अंगराग नाहींत, प्रेमळपणानें नेत्र डबडबलेले परंतु फार तिखे कटाक्ष नाहीत; हृदयांत विकार फार, परंतु वाक्चातुर्य नाहीं; अशी साधी, देखणी, सशक्त, पाणीदार अशी रे. टिळकांची कविता आहे.... रे. टिळकांची कविता म्हणजे कोणी राजकन्या नव्हे कीं, मानवी कल्पनेनें निर्माण केलेली सर्व भूषणें तिच्या अंगावर सांपडतील. रे. टिळकांची कविता म्हणजे कोणी वसंतसेनाहि नव्हे कीं, तिच्या केवळ नूपुर-नादानें सद्गुणी चारुदत्तसुद्धां व्याकुळ होऊन जातील. ” एकाद्या चित्रकाराप्रमाणें वा शिल्पकाराप्रमाणें अंगप्रत्यंगाचीं सूक्ष्म स्वरूपें अच्युतरावांनीं स्पष्ट केलीं आहेत.

## कवि कोण ?

काव्याची व्याख्या याहून ऐसपेस करून अच्युतरावांनीं म्हटलें आहे, “ सप्पदिशी लोकांच्या हृदयाचा कबजा घेणारा तो कवि ! जो एका सटक्यांत लोकांचीं अंतःकरणें आत्मवश करील तो कवि ! एका झापेंत लोकांचीं हृदयें लुटील तो कवि ! एका तिरपींत लोकांच्या हृदयांवर स्वतःची मुद्रा ठोकणारा तो कवि ! एका धांवेंत जनतेच्या मनावर आपलें निशाण उभारणारा तो कवि ! ”

या सढळ व्याख्येच्या सैल चौकटींत शिवरामपंत परांजपे यासारख्या गद्यकवींना अच्युतरावांनीं सहजच बसविलें आहे. ( आणि ते स्वतःहि बसूं शकतील. ) पण अच्युतरावांची मजल याहून मोठी. लो. टिळकांसारख्या

तर्ककर्कश व वेदाभ्यासी अशा मुत्सद्यालाहि कवींच्या मालिकेंत बसविण्यासाठीं अच्युतराव असा युक्तिवाद करतात, " आणि तो दुसरा एक कवि बसला आहे तो ? शिवरामपंतांवर कुणी कदाचित् कवित्वाचा आळ तरी घालील, पण त्याचेवर कुणी कवित्वाचा आरोपहि करीत नाहीं ! आपण कवि आहोंत हें त्याला माहीतहि नाहीं ! लोकांचीं हृदयें मुठींत गवसण्याची ह्याची एवढी शक्ति कीं, हा दिल्लींत गेला तरी ह्याच्या मिरवणुकी निघतात, रहिमतपुरलाहि ह्याची लोक वाट पाहतात; सिंधमध्यें गेला तरी ह्याला लोक चिकटतात, सोलापूरला जायचा असला तरी त्याची मार्गप्रतिक्षा करतात. हा सांगलीच्या लोकांच्या गळ्यांतला ताईत आहे. हा नागपूरच्या लोकांच्या हृदयाचा ठोका आहे, हा पुण्याच्या लोकांच्या नाकींचा बाल आहे, हा लाहोरच्या लोकांच्या रत्नांतला लाल आहे. हा बोलो न बोलो, हा कवि ! हा हालो अथवा डोलो, हा कवि ! हा हांसो अथवा बसो, हा कवि ! अशा कवीचें जें लोकचित्ताकर्षक सामर्थ्य तें काव्य आणि हें काव्य जेव्हां हृदयंगम स्वरूपांत मांडलें जातें तेव्हां तें नाटक. "

## दृष्टांतांची माला

जसा कवि, तसा रसिक हवा. अरसिकाशीं गांठ पडूं नये अशी त्रिवार प्रार्थना कवि करतो. हा विचार अच्युतरावांनीं किती मनोहरपणें मांडला आहे, पहा. " थोर पुरुषांच्या मनांतला अर्थ जर तुम्हांस हवा असेल, तर थोर पुरुषांचें मन जितकें थोर असेल तितकें तुम्ही आपलेंहि मन थोर करा. तुम्हीं त्यांच्या मनापेक्षां आपलें मन कमी थोर ठेवाल, तर थोर पुरुषांच्या अभिप्रायाचें मर्म तुमच्या मनांत उतरणार नाहीं. सुवर्ण-पात्रांतील दुग्ध सुवर्णपात्रांतच ओतून घेतलें पाहिजे, हिऱ्याचा खडा रत्नांच्याच कोंदणांत बसविला पाहिजे, स्वर्गांतील अमृत देवांच्याच मुखांत पडलें पाहिजे, कर्पूराचें धवलत्व शंकराच्याच अंगीं उतरलें पाहिजे, धवल कीर्तीचा शेला वीरांच्याच खांद्यावर ठेवला पाहिजे, तें पवित्र भगवन्नाम नारदांच्याच ब्रम्हवीणेंतून प्रस्फुट झालें पाहिजे. अहाहा, काय तो आनंद–तें पवित्र भगवन्नाम नारदांच्याच ब्रह्मवीणेंतून प्रस्फुट झालें पाहिजे. योग्याला योग्यच योग्य ! "

## मृत्युलेखाचा अजब नमुना

क्षणाक्षणाला नवीननवीन कल्पना काढण्यांत अच्युतराव अत्यंत पटाईत. समुद्राच्या लाटांचा किंवा संध्याकाळच्या आकाशावरील रंगांचा खेळ जसा अखंड चालू असतो, तसा चमत्कार अच्युतरावांची कल्पनाशक्ति दाखवीत असे. स्वामी श्रद्धानंद यांचा खून किती अमानुष ! किती दुःखदायक ! साऱ्या भारतीयांच्या हृदयांतून रक्तबिंदु वहावयास लावणारा तो भयंकर प्रसंग. पण ‘ संदेश ’कारांनीं त्या प्रसंगांतील रहस्य किती रम्यतनें उलगडून दाखविलें आहे. “ पावसाळा नुकताच संपलेला होता, शेतें हिरवीगार झालेलीं होतीं. ” असा प्रसन्न प्रारंभ करून अच्युतरावांनीं स्वामीजींच्या त्यागाचें कौतुक करण्यासाठीं कैलासाहून शंकरास बोलाविलें, वैकुंठाहून विष्णूस पाचारिलें, ब्रह्मदेवहि आपली ‘टेनिस बॅट’ ठेवून पृथ्वीवर आले आणि “ शेतांत उभा असलेला जोंधळा—शेतांत उभा असलेला गहूं, शेतांत उभा असलेला ऊंस, शेतांत उभा असलेला हरभरा—ह्या सर्वांचे चेहऱ्यावर स्वार्थत्यागाचा सोनेरी रंग चढलेला होता ! ते रोज प्रार्थना करीत होते कीं, “ देवा, लोक केव्हां येतील व आम्हांला कापतील ? ताटव्यांच्या देठांवर नाचत रहाणें आतां पुरें ! आत्मस्तुतीचें वारें आतां पुरें ! रोज उगवत्या सूर्याचें दर्शन घेणें आतां बस्स झालें ! आकाशांतील चांदण्यांनो, तो दिवस लौकर उगवो कीं, ज्या दिवशीं लोक आपल्या हातांत विळे घेऊन आमच्या देहाच्या कणशांची मुण्डीछाट करतील आणि आमच्या मृत्यूवर लोकांच्या मेजवान्या झडतील ! गव्हांचीं पिकें काढलीं गेलीं नाहींत, तर बुंदीचे लाडू होणार नाहींत ! साळीचीं शेतें कापलीं गेलीं नाहींत, तर साखरभात मिळणार नाहीं ! उसाचें पीक चरकाच्या चरक्यांत पिळून निघालें नाहीं तर साखरहि मिळणार नाहीं ! ”

पृथ्वीवरील पिकांची ही परोपकारी व त्यागी वृत्ती पाहून स्वर्गातील देवांना आश्चर्य वाटलें. तें अच्युतरावांनीं नाट्यमय पद्धतीनें पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे.

“ सर्वजण थंडीनें कुडकुडत होते ! फक्त पिकें हंसत होतीं !

'हॅलो—हें कोण हंसतंय इथें?' लक्ष्मी आपल्या लालसर पापण्या हालवीत म्हणाली!

'ओ!— हीं तर पिकें!' श्रीविष्णूंनीं कौतुक केलें!

'पण तीं हंसताहेत कां?' ब्रह्मदेवांनीं सर्वांसमक्ष पिकांना विचारलें.

'कां हंसतों?' गहूं हंसत हंसत म्हणाला—'उद्यां आम्हांला कापणार म्हणून हंसतों.'

'उद्यां आमची कापणी करून जग आपलें पोट भरणार म्हणून आम्हीं हंसतों.'—तांदूळ म्हणाले.

'उद्यां आमच्या नाशानें जगाला भरभराट येणार म्हणून आम्हीं हंसतों.'—बाकीचीं सर्व धान्यें म्हणालीं!

'काय तुमचा नाश होणार म्हणून तुम्हीं हंसतां?'

'होय सरकार! आमचा नाश होणार म्हणून आम्हीं हंसतों! जगाच्या कल्याणाकरितां आमचा नाश होणार म्हणून आम्हीं हंसतों!'

देव विस्मित झाले, तिन्ही देव विस्मित झाले! देवीहि विस्मित झाल्या."

## एक गद्यकाव्य!

कारुण्यांतून हर्ष निर्माण करण्याची अच्युतरावांची ही जादू अजब आहे. 'शेवटची वेल सुकली' हा लेख म्हणजे तर एक गद्य करुण-काव्यच आहे! कारुण्याचा ताण वाचकाच्या मनावर फाजील पडूं नये म्हणून मधून मधून विनोदाच्या गुदगुल्या करण्यांत आलेल्या आहेत. पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरमध्यें १९१३ सालीं 'तोतयाचें बंड' हें नाटक चाललें होतें. आणि तें पहाण्यास दुसऱ्या बाजीरावांची कन्या कुसुमाबाई आलेल्या होत्या. पेशव्यांचेंच नाटक, पेशव्यांचाच एक व्यक्ति, पेशव्यांच्याच वाड्यांत पहात आहे; पण नाटकांत स्वराज्य आहे व ती व्यक्ति मात्र पारतंत्र्यांत आहे. हा विषादपूर्ण विरोध अच्युतरावांच्या काळजाला दंश करून गेला—आणि तसाच दंश आपल्या वाचकांच्या हृदयालाहि करण्यासाठीं त्यांनीं हा दहा पानी लेख लिहिला.

किर्लोस्कर थिएटर कोठें आहे हें सांगतांना अच्युतराव म्हणतात, “ नाना फडणिसांचा वाडा लागतो. मराठींतील षष्ठीच्या प्रत्यया, असें कां खोटें बोलतोस ? हा वाडा नाना फडणिसांचा कोठला ! आतां तेथें नाना फडणिस कोठें आहेत ?......आतां तिथें पन्नास रुपयांवर “ तुनुमुनु तुनुमुनु ” करणारीं मास्तरें, बारा वाजल्याची घंटा बडविणारे शिपाई व छडीच्या धाकानें खोटी सबब हुडकून काढण्यांत गर्क झालेलीं पोरें हींच आज वावरत आहेत ! ”

कुसुमाबाईचें व त्यांच्या मनःस्थितीचें वर्णन करतांना अच्युतराव लिहितात, “ ही आमची व्यक्ति म्हणजे दुःखपर्यवसायी नाटकांतील शेवटचा आकांत, करुण कहाणींतील शेवटची किंकाळी, अपशकुनी भवितव्यतेची शेवटची गांजणूक होती. अशा ह्या व्यक्तीपुढें त्या दिवशीं, त्या ‘ तोतयाचें बंड ’चे दिवशीं, सर्व मराठी इतिहास पुनः जिवंत होऊन पुनः पुनः थडग्यांतून उठून, पुनः चितेवरून खडबडून उभा राहिला असेल. त्या व्यक्तीला त्या दिवशीं त्यानें किती भेडसावलें असेल ह्याची वाचकांनींच कल्पना करावी ! ”

ही कल्पना करण्याची शक्ति सर्वच वाचकांजवळ असते असें नाहीं. त्यांनाहि ती कल्पना आणून देण्यास अच्युतरावांचा हा लेख समर्थ आहे. तें नाटक पाहतांना कुसुमाबाईनें आपले डोळे मिटले तेव्हां, अच्युतराव सांगतात, “ तिनें डोळे मिटल्यानंतर एकदम तीं सारीं मेलेलीं माणसें, तो उंच मानेचा नाना फडणीस, त्या झुरत असलेल्या पार्वतीबाई, तो पोटाचा कोथळा बाहेर पडलेला नारायणराव, तो ‘ भाऊ ’ ‘ भाऊ, ’ करीत ऊर बडविणारा नानासाहेब, तो कफ दाटलेला माधवराव—फार काय सांगावें ? कारंज्यावर उडी टाकण्याच्या तयारींत असलेला तो सवाई पेशवा, हीं सारीं मेलेलीं माणसें तिच्याभोंवतीं जिवंत झालीं व तिला म्हणालीं, ‘ कुसुम, तूं एकटीच येथें कोठें ? ”

## कल्पकतेची मेजवानी

केवळ मौजेसाठीं, केवळ कल्पनेच्या विलासासाठीं अच्युतरावांनीं जे लेख लिहिलेले आहेत, त्यांत तर काय ? विनोदाचे व आनंदाचे फवारेच

उडत आहेत. प्रचलित राजकारणाला कधीं सर्कशीचें तर कधीं नाटकाचें, कधीं दवाखान्याचें तर कधीं खेळांच्या सामन्यांचें रूप देऊन अच्युतराव चटकदारपणा आणीत. हिडिंबा–शूर्पणखेला रंभा–उर्वशीचें लावण्य देण्याची जादू जशी एकाद्या मांत्रिकाच्या हातांत असावी, तशी रुक्ष विषयाला रम्य बनविण्याची किमया अच्युतरावांच्या लेखणींत होती. मराठी दैनिक लोकप्रिय करण्याचा पहिला मान त्यांचाच. मुंबईतील मजुरानेंहि वाचावें व त्याला कळावें आणि त्याचें चित्त गुंगावें, असे सोपेसोपे व मजेशीर लेख अच्युतरावांनी अक्षरशः शेंकडों लिहिले. ' माधवाश्रमांत शिवाजी ! ' हेंच एका लेखाचें नाव. तें वाचतांच कोणता मुंबईचा वाचक पुढील लेख वाचणार नाही ? मुंबईकराच्या भाषेंत, चालू परिस्थितीचें वर्णन, खुसखुशीत विनोदानें व खरमरीत टीकेनें खमंग झालेलें पाहून कोणाच्या तोंडास पाणी सुटणार नाहीं ? माधवश्रमाच्या ' रूम नंबर ३५ मध्यें ' शिवाजी उतरलेला आहे हें कळतांच कोणावर काय परिणाम झाला, याचें किती गंमतीदार वर्णन अच्युतरावांनीं केलेलें आहे पहा: --

" प्रथमतः ' घाटी ' लोक फार घाबरले. कुणाला वाटलें कीं, हा आतां पुनः आपल्याला लढाईवर घेऊन जाणार ! आपण कसे सुखानें भांडीं घाशीत व गिरण्या फिरवीत बसलेलों आहों ! आतां ह्या भांडीं घासण्याच्या सुखाला व गिरण्यांतल्या सुखकर काबाडकष्टांना आम्ही मुकणार ! आतां आमच्या बायकांच्या मजुऱ्या व ' खानावळी ' बंद होणार ! " तसेंच " शिवाजी माधवाश्रमांत आला हें समजल्याबरोबर बँकावर ' रश ' झाला. जो तो आपले पैसे मागायला लागला. वॉर-लोनचे भाव एकदम उतरले. त्यांतहि कांहीं लोकांनीं अशी बातमी उठविली कीं, सरकारचें कर्ज नाकबूल करण्याचा ठराव शिवाजी प्रथमच हातांत घेणार आहे. त्यामुळें तर जो तो येईल त्या भावांत वॉर-बॉंड विकीत सुटला. " यांत जितका उपरोध आहे, तितकीच परक्या सरकारवर टीकाहि आहे.

## बहुजनांचा शिक्षक

तिळाएवढा बारीक विचार घेऊन, तो आपल्या भाषेच्या साखरेंत

प्रतिभेच्या अग्निवर घोळवून घोळवून व त्यावर कल्पनेचें केशर चढवून अच्युतराव त्या तिळाला कांटेदार, डौलदार व रंगदार अशा मोठ्या हलव्याचें स्वरूप देत असत. ते विद्वान् होते; पण ते आपली विद्वत्ता, दुधांत साय मुरवावी त्याप्रमाणें, आपल्या लेखांत लपवीत. ते वकील होते, पण ते आपल्या लेखनांत फारसे युक्तिवाद करीत नसत. ते बहुश्रुत होते, पण आपल्या पांडित्याचें प्रदर्शन ते कधींच करीत नसत. सहज एखाद्या मित्राशीं आपण बोलावें; तसें खेळकरपणानें ते लिहीत. बहुजनसमाजाचे ते रसिक शिक्षक होते. त्यांच्या लेखनांत वक्तृत्वाचा धबधबा आहे व त्यावर कल्पकतेचे सोनेरी किरण नाचत आहेत आणि देशाभिमानाचा झंझावात तर सदैव दशदिशां सुटलेला आहे. ‘ सरसा ’ म्हणून जो वाणीचा प्रकार संस्कृतांत मानलेला आहे, त्याचा मराठींतील उत्तम नमुना म्हणजे अच्युतरावांचें वाङ्मय. त्यांत भावना आहेत, कल्पना आहेत, अलंकार आहेत, नादमाधुर्य आहे आणि प्रखर राष्ट्रभक्तीहि आहे. त्यांच्याच जातीचे दुसरे श्रेष्ठ लेखक म्हणजे प्रो. शिवराम महादेव परांजपे. त्यांचा मृत्युलेख अच्युतरावांनीं लिहिलेला आहे. त्यांत त्यांनीं शिवरामपंतांचें गुणवर्णन ज्या शब्दांनीं केलें आहे, तेच शब्द खुद्द अच्युतरावांनाहि शोभण्यासारखे आहेत. ‘ शिवरामपंत ’ या शब्दाऐवजीं ‘ अच्युतराव ’ हा शब्द घालून पुढील उतारे वाचावेत म्हणजे झालें.

“ शिवरामपंत ही एक व्यक्ति नव्हती ! शिवरामपंत ही स्फूर्ति होती ! शिवरामपंत ही शक्ति होती ! शिवरामपंत ही चेतना होती ! शिवरामपंत ही बुद्धीची रत्नपेटिका होती ! शिवरामपंत ही विचारांची सुवर्ण खाणी होती ! ”

“ शिवरामपंत हे स्वातंत्र्येच्छेची मूर्ति होते. त्यांच्या प्रत्येक शब्दांत स्वातंत्र्येच्छा असे. त्यांच्या प्रत्येक चलनवलनांत स्वातंत्र्येच्छा असे. त्यांच्या प्रत्येक अवलोकनांत स्वातंत्र्येच्छा असे ! स्वातंत्र्येच्छेची ते मूस होते स्वातंत्र्येच्छेचा ते पंचरस होते ! त्यांच्या रोमरोमांत स्वातंत्र्येच्छा भरलेली होती ! त्यांची नाडी स्वातंत्र्येच्छा बोलत होती ! त्यांच्या हृदयाची तबकडी स्वातंत्र्येच्छा गर्जवीत होती. ”

"महाराष्ट्राच्या वातावरणांत उत्पन्न केलेला स्वातंत्र्याचा वारा–ह्यांत खरे शिवरामपंत आहेत ! परकीय सत्तेसाठीं उत्पन्न झालेला तिटकारा–ह्यांत खरे शिवरामपंत आहेत ! मनाच्या चोचीला स्वातंत्र्याच्या अमृतबिंदूची लागलेली चटक–ह्यांत खरे शिवरामपंत आहेत ! नको ती परकीय सत्ता, अशी अंतःकरणानें घेतलेली शपथ–ह्यांत खरे शिवरामपंत आहेत !"

' ते स्वातंत्र्याचे खरे शाहीर होते ! स्वातंत्र्याचे राजहंस, स्वातंत्र्याचे भारद्वाज होते ! स्वातंत्र्य–कूजनाचे कोकिल होते !"





## बॅ० सावरकर : : : १२

" **मा**झें जीवन विद्युत्–तंतूंनीं विणलेलें आहे " असें स्वतःचें वर्णन एकटे बॅ. सावरकरच करूं शकतात. विजेप्रमाणें क्षणिक पण दिपविणारें तेज आणि विजेप्रमाणें धक्के देण्याचें सामर्थ्य–हे दोन्ही गुण त्यांच्या चरित्रांत बालपणापासून वृद्धपणापर्यंत ओतप्रोत भरलेले आहेत. त्यांच्या जीवनाचा परिणाम मराठी साहित्यावर व महाराष्ट्र समाजावर, किंबहुना भारतीय स्वातंत्र्य–संग्रामावरहि, झालेला आहे. " सहस्रावधि तरुणांच्या आयुष्याची दिशा बदलून जावी इतका त्यांच्यावर माझ्या मतांचा, प्रयत्नांचा आणि सहवासाचा परिणाम झालेला आहे " असा आत्मविश्वास सावरकरांनीं आत्मचरित्रांत व्यक्त केला आहे.

जसा सरस्वतीनें तसाच स्वातंत्र्य-लक्ष्मीनेंहि आपला वरदहस्त सावरकरांच्या मस्तकांवर ठेवलेला आढळतो. मातृभूमीच्या " उद्धरणिं व्यय " नसेल अशी ओळहि ते सहसा लिहीत नाहींत. केवळ आपल्या राष्ट्रमातेच्या उद्धारासाठीं आपली वाणी व लेखणी त्यांनीं अखंड झिजविली आहे. ' किती लिहावें आणि कसें लिहावें ?' याचें बंधनच जणुं त्यांच्या लेखणीला माहीत नाहीं. त्यांचें काव्य उज्ज्वल प्रतिभेनें तेजःपुंज बनलेलें आहे. नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत, कादंबऱ्या त्यांनीं रचल्या आहेत आणि निबंध तर त्यांच्या लेखणीतून शेंकडों उतरले आहेत. जसें लेखन तसेंच वक्तृत्व आणि जसें मराठी तसेंच इंग्रजी — चोहों दिशा उजळीत जाणारी त्यांची लेखणी आहे.

## लेखनाच्या तीन आघाड्या

राजकीय विचार हा त्यांच्या लेखनाचा आत्माच. ' हिंदुत्व,' ' हिंदुपदपादशाही ' अशा त्यांच्या ऐतिहासिक ग्रंथांतूनहि राजकारणाचाच सूर वहात आहे. त्याशिवाय खास राजकीय विषयावर लिहिलेले त्यांचे निबंधहि पुष्कळच आहेत. जेव्हां राजकारण लिहिण्यास ब्रिटिश सरकारनें बंदी केली तेव्हां सामाजिक क्षेत्रांत त्यांची लेखणी संचार करूं लागली. अस्पृश्यता-निवारण, जातिभेद-निर्मूलन इत्यादि सामाजिक सुधारणांचा पुरस्कार त्यांनीं आत्यंतिक बुद्धिवादानें केला. आणि तो इतक्या हिरीरीनें कीं, साक्षात् आगरकरांनींहि आनंदानें मान डोलवावी ! याशिवाय भाषाविषयावरहि त्यांनीं अनेक निबंध लिहिले. त्यांना जसें आपल्या राष्ट्रावर परक्या देशाचें आक्रमण दुःसह वाटे, तसेंच स्वभाषेवरील अन्य भाषांची बळजोरीहि त्यांना नकोशी वाटे. त्यासाठीं त्यांनीं भाषाशुद्धीचें मोठेंच आंदोलन उठवून दिलें. त्यामुळें प्रा. माधवराव पटवर्धनांसारखे प्रारंभीं त्या आंदोलनाचे विरोधक असणारे विद्वानहि त्याचे पुरस्कर्ते बनले. सावरकरांच्या लेखणीचा प्रभावच आहे हा !

## विविध कलांची देणगी

श्री. विनायक दामोदर सावरकर यांचा जन्म नाशिक जिल्ह्यांतील

भगूर या गांवीं ता. २८ मे १८८३ रोजीं झाला. याच वर्षीं युरोपमध्यें मुसोलिनीचा जन्म झाला. त्या हुकूमशहानें कांहीं काळ आपल्या सामर्थ्यानें युरोप हालविलें. इकडे हिंदुस्थानांत " प्रजासत्ताक राज्याचें स्वप्न " पहात पहात वासुदेव बळवंत फडके एडनमध्यें मृत्यु पावले ते याच वर्षीं. महाराष्ट्रांत राष्ट्रीय उद्धाराचीं अनेक बीजें रोवणारे ' माला 'कार चिपळूणकर यांना दिवंगत होऊन यावेळी नुकतें एक वर्ष झालें होतें; त्यांच्या 'निबंधमालेचे' पडसाद अद्याप मराठी हृदयांत जोरानें उमटत होतें. सावरकरांनीं ' निबंधमाले'चीं पारायणें लहानपणींच कित्येक वेळां केली होतीं. मराठ्यांच्या बखरी अनेकवार वाचून ऐतिहासिक पुरुषांपासून त्यांनीं स्फूर्ती मिळविली. प्राचीन काव्याचा सुरस 'मेला' असलेलें ' नवनीत ' तर त्यांनीं बहुतेक तोंडपाठच केलें. वक्तृत्वकला त्यांच्या जिव्हेवर नर्तन करीत असे ! काव्य-शक्तीहि त्यांच्या ठायीं बालपणापासूनच अंकुरित झाली होती. त्याचें कारण स्वतः सावरकर सांगतात, " माझ्या वडिलांच्या आणि मामांच्या उभय कुलीं आढळून येणाऱ्या उपजत कवित्व–शक्तीचे अंकुरच आम्हां बंधूंच्या कवितेंत पल्लवित, पुष्पित आणि फलित झाले असावेत " दहाव्या वर्षीं त्यांनीं एक पोथी रचिली आणि बाराव्या वर्षीं त्यांचा स्वदेशाचा फटका ' जगद्धितेच्छु 'त प्रसिद्ध झाला. ' सर्व पेशव्यांत थोर पेशवे कोण व कां ?' हा निबंध सतरावे वर्षीं त्यांनीं लिहिला. 'करमणूक' पत्रानें लावलेल्या चढाओढींत तो सर्वश्रेष्ठ ठरून त्याला बक्षीसहि मिळालें. लहानपणापासून सावरकरांना हे नाद !

## पंधराव्या वर्षीं—

वक्तृत्वस्पर्धेत भाग घेण्याचा नाद, निबंध–स्पर्धेत भाग घेण्याचा नाद, वाचनाचा नाद, भाषणें करण्याचा नाद, कविता करण्याचा नाद, आणि मुख्य नाद स्वातंत्र्य–प्राप्तीचा वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षीं, ऐन मध्य-रात्रीं, साखर-झोंप घेण्याऐवजीं, दुःखाचे अश्रु ढाळीत बसलेला विनायक ! रानडे आणि चाफेकर यांना फांशी दिल्याचें वृत्त सांगणारें वृत्तपत्र डोळ्यासमोर ठेवलेलें ! त्या हुतात्म्याच्या गौरवाचा एक फटका व एक

नाटकहि विनायकानें रचलें. " विनायकानें रचिले पवाडे । स्वदेश-सत्प्रेम तयांत गाढे । " हें सेनापति बापटांनीं केलेलें वर्णन यथार्थ आहे.

आणि वयाच्या पंधराव्या वर्षीच ! समोर अष्टभुजा भवानीची मूर्ति आहे, नीरांजनाचा प्रकाश पडलेला आहे, रात्रींची गंभीर शांतता पसरलेली आहे, रोहिडेश्वरापुढें स्वराज्याची शपथ घेणाऱ्या बालशिवाजीची मूर्ति चित्तांत खेळत आहे. अशा वेळीं विनायकानें देवीच्या चरणावर हात ठेवून प्रतिज्ञा केली की, "देशाचें स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठीं सशस्त्र क्रांतीचा केतु उभारून मी मारतां मारतां मरेतों झुंजेन. "

## स्फूर्तीचे गुरु

ज्या महाराष्ट्रांत पंधराव्या वर्षी ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथराज रचला आणि शिवाजीमहाराजांनीं स्वराज्याची शपथ घेतली, त्याच महाराष्ट्रांत सावरकरांनीं पारतंत्र्य नष्ट करण्याची प्रतिज्ञा केली !! तेजस्वी जीवांना वयाचें बंधन कुठलें ? सिंहाचे छोटे छावेहि हत्तीच्यां गंडस्थळावर झेप घेतात. पंधरावे वर्षी सावरकरांनीं गणेश-उत्सवांत प्रकट व्याख्यान दिलें यांत विशेष काय आहे ? वक्तृत्व-स्पर्धेत पहिल्या क्रमांकाचें बक्षिस मिळविलें, यांत तरी विशेष काय आहे ? आणि याच सुमारास " नाशिक-वैभव " या पत्रांत अग्रलेख लिहिला यांत तरी विशेष काय आहे ? समुद्र उल्लंघिणाऱ्यानें तळीं व सरोवरें ओलांडण्यासारखेंच हें ! वक्तृत्व-स्पर्धेत सावरकरांना बक्षिस काय मिळालें ? तर प्रा. शिवरामपंत परांजपे यांचें ' काळ ' पत्र. त्यांतील काव्य-स्फूर्ति व स्वातंत्र्य-भक्ति पाहून सावरकरांचें त्याच द्रव्यानें घडविलेलें हृदय उचंबळूं लागलें. सावरकर हें मान्य करतात कीं, " जर मला माझ्या क्रांतिकारक जीवनाच्या स्फूर्तीचें गुरुपद कोणास तरी देणेंच पडेल, तर तें मी ' काळा 'सच देऊं शकेन." ता. १ जानेवारी १९०० रोजीं त्यांनीं ' मित्र–मेळा ' काढला. त्यामार्फत शिवाजी-उत्सव व गणेशोत्सव हे कार्यक्रम प्रकटपणें करीत; पण बंदुक–तलवारींचें शिक्षण गुप्तपणें घेत.

## विदेशीची होळी

अशा साहित्याच्या व राजकारणाच्या चळवळी करीत असतांनाच सावरकरांवर कांहीं कौटुंबिक आपत्ति कोसळल्या. प्लेगनें तर कहरच केला. वडील, चुलते व दोन्ही भाऊ—या सर्वांना या 'गांठ्या तापानें' गांठलें. त्यांपैकीं वडील १८९९ मध्यें प्लेगनें निधन पावले. आई महामारीनें १८९२ सालींच मृत्यु पावली होती. चुलतेहि प्लेगनेंच गिळले. बाबा (गणेश) व बाळ (नारायण) हे दोघे भाऊ मात्र वाचले. अशा धामधुमींतहि सावरकर १९०१ सालीं मॅट्रिक झाले. त्याच वर्षी त्यांचा विवाह झाला. १९०२ ते १९०५ हीं चार वर्षे त्यांनीं पुणें येथें फर्ग्युसन कॉलेजमध्यें काढलीं. पण त्यांचें सारें लक्ष असे कॉलेजबाहेरील लो. टिळक व प्रो. परांजपे यांच्या भाषणाकडे व चळवळींकडे. त्यावेळीं बंगालची फाळणी सरकारनें केल्यामुळें साऱ्या राष्ट्रांत क्रोधाची आग पेटली होती. तिची खूण म्हणून पुणें येथें लकडी—पुलाच्या ( आतां संभाजी—पुलाच्या ) खालीं विदेशी कपड्यांची प्रचंड होळी करण्यांत आली. तिचा पुढाकार घेतला होता सावरकरांनीं. अध्यक्ष होते लो. टिळक व वक्ते होते स्वातंत्र्यकवि प्रो. परांजपे !

## सशस्त्र क्रांतीची तयारी

१९०५ च्या डिसेंबरांत सावरकर बी. ए. झाले व १९०६ च्या जूनमध्यें ते इंग्लंडला रवाना झाले. त्यासाठीं त्यांच्या सासऱ्यानें त्यांना द्रव्य-साहाय्य केलें शिवाय श्यामजी कृष्णवर्मा यांचीहि मदत होती. श्यामजींकडे सावरकरांना शिफारस-पत्र दिलें लो. टिळकांनीं. इंग्लंडमध्यें 'अभिनव-भारत' या नांवाची संस्था सावरकरांनीं स्थापन केली. तेथून हिंदुस्थानांत पिस्तुलें पाठविण्याचा उपक्रम सुरू झाला. १९०९ सालीं, जुलै महिन्यांत इंग्लंडांत मदनलाल धिंग्रा यांनीं कर्झन वायलीचा खून केला आणि त्याच वर्षी डिसेंबर महिन्यांत नाशिक येथें अनंत कान्हेरे यांनीं जॅकसनला ठार केलें. याचा एक परिणाम म्हणजे ता. १३ मार्च १९१० रोजीं सावरकरांना इंग्लंडांत अटक झाली. तेथून त्यांना ता. १ जुलै रोजीं

हिंदुस्थानला आगबोटींतून चौकशीसाठीं पाठविण्यांत आलें. आपल्यापुढें मृत्यु उभा आहे हें सावरकरांना दिसलें. आपल्या यौवनाची राख होणार, संसाराचा उन्हाळा होणार आणि आपली राजकीय कार्यें होरपळून निघणार असें त्यांना वाटलें. चोहोबाजूंनीं अंधार दाटला-" शतसूर्य-मालिकांच्या दीपावलि विझाल्या ! " त्यांच्या साऱ्या आशांची अमावस्या झाली !

## समुद्रांत उडी !

अशा वेळीं निर्वाणीचें धैर्य सावरकरांच्या हृदयांत स्फुरलें त्यांना घेऊन जाणारी आगबोट फ्रान्सच्या किनाऱ्यावर मार्सेलिस बदरांत उभी होती. तेव्हां आग्ऱ्याहून सुटणाऱ्या शिवाजीमहाराजांचें स्मरण करीत त्यांनीं त्या आगबोटींतून पळून जाण्याचें ठरविलें. ता. ८ जुलै रोजीं पहाटेच्या वेळीं एक फूट रुंदीच्या भोंकांतून त्यांनीं आपलें शरीर समुद्रांत झोंकून दिलें. कातडी सोलली गेली, तरी ते दीडशें फूट समुद्र पोहून गेले. शिपायांचा पाठलाग सुरू झाला. त्यांचीं पिस्तुलें उडूं लागलीं. किनाऱ्याला पाय लागतांच सावरकर तीनशें यार्ड तसेच धांवत पळत सुटले. पण फ्रेंच शिपायानें लांच खाल्ली, नागरिक स्वातंत्र्याची पायमल्ली केली, आणि आपल्या देशाचा कायदा मोडून सावरकरांना इंग्रज शिपायांच्या स्वाधीन केलें. शिपायांच्या कसलें ? यमदूतांच्याच ! कारण, ता. २३ जुलै १९१० रोजीं हिंदुस्थानांत परत आल्यावर सावरकरांना दोन जन्मठेपींची शिक्षा झाली. त्यावेळीं आपल्या मागील प्रयत्नांचा मृत समुद्र व पुढील नरक-यातनांचा काळा- समुद्र-दोन्ही त्यांच्या डोळ्यांना खवळलेले दिसत होते. तरी असामान्य धैर्यानें सावरकरांनीं शिक्षा ऐकल्यानंतर असे निर्भय उद्गार काढले,"तुमच्या कायद्याप्रमाणें कठोरांतील कठोर शिक्षा जी मला मिळेल, ती निमूटपणें स्वीकारण्यास मी सिद्ध आहें. कारण माझी श्रद्धा अशी आहे कीं, आमच्या प्रिय मातृभूमीला आमच्या त्यागानें व हालानेंच यशःसिद्धि प्राप्त होईल. हें यश त्वरित न मिळालें, तरी तें मिळणार हें मात्र निश्चित." लोकमान्य टिळकांनींहि असेच स्वाभिमानदर्शक उद्गार काढले नव्हते का ?

## शिक्षा-सन्मानाचें अलौकिकत्त्व

दोन जन्मठेपींची शिक्षा ! ती भोगण्यासाठीं सावरकरांना अंदमानाला जाणाऱ्या बोटीवर—बोट कसली ? तिरडीच ती—ता. ४ जुलै १९११ रोजीं चढविण्यांत आलें ! ! तेथें मृत्युहूनहि भयंकर अशा आपत्ती भोगून, सुमारें तेरा वर्षांनीं, ता. ६ जानेवारी १९२४रोजीं त्यांना हिंदुस्थानांत आणण्यांत आलें. रत्नागिरी येथें सुमारें तेरा वर्षें स्थानबद्ध अवस्थेंत त्यांनीं काढल्या-नंतर ता. १० मे १९३७ रोजी ते पूर्ण मुक्त झाले. या अवधींत त्यांनीं हिंदुसभेचें कार्य केलें. त्या सभेचे ते सतत पांच वर्षे अध्यक्ष होते. यानंतर त्यांच्यावर सन्मान व सत्कार यांची वृष्टि होत गेली. १९३८ सालीं मुंबई येथें भरलेल्या ' मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९४३ सालीं ता. २८ मे रोजीं, त्यांच्या साठीं—समारंभानिमित्त त्यांना एक लाख वीस हजार रुपयांची थैली पुणें येथें अर्पण करण्यांत आली

१९४८च्या मेपासून१९४९च्या फेब्रुवारीपर्यंत गांधी—खून-खटल्यांत ते गुरफटले गेले. आपल्या बावन्नपानी जबानींत त्यांनीं जेव्हां गहिंवरलेल्या कंठानें, " माझी मातृभूमी स्वतंत्र झालेली पहाण्यास मी जिवंत आहें म्हणून मी स्वतःला धन्य समजतों." असे आनंदाचे उद्गार काढले, तेव्हां त्यांच्या —व इतरांच्याहि—डोळ्यांतून अश्रु ओघळले. न्यायमूर्तींनीं त्यांना निर्दोषी म्हणून सोडून दिलें. १९५२ सालच्या मे महिन्याच्या दहा तारखेस पुणें येथें आणखी एक आनंदाचा समारंभ झाला. सावरकरांनीं लंडन येथें १९१० सालीं स्थापिलेल्या ' अभिनव भारत ' या क्रांतिकारक संस्थेचा 'सांगता — समारंभ' त्यावेळीं झाला. कारण त्या संस्थेचें उद्दिष्ट जें स्वातंत्र्य' तें भारताला आतां लाभलें आहे. त्याबद्दल सावरकरांनीं आपल्या भाषणांत निःशेष आनंद मुक्तकंठानें घोषविला आणि सर्व पंथांच्या स्वातंत्र्य—सेवकांचा गौरवहि उदार मनानें केला.

## स्वाभिमानाची ज्वाला

" तर्कनिष्ठ विद्वत्ता आणि साहित्यप्रसव प्रतिभा यांचा आपल्या ठिकाणीं जो मधुर प्रीतिसंगम झाला आहे, त्यानें तर या सर्व गुणसंपदेला

अभिनव वैभव प्राप्त झालें आहे." असे गौरवाचे उद्गार सावरकरांविषयीं काढले गेले. कोणाकडून ? तर महाराष्ट्रांतील अनेकानेक साहित्य-संस्था, संपादक व साहित्यसेवक यांचेकडून. त्यांना त्यांच्या साठी-समारंभा-निमित्त दिलेल्या मानपत्रांत सावरकरांचें स्तुति-स्तोत्र अशा शब्दांनीं गाइलें आहे. गद्य असो वा पद्य असो — सावरकरांच्या सर्व साहित्यांतून देशाभिमानाचें एकच रक्त वहात आहे. आपला देश, आपला धर्म, आपली भाषा—जें जें म्हणून आपलें तें तें चांगलें, या स्वाभिमानाची जी ज्योत विष्णुशास्त्र्यांनीं पेटविली, तिची प्रचंड व प्रखर बनलेली ज्वाला म्हणजे सावरकर ! या स्वाभिमानाचीं दोन पथ्येंहि ते जाणतात. तीं पथ्यें म्हणजे आपल्या समाजांतील अस्पृश्यतादि दोष काढले पाहिजेत, आपले म्हणून ते जतन करून ठेवावयाचे नाहींत, असा विवेक त्यांच्या स्वाभिमानाच्या तळाशीं आहे. त्याचबरोबर त्यांच्या स्वाभिमानाचें मस्तक इतकें उंच आहे कीं, त्यामुळें त्यांना जगांतील इतरांचा चांगुलपणाहि दिसूं शकतो, स्वदोषा-प्रमाणें परगुणांचे बाबतींतहि ते अंध नाहींत. देशाभिमानाच्याहि तटबंदी ओलांडून सर्व मानवतेचें ध्येय डोळ्यापुढें ठेवण्याइतकी विशालता त्यांच्या विचारांत आहे.

## विचाराची उदारता

ज्या इंग्रजांनीं त्यांना जन्मभर तापल्या तव्यावर उभें केलें आणि ज्यांना या देशांतून घालविण्यासाठीं सावरकरांनीं जन्मभर जिवाचें रान केलें, त्यांच्याविषयींसुद्धां सावरकर किती समतोल व उदार दृष्टि ठेवतात पहा. " इंग्लिशांचा इंग्लिश म्हणून आम्ही केव्हांहि द्वेष केला नाहीं—करूं दिला नाहीं. इंग्लंड हिंदुस्थानावर आततायी आक्रमण जोंवर करीत आहे, तोंवरच तें आमचें शत्रु. तो आततायीपणा सोडतांच ते आमचे मित्रच आहेत. कारण मनुष्यमात्र एक आहे—आपला बंधु आहे, इतकेंच नव्हे, तर इंग्लंडच्या न्याय्य स्वातंत्र्यास जर कोणी दुसरें आततायी राष्ट्र अन्यायी दंडेलीनें तुडवूं पाहील, तर आम्ही इंग्लंडच्या मुक्ततेस्तवहि असेंच झटूं, झुंजूं; ही आमची अनेक वेळां व्यक्तविलेली

प्रतिज्ञा असे. आमची खरी जाति मनुष्य. खरा धर्म माणुसकी, मानवधर्म, खरा देश पृथ्वी, खरा राजा ईश्वर, अशी आमची अत्युदात्त भावना आहे."

## मायभूमीचें प्रेम कां ?

" देशाच्या भौगोलिक सीमा हे देशप्रेमाचें केंद्र कधीच नसते. " असा सिद्धांत सांगून सावरकर आपल्याला आपली मातृभू प्रिय कां आहे, याची मीमांसा करतांना म्हणतात, " हा हिमालय, ही गंगा, ही यमुना—यांच्या आश्रयानें माझ्या अभिमानाचें स्थान असलेली माझी संस्कृति जन्मली, नांदली व विकासली. मथुरेच्या वाळवंटाहून सुंदर वाळवंटें जगांत पुष्कळ असतील. परंतु मथुरेचेंच वाळवंट मला विशेष प्रिय कां ? तर येथें कृष्णाची बांसरी वाजली, म्हणून माझ्या पूर्वजांची स्मृति या वस्तूंशीं निगडित झाली आहे. माझें वेदवाङ्मय येथें जन्म घेतें झालें. माझे वाडवडिल येथें जन्मले व मेले. माझ्या ऋषिमुनींच्या पदरवानें ही भूमि पुनीत झाली आहे. माझ्या संस्कृतीचा भूत तसाच भविष्यकाळहि ह्या भूमीशीं निगडित झाला आहे. हेंच तिजसंबंधींच्या माझ्या प्रेमाचें कारण होय. तिचें वैशिष्ट्य माझ्या प्रेमाचें केंद्र आहे. "

## स्वतंत्र भारतांतील पीक

भारतमातेच्या पुत्रास उद्देशून सावरकरांची तेजस्वी प्रतिभा किती आशावादी सूर काढीत आहे—आणि तेहि लंडनमध्यें १९०६ सालीं असतांना—तें पहा.

" परमेश्वरानें तुला भरतभूसारखी शेती दिली आहे. या विस्तीर्ण शेतीला गंगा, यमुना, गोदावरी, कावेरी, सिंधु व ब्रह्मपुत्रा हे अखंड कालवे देवानें तयार करून ठेवले आहेत. या दिव्य शेतींत या अखंड कालव्यांच्या पाण्यानें तुझ्या पूर्वजांनीं धान्यच नव्हे तर प्रत्यक्ष सोनेंही पिकविलें आहे......तूंच ही शेती करशील तर हींत सोनें पिकेल. ही देवाची शर्त तूं पाळलीस कीं, हिंदुस्थाना, पुढच्या हंगामांत तुझ्या या दिव्य शेतींत, पाऊस पडो किंवा न पडो—कोहिनूर पिकतील, मयूरासनें पिकतील, कालिदास पिकतील, शिवाजी पिकतील ! "

## भारतीयांची संस्कृति

भारत–पुत्रांना आशायुक्त व अभिमानयुक्त करणारी ही वाणी जशी त्यांनीं काढली, तशीच त्या भारतपुत्रांना आपल्या जबाबदारीची जाणीव देण्यासाठी सावरकर लिहितात, " उत्तम नदी ती कीं, जी अत्यंत गोड व विमल पाणी देते; उत्तम शेत तें कीं, जें धान्याच्या कणसांनीं सदैव आंदोलन घेत असतें व उत्तम वृक्ष तोच कीं, ज्याचीं फळें अत्यंत मधुर व रसाळ असतात; त्याचप्रमाणें उत्तम देश तो होय कीं, ज्याच्या पुत्रांचें अंगीं कांहीं तरी असामान्यता असते. देशभूमीची खरी चारुता तिच्या स्वतःच्या महत्त्वानें जितकी प्राप्त होते, तिच्या शतपट अधिक रीतीनें त्या देशभूमीच्या पुत्रांच्या कृतीवरून ठरत असते......सर्व जगाला अजून वंद्य असणाऱ्या कपिल महामुनींनीं जिला ' आई ' म्हणून वंदन करावें अशी भूमि या जगावर किंवा चद्र-मंगल–बुधादि ग्रहहो, तुमच्या तिकडे तरी एखादी आहे काय ? भास्कराचार्यांनीं, आर्यभट्टांनीं व वराहमिहिरांनीं भूगोलाचे, ज्योतिषशास्त्राचे व गणितशास्त्राचे शोध या भूमींतील अन्न-सेवनानें आलेल्या तीव्रतेनें लाविले. दशांशांचा शोध या भूमीचा आहे, गुरुत्वाकर्षणाचा शोध या भूमीचा आहे. भूमिति या भूमींत जन्माला आली...सप्तसुरांचा उदय या भूमीच्या कोमल कंठांतून झाला...जगताला व्याकरणशास्त्राची देणगी या भूमीनें दिली. "

## कल्पनेची स्वर्गापर्यंत भरारी

भारतमातेच्या स्तुतिस्तोत्राची संधि आली कीं, सावरकरांच्या लेखणीला कशी पौर्णिमेची भरती येते ! केवळ कालिदासालाच शोभेल अशा उत्तुंग व विलासी कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें सावरकर अशी एक कथा सांगतात कीं,—" सर्व जगतीतलावर पसरलेल्या हजारों भूभागांमध्यें आर्यभू-सारखी रमणीय भूमि दुसरी कोणती आहे, हें पहाण्यासाठीं हिमालय-पर्वत उठून उभा राहूं लागला. त्यानें आपलें डोकें सर्व विश्वांतील प्रदेश दिसतील इतकें उंच केलें. तरी त्याला इतकी रमणीयता अन्यत्र कोठेंच आढळेना ! भूलोकावर जिच्याइतकी रमणीयता नाहीं तिच्यासमान

स्वर्गलोकांत तरी कांहीं आहे कीं नाहीं म्हणून, जयानें उत्साह पावलेला तो हिमालय स्वर्गाचीं कपाटें उघडून आंत घुसला. परंतु, तेथें, हे आर्यभू, तुझ्याइतकी मनोरम वस्तु सांपडण्याऐवजीं कांहीं निराळाच प्रकार झाला ! हिमालयाचीं तीं हिमधवल सौधशिखरें पाहून इंद्राच्या अमरावतींतील अप्सरांची एकच त्रेधा उडाली ! त्या सर्वजणी हिमालयाच्या गळ्यांत मिठ्या मारूं लागल्या. अमरावतीचा त्याग करून तेव्हांपासून त्या हिमालयावर स्वच्छंदानें विहार करीत असतात. ”

भारतांतील पक्षी—एक नुसता मोर घेतला तरी सावरकरांचें कवि—मन आनंदानें किती बेभान होतें पहा——

“ मनुष्याच्या डोळ्यास प्रसादविण्यास्तव सौंदर्यांचा नी सुरंगांचा जो महोत्सव तूं त्रिभुवनांत चालू केलास त्याची आरास तरी काय वर्णावी ? हें पारिजाताचें सुकोमल फूल, तें सोनचांफ्याचें सुवास—मत्त सुमन ! हा मोराचा पिसारा पहा, अहाहा ! एकेका पिसाची ती ठेवण, तें रंगकाम. ती जिवंत चमक, तें तरल नटवेंपण ! आद्य कलावन्त ! अशा अनेक सुंदर पिसांचा तो पिसारा पसरून तो तुझा मोर जों जों आनंदानें उन्मत्त होऊन नाचूं लागतो, तों तों देवा, तुझी ती ललित कलाकुसरी पाहून ‘ धन्य देवा, धन्य तुझी ! वारे वा ! ’ असें वारंवार उद्गारत माझें हृदयहि नाचूं लागतें ! आणि असा पिसारा मनुष्यासहि तूं कां दिला नाहींस म्हणून किंचित् रुसूंहि लागतें ! ” शेवटची विनोदाची किनार काव्य-कल्पनेला किती शोभून दिसते !

## प्रतिभेला अनुभवाची जोड

अन्य साहित्यिक व सावरकर यांमध्यें एक मोठा फरक आहे. तो हा कीं, ते स्वत धाडशी कृति-वीर असल्यामुळें निरनिराळ्या अद्भुत प्रसंगां-तून गेलेले आहेत व त्या त्या प्रसंगांचे रोमांचकारक अनुभव त्यांनीं साक्षात् घेतले आहेत. चोहोबाजूंनीं मृत्यूची काळीकुट्ट सांवली स्वतःला वेढीत असतांना एखाद्या लहानशा झरोक्यांतून आकाशांतील तेजःपुंज ताऱ्यांचें दर्शन झालें कीं, त्यांच्या प्रतिभेंतून ‘ सप्तर्षि ’ सारखी कविता जन्मास

येते. समुद्रानें तर त्यांना इंग्लंडपासून अंदमानपर्यंत सुखदुःखांचें कैक झोके दिले. त्यांचें जीवन-मरणच समुद्र-पृष्ठावरील लाटावर खेळत होतें. ज्यानें जन्मांत समुद्र पाहिला नाहीं, असा एखादा प्रतिभाशाली लेखक समुद्राचें यथातथ्य वर्णन करून ' रॉबिन्सन क्रूसो ' सारखी अमर वाङ्मय-कृति निर्माण करूं शकतो. पण प्रत्यक्ष अनुभवाचा जिवंतपणा कांहीं निराळाच ! सावरकर समुद्राच्या स्वभावाविषयीं लिहितांना एके ठिकाणीं म्हणतात.

" मनुष्यांचीं तारवें पाठीवर वाहून नेतां नेतां, सदय वाटाड्याचें सोंग घेऊन चाललेला वाटमाऱ्या जसा भर रानांत त्याच बायाबापड्या वाटसरूंवर उलटून त्यांचे गळे कापतो, तसा हा समुद्र अकस्मात् हजारों माणसांनीं भरलेलीं तीं तारवें नी त्या प्रचंड टिटानिका बोटी आपल्या पाठीवरून फेंकून आपल्या भयंकर जबड्यात ढकलतो—गट्कनी गिळून टाकतो ! एखादी राक्षसीण रागावली तर एकाद्या लेंकराची मानगुटी नदींत दाबून, त्याचा गुदमरून जीव जाइतों धरील ! एखादी हिंस्र सुसर फार तर दोनतीन सुरेख कुमारिकांना नदींत उतरून लाजत लाजत स्नान करीत असतां, त्यांचे काकडीसारखे कोवळे लुसलुशीत पाय दांतांत धरून हिसडून पटकन् गिळून टाकील, पण ही गंगामाय, ही जमनाजी, ही देवांची जार्डन, हा फादर थेम्स, हजारों कुमारींची, मुलांलेकरांची मान एका लाटेसरशीं, आपल्या पाण्यांत याचा अवश्य जीव गुदमरून ठार होइतों दाबील, नगरेंची नगरें त्यांचा पाय हिसडून गिळून टाकील."

समुद्राच्या अजस्र सामर्थ्याचें दुसरेंहि एक वर्णन वाचा. " हाच समुद्र पहा. केवढी ही अतर्क्य, अगम्य राक्षसी शक्ति ! त्याच्या अंगावर ही नाव निसरत गम्मत करीत चालली आहे. तो चालूं देतो म्हणून. जसा तो एकादा प्रचंड राक्षस एकाद्या घुंगुरुटाचें धाष्टर्य क्षणभर, आणि पटकन चापटी मारून, करून टाकतो त्यास होतें कीं नव्हतेसें ? तसें हें तुम्हां घुंगरुट मनुष्याचें धाष्टर्य. ही प्रचंड सामुद्रिक शक्ति खवळेल, तर एका लाटेच्या एका बिंदूच्या, एका तुषारावर ही तुझी नावच नव्हे तर हें खंडच्या खंड उचलून चुरून सुपारीसारखें झटकन् गिळून टाकील ! तर पत्ता लागूं

देणार नाहीं कीं, इकडे कोणी आशिया खंड होतें कीं नव्हतें ! यःकश्चित् हा मनुष्य ! ''

## तत्वज्ञानाची तुतारी

समुद्राकडे पहातां पहातां सावरकरांच्या अंतःकरणांतील ' कवि ' जसा जागा होतो, तसाच येथें तत्त्वज्ञहि जागृत झाला आहे. फार काय, अंदमानात पाशवी कष्ट करतांनाहि त्यांच्यांतील काव्याचें कूजन व तत्त्वज्ञानाची तुतारी सुरूच होती. तुरुंगांत प्रथमच या तरुण बॅरिस्टरला काथ्या कुटण्याचें बिकट काम देण्यांत आलें. तें करतां करतां त्यांचें मन म्हणतें, " सकाळ झाली कीं सध्याकाळ, संध्याकाळ झाली कीं सकाळ, सगळी काथ्याकूट. आपण वनस्पति खात खात जगावयाचें, जगत जगत मरावयाचें, मरतांच त्या हाडा–मांसास वनस्पतींनीं खावयाचें, सगळी काथ्याकूट. तेजोमेघांची सूर्यमाला, सूर्यमालेची पृथ्वी, पृथ्वीची एकाद्या धूमकेतूशी टक्कर उडाली कीं पुनः तेजोमेघ, सगळी काथ्याकूट ! तशीच, त्याचाच व त्याचाच अवश्य व अपरिहार्य भाग म्हणून हें वळलेलें चऱ्हाट उकलून कुटण्याची आमची काथ्याकूट. जर ती महान् काथ्याकूट महत्वाची असेल, जर तींत आयुष्य व्यर्थ जात नसेल, तर हीहि एक छोटीशी काथ्याकूट कर्तव्यच आहे. कारण त्या महान् काथ्याकुटीचा हाहि एक अपरिहार्य घटक आहे ! ! ''

## आगरकरांचे वारस

तेरा वर्षे अंदमानांत बंदिवान म्हणून आणि तेरा वर्षे रत्नागिरींत स्थानबद्ध म्हणून सावरकरांनीं आपल्या आयुष्याचा माध्यान्ह काळ काढला. ते स्वतः स्थानबद्ध असतांना त्यांची लेखणीहि विषयबद्ध होती. राजकारणावर लिहिण्यास त्यांना सरकारनें बंदी केली होती. तेव्हां त्यांची लेखणी इतर क्षेत्रांत धांवू लागली. सामाजिक, धार्मिक व साहित्यिक अशा कुरणांमागून कुरणांवर ती स्वच्छंदानें चरूं लागली. ते स्वतः ईश्वर न मानणारे, पोथीनिष्ठा न ठेवणारे, उघड्या बुद्धिवादानें चालणारे, विज्ञानांना प्रमाण समजणारे असे करोल सुधारक आहेत. त्यांचे कैक लेख आगरकरांचे

म्हणून सहज खपण्यासारखें आहेत. किंबहुना, आगरकरांपेक्षांहि अधिक तार्किकता, अधिक तिखटपणा व अधिक कोटीबाजपणा त्यांच्या कांहीं कांहीं निबंधांत आहे. काव्याची चमक व उपहासाची धार या बाबतींत तर सावरकरांचें स्थान आगरकरांपेक्षां उंचच आहे. आगरकरांनीं ' शनि-देवाची आरती ' लिहिली, तशीच 'कंदिल-स्तुति' सावरकरांनीं विनोदानें रचली आहे; ती अशी —

—" ओम जयजयाजी कंदिला
म्युनिसिपल यशोमंदिला
काळोखासुराच्या धुंदिला
  उतरवितां तूं तत्क्षणीं ॥ १ ॥

राकेल डबा ज्याचा पिता
आगपेटी धन्य माता
हे कंदिलदेवा समर्था
  दीपो ज्योति नमोस्तु ते ॥ २ ॥

हा कंदिलवाला नोकर
तुझिया डब्यांत राकेल
घाली थोडें, चोरी फार
  काळोख्याची रात्रीं नेमानें ॥ ३ ॥

यास्तव करी मी नवस
मावळतांची दिवस
मालवे न तूं परी प्रकाश
  घासलेटावांचोनी ॥ ४ ॥

पावसी जरी या नवसास
ब्राह्मण घालीन दहावीस
लागु दे निदानीं न ठोकरीस
  आम्हां तुझ्याची खांबाच्या ॥ ५ ॥

## भौतिकवादाचा पुरस्कार

भौतिक साध्य भौतिक साधनांनीच प्राप्त व्हावयाचें, त्यासाठीं पारमार्थिक वा अदृष्ट उपाय योजून कांहींहि उपयोग नाहीं, हें तत्व आवेशानें व टासटासून सावरकर सांगतात. आपल्या या सिद्धांताच्या पुष्टीसाठीं ते अशीं उलटसुलट उदाहरणें देतात, " अहो, ह्या भारतवर्षांत ज्या आम्हां हिंदूंनीं सकाळ-संध्याकाळ-मध्यान्हीं सूर्यासाटीं भक्तिभरानें अर्घ्यांची संतत धार युगायुगानें सारखी वाहत ठेवली आहे आणि सूर्यस्तुतीच्या गायत्रीचा अखंड घोष चालू ठेवला आहे; त्याच आम्हां हिंदूंच्या साम्राज्यावर आज शतकोंशतकें त्या सूर्यानें पाठ फिरविली आहे; आमच्या आशेच्या साम्राज्यावर तो मुळींच उगवत नाहीं ! पण कधींच मावळत नाहीं कोणाच्या साम्राज्यावर ? ज्यांनीं त्याला युगांयुगांतुन एकदांहि अर्घ्य दिलेले नाहीत; गायत्रीचे जे घातक, सूर्यनमस्कारांवांचूनहि ज्यांचे स्नायु पोलादी, मणगटें वज्रमुष्टि, भर सूर्यग्रहणांत जेवणारे, सूर्यवंशाचे उच्छेदक, राहूचे नी केतूचे वेदबाह्य साथीदार; त्यांच्याच साम्राज्यावर आज तो सूर्य मावळत नाहीं ! प्राचीन सूर्योपासक बाबिलोन-मिश्र-मिसर-सोडा. ते आज झालेले आहेत नामशेषच ! पण आजहि जीं दोनच राष्ट्रें सूर्योपासक आहेत, तीं पारस नी भारत; त्यांच्याच राष्ट्रावर आज राज्य आहे निराशेच्या एकछत्री काळ्याकभिन्न रात्रीचें ! व्रताविधीनें सूर्य प्रसादत नाहीं—व्रताविधी-त्यागानें सूर्य रागावत नाहीं. याचें याहून उत्कृष्ट प्रत्यक्ष प्रमाण दुसरें काय असणार ! सूर्य सूर्याच्या सृष्टिनियमानें प्रवर्तते, निवर्तते; आमच्या व्रतवैकल्यानें नव्हे; स्वेच्छेनेंहि नव्हे ! तीच गोष्ट त्या शनीची, त्या संक्रांतीची, त्या ग्रहणांची, त्या मंगळाची. त्या साऱ्या भाकडकथांची, रस्त्याच्या प्रत्येक दगडाला शनिप्रीत्यर्थ शेंदूर फांसून तेल चोळलें युगायुगानें ! संक्रांत बसणार नेहमीं आमच्याच बोकांडीं; मंगळ आम्हांलाच काय तो अमंगळ; त्यांना जे दमडीचाहि धूप कधीं जाळीत नाहींत त्यांची उलट चंगळ ! "

यांतील वाक्यरचना किती लवचिक आहे, पहा. ज्यावर जोर द्यावयाचा त्या शब्दाला अग्रस्थान.

## आग्रही प्रचार

धर्मश्रद्धेवर सावरकरांची तर्कशक्ति किती कडाडून हल्ला चढविते पहा. " गायीबैलासारखे पशु काय किंवा वडपिंपळासारखीं झाडें काय, तीं मनुष्यास अत्यंत उपयुक्त असतात, म्हणून त्यांच्याविषयीं आम्हांस प्रेम वाटावें, त्या प्रमाणांत किंचित् पूज्यताहि वाटो. त्यांचें पालन नी कौतुकहि करणें आमचें कर्तव्य, ह्या अर्थीच काय तो, तो आमचा धर्म ! पण त्याचाच उपसिद्धांतहि हाच नव्हे काय कीं, ज्या परिस्थितींत तो पशु वा तीं झाडें मनुष्यास उपद्रव देण्यास कारण होतात, तेव्हां ती पालनीय वा रक्षणीय रहात नाहींत. आणि जेव्हां त्यांच्या नाशानेंच मनुष्यजातीचें वा राष्ट्राचें हित साधणारें असतें तेव्हां त्याचा नाश हाच मनुष्यधर्म वा राष्ट्रधर्म होणार ! "

अस्पृश्यता तर सावरकरांना त्याज्यच वाटते, पण जातिभेदहि उच्छेदावयाची घाई त्यांना आहे. त्यासाठीं किती निकराचा प्रचार ते करतात पहा. अस्पृश्यता-निवारण ही एक न्याय्य आणि सोपी गोष्ट आहे हें वाचकांच्या मनावर टसविण्यासाठीं ते आग्रहानें लिहितात.—" केवळ शिवायचें ! कीं, जन्मजात जातिभेदाचा एक पाय खाड्दिशीं उखडला जाऊन तात्पुरतें तरी चार कोटि हिंदुबांधवांस माणुसकींत आणून सोडण्याचें महत्कृत्य त्याचें त्यानें पुरतें केलें म्हणून समजण्यास हरकत नाहीं; तरी रे हिंदुसंघटका, ऊठ आणि दुसरें कोणी काय हवें ते करो, तूं तुझ्यापुरतें या घटकेपासून हें व्रत धर कीं, जें बोट कुत्र्यामांजरास मी लावतों, तें बोट मी माझ्या ' अस्पृश्य ' धर्मबंधूस, माणसास प्रत्यहीं लावल्यावांचून प्रत्यहीं अन्नग्रहण करणार नाहीं. म्हण ' शिवेन ' ! " सावरकरांच्या लिहिण्यांत तडजोड नाहीं, मिळमिळीतपणा नाहीं, जर–तरची सावधानता नाहीं. ' झुंजेन व जिंकेन ' हेंच त्यांचें जीवन–ब्रीद. त्याचेंच प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयांत पडलेलें.

## भाषा–शुद्धीच्या मर्यादा

भाषाशुद्धीचा प्रचारहि सावरकरांनीं अशाच झंझावाती वेगानें केला

आहे. झंझावात म्हटला कीं, धूळधुरळा उडावयाचा आणि पाहणाराला सृष्टीचें सत्यस्वरूप कांहीं दिसावयाचें नाहीं. सावरकरांच्या भाषाशुद्धीच्या तत्त्वाचेंहि सत्यदर्शन पुष्कळांस झालें नाहीं. आणि म्हणूनच पुष्कळ साहित्यिक विरोध करावयास उठले. पण सावरकरांनीं विवेक सांभाळून व तारतम्य चालवून आपल्या आंदोलनाला योग्य त्या मर्यादा प्रथमपासूनच घातलेल्या आहेत. त्या बरोबर ध्यानीं आल्यामुळेंच डॉ. माधवराव पटवर्धनांसारखे प्रांजल साहित्यिक विरोधाचें शस्त्र खालीं ठेवून भाषाशुद्धीचें सारथ्य करूं लागले. इंग्रज किंवा मुसलमान यांचा द्वेष आणि म्हणून त्यांच्या शब्दांचाहि द्वेष, ही भाषाशुद्धीची भूमिकाच नव्हे. परके व अनवश्यक तेवढेच शब्द आपल्या भाषेंतून काढून टाकावयाचे आणि त्यांच्या जागीं मराठींतील मूळचे शब्द वापरावयाचें हें त्यांच्या भाषाशुद्धीचें धोरण आहे. ओक, गुलाब, अशीं विशिष्ट वस्तूंचीं नांवें किंवा शास्त्रीय पारिभाषिक शब्द परक्या भाषेंतून घेण्यास सावरकरांचा विरोध नाहीं. या आपल्या भूमिकेसंबंधीं सावरकर स्वच्छ लिहितात, " आम्ही भाषाशुद्धिवादी मंडळी इंग्लिश शब्दांना जें बहिष्कारतों तें ते केवळ परकी आहेत, म्हणूनच नव्हे ! तर ते परकी असून अनावश्यकहि आहेत म्हणून. त्यापेक्षां वा तितकेच अन्वर्थक असे आपले स्वकीय शब्द असतांना परकीय शब्द वापरूं नयेत, आपले तदर्थक शब्द मरूं देऊं नयेत, असें भाषाशुद्धीच म्हणणें. आमच्यांत नसलेली वा आमच्याहून चांगली असलेली अशी कोणतीहि हितकारक नि अवश्य गोष्ट—मग तो शब्द असो वा शस्त्रअस्त्र, आचार—वाक्प्रचार, ज्ञान-विज्ञान कांहीं का असेना—तें परदेशांत जेथें आढळेल तेथून आणून आत्मसात् करण्याची तर प्रतिज्ञाच आहे आमची. "

## अंगणांतील खाण

मराठीचें भाग्य असें आहे कीं, नवे शब्द बनविण्यासाठीं सर्व साहाय्य करण्यास संस्कृत भाषा तिच्या पाठीशीं सदैव उभी आहे. आणि ती संस्कृतहि कशी ? तर सावरकर सांगतात, " जिच्यापुढें ग्रीक, लॅटिन इत्यादि भाषांनींहि आनतमस्तक व्हावें अशी आपली संस्कृत भाषा किती

संपन्न आहे ! तिला अव्हेरून इंग्रजी, फारसी इत्यादि दुसऱ्या परक्या भाषांतून शब्द घेणें म्हणजे घरांतील सोन्याची वाटी फेकून चिनीमातीचे कप हातीं घेण्यासारखेंच नव्हे काय ? सूर्य, चंद्र यांना इंग्रजींत एकएकच शब्द; पण संस्कृतांत किती पर्याय आहेत ? आणि तेहि असे कीं, एकेक शब्द म्हणजे जणुं श्लोक, जणुं काव्यच ! अशी बहुमोल खाण अंगणांत असतांना परक्याच्या दारीं भीक कां मागतां ? ”

## क्रियापदांची टांकसाळ

भाषाशुद्धीचा केवळ तात्त्विक प्रचार करूनच सावरकर थांबले नाहींत, तर ती कृतींत आणण्याचा प्रत्यक्ष आचारहि ते प्रथमपासून करीत आहेत. त्यामुळेंच हुतात्मा, निबंध, बोलपट, विश्वस्त, स्तंभ, टंकलेखन, परिच्छेद, झरणी, गणसंख्या, इच्छुक, उपस्थित, उत्तरदायित्व, प्रतिवृत्त, निवेदन, ध्वनिक्षेपक, नभोवाणी, अद्यावत् इत्यादि शब्द रूढ होऊन रुळलेसुद्धां. त्याचप्रमाणें आपल्या भाषेमध्यें अल्पाक्षरांनीं बहुत अर्थ प्रगटविण्याचें सामर्थ्य आणण्याचेंहि कंकण सावरकरांनीं आपल्या हातीं बांधलें आहे. इंग्रजीप्रमाणें मराठीतहि नामापासून क्रियापदें करण्याची पद्धत जोरावावी आणि त्यायोगें मराठीचें क्रियापद–दारिद्र्य घालवावें असा सावरकरांचा कटाक्ष आहे. “ जें जें चांगलें तें तें परकीय असलें तरी ग्राह्यच होय. ” अशी आपली वृत्ति त्यांनीं व्यक्तविली आहे. स्वागतिलें, आंघोळणार, पवित्रावें, निर्मळावें, बहिष्कारणें, व्यक्तविणें, प्रगटविणें, इत्यादि क्रियापदें त्यांनीं उपयोगिलीं आहेत. उद्धारणें, उत्तरणें अशी क्रियापदें वापरण्याची प्रथा श्री. हरिभाऊ आपटे यांनीं सुरू केली होतीच, ती सावरकरांनीं दृढावली व रूढावली.

## साहित्याचें ध्येय काय ?

साहित्याचेंच काय, पण एकूण जीविताचेंच ध्येय आपण काय मानतों, हें सावरकरांनीं एके ठिकाणीं स्पष्टपणें निवेदिलें आहे. ते म्हणतात, “ मनुष्यजातीचें अधिकांत अधिक हित ज्यायोगें साधतां येतें तेंच मनुष्याचें ऐहिक कर्तव्य होय. तात्कालिक कर्तव्यहि त्याच न्यायानें असें कीं,

प्राप्त परिस्थितींत त्या त्या कालीं मनुष्यजातीचें जें अधिकांत अधिक हित साधतां येईल तें तें साधावें. या दृष्टीनें साहित्याच्या परम वा तात्कालिक ध्येयाचीहि व्याख्या अशीच असणार, कीं मनुष्यजातीच्या अधिकांत अधिक हितास साधण्यासाठीं झटेल तेंच साहित्य श्रेष्ठ, तेंच सुप्रासंगिक. आनंद नि करमणूक हीं मानवहितास कांहीं प्रमाणांत हित-कारकच असल्यामुळें त्यांचाहि अंतर्भाव योग्य त्या प्रमाणांत वरील ध्येयांत होतोच. पण केवळ करमणूक हें कांहीं कर्तव्य नव्हे. घरांत आई मरणांतिक वेदनांनीं अंथरुणास खिळली असतां, जर एखादा बहकलेला कलावंत बंगल्यांत नायकिणीच्या नाचांत रमूं शकला, तर त्यास कलावंत म्हटलें तरी कुलदीपक कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं !"





# आचार्य कालेलकर : : : १४

आपल्या मायभूमीचें नखशिखांत दर्शन कितीजणांनीं घेतलें असेल? काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत आणि कराचीपासून रंगूनपर्यंत आपला देश कसा आहे, हें किती जणांनीं पाहिलें आहे?—आणि तेंहि विमानानें, आगगाडीनें किंवा मोटारगाडीनें नव्हे, तर पायीं हिंडून. आचार्य कालेलकर हे अशा दुर्मिळ भाग्यवंतांपैकीं एक आहेत. त्यांनीं सारा भारत खरोखर 'पादाक्रांत' केला आहे—पायीं चालून पालथा घातला आहे—आणि तोहि एकदां नव्हे, अनेकदां. त्यांच्या अखंड प्रवासाकडे पाहिलें म्हणजे चीनहून हिंदुस्थानास येणाऱ्या पूर्वींच्या जिज्ञासु बुद्ध भिक्षूंचें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं.

## अनेक भाषांचे पंडित

प्रवास—अखंड प्रवास—देशभर पायीं प्रवास—आणि तोहि कसा ? तर डोळे, कान व मन उघडे ठेवून केलेला. कांहीं रसिक तरुण आग्र्याचा ताजमहाल—आणि फक्त ताजमहालच—पाहून परत येतात; तर कांहीं धार्मिक वृद्ध काशीची कावड रामेश्वराला डोळे मिटून पोचवितात, पण प्रवासांतील रस पदोपदीं चाखणारे कालेलकरांसारखे चोखंदळ विरळा ! त्यांची जन्मभाषा मराठी, त्यांनीं प्रभुत्व गाजविलें गुजरातीवर आणि जन्मभर प्रचारिली हिंदी. याशिवाय इंग्रजी, संस्कृत, कानडी वगैरे भाषांचाहि अभ्यास त्यांनीं केलेला. त्यामुळें, कोणत्याहि राज्यांत, कोणत्याहि गांवी गेले, तरी त्यांना परकें असें वाटतच नाहीं. या सर्व भाषांतील वाङ्मयाचा संस्कार त्यांच्या चित्तावर झालेला आहे. त्यांच्याइतका उदार सुसंस्कृतपणा फारच थोड्या विद्वानांमध्यें सांपडेल.

त्यांच्या विद्वत्तेला रसिकतेचीहि भरजरी किनार आहे. त्यांची वृत्ति अंतर्मुख व अध्यात्मवादी आहे. देशाभिमान हा तर त्वचेप्रमाणें त्यांच्या सर्व जीवनाला व्यापून राहिलेला आहे. रसिक वृत्ति, संस्कारित बुद्धि व आध्यात्मिक भावना—या अमोल साहित्यानिशी कालेलकरांनी देशभर संचार केलेला आहे. रसिकता हीच त्यांची दुर्बिण आणि मार्मिकपणा हाच त्यांचा कॅमेरा.

## वर्णनाची किमया

त्यांच्यापूर्वीं कांहीं शिक्षक–प्राध्यापक–प्राचार्य यांनीं काश्मीरचे, हिमालयाचे प्रवास केलेले होते आणि प्रवासवर्णनेंहि लिहून, छापून प्रसिद्ध केलीं होतीं, नाहीं असें नाहीं; पण तीं बहुधा, शाळेंतील भूगोलाप्रमाणें किंवा आगगाडीच्या वेळापत्रकाप्रमाणें, रुक्ष तपशिलानें कळकटलेलीं होतीं. आपल्या प्रवासांतील हालअपेष्टांचें व अडीअडचणींचेंच वर्णन त्यांत जास्त. त्या त्या स्थानांचें किंवा सृष्टिसौंदर्याचें वर्णन यथातथाच. कालेलकरांची किमया अशीं कीं, त्यांनीं पुण्याची पर्वती वर्णावयास घेतली, तरी वाचकाला वाटावें, आपण मलयगिरीवरच चढलों आहों, आणि त्यांच्या

कलमांतून मुळामुटेचें शब्दचित्र निघालें, तर वाटावें कीं, आपण स्वर्गगेच्या काठानेंच चाललों आहोंत ! आणि तो सौंदर्यराशी हिमालयच त्यांनीं रंगवावयास घेतला असेल तर? हातांतील पुस्तक खालीं ठेवावें आणि रेल्वेचें तिकीट काढून तडक हिमालयाची वाट धरावी, असेंच रसज्ञ वाचकांस वाटतें. ही जादू, ही करामत, ही किमया कालेलकरांच्या रसाळ व सुसंस्कृत लेखणींत आहे.

## क्रांतिकारकांच्या जाळ्यांत

" काका कालेलकर " या प्रेमळ नांवानेंच ते सर्वत्र ओळखले जातात. त्यांचे मूळचें नांव दत्तात्रेय बाळकृष्ण कालेलकर असें आहे. त्यांचा जन्म सांवतवाडीजवळ बेळगुंदी गांवी १८८५ सालीं झाला. वडिलांना जी सरकारी नोकरी होती, ती होती फिरतीची. त्यामुळें कालेलकरांना लहानपणापासूनच फिरावयास सांपडलें. प्रवासाचें बाळकडूच त्यांना मिळालें म्हणाना.

कालेलकरांचें कॉलेजचें शिक्षण पुण्यास झालें. फर्ग्युसन कॉलेजांत आचार्य कृपलानी, आचार्य कालेलकर इत्यादि आजची गांधीवादी मंडळी तेव्हां कॉलेजांतील विद्या एकत्र शिकत होती——आणि बॉम्बची विद्याहि शिकत होती. सशस्त्र क्रांति करून आपल्या देशाला स्वतंत्र करावें ही महत्वाकांक्षा कालेलकरांच्या अंतःकरणांत उसळ्या मारीत होती. वंग-भंग, सुरतेचा कॉंग्रेस-भंग, लालाजींची हद्दपारी, लोकमान्यांना काळेपाणी— इत्यादि एकाहून एक अधिक क्षोभकारक प्रसंगांचे धक्के कालेलकरांच्या तरुण हृदयाला बसत होते आणि ते त्यांना देशाभिमानाचे धडे नकळत देऊन जात होते.

## शिक्षकाच्या खुर्चीवर

पदवीधर होतांच त्यांनीं टिळक-आगरकरांचा मार्ग अनुसरला आणि एका राष्ट्रीय शाळेंत शिक्षकाचा पेशा पत्करला. शाळेपेक्षां अधिक व्यापक प्रमाणावर शिक्षण देण्याची संधि त्यांना लवकरच मिळाली. मुंबई येथें त्यावेळीं ‘ राष्ट्रमत ’ या नांवाचें राष्ट्रीय पक्षाचें एक दैनिक

चालू होतें. त्याच्या संपादक-मंडळांत कालेलकर काम करूं लागले. त्यानंतर त्यांना निमंत्रण आले बडोद्याहून. तेथील गंगानाथ विद्यालयांत ते अध्यापकाचें काम करूं लागले. तें विद्यालय सरकारच्या दडपशाहीस बळी पडल्यानंतर कालेलकर प्रवासास मोकळे झाले. त्यांनीं दूरदूरचे प्रवास केले. त्यांची थोर विद्वत्ता जाणून ठिकठिकाणच्या सस्था-चालकांनी त्यांना आपल्याला लाभ देण्याविषयीं विनंति केली. हरिद्वारचें ऋषि-कुल, डॉ. टागोरांचें शांतिनिकेतन इत्यादि कांहीं श्रेष्ठ शिक्षण-संस्थांत ज्ञानदानाचें कार्य त्यांनीं केलें—आणि तेथून त्यांनीं ज्ञान लुटलेंहि पुष्कळ.

## गांधीजींचें गुरुत्वाकर्षण

याच सुमारास म. गांधी आफ्रिकेंतील आपला अभिनव असा सामुदायिक सत्त्याग्रहाचा प्रयोग यशस्वी करून हिंदुस्थानांत आले होते आणि अहमदाबादजवळ साबरमती आश्रमांत रहात होते. राष्ट्रांतील सर्व विधायक सेवकांचें तें एक केंद्र गांधीजी बनवीत होते. कोणत्याहि प्रांताचा, कोणत्याही जातीचा मनुष्य असो; त्याच्या अंगीं कांहीं विशेष गुण दिसला कीं, गांधीजी त्याला प्रेमानें पाचारीत, आस्थेनें जवळ करीत, किंबहुना एक आश्रमीयच बनवून टाकीत. या ‘ गुरुत्त्वाकर्षणानें ’ काकासाहेब गांधीजींकडे ओढले गेले आणि साबरमती आश्रमांत त्यांनीं ठाण दिलें. गांधीजींनीं पुढें ‘ गुजरात विद्यापीठ ’ काढलें, तर त्याची स्थापनेआधींपासूनची जबाबदारी त्यांनीं सोपविली कालेलकरांवरच.

## प्रवासाची ओढ

वर्धा येथें राहून कालेलकर निरनिराळ्या कार्यांचीं चक्रें फिरवीत असतात. त्या संस्थांच्या कचेऱ्या ज्या ठिकाणीं आहेत, त्याला ‘ काकावाडी ’ असें नांवच पडलें आहे. ‘ हिंदुस्थानी प्रचार सभेचें ’ काकासाहेब हे प्राण आहेत. त्यांनीं राष्ट्रभाषेचा प्रचार देशभर मोठ्या प्रमाणावर केला. या प्रचाराच्या निमित्तानें तर त्यांना प्रवास घडलाच, पण त्याशिवाय त्यांनीं हौसेनेंहि पुष्कळ प्रवास केला, त्यांना समुद्राची ओढ विलक्षण.

" या, या " म्हणून समुद्राच्या लाटा आपणाला हांक मारीत आहेत असेंच त्यांना वाटतें. आणि हिमालयाचें आकर्षण ? ' सासरहून माहेरीं जाणाऱ्या मुलीसारखी आपली अवस्था हिमालयाकडे जातांना होते, ' असें तेच सांगतात. हिमाल्याकडे जाणें म्हणजे स्वगृहींच जाणें—परमुलुखांत जाणें नव्हे असेंच तें मानतात. १९१२ सालीं त्यांनीं हिमालयांत दोन-तीन हजार मैलांचा पायीं प्रवास केला. तो संपविल्यानंतर सात वर्षांनीं त्यांनीं ' हिमालयांतील प्रवास ' हा आपला ग्रंथ लिहिला. देशांतील निरनिराळ्या नद्या पाहून सुचलेले त्यांचे विचार ' लोक-माता ' या पुस्तकांत पहावयास मिळतात. त्यांची मुशाफरी ब्रह्मदेशापर्यंतहि पोंचलेली आहे. दक्षिणेकडील ' जोग धबधब्याचें वर्णन ' म्हणजे तर एक गद्य-काव्यच आहे राष्ट्र-पुरुषाचें दर्शन स्वतः घेण्यांत व इतरांना वाङ्मयद्वारां घडविण्यांत कालेलकरांचें बहुतेक सारें आयुष्य कारणीं लागलें आहे.

स्वातंत्र्य-प्राप्तीच्या प्रत्यक्ष संग्रामापासून ते अलिप्त राहिले. तरीहि १९४२ सालीं त्यांना ब्रिटिश सरकारनें अटक केली होतीच. 'हिंडलग्याचा प्रसाद,' ' उत्तरेकडील भिंती ' इत्यादि त्यांची ग्रंथ-संपत्ति म्हणजे तुरुंगांतील साहित्य-संततिच होय. गुज्रातींत तर त्यांना ' पहिल्याश्रेणीचे ग्रंथकार ' म्हणून मान दिला जातो. ' जोडणी-कोश ' लिहून त्यांनीं गुजराती भाषेला व्यवस्थित स्वरूप दिलें. हिंदींतहि त्यांनीं कांहीं ग्रंथ लिहिलेले आहेत. ' सर्वोदय,' ' मंगल प्रभात,' इत्यादि हिंदी मासिकांचें लेखन-संपादनहि ते करतात.

## राहवेना म्हणूनच लिहिलें

प्रवासाची ओढ जशी कालेलकरांना अनिवार आहे, तशीं प्रवास-वर्णनें लिहिण्याची कांहीं नाहीं. मग त्यांनीं इतकें लिहिलें, तें कां ? या प्रश्नाचें उत्तर ते देतात, " निसर्गाचें आकर्षण, इतिहासाचा ओढा आणि धर्मभावनेंतील काव्य या संस्कार-त्रयीनें ज्याचें जीवन समृद्ध झालें आहे, त्याची वाणी मूळची मूक असली तरी यथाकाळीं वाचाळ होणारच. जें पोटांत सांठवलें असेल तें ओठांवाटे बाहेर पडल्यावाचून कसें राहील ?

अगदीं राहवेना, म्हणूनच भारतवर्षांतील पाहिलेल्या कित्येक नद्यांचें येथें स्मरणपूर्वक उपस्थान केलें आहे. ''

आपल्या प्रवासी जीवनाचा धांवता आढावा घेतांना आचार्य कालेलकर लिहितात, " कृष्णेच्या कांठीं ज्याचें बाळपण गेलें, किशोर वयांत ज्यानें समुद्रकांठीं वाळूचे किल्ले बांधले, गंगा यमुनेच्या संगमस्थानीं ज्यानें स्वतःच्या आईबापांच्या अस्थींचें विसर्जन केलें, गंगोत्री, त्र्यंबकेश्वर आणि लोणावळा वगैरे ठिकाणीं ज्यानें पवित्र नद्यांचे उगम पाहिले, हिराबंदर, कोटीबंदर, अड्यार, कारवार वगैरे ठिकाणीं ज्यानें सागर-सरितांचा संगम न्याहाळला, त्याच्याजवळ नद्यांविषयीं सांगण्याजोगें थोडें थोडकें नसणार.''

## कृष्णेचें माहात्म्य

कृष्णेच्या पाण्यांत महाराष्ट्राचें माहात्म्य मिसळलेलें आहे, हें सांगण्यासाठीं कालेलकर म्हणतात, ''कृष्णा ही महाराष्ट्राची आराध्य देवता. तिचें थेंबभर-सुद्धां पाणी पोटांत गेल्यास आपण पावन होऊं ! ज्याच्या पोटांत कृष्णेचा एक बिंदु गेला आहे तो महाराष्ट्रीयपणा कधीं विसरणार नाहीं. श्रीसमर्थ व शिवाजीमहाराज, शाहू व बाजीराव, घोरपडे व पटवर्धन, नाना फडणीस व रामशास्त्री—थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्राचें साधुत्व व वीरत्व, महाराष्ट्राची न्यायनिष्ठा व मुत्सद्दीपणा, धर्म व सदाचार, देशसेवा व विद्यासेवा, स्वतंत्रता व उदारता हीं सर्वच कृष्णेच्या वात्सल्यांत वाढलीं आहेत. देहू व आळंदी येथील इंद्रायणीचें पाणी कृष्णेलाच मिळतें. पंढरपूरची चंद्रभागासुद्धां भीमा होऊन कृष्णेंतच विलीन होते. " गंगास्नान आणि तुंगापान " या म्हणींत जिचा गौरव व्यक्त झाला आहे ती तुंगभद्रा कर्नाटकाच्या प्राचीन वैभवाच्या स्मरणासहित कृष्णेंतच मिसळून जाते. खरें सांगावयाचे म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटक व तेलंगण ( आंध्र ) या तीन देशांचें ऐक्य साधण्यासाठींच कृष्णा वाहत आहे. या तीनहि प्रांतांनीं कृष्णेचें दुग्धपान केलें आहे. कृष्णेंत प्रांतीयता नाहींच ! ''

## गोदा-गौरव

कृष्णेप्रमाणेंच गोदावरीचाहि महिमा आहे. तो गातांना कालेलकर

म्हणतात, " कृष्णा व गोदावरी या दोन नद्यांनीं दोन, महाप्रजांना पोसलें आहे. महाराष्ट्राचें स्वराज्य व आंध्राचें साम्राज्य या दोन नद्यांमुळेंच भरभराटलें असें म्हटल्यास त्यांत तिळमात्र अतिशयोक्ति होणार नाहीं. साम्राज्यें उभारलीं गेली आणि भंगलीं; महाप्रजा उन्नतीस चढल्या आणि पडल्या; पण या ऐतिहासिक भूमींत या दोन नद्या भूतकालाच्या गौरवशाली इतिहासाच्या जशा साक्षी आहेत, तशाच त्या भविष्यकालीन महान् आशांच्याहि प्रेरक आहेत." गोदावरीच्या कांठावरून हिंडतांना, 'सहनवीर' रामचंद्राची ती उदात्त मूर्ति आचार्यांना दिसते, तशीच दुःखमूर्ति सीतेची मंदमंद पावलें टाकीत जाणारी त्यागमय आकृतिहि नजरेस पडते. रामराज्याचें स्मरण होऊन त्यांना त्यांच्याभोंवतालचें ब्रिटिशांचें अधिराज्य आठवतें व भावनेच्या आवेगांत देशभक्ति उचंबळून येऊन, ते गोदा-मातेला हाक मारून म्हणतात, " माते गोदावरि ! ज्याप्रमाणें तुझ्या तीरावर श्रीरामचंद्रांनीं दुष्ट रावणाचा नाश करण्याचा संकल्प केला, तसा संकल्प कधींपासून मी मनांत वागवीत आहें. तुझी कृपा असेल तर हृदयांतून, व देशांतून रावणाचें राज्य नाहींसें होईल, रामराज्याची स्थापना झालेली दिसेल आणि फिरून तुझ्या दर्शनाला येईन. " लेखकाची महत्वाकांक्षा, आध्यात्मिक वृत्ति व राष्ट्रभक्तीची भावना या सर्व गुणांची ओळख या दोन वाक्यांवरूनहि होत नाहीं काय?

## यमुनेचीं रूपें

कृष्णा-गोदावरी या महाराष्ट्रांतील नद्या, त्यांच्या मानानें गंगा-यमुना या नद्या किती मोठ्या व त्यांच्या काठावर नांदलेली संस्कृति किती प्राचीन ! पर्वतराज हिमालयाच्या या दोन राजकन्या. त्यांचें स्वरूप, त्यांचें वैभव, त्यांचें चरित्र सारेंच कांहीं निराळें. यमुनेचें नुसतें उगम-स्थल कसें आहे हें सांगतांना कालेलकर लिहितात, " हिमालय म्हणजे भव्यतेचें भांडार ! सर्वत्र भव्यपणाचें प्रदर्शन करून भव्यतेची भव्यता कमी करणें हाच जणूं त्याचा व्यवसाय आहे. तरीसुद्धां अशा हिमालयांतहि एक स्थळ असें आहे कीं, ज्याची उर्जस्विता हिमालयांत वास करणाऱ्यांच्यासुद्धां डोळ्यांत

भरते. तें स्थळ म्हणजे यमराजाच्या भगिनीचें उगमस्थान होय. उंचीवरून बर्फ वितळून मोठा धबधबा खालीं पडत आहे; आसमंतात् गगनचुंबी नव्हे, तर गगनभेदी जरठ महावृक्ष आडवे पडून कुजत आहेत; उत्तुंग पहाड यमदूतांप्रमाणे रक्षण करण्यास उभे आहेत; घटकेंत पाणी थिजून त्याचें बर्फ होत आहे आणि घटकेंत बर्फ वितळून बर्फाइतकेंच थंड पाणी होत आहे; अशा ठिकाणीं भुईतून विलक्षण रीतीनें उकळणारे पाणी उसळून वर येतें. ”

निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या रूपांत आपल्याला भेटलेल्या यमुनेला उद्देशून आचार्य म्हणतात,

“ हं, हीच ती काळी कालिंदी; जिच्या पाण्यांत मी प्रयाग येथें स्नान केलें होतें, जिचीं कासवें वृंदावनांत वानरांबरोबर लढतांना मी पाहिलीं होतीं, जिच्या आरशांत ताजमहालाचें प्रतिबिंब पाहून मी आश्चर्यचकित झालों होतों, आणि जिच्या नांवाशीं कालियामर्दनांतील चित्रें मी लहानपणापासून जोडलीं होतीं. दुहेरी हाडाची, मजबूत बांध्याची सोळा सतरा वर्षांची सुंदरबाला यौवनाच्या जाणिवेच्या अभावीं धांवत उड्या मारीत असावी आणि सांखळ्याघुंगरांच्या नादाच्या मस्तींत साऱ्या जगाला विसरून जात असावी, अशी ती तेथें दिसते. ”

## गंगामाईचा प्रपंच

यमुना कांळीं तर गंगा गोरी. गंगेचा तो धवल व विशाल प्रवाह पाहतांना कालेलकरांना वाटतें, “ हरिद्वार हें खरोखर गंगाद्वार आहे. भागीरथीगंगा गंगोत्रीमधून निघाली, तेथून महादेवाच्या जटेंत म्हणजेच हिमालयाच्या जंगलांत ती सांपडली. अनेक डोंगरांमधून किंवा टेकड्यांमधून कसाबसा रस्ता काढून ती पुढें सरकतें. तिकीट घ्यायच्या निरुंद वाटेंतून लोक पसार होतात त्यावेळीं जशी गर्दी आणि अडचण होते, तशीच अडचण पहाडांत गंगेला होते. एकादी जंगी मिरवणूक अरुंद गल्लींतून मोठ्या मैदानावर येते आणि मग जसे लोक मोकळेपणानें ‘ हुश्श ’ करीत अनेक दिशांनीं विखुरतात, तीच दशा हरिद्वाराजवळ श्रीगंगाजीची

झाली आहे. गोठ्यांतून सुटलेलीं वासरें स्वतंत्रतेचा अनुभव घेण्याकरितां जशीं इकडे तिकडे धांवतात, तशी हरिद्वारहून गंगानदी अनेक प्रवाहांनीं धांवते; आणि प्रत्येक प्रवाहाचा उल्हासमुद्रा बालवृत्तीच दाखवितो. नील-धारा कांहींशी गंभीर आहे खरी; पण लहान मुलें आजोबाची पगडी घालून हातांत काठी घेऊन मोठ्या गंभीरपणानें चालतात, तशीच ही कृत्रिम गंभीरता आहे. "

## नद्यांचीं मुलें

नदीच्या प्रवाहांत जे भोवरे गिरगिरतांना दिसतात, त्याकडे पाहून कालेलकर उद्गारतात, " लहानमोठ्या नावा म्हणजे नदीचीं मुलें. आईचा स्वभाव ओळखून घेतल्यानंतर तिच्या मांडीवर वाटेल तशीं तीं नाचलीं तरी त्यांना कोण अडवणार ? पण मुलांची उपमा त्या नांवाना देण्यापेक्षां प्रवाहांत ठिकठिकाणीं फिरणाऱ्या भोंवऱ्यांना देणें अधिक योग्य होईल. ते घटकेंत दिसत, प्रचंड तुफान करण्याचा आविर्भाव करीत आणि लगेच दुसऱ्या क्षणीं हसूं लागत; ते वाटेल तेथून येत आणि वाटेल तिकडे जात."

अशा एक ना दोन—छपन्न नद्यांचे लहानमोठे प्रवाह, त्यांचे रुंद—अरुंद कांठ, त्यांच्या कांठावरील वनश्री आणि त्यांच्या सान्निध्यांत घडलेला हजारों वर्षांचा इतिहास कालेलकरांना 'लोकमाता' दिसतांच आठवतो. तो त्यांनीं वेचक शब्दांनीं उभा केला आहे.

## सागराची शोभा

अशा सरितांचा पति जो सागर त्याच्या अखंड तांडवानें कालेलकर मुग्ध होतात. कन्याकुमारी येथें तर तीन सागर एकत्र आलेले ! अपूर्व शोभा ! नुसती भरती—ओहोटी पाहून कालेलकर म्हणतात, " समुद्राचें दर्शन झालें तर भरती-ओहोटीरूपी त्याचा श्वासोच्छ्‌वास आपलें लक्ष वेधून घेतल्याखेरीज रहात नाहीं. आपल्या श्वासानें जर आपलें रक्त शुद्ध होतें, तर समुद्राच्या या भरती-ओहोटीनें कशाची बरें शुद्धि होत असेल, अशा तऱ्हेचे कल्पनातरंग उठल्यावांचून कसे राहतील ? आणि समुद्रावरचे पतंग ( शिडाचीं जहाजें ) जेव्हां लाटांवर डोलूं लागतात, तेव्हां आतां या लाटां-

तून फुलें फुलतील अशी उत्कंठा वाटूं लागते. समुद्रांत जसे लाटामुळें पाण्याचें हृदय वरखालीं होतें, तसें दृश्य शस्य-श्यामला धरित्रीवरहि केव्हां केव्हां दिसतें. ''

## भूवरील स्वर्ग

आणि या नद्यांचा पिता, सर्व पर्वतांचा राजा, अखिल पृथ्वीचा मान-दंड असा हिमालय दृष्टीस पडतांच आचार्यांचें भानच हरपतें. काश्मीर-मधील एका तलावाचें वर्णन करतांना ते म्हणतात.

'' पृथ्वीवर जर कोठें स्वर्ग असेल तर तो येथेंच आहे, येथेंच आहे, येथेंच आहे,'' असें सम्राट जहांगिरानें झेलम नदीचा उगम पाहून म्हटलें. त्याचे हे उद्गार येथील अष्टकोनी तलावाच्या एका बाजूस कोरून ठेवले आहेत. खरोखर हें स्थळ भूस्वर्ग या पदवीस शोभेल असेंच आहे. नसां-नसांतून व रोमरोमांतून चेतना उत्पन्न करणारा शीतल मधुर वारा जेथें वाहतो, जेथें वनश्री आपल्या यौवनाचा पुरेपूर उन्माद प्रकट करते, जेथें पर्वत आपल्या सौंदर्यानें हा खरोखरच पर्वत आहे कीं रंगभूमीवरील पडदा आहे अशी शंका मनांत उत्पन्न करतो, आणि जेथील शांति चैतन्यानें गजबजलेली असते, अशा ठिकाणीं झेलम नदीचा उगम झाला आहे. तिचें वेदकालीन नांव ' वितस्ता.' जहांगीर बादशहानें या उगमाच्या स्थळीं एक सुंदर अष्टकोनी तलाव बांधला आहे. आंतील पाणी—पाणी म्हणजे नीलमण्यांचा रस !—पाहिल्याबरोबर वाटतें कीं, येथें कोणी निळीनें रंगविलेलें कपडे धुतले असावेत. इतकें स्वच्छ, गोड पाणी दुसरीकडे कोठें मिळणार ? ''

## पर्वतांचा राजा

हिमालयाच्या पायाचें नख शोभणाऱ्या एका स्थळाचें हें वर्णन ! मग साक्षात् हिमालय—त्याचीं तीं एकाहून एक अधिक उत्तुंग रुपेरी शिखरें ! तीं दृष्टीस पडतांच आचार्यांची संस्कारित बुद्धि बोलूं लागते, '' हिमालय—आर्यांचें हें आद्यस्थान, तपस्व्यांची ही तपोभूमि—हा पुरुषार्थी लोकांना

चिंतन करण्याचें एकांतस्थान, थकल्याभागलेल्यांचा विसावा, निराश झालेल्यांचे सांत्वन, धर्माचें माहेर, मुमुर्षु जनांची अंतिम दिशा, साधकांचें आजोळ, महादेवाचें धाम आणि अवधूताची पथारी आहे. माणसांनाच काय, पशुपक्षांनासुद्धां हिमालयाचा केवढा तरी आधार आहे. सागराला मिळणाऱ्या अनेक नद्यांचा तो पिता आहे, त्याच सागरांतून उद्भवलेल्या ढगांचें तो तीर्थस्थान आहे. कविकुलगुरूंनीं या 'देवतात्मा नगाधिराजा'ला पृथ्वीचा मानदंड म्हटलें आहे, तें अनेक अर्थांनीं यथार्थ आहे. हिमालय हा भूलोकीचा स्वर्ग व यक्षकिन्नरांचें वसतिस्थान आहे. जगतांतील सर्व दुःखांना सामावून घेईल इतका तो थंड आहे; कुबेरालाहि आश्रय देण्याइतका तो धनाढ्य आहे, आणि मोक्षाची शिडी बनवूं शकेल इतका तो उंच आहे."

## अद्भुत दृश्यें

हिमालय म्हणजे अद्भुत दृश्यांचा सागर आहे. नाटकांत एक एक पडदा उलगडतांच नवा नवा देखावा दिसतो, तसा विस्मयकारक अनुभव कालेलकरांनी घेतला आणि 'तच्च संस्मृत्य संस्मृत्य हृष्यामि च मुहुर्मुहुः' या वृत्तीनें ते अनुभव वर्णिले आहेत. ते म्हणतात, "वर पोंचतांच जें दृश्य दिसलें तें मी जन्मात विसरणार नाहीं. वेदकालीन ऋषींची महासभा बसली असावी अशा रीतीनें असंख्य बर्फाच्छादित शिखरांची एक महापरिषद् अर्धवर्तुलाकार बसलेली होती ! नाहीं म्हटलें तरी पन्नास मैलांचें दृश्य येथून दिसत होतें आणि ज्या दिशेला पहावें तिकडे दूरवर पांढरीं पांढरीं शिखरें अनंततेचें सूचन करीत होतीं ! हें पांढरें बर्फ त्रिकालातींत असावें असें पसरलेलें होतें बर्फ जसजसें शिळें होत जातें तसतशी त्याच्यावर हस्तिदंताच्या पिवळटपणाची प्रतिष्ठा येते, आणि त्यावर जेव्हां कुठें कुठें नवीन पांढरें कापरासारखें बर्फ पडतें, तेव्हां तें एकाद्या म्हातारीच्या मांडीवर मूल बसलें असावें, तशी शोभा देतें."

आतां धुक्याची गंमत पहा, "पहाडांत जेव्हां धुकें असते, तेव्हां पुष्कळ वेळां प्रवाश्याला जादूचीं दृश्यें दिसतात. दह्यासारखें जाड धुकें

पसरलें असलें म्हणजे मागेंपुढें एका हातापेक्षां जास्ती क्वचित्च कांहीं दिसतें. समोरासमोर माणसें पळत आलीं तर बरोबर टक्कर होईल ! एवढ्यांतच जर ढग विखुरलें अ णि सूर्याचे किरण आपला प्रताप गाजवूं शकले तर तेंच धुकें तिथल्या तिथें वितळून जातें आणि मोठी विशाल सृष्टि एकदम प्रकट होते. आश्चर्यमग्न होऊन इकडे तिकडे पाहूं लागावें तोंच मत्सरी ढग आकाशाचीं कवाडें बंद करून टाकतात; कीं लगेच आपण धुक्यांत मग्न होऊन जातों आणि मग कांहींच दिसत नाहीं. हें इंद्रजाल पहाण्यास कांहीं और मजा येते. ”

सृष्टि-सौंदर्याचें आकंठ पान करतां करतां त्याचा कैफ चढून कालेलकर म्हणतात, “ जसजसा टक लावून हें सारें दृश्य मी पाहूं लागलों, तसतसा त्याचा उन्माद माझ्या मेंदूंत चढूं लागला आणि सगळें दृश्य जणुं टेकड्यांचा एक महासागर उसळत असावा तसें वाटायला लागलें. अशी एक जरी टेकडी आपल्या इकडल्या सपाट प्रदेशांत येऊन बसेल तर कवी आणि भाट अभिमानानें तिचें अखंड गायन करतील. पण येथें या टेकड्यांना विचारतो कोण ? जशी हिंदुस्थानच्या संतांना गणती नाहीं, तशी हिमालयांतील टेकड्यांनाहि गणती नाहीं. ”

## सृष्टीचें रौद्र स्वरूप

हें झालें उत्तरेकडचें वैभव. दक्षिणेकडेहि असेंच नैसर्गिक सौंदर्य ओसंडत आहे. गिरसप्पाचा धबधबा पाहण्यासाठीं कालेलकर गेले होते. त्याचे निरनिराळे भाग पाहतांना त्यांना नवनवा आनंद अनुभवास आला. ते म्हणतात, “ राजा ” धबधबा म्हैसूर सीमेकडून दुरून पाहिला होता, तेव्हां तो वेगळाच दिसत होता. येथें मात्र जणूं काय हत्तीच्या गंडस्थळावरच झोपलों आहोंत इतक्याजवळ आम्ही होतों. वरचें पाणी धबधब्याकडे अशा कांहीं वेगानें धावत होतें कीं, जणुं काय एकादा महान् लोकसमाज कळत न कळत, इच्छा असो नसो, प्रचंड क्रांतीकडे धावत आहे ! ”

आणखी एक धबधबा पाहतांना आचार्यांच्या चित्तांत कल्पनांचीं पांखरें उडूं लागलीं. ते विचारतात, “ वीरभद्राचा प्रपात हत्तीच्या गंड-

स्थंळासारख्या एका विस्तृत शिलांखंडावर आपटल्याबरोबर त्यामधून आतष-बाजीच्या बाणासारखे फवारे उंच उंच उडत जातात ! हें शंकराचें तांडव-नृत्य कीं महाकवि व्यासाच्या प्रतिभेचा नवनवोन्मेषशाली कल्पनाविलास ? की सूर्यबिंबाच्या पृष्ठभागापासून निघणाऱ्या सर्वसंहारकारी, पण कल्पनामय ज्वाला ? कीं भूमातेच्या वात्सल्याच्या स्तन्यधारांचे फवारे ? ”

## ढगावर ढग उगवले

धबधब्याचे शिरावर नाचणारे ढग पाहून कालेलकर म्हणतात,

“ आणि ढग! ढग म्हणजे अनंत आकाशाचे चिरप्रवासी यात्रेकरू! आकाश बदलावयाचें नाहीं आणि ढग क्षणभरहि स्थिर राहायचे नाहींत.या दोघांच्या कात्रींत सांपडलेल्या सूर्याला क्षणोक्षणीं नवी भूमिका धारण करावी लागते. पृथ्वी - बहुरत्ना वसुंधरा--वाटेल तितकें वैभव दाखवो, तें कमीच आहे असें सिद्ध करण्यासाठींच या ढगांची नेहमीं धडपड चालू असते ! या ढगांशीं चढाओढ करण्याचें जर कोणाच्या मनांत येत असेल, तर तें हिमालयांतील बर्फाच्या ढिगांना; पण हिमालयाच्या पहाडापेक्षांहि मोठमोठे पहाड वाटेल त्या ठिकाणी उभे करून हे ढग हिमालयाचे, किंबहुना, पृथ्वीचें गर्वहरण करतात ! फरक इतकाच कीं, पहाडावर लहान-मोठे असंख्य वृक्ष उगवतात, तर ढगांवर ढगच उगवतात !”

## सागराची हाक

कराची बंदरांतील एका बेटावर कालेलकर गेले असतांना तेथें भिंतीवर आपटणाऱ्या लाटांचें दृश्य त्यांना दिसलें. त्याचें वर्णन करतांना ते म्हणतात, “ एकेक लाट म्हणजे जणु एकेक उसळणारी टेकडीच. ती उत्तुंग शोभा पाहून दुसऱ्या लाटांनीं तिचें कौतुक करायला हवें; पण तें सोडून त्या दोघी एक होतात व नवाच उच्चांक गांठतात. येवढेंच काय, पण आस-पासच्या लाटांनादेखील आपल्याइतकें उच्चत्वाला पोंचण्यासाठीं उत्ते-जित करीत राहतात. हें नृत्य एका क्षणाचीहि उसंत न घेता अव्याहत चालू असतें. त्याकडे अगदीं टक लावून पाहत बसलें, तर त्यांत एक

तऱ्हेचा प्रचंड ताल असल्याचा प्रत्यय येतो. जणुं शिवतांडव स्तोत्राचें प्रमाणिका वृत्त आपली शक्तीच अजमावूं पाहत आहे ! "

समुद्राची ओढ कालेलकरांना अनावर ! तो जणूं त्यांच्याशीं बोलतो. त्याचे शब्द आचार्यांना ऐकूं येतात. कोणते ते शब्द ? आचार्य सांगतात, " स्थानांतर करून करून अनेक दृष्टिकोणांतून आम्ही तें दृश्य पाहिलें. त्यामुळें लाटांच्या मनांत आमच्याविषयी सद्भावना निर्माण झाली. त्या आम्हांला म्हणूं लागल्या, " या, या, इतक्या दुरून काय पाहतां ? तुमच्याविषयी आमच्या मनांत परकेपणा मुळींच नाहीं. असे जवळ या ना ! हुंगा, खेळा. क्षणभर मौज करा कीं ! या क्षणांत आणि अनंत काळांत कांहींच फरक नाहीं. चला या. "

लाटांचा शिष्टाचार कांहीं विचित्रच ! निमंत्रण देतांना त्या हात धरणार नाहींत, तर पाय धुतील."

## कल्पनारम्य वर्णन

भावनगर येथील गौरीशंकर तलावाचें दर्शन कालेलकरांनीं घेतलें आणि त्यांच्या कवि-मनाला वाटलें, " अगदी शेवटच्या पायरीवर पाय ठेवला म्हणजे जणूं एकाएकी आकाशाचा पट चिरून एकादी अप्सराच आपल्यासमोर अवतीर्ण व्हावी तसें सरोवराचें पाणी स्मित करीत आपणांकडे पहात असल्याचें दृश्य दिसतें. सरोवराचें दर्शन घेण्यासाटीं आपण जरी एकटें गेलों तरी तेथें आपण एकटेंच रहाणार नाहीं. आकाशांतील मेघपंक्ति आणि उतावीळपणें धांवपळ करीत आलेली संध्यातारका आपल्याप्रमाणेंच सरोवराचें सौंदर्य निरखीत असलेली आपल्याला दिसेल."

## अद्वैताचा आनंद

डेहराडूनजवळ ' सहस्रधारा ' म्हणून एक स्थान आहे, तें पहावयास एकदां कालेलकर गेले. तेव्हां त्यांना काय दिसलें ? कोणता अनुभव आला ? " तोंच एकाएकीं सहस्रधाराचा धबधबा उसळत असलेला दिसला. उंचावरून स्वच्छ पाणी घट्ट झालेल्या मातीच्या भिंतीवरून खालीं कोसळतें

आणि निनाद करतें. एकलय, एकताल यांत तें मग्न असतें. आजूबाजूला कोणी आहे कीं नाहीं हें पहाण्याची काय गरज ? काय होत आहे त्याची त्याला काय पर्वा ? धब धब धब धब अव्याहत चालूच आहे. दगडांवरून पाणी खालीं आदळतें यांत तेवढें आश्चर्य वाटत नाहीं. परंतु येथें तर आपला हट्ट न सोडणाऱ्या मातीवरून पाणी कोसळतें. मी तर नुसता पहातच राहिलों. प्रपाताचा नशा इतक्या उन्मादानें चढतो हें जर दारुड्याला कळलें तर तो आपलें व्यसन टाकून अहर्निश येथेंच येऊन उभा राहील. क्षणभर मी हेंहि विसरलों कीं, आम्हांला परत जायचें आहे. एका क्षणासाठीं तरी कां होईना, जेव्हां आपण निसर्गाशीं तादात्म्य होतों तेव्हां खरोखर अद्वैतानंदाचा साक्षात्कार घडतो. आपणा स्वतःचें भान विसरल्यावर आनंदच शिल्लक राहणार ! ”

सृष्टीचें स्वरूप सूक्ष्मतेनें पहाण्यांत कालेलकर जितके दक्ष असतात, तितकेंच त्या स्वरूपाचें शब्दचित्र तपशिलानें काढण्यांत ते निष्णात आहेत. त्या वर्णनावर हृद्य कल्पनेचा व रम्य अलंकारांचा साज चढविण्याचीहि हौस त्यांना आहे आणि त्या दर्शनातूनहि आध्यात्मिक तत्त्व शोधून काढण्याचीं शक्ति त्यांचे ठायीं आहे. ते कवि आहेत तसेच तत्त्वज्ञहि आहेत.

## दोन शब्द-मूर्ति

कालेलकर नुसते रसिक नाहींत, ते गाढे पंडित आहेत. ज्या ज्या ठिकाणीं ते जातात, तेथील सारा इतिहास त्यांची जाणती बुद्धि उभा करते. श्रीमत् शंकराचार्य व भगवान् बुद्ध यांच्या शब्द-मूर्ति त्यांनीं कशा कोरल्या आहेत, पहा. “ धर्मक्षेत्रांत शंकराचार्य हे समुद्रगुप्तासारखे किंवा नेपोलियनसारखे विजेते होते, राजा तोडरमल किंवा शिवाजीसारखे व्यवस्थापक होते, तुळशीदासारखे कवि होते, बुद्ध भगवानासारखे आत्मविश्वासी होते, आणि ज्ञानेश्वरासारखे साहित्याचार्य होते. त्यांनीं सनातन हिंदु लोकांना जी व्यवस्था लावून दिली, तिचे अवशेष अजूनहि कायम आहेत. खरोखर शंकराचार्यांना ‘हिंदु-धर्म-सम्राट्’ म्हटलें पाहिजे.”

बोधिवृक्षाकडे पहातांच आचार्यांचें मन प्राचीन काळाकडे धांवत जातें

व म्हणतें, " त्या ठिकाणीं तो तरुण बसला नव्हता; भारतवर्षाची सनातन श्रद्धा बसली होती. तरुणांचा कुलगुरु, आस्तिकतेचा सागर, निर्भयतेची मूर्ति, अशा भगवान् नचिकेताचा तो अवतार होता. अक्षय्यस्थान मागणाऱ्या राजपुत्र ध्रुवाच्या परंपरेंतील तो होता; कारण त्याची निष्ठासुद्धां तितकीच ध्रुव होती. तरुणानें निर्धार केला होता कीं, याच आसनावर शरीर सुकून गेलें तरी बेहत्तर; हाड, मांस, आणि कांतडें हवेंत मिसळून गेलें तरी हरकत नाहीं; पण जोपर्यंत या भवरोगाचें दुःख नाहींसें करणारें बहुकल्पदुर्लभ बोधि ( ज्ञान ) मिळणार नाहीं, तोंपर्यंत ही काया येथून हलणार नाहीं. "





## म. म. पोतदार : : : १५

'दत्तो वामन' हें नांव कानावर पडतांच आपल्या डोळ्यापुढें ऐतिहासिक काळांतील एक जुनाट पुरुष उभा राहतो ना ? तसें व 'पोतदार' हें आडनांवहि. पोतें म्हणजे खजिना. जुन्या स्वराज्यांत खजीन्यावरील काम करणारे ते पोतदार. प्रा. दत्तो वामन पोतदार यांचें आजचें निवास-स्थानहि या ऐतिहासिक परंपरेला शोभेसें असेंच आहे. तो पेशव्यांचा शनिवारवाडा, त्याच्या डावे बाजूस, अमृतेश्वराला वळसा घालून, आपण जरा पुढें गेलों कीं, एक तिमजली पुराणा वाडा दृष्टीस पडतो. दाराशींच एक विशाल वटवृक्ष, कोणाहि श्रीतांना व पांथांना, विसांवा देण्यासाठीं उभा आहे. तसाच, मानसिक विसांवा–नुसता विसावाच नव्हे, तर उत्साह

व प्रेरणाहि—देणारा एक मानवी वटवृक्ष तिसऱ्या मजल्यावर बसलेला आहे. पहाटेपासून रात्रींपर्यंत तेथें लहानथोरांचा राबता चालू असतो. त्यांचीं कार्ये किती, व्याप किती, आणि मित्र–चहाते–शिष्य तरी किती ! सर्वांना मुक्तद्वार ! “एक व्यक्ति म्हणजे एक संस्थाच.” असें महत्त्व ज्या थोड्या महाराष्ट्रीयांनीं कमाविलेलें आहे, त्यांपैकीं पोतदार हे एक आहेत. ‘तमाशा सुधारणा’ मंडळापासून ‘वैदिक संशोधन संस्था’ व ‘कऱ्हाडे संघा’पासून ‘युनेस्को’च्या शाखेपर्यंत शें–पाऊणशें संस्थांशीं त्यांचा जवळून दुरून संबंध आलेला आहे. या सर्व संस्थांचें समान अधिष्ठान कोणतें ? तर लोक–कल्याण.

## दुर्मिळ ग्रंथ–संग्रह

‘लोककल्याण’ हेंच त्या वाड्याचें नांवहि आहे. तिसऱ्या मजल्यावर जाऊन खुद्द पोतदारांच्या खोलींत आपण प्रवेश केला, तर एखाद्या पुराण-वस्तु-संग्रहालयांतच पाऊल ठेवल्यासारखें वाटतें. नानादेशींच्या, नानाकाळच्या लहानमोठ्या ऐतिहासिक वस्तु तेथें पडलेल्या दिसतात. आणि पाठीमागच्या खोल्यांत आपण डोकावलें, तर त्यांचा ग्रंथ-संग्रह खच्चून भरलेला दिसेल. जणुं विद्यारण्यच ! अरण्यांत मोठमोठे जुनेपुराणे वृक्ष एकमेकांवर रेललेले असतात आणि भरदुपारींहि पाऊलवाट सांपडणें कठीण जातें; तशी अवस्था पोतदारांच्या ग्रंथसंग्रहालयाची पूर्वीं होती. पण या ‘लोक-कल्याण’ वाड्यांत आल्यापासून त्या अरण्याला व्यवस्थित उपवनाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. जुन्या दुर्मिळ ग्रंथापासून ताज्या मासिकापर्यंत शक्य तेवढें मराठी वाङ्मय वर्गवारीनें व शिस्तीनें लावलेलें तेथें आढळतें. महाराष्ट्रांतील निरानिराळ्या ग्रंथालयांतून शोधशोधूनहि एखादें पुस्तक कोणास गवसलें नाहीं, तर तें दुर्मिळ पुस्तक त्याला पोतदारांच्या ग्रंथसंग्रहालयांत हटकून मिळतें. खुद्द ग्रंथकाराच्याहि घरीं नसेल तेंहि पुस्तक तेथें सांपडावयाचें. एखादा कवडीचुंबक लहानमोठीं नाणीं आस्थेनें व ममतेनें जपून ठेवतो ना ? तोच प्रकार पोतदारांचा मराठी साहित्याबाबत मराठी साहित्य हीच त्यांची जिंदगी व तोच त्यांचा संसार !

## स्वतंत्र भाषा-शैली

मराठीचा कडकडीत अभिमान, शिक्षण प्रसाराची तीव्र तळमळ आणि इतिहास-संशोधनावर निःस्सीम निष्ठा, हे तीन गुण पोतदारांनीं जणुं काय 'मालाकार' चिपळूणकरांपासून उचललेले दिसतात. जातिवंत मराठी भाषा म्हणजे काय, याचा नमुना आज कोणास पहावयाचा असेल, तर त्यानें पोतदारांचें चार मिनिटांचें भाषण ऐकलें किंवा चार ओळींचें लेखन वाचलें म्हणजे पुरें. स्वतंत्र शैलीच आहे त्यांची! 'भाषेचें शुद्ध स्वरूप बायकांच्या बोलींत पहावयास सांपडतें' असें म्हणतात. पण त्या अनघड बोलींत ज्ञान नसतें, अनुभव नसतो, विचार नसतो आणि बोलण्याचा विषयहि गहन किंवा सूक्ष्म नसतो. पण पोतदारांच्या वाणीचें सामर्थ्य असें कीं, अस्सल मराठी शब्दांनीं ते कोणत्याहि गूढ-बिकट विषयाचे पापुद्रे हलकेहलके व मजेमजेनें उकलून दाखवितात. शब्द, वाक्प्रचार, वाक्याची मांडणी-सारा थाट अस्सल मराठी. बैठक मारून, मांडी घालून, लेखणी हातीं घेऊन दिवसानुदिवस व महिनेनुमहिने, सतत लेखन करण्याची संवय पोतदारांना नाहीं. म्हणून आतांपर्यंत दोनतीनच ग्रंथ त्यांच्या हातून निर्माण झाले. पण प्रस्तावनांच्या व ऐतिहासिक संशोधनांच्या निमित्तानें त्यांनीं तीनशेंवर लेख लिहिलेले आहेत.

## पट्टीचे वक्ते

त्यांच्या लेखणीपेक्षां त्यांची वाणी अधिक कामसू आहे. तासन्तास अस्खलितपणें वाहणारी त्यांची रसवंती श्रोत्यांना मंत्रमुग्ध करते. जितक्या लीलेनें ते मराठी बोलूं शकतात, तितक्याच सहजतेनें व सफाईनें इंग्रजी, संस्कृत व हिंदी या भाषांतूनहि आपले विचार व्यक्त करूं शकतात. त्यांचें एकएक व्याख्यान म्हणजे जणुं एकएक ग्रंथच. पट्टीचे वक्ते असा त्यांचा लौकिक आहे. आणि कोणत्याहि सभेंतील 'शेवटचें गोड' पण श्रोत्यांना कटु वाटणारें आभार-प्रदर्शनाचें काम करण्यांत तर पोतदारांचा हात कोणीच धरणार नाहीं. सभा खूप लांबलेली आहे, श्रोते पुरे कंटाळलेले आहेत, किंबहुना घरीं जाण्यासाठीं खुर्चीवरून अर्धेअधिक

उठलेहि आहेत—अशा वेळींहि आभाराचें कंटाळी काम, हंसत-खेळत, नवी माहिती सांगत, क्वचित् मुख्य वक्त्यावरहि ताण करीत, श्रोतृ-वृंदाला दहादहा, पंधरापंधरा मिनिटं झुलवीत ठेवावें पोतदारांनीच ! वसंत-व्याख्यान-मालेचे चिटणीस म्हणून १९१४ ते १९१८ पर्यंत ते आपल्या वक्तृत्वाचें दर्शन घडवीत.

## वक्तृत्वाचें बाळकडू

पोतदारांचा जन्म ता. ५ ऑगस्ट १८९० रोजी बिरवाडी या कुलाबा जिल्ह्यांतील गांवीं झाला. त्यांचे वडील वामनराव उर्फ बाबासाहेब हे विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे शिष्य. चिपळूणकर सरकारी नोकरीची बेडी तोडून रत्नागिरीहून पुण्यास आले आणि त्यांनीं न्यू इंग्लिश स्कूल स्थापन केलें. तेव्हां त्यांच्या मागोमाग जे कांहीं हुशार विद्यार्थी कोंकणांतून देशावर आले, त्यांपैकीं वामनराव हे एक होत. याचा फायदा दत्तोपंतांना असा मिळाला कीं, त्यांचें सारें शिक्षण पुण्यास झालें. १८९६ सालीं नूतन मराठी विद्यालयाच्या पहिल्या यत्तेंत त्यांचें नांव घातलें गेलें, तेव्हां त्या संस्थेशीं त्याचा जो संबंध जडला, तो पुरी चाळींस वर्षे टिकला. १९३६ सालीं सेवानिवृत्त झाल्यानंतरहि पोतदारांची प्रेमळ पाखर त्या संस्थेवर आहेच. हायस्कुलांत असतांना त्यांनीं ‘ आर्योद्धारक मंडळ ’ काढलें. त्या मंडळांत प्रा. शिवरामपंत परांजपे यांच्या ‘ काळ ’ पत्राचें वाचन आवडीनें होई. मग चर्चा, व्याख्यानें यांचें गुऱ्हाळहि चाले. पोतदार पुराणेंहि सांगत. दर शनिवारीं निबंध-वाचन होई. याच भूमींत पोतदारांच्या वक्तृत्वाचा वृक्ष पोसला गेला. १९०६ सालीं ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले.

## आयुष्यांतील व्रत

टिळक-परांजपे-सावरकर यांचा तो काळ ! राजकारणाचें तप्त वारें तरुण विद्यार्थ्यांच्या अंतःकरणावरून वहात होतें. ‘ निबंधमाला ’ वाचल्यानें तिच्यांतील भाषाभिमान व इतिहासाभिमान पोतदारांच्या बुद्धीवर विशेष ठसला. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या तपस्वी जीवनाकडेहि त्यांचें चित्त

ओढलें गेलें. संसार–पाशांत न गुरफटतां, आजन्म ब्रह्मचारी राहून, आपल्या भाषेची व आपल्या इतिहासाची सेवा करण्याचें व्रत पोतदारांनीं घेतलें व तें अखंड टिकविलें. कॉलेजच्या त्रैमासिकांत ‘ पुराण-वस्तु–संशोधन ’ या नांवाचा त्यांनीं एक लेख लिहिला होता. त्याची तारीफ प्रो. काळेप्रभृतींनीं केली. १९१० सालीं पोतदार बी. ए. झाले.

## शिक्षकाचा पेशा

वकिलीचा अभ्यास पोतदारांनीं सुरू केला होता. पण त्याला प्लेगनें खो दिला. मग चिपळूणकरांचाच राजमार्ग त्यांनीं पत्करला. त्यांच्या स्मरणार्थ निघालेल्या नूतन मराठी हायस्कूलचे ते ता. ६ जून १९१२ रोजीं शिक्षक म्हणून दाखल झाले. पगार होता फक्त पंचवीस रुपये. पण शिक्षण हाच त्यांचा छंद, हेंच त्यांचें ध्येय आणि हीच त्यांची राष्ट्रसेवा. १९१५ सालीं ते ‘ शिक्षण प्रसारक मंडळीचे ’ आजन्म सदस्य झाले. मराठी शाळेचे प्रमुख म्हणून १९१६ पासून नऊ वर्षें त्यांनीं काम केलें. पहिल्या यत्तेंतील विद्यार्थी म्हणून ते जेथें बसले, त्याच संस्थेच्या सर्वांत उंच खुर्चीवर ते आतां आरूढ झाले. नूतन मराठी हायस्कूलचे प्रमुख म्हणून १९२६ सालीं त्यांची नेमणूक झाली. ती धुरा त्यांनीं सहा वर्षें वाहिली.

## शिष्य-शाखेचा विस्तार

‘ शिक्षण प्रसारक मंडळीनें ’ १९१६ सालीं न्यू पूना कॉलेज ( आतांचें स. प. कॉलेज ) काढलें. त्यांत १९२१ पासून मराठीचे प्राध्यापक म्हणून पोतदारांनीं काम केलें आणि मोठें यश मिळविलें. पुढें इतिहासाचेंहि अध्यापन ते करू लागले. हें ज्ञान–दानाचें कार्य त्यांनीं १९३४ पर्यंत केलें. चिपळूणकर–आगरकरांप्रमाणेंच त्यांनाहि शिकवितांना घंटेचें भान रहात नसे. घड्याळ पालथें घालूनच जणु ते शिकवीत ! सुट्टीच्या दिवशीं खास तास घेतला म्हणजे मग तर काय ? त्यांना मोकळें रानच मिळे. दोनदोन तीनतीन तास त्यांच्या मधुर व माहितीपूर्ण वक्तृत्वाचा ओघ दुथडी चाले व जिज्ञासु विद्यार्थीहि त्यांत आनंदानें डुंबत व उल्हसित होत. पोतदारांचा

जुन्या कवींचा व्यासंग गाढा. त्यांतहि रामदासांची भक्ति आगळी. मोरोपंतावरहि प्रभुत्व दांडगें. विष्णुशास्त्री तर त्यांचे स्फूर्तिदातेच. त्यामुळें ह्या वाग्भटांचें वाङ्मय शिकवितांना त्यांच्या वक्तृत्वाला उधाण भरती येई. केवळ परीक्षेची तयारी करून देणें, त्यासाठीं शेलकीं प्रश्नोत्तरें सांगणें किंवा टिपणें लिहून देणें, असें यांत्रिक काम त्यांच्या पल्लेदार बुद्धीला मानवत नसे. त्या त्या विषयाची चटक विद्यार्थ्यांना लावणें, तसें-तसें वाङ्मय निर्मिण्याची प्रेरणा त्यांना देणें आणि मातृभाषेच्या सेवेची स्फूर्ति उत्पन्न करणें;—हे त्यांच्या अध्यापनांतील अलौकिक गुण होते. याच झऱ्याचें पाणी पिऊन सानेगुरुजींसारखे अनेक लेखक पुढें आले. कैक प्राध्यापक व प्राचार्य पोतदारांचें हें ऋण मान्य करतात. भाषा—सेवकांची पिढीच्या पिढी निर्माण करण्याचें श्रेय पोतदारांना आहे. त्यांचे शेंकडों—हजारों विद्यार्थी महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांत विखुरलेले आहेत आणि स्वभाषेची सेवा बजावीत आहेत. त्या सर्वांची ग्रंथ-संपत्ति ही पर्यायानें पोतदारांचीच लेखन-संपत्ति होय. आपल्या विद्यार्थ्यांच्या आग्रहामुळेंच, त्यांची नड भागविण्यासाठीं, पोतदारांनीं 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हा अपूर्व ग्रंथ लिहिला आणि तोहि अवघ्या वीसबावीस दिवसांत. १८१८ ते १८७४ या काळांतील मराठी भाषेची स्थिती या छोट्या ग्रंथांत साधार वर्णिलेली आहे.

## तीन संस्थांचें पोषण

मराठी भाषेच्या उत्कर्षासाठीं स्वतंत्र विद्यापीठ हवें असा ध्यास पोतदारांना लागला. १९३६ सालीं महाविद्यालयांतून निवृत्त झाल्यानंतर तर, त्यांनीं महाराष्ट्र विद्यापीठासाठीं एकच धोशा लावला. त्यासाठीं संस्था स्थापून, चोहोंकडे हिंडून, व्याख्यानें देऊन, लेख लिहून, वर्गणी जमवून त्यांनीं आपल्या प्रचारानें सारा महाराष्ट्र दुमदुमून सोडला. अखेर त्यांचें स्वप्न १९४८ सालीं खरें झालें. त्या वर्षी "पुणें विद्यापीठ" मूर्त स्वरूपास आलें. 'टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे' ते कुल-गुरु आहेत.

'भारत इतिहास संशोधक मंडळ' १९१० सालीं स्थापन झालें. सुमारें

पंचवीस वर्षें पोतदार त्या मंडळाचे चिटणीस होते. १९४२ पासून ते कार्याध्यक्ष झाले. तें मंडळ म्हणजे त्यांच्या कर्तृत्वशक्तीचें स्मारकच. ऐतिहासिक वादांच्या निमित्तानें त्यांनीं भल्याभल्यांशीं झुंजी घेतल्या आहेत. अफझलखानाच्या वधाचे बाबतींत शिवाजीमहाराजांचें वर्तन चोख कसें होतें, हें त्यांनीं एका युरोपियन प्राध्यापकांशीं सामना करून, सिद्ध करून दाखविलें. पोतदारांना वक्तृत्वाची फार हौस व त्यांत वादाची खुमखुमी जबर. तात्त्विक युद्धाचे नगारे कोठें वाजूं लागले कीं, त्यांची जिव्हा स्फुरण पावते. सर जदुनाथ सरकारांसारख्या अव्वल इतिहास–संशोधकांशींहि मुकाबला करण्यास ते तयार. ‘ मराठे व इंग्रज ’ या केळकरांच्या ग्रंथाचे गुणदोष–विवेचन करणारें पुस्तक त्यांनीं लिहिलें. ‘ भारतीय इतिहास परिषदेचें ’ अध्यक्षस्थान त्यांना १९४८ सालीं लाभलें. ‘ प्राच्य परिषदेचें ’हि अध्यक्षस्थान त्यांनीं भूषविलें.

‘ मराठी साहित्य संमेलन ’ तर काय ? त्यांच्या घरचेंच ! नगर येथें १९३९ सालीं भरलेल्या साहित्य-संमेलनाचे ते अध्यक्ष होते. साहित्य-परिषदेचें अध्यक्ष म्हणूनहि त्यांनीं मोठी कामगिरी केली आहे. अधिकार-पदावर असोत वा नसोत, परिषदेचे ते एक प्राणच आहेत. परिषदेचा इतिहासहि त्यांनीं लिहिलेला आहे. १९३३ ते १९३६ पर्यंत ते ‘ साहित्य-पत्रिके ’ चे संपादक होते. ‘ महामहोपाध्याय ’ ही पदवी देऊन सरकारनेंहि १९४६ मध्यें त्यांचा सत्कार केला.

## वकील व न्यायाधीश

पोतदार जसे एकांतिक वादबहाद्दर आहेत, तसेच ते निःपक्षपाती न्यायाधीशहि आहेत. कोणत्याहि पक्षाचा लेप किंवा कोणत्याहि मताचा अभिनिवेश आपल्या बुद्धीवर ते सहसा होऊं देत नाहींत. सत्यनिष्ठा मात्र जाज्वल्य आहे. त्या दैवताचे ते एकनिष्ठ उपासक आहेत. रे. स्टॅन्ले जोन्स यांनीं म. गांधींविषयीं एक इंग्रजी ग्रंथ लिहिला. त्यांत गांधीजींची हत्त्या करणारा गोडसे याची तुलना अफझलखानाचा वध करणाऱ्या शिवाजीशीं केली होती. ही चूक त्या साहेबाच्या लक्षांत आणून देण्यासाठीं

पोतदारांनीं जें पत्र त्यांना लिहिलें; तें एक विस्तृत व साधार प्रबंधच आहे. तें वाचतांच साहेबमजकुरांनीं आपल्या ग्रंथांतून ती चुकीची व प्रक्षोभक तुलना गाळण्याचें तत्काळ मान्य केलें. असे किती तरी जय पोतदारांनीं वाद-संगरांत मिळविले आहेत.

त्याचप्रमाणें समतोल न्यायाधीश म्हणून काम करण्याचा प्रसंग त्यांचेवर १९३३ सालीं आला. प्रा. फडके यांनीं ' प्रतिभा–साधन ' नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. त्यावर मि. क्लेटन हॅमिल्टन या इंग्रज ग्रंथकाराच्या विचाराची ' दाट–पुसट ' छाया पडलेली आहे. हा शोध टीकाकारांनी लावला, तेव्हां फडक्यांवर वाङ्मय-चौर्याचा आरोप आला. साहित्य-क्षेत्रांत पुष्कळच काहूर माजलें. ' प्रतिभा-साधन समिति ' नेमण्यांत आली. तिचें अध्यक्षस्थान कोणाला द्यावें ? पोतदारांच्या सत्यनिष्ठेवर विश्वास सर्वांचा-प्रा. फडक्यांचाहि. त्यांनींहि त्या समितीपुढें येऊन आपलें बचावाचें भाषण केलें. शेवटीं पोतदारांनीं जो अहवाल लिहिला, तो अगदीं निःपक्ष न्यायाधिशाला शोभण्यासारखा आहे. कोणाला न दुखवतां व कोणाचा बोज कमी न करतां, त्यांनीं असें निकाल-पत्र लिहिलें कीं, " खरोखरी ग्रंथाच्या सुंदरपणाविषयीं अथवा उपयुक्ततेविषयीं कसलाच वाद नव्हता. फक्त कोठें तरी ठळकपणानें पुढील एक वाक्य अथवा वाक्यांश त्यांनीं दाखल करावयास पाहिजे होता. " क्लेटन हॅमिल्टनप्रभृति अनेक इंग्रजी ग्रंथांच्या साहाय्यानें तयार केलेला. "

## मानपत्रांतील चमत्कार

झुंझार वकील व समतोल न्यायाधीश या दोन्ही भूमिका निरनिराळ्या प्रसंगीं पोतदार पार पाडतात यांत विशेष कांहींच नाहीं. पण एकाच वेळीं त्या दोन्ही भूमिका ते शिताफीनें पार पाडूं शकतात हें कौतुकास्पद आहे. बॅ. सावरकर यांनीं मुंबईच्या साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षपदावरून साहित्याला मारक असणारा असा संदेश दिला कीं, " लेखण्या मोडा व बंदुका हातीं घ्या. " पांच वर्षांनींच सावरकरांचा साठी–समारंभ झाला. तेव्हां पुण्यांत महाराष्ट्रांतील साहित्यिकांनीं त्यांना एक मानपत्र अर्पण केलें.

तें लिहिण्याचें काम आलें अर्थात पोतदारांकडेच. सावरकरांचा मुंबईतील संदेश त्यांना अमान्य होता आणि मानपत्र म्हणजे तर गौरवाचा लेख. आपलें सत्य मत न दडवितां सावरकरांचा गौरव मानपत्रांत कसा आणावयाचा ? असा पोतदारांना पेंच पडला. प्रतिस्पर्धी म्हणून वादहि करावयाचा आणि मानपत्र म्हणून सत्कारहि करावयाचा, ही तारेवरील कसरत पोतदारांनीं किती कसबीपणानें केली आहे पहा. ते मानपत्रांत लिहितात,

" आम्ही दुर्दैवानें निःशस्त्र तर झालोंच आहों ! पण प्रज्ञेच्या आणि प्रतिभेच्या बळावर पुनः सशस्त्र होऊं ! आपल्या रानफुलांतील एका पद्यांत " आसन्नमृत्यु राष्ट्रांची । राष्ट्रें ज्या प्रतिभेंत वा ।। नवजीवन पीती तो । विश्वख्यात अमात्य वा ।। दिग्विजयी चंद्रगुप्ताचा । " आपण ज्याची आठवण केली आहे तो ' बुद्धिस्तु मागान्मम ' म्हणणारा सर्वमंत्रिश्रेष्ठ आर्य चाणक्य ' एक माझी बुद्धि-प्रज्ञा-जर जिवंत राहील, तर मी पुनः नवें राष्ट्र उभारीन ' असाच विश्वास व्यक्तवीत होता. तोच विश्वास, तसलेच चाणक्य या भारतांत पुनः खरा करून दाखवितील ! एवढा धनुर्धारी धनंजय पण रणांगणावर उभा ठाकतांच त्याचें तें गांडीवच त्याच्या हातांतून गळून पडलें ! बुद्धीच गळाली, प्रज्ञा मरगळली ! " तेणे विव्हळु हातु गेला । गांडिवाचा ।। " त्या गळालेल्या अर्जुनाच्या हातांत पुनः धनुष्य घेण्याचें बळ श्रीकृष्णांनीं बोध करूनच उत्पन्न केलें ना ? तीच गीता मरणाच्या दारीं उभे राहिलेल्यांना पुनः जीवनाच्या मार्गावर आणीत आली आहे ! हें श्रीकृष्णाचें अजरामर साहित्य जगाला दीपगृहांतील उत्तुंग दीपाप्रमाणें प्रकाश देत राहिलें आहे. अशा अजरामर साहित्याची थोरवी गावी तेवढी थोडीच होईल. आपली गणना अशा प्रवर्तक साहित्यिकांतच यथार्थपणें होत आहे. "

सावरकरांच्या मताचें खंडन त्यांच्याच शब्दांनीं करून, वर त्यांचा गौरव केलेला. साहित्याची महती सहजगत्या गाइलेली. हा समर–चमत्कार किती साहित्यिक दाखवूं शकतील ? खुद पोतदारांचा साठी–समारंभ १९५० सालीं प्रेमानें व उत्साहानें साजरा झाला,

## राष्ट्राचा उत्कर्ष

पोतदारांच्या आकांक्षेची उडी विश्व-व्यापी आहे. "तें सर्व कारणीं लावी । विश्वाच्या, ठेविं लेश ना" अशी त्यागाची शिकवण ते देतात. विश्वाच्या खालीं एक पायरी उतरून आपल्या राष्ट्राचा विचार करतांना ते थेट मुळाकडे जातात. इतिहास-ज्ञानानें स्वच्छ बनलेल्या नजरेनें ते जगाच्या प्रगतीकडे पाहतात व असा इषारा देतात कीं, "आपलें हें राष्ट्र ग्राममय आहे, नगरमय नाहीं. विचारांनीं स्थूलमानानें त्याची ठेवण ग्राममयच राखणें हितावह आहे असें आम्हांस वाटतें. आपणाला आणखी पुष्कळ नगरें पाहिजे आहेत. कारखाने, उद्योग हेहि पाहिजे आहेत. परंतु लंडन, न्यूयॉर्क, बर्लिन यांसारखीं राक्षसी नगरें आपण तयार केलीं पाहिजेत असें वाटत नाहीं. तीं पाश्चात्यांचीं पाश्चात्यांसच लखलाभ असोत ! समाधानाच्या बळावर सुखानें नांदणारी आणि आजवर टिकून राहिलेलीं आमचीं ग्रामें हींच आमच्या राष्ट्रपुरुषांच्या शरिरांतील चित्केंद्रें होत."

## कोंकणचा आनंद

महाराष्ट्राचा अभिमान त्यांचे ठायी मूर्तिमंत आहे. कोंकणचें वर्णन ते किती ऐटीनें करतात पहा !—" कोंकण आणि देश अशा जणुं कांहीं दोन झडपाच सह्याद्रीच्या दांड्यानें आमच्याकडे आपोआपच साधल्या आहेत. कोठेंहि सह्याद्रीचा कडा चढून गेलें कीं, आपण एका ताशीव भिंतीच्या टोंकावर चटकन जाऊन उभे रहातों आणि तेथून समुद्रापावेतों नजर चालवूं शकतों. सह्याद्रीच्या भिंतीखालच्या कोंकणपट्टींत आम्हांला मनमुराद समुद्रशोभा पहावयास मिळते. नारळीचीं आणि पोफळीचीं बनेंच्या बनें थाटामाटानें आपल्या चवऱ्या तेथें आमच्या मस्तकावर ढाळीत असतात. समोर समुद्राची रणगर्जना चालू असते आणि आम्ही राजाप्रमाणें ऐटींत आपली स्वारी काढीत असतों. असें निसर्गसुख आमच्या भाग्यानें आमच्या वांट्यास या कोंकणपट्टींत आलें आहे. हा आमचा पाताळ, आणि हाच आमचा नागलोक. खारी हवा आणि खारें पाणी याची तमा आम्ही या सुखानंदा-

पुढें बिलकूल धरीत नाहीं. गवती पेंढारू घरांत राहून परसांतल्या आंब्या-फणसांच्या राजींत आम्ही ऐटीनें आणि आनंदानें कालक्रमणा करितों. ”

## शिक्षणाचें कार्य

‘ निसर्गानें लाडावलेला पण मानवानें बिघडविलेला देश ’ असें हिंदुस्थानाचें वर्णन ना. गोखले करीत. दीडशें वर्षांच्या पारतंत्र्यामुळें आमचें सामर्थ्य, आमचें ऐक्य, आमचें ऐश्वर्य, फार काय, आमचें ज्ञानहि धुळीस मिळालें. इंग्रजशाहींतील शिक्षण-पद्धतिच किती विचित्र परिणाम करणारी होती, याचें विरोधाभासाचें वर्णन पोतदार पुढील शब्दांनीं करतात, “ शिकण्यापूर्वीं पोट रिकामें आाण शिकल्यानंतरहि रिकामें अशी सांप्रतची आपली विचित्र स्थिति आहे ! शिक्षण म्हणजे पोट कसें भरावें हें शिकविणें असा अर्थ नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच शिक्षणानें पोट कसें भरावें तें कळूं नये असा अर्थ नाहीं हेंहि खरें आहे. आज माजलेली बेकारी ही शिक्षणामुळें माजली आहे हें म्हणणें जितकें चूक आहे, तितकेंच आजच्या शिक्षणानें नोकरींतून पुढें मार्ग कसा काढावा हें सुचत नाहीं असें म्हणणें बरोबर आहे. बेकारी व शिक्षण यांचे पाय असे एकमेकांत गुंतलेले आहेत. आपलीं गांवें जर आपणांस बलिष्ठ करावयाचीं आहेत, तर गांवकरी लोक गांवावर राहिले पाहिजेत; आणि गांवकरी लोक गांवावर राहावयाचें तर तसें राहून त्यांचें पोट भरलें पाहिजे. तसें त्यांचें पोट भरावयाचें तर शिक्षणानें या कामीं त्यांस सामर्थ्य येईल अशी त्याची मांडणी असली पाहिजे. आज तर उपाशी राहून शिक्षण घ्यावें आणि शिक्षण घेऊन पुनः उपाशींच राहावें अशा काचांत आपण सांपडलों आहों.”

## रेखीव व्यक्ति-रेखा

राष्ट्रीय शिक्षण सुलभ रीतीनें सर्वत्र फैलावणारे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याबद्दल पोतदारांना केवढा आदर ! शास्त्रीबोवा मृत्यु पावले, त्यावेळीं लोकांच्या मनांत काय आलें याचें शब्द-चित्र पोतदारांनीं पुढीलप्रमाणें रेखाटलें आहे. “ मराठी भाषेचा पुरस्कर्ता गेला ! सत्यज्ञानमय अपूर्व

पुष्पांची माला गुंफणारा आटपला ! लोकांच्या डोळ्यांत दिव्य अंजन घालून त्यांची दृष्टि स्वच्छ करणारा नेत्रवैद्य निमाला ! अज्ञान-समुद्रांत गटंगळ्या खाणाऱ्यांना हात देऊन वांचविणारा नाहींसा झाला. मिथ्या कल्पनांनीं मोहांध झालेल्यांना ताळ्यावर आणणारा समर्थ मांत्रिक या नश्वर जगास सोडून चालता झाला ! कुतर्कांच्या भयंकर गर्तेतून बाहेर काढणारा अंतरला ! अविद्याभ्रमानें घोर निद्रेंत मग्न झालेल्यांना जागृत करणाऱ्या शंखांचा आस्फुरक स्वर्गाची वाट धरता झाला ! ' दाक्षिणचा दिवा ' मालवला ! हिरा हरपला ! "

जसा शास्त्रीबोवाबद्दल, तसाच इतिहासाचार्य राजवाडे यांच्याबद्दलहि पोतदारांना परम आदर. तो प्रगट करतांना ते लिहितात, " शिवाजी-महाराजांनीं देशासाठीं फकिरी घेतली आणि राजवाडे यांनीं राष्ट्रीय स्मृति-संचालनासाठीं तशीच फकिरी घेतली. ' समर्थ ' पदवी नव्यानें शोभाविली. श्रीसमर्थांच्या चरित्राच्या उपेक्षितांगाचें रहस्य यथार्थ जाणून आचरण्यांत आणणारा त्यांच्यासारखा पुरुष शोधून काढून दाखविणें कठीण आहे. समर्थपदवीचें हें रहस्य विद्यावैभवार्थ मंडळीकरणांत आहे. "

असें मंडळीकरण करून ' ज्ञानकोशाचें ' अपूर्व व अजस्र कार्य डॉ. केतकर यांनीं सिद्धीस नेलें. त्यांच्या मृत्युलेखांत पोतदारांनीं जशी गुण-ग्राहकता दाखविली आहे, तशीच क्षमावृत्तिहि शिकविली आहे. ते लिहितात, " रानड्यांचा अष्टपैलूपणा, दूरदृष्टि व धारणा, टिळकांची असामान्य बुद्धिमत्ता, देशभक्ति व धडाडी आणि राजवाड्यांचा संन्याशी बाणा, प्रतिभा व संशोधनपरायणता, या विशेषांमुळें त्या विभूतींनीं महाराष्ट्राच्या इतिहासांत अढळ स्थान पटकाविलें आहे. या अजरामर पुरुषांच्या कोटींतच केतकरांचें स्थान आहे. त्यांनीं आपली उज्ज्वल कार्यरेषा एवढ्या जोरानें महाराष्ट्र-शरिरावर ओढिली आहे कीं, ती तेजोलेखा तेथें यावच्चंद्रदिवाकरौ लखलखत राहील आणि प्रत्येक महा-राष्ट्रीय तिला पाहून विनम्र-मस्तक होत्साता कार्याला लागेल ! "

## गांधीजींचा गौरव

'सुमन-सप्तक' या पुस्तकांत पोतदारांनीं लिहिलेल्या मृत्युलेखांचा

संग्रह आहे. त्यांत एकएका पुढाऱ्यांचें गुण–ग्रहण सूक्ष्म बुद्धीनें व ठसकेबाज भाषेनें केलें आहे. म. गांधीसंबंधीं ते लिहितातः

" चळवळी झाल्या आणि गांधीजींनीं चाळीस कोटी जनतेचीं हृदयें हलवून सोडलीं ! येवढी प्रचंड जागृति त्यांनीं केली. या श्रेयाचा सर्वोच्च वांटेकरी आणि मानकरी तोच महापुरुष ! ' या प्रचंड जनजागृतीतून प्रथम सामाजिक अराजक उद्भवेल ! ' आज गांधीजींच्या वधोत्तर हें अराजक आम्हीं प्रत्यक्षच अनुभवीत आहों. आणि यापुढें त्याचे नवे नवे पापुद्रे आणि पडदे खुलतील आणि सारी खरूज, सारे खवडे आणि नायटे बाहेर पडतील ! ! मग मात्र आमचें शरीर दिव्य आणि सुंदर होईल. तेजस्वी आणि जगाला मार्गदर्शक असा नवा भारतीय समाज जगाच्या अग्रभागीं झळकेल—मात्र आज नाहीं, आतां नाहीं—तर उद्यां ! महत्पद तेंच ! ! त्या अमरपदावर आमचा हात धरून आम्हांला बसविणारा आणि आम्हांला कृतार्थ करणारा कोण ? तर ज्याच्या नांवानें ' अनामिका सार्थवती बभूव ' असें म्हणावें तो एक, वाट चुकलेल्या देशबांधवांच्या गोळीला ज्याचा देह बळी पडला असा, सर्ववंद्य महात्मा ! ! !"

## विद्यार्थ्यांना उपदेश

' यत्न तो देव जाणावा ' हें श्रीसमर्थांचें सूत्र विवरणारा एक लेख पोतदारांनीं १९१६ सालीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांसाठीं लिहिला. त्यांत ते असे प्रेरक विचार मांडतात, " शुक्राचार्यांकडून संजीवनी विद्या मिळविण्याचे कामीं यश यावें म्हणून कचानें या यत्नदेवाचीच उपासना केली होती. श्रीरामचद्र वनवासांत असतांना यानेंच त्यांना धीर दिला होता. बलसागर मारुतीनें जलसागर उल्लंघिला त्यावेळीं त्याच्या देहांत यानेंच प्रवेश केला होता. द्रोणागिरी उचलून आणण्याच्या कामीं त्याला यानेंच हातभार लावला होता. याच्याच जोरावर अभिमन्यूनें चक्रव्यूह फोडिला. भारतीय युद्धांतील महावीरांना हाच उत्साह देत होता. विजयनगरचें साम्राज्य यानेंच स्थापन केलें. शिवाजीमहाराजांबरोबर प्रतापगडीं भवानीसमक्ष यानेंच अनेक खलव्रतें केलीं. आग्र्याहून पेटाऱ्यांत

महाराज सुटून आले, त्यावेळीं महाराजांना हा पोटाशीं धरून बसला होता. औरंगजेबाच्या तंबूचे सोनेरी कळस संताजी घोरपडे कापून नेत असतां ' शाबास ! भलेबहादर ! ' असे उद्गार यानेंच काढिले. हा बाळाजी विश्वनाथाबरोबर कोंकणांतुन वरघाटीं आला. माधवराव पेशव्यांच्या सर्व स्वाऱ्यांत हा जरीपटका संभाळीत होता. थोरल्या आबासाहेबांनीं मराठे-शाहीची स्थापना केली त्यावेळीं हा सदैव रंगून गेला होता."

या यत्न-देवाच्या उपासनेची फलश्रुति काय ? पोतदार सांगतात, "यत्न-देवाचा प्रसाद झाला म्हणजे दुर्बळांचे सबळ होतात. यत्नदेवाची कृपा झाली म्हणजे लहानांचे थोर होतात. यत्नदेवाची तृप्ति झाली कीं करंट्यांचे कर्तबगार होतात. यत्नदेवाचा वरदहस्त डोक्यावर पडला कीं, भाग्यहीनांचे भाग्यवंत होतात. यत्नदेवाचा संतोष झाला कीं, अज्ञानांचे सज्ञान होतात, आंधळ्यांचे डोळस होतात, परतंत्राचे स्वतंत्र होतात, सामान्यांचे असामान्य होतात, दुर्बुद्धांचे सुबुद्ध होतात; फार काय, पण दगडांचे देव होतात !" शिवरामपंती शैलीचा मनोहर नमुना !

## संत-कवींची साहित्य-सेवा

मराठी भाषेचा कैपक्ष घेऊन झुंजणें हा तर पोतदारांचा बाणा. ज्ञानेश्वरापासून सर्व संत-कवींनीं ही झुंज कशी घेतली, हें सांगतांना पोतदारांची वाणी कशी उसळते पहा. " महाराष्ट्रीय संतकवींनीं आपल्या वीर्यवती वाणीचा अद्‌भुत विलास प्रगट केला व त्यांचीं हृदयें भरून व भारून टाकिलीं ! आणि असें अर्वाट आणि अक्षय्य, पवित्र आणि प्रखर वाङ्मय निर्माण केलें कीं, सारें भूमंडळ डोलूं लागावें ! ज्ञानेश्वरांनीं उभारलेली गुढी पर-चक्राच्या वावटळींत अदृश्य होते कीं काय अशी धास्ती पडली होती. तिला नाथांनीं सोडवून तिची प्रभा सर्वत्र फाकेलसें केलें ! नाथांचे नातु मुक्तेश्वर यांची निर्मळ वाग्गंगा धों धों वाहूं लागली. तिच्या त्या प्रचंड निनादानें भगीरथाबरोबर खालीं येतांना तिचा जो मूळचा आवेश, तोच जणूं सर्वांच्या कानांत घुमूं लागला. हाच आवेश आर्यापति मोरोपंतांपर्यंत प्रज्वलित राहिला. पंतांनीं ' तसि हे मयूर नाहीं तरि लोकांना न दीसती आर्या ' असें म्हणून डंका गाजविलाहि ! "

## साहित्य व जनता

साहित्याचें मुख जनतेकडेच वळलेलें असलें पाहिजे हें तत्त्व संतांच्या उदाहरणावरून पोतदार ठसवितात. ते म्हणतात, "जनता हाच त्यांचा जनार्दन होता. जनतेला प्राकृत म्हणून तुच्छ करून आपल्याच डौलांत राहण्यानें विद्या तर क्षीण होतेच इतकेंच काय, परंतु विफलहि होते. विद्येचें शुद्ध स्वरूप पंडितांनीं सांभाळावयाचें असतें; परंतु जनतेकडून तिचें वैभव सांभाळविण्याची व्यवस्थाहि त्यांनींच करावयाची असते. नाहींतर समाज अज्ञानी, भ्रांत आणि आक्रमणसुलभ होतो; आणि समाजच गेला म्हणजे विद्येचें अधिष्ठानच ढांसळतें."

## स्वराज्यांतील वाङ्मय

पोतदार आणखी सांगतात, "भोळ्या लोकांचें वाङ्मय भोळेंच असणार. दुबळ्या लोकांचें वाङ्मय दुबळेंच असणार आणि खुळ्यांचें खुळेंच असणार. वाङ्मय हा राष्ट्रादर्श आहे. राष्ट्राच्या मनाची, बुद्धीची व कर्तृत्वाची लांबी-रुंदी व उंचीजाडी या वाङ्मयाच्या मापानें बिनचूक मोजतां येते. इंग्रजी अंमलाच्या सुरवातीपासून आमच्या समाजाची स्थितिगति आमच्या तत्कालीन वाङ्मयावरून उत्कृष्ट कळून येते. स्वराज्य गेलें आणि पाठोपाठ सरस्वतीहि आम्हांस विन्मुख झाली ! !"

तसेच, "भाषा ही जीवनाशीं इतकी निकट संबद्ध आहे कीं, मराठ्यांना स्वातंत्र्याची संप्राप्ति होतांक्षणींच मराठी भाषेला स्वतंत्र वैभवाचें स्वाभाविक तेज चढूं लागलें. जिवाची होड करून चालविलेल्या या स्वातंत्र्य-संगराचें पर्यवसान मुसुलमानी सत्तेच्या विनाशांत झालें आणि मराठ्यांचें नांव साऱ्या भरतखंडांत दुमदुमलें ! पुढें मराठी स्वराज्याचा विस्तार मराठ्यांच्या साम्राज्यांत झाला. मराठी भाषेचें भय-निवारण पूर्वींच झालें होतें साम्राज्यसंगतीनेंच विलासाचे डोहाळे राष्ट्राला लागले आणि तोच विलासी रंग आमच्या वाङ्मयाला लागला. ज्ञानेश्वरीचें शांतिपर्व मागेंच संपलें होतें आणि दासबोधाचा यत्नघोष शांत होऊन गेला होता. आमची मराठी आतां कविरायांवर फिदा होऊं लागली होती आणि

होनाजी-प्रभाकरांसारख्यांच्या संगतींत, कलगीतुऱ्यांच्या भांडणांत व डफ-तुणतुण्याच्या ठेकेबाज साथींत ती रंगून गेली होती!"

## मराठी उपनिषदें

बायकांच्या कहाण्यांत किती वाङ्मय लपलेलें आहे हें पोतदार पुढील शब्दांनीं सांगतात,

"हें कहाण्यांचें वाङ्मय मराठींत फार नामीपैकीं आहे. वाङ्मयदृष्टीनें अद्यापि कोणीहि तिकडे लक्ष पुरविल्याचें आढळलें नाहीं. कहाण्यांतील सोपी, सरळ, रसाळ व शुद्ध मराठी भाषा वाचून फार आनंद वाटतो. त्यांतील नीत्युपदेश फारच मार्मिक आहे. तेव्हां या नवीन शाखेचाहि समावेश प्राचीन मराठी गद्यांत अग्रेसरत्वानें करणें अगत्याचें आहे. मला तर कैकवेळां असें वाटतें कीं, या कहाण्या म्हणजे मराठी उपनिषदेंच होत. अशी याची अव्याजमनोहरता व माधुरी अलौकिक आहे." खुद्द पोतदारांची भाषा पुष्कळ वेळां अशीच शुद्ध, सोपी, मधुर व ठसठशीत असते.

'नवनीत' रचणारे परशुरामपंत गोडबोले यांच्या कामगिरीचें वर्णन करतांना पोतदारांनीं पुढील रूपक विस्तारानें योजलें आहे—"परशुरामपंत-तात्या वाङ्मयोपवनांतील माळीपणाच्या कामांत फार कुशल होते. घरच्याच वडिलोपार्जित बागेंतील उमललेलीं नामीं नामीं पुष्पें निवडून त्यांच्या माळेच्या सौरभानें त्यांनीं दशदिशा दरवळून सोडल्या; पण एवढ्यावरच ते थांबले नाहींत, तर आजोळीं जाऊन तेथल्या जुनाट व विस्तीर्ण उप-वनांतील सुंदर व सुगंधी वृक्ष आणून त्याचीं कलमेंच आपल्या घरच्या बागेंत त्यांनीं लावून टाकिलीं व पुनः पुनः आजोळीं जाण्याची कटकटच नकोशी केली. आजीहि भली होती. तिला तात्याच्या उद्योगाचें कौतुक वाटलेसें दिसतें."

## मातृभाषेचा आश्रय घ्या

मातृभाषा मराठीला अव्हेरून ज्ञानाचा प्रसार करण्याचें जें धोरण ब्रिटिश सरकारानें आंखलें होतें, त्यावर त्वेषानें तुटून पडतांना पोतदार म्हणतात,

" इकडे १८५४ सालीं आतां ' ज्ञानाचे झिरपे ' खालीं साऱ्या मैदानांत लागतील म्हणून उच्च शिक्षणाचे हे विद्यापीठरूपी तलाव आम्ही उंच जागीं बांधीत आहोंत, म्हणून सरकारची प्रतिज्ञा; आणि एवढ्या दीर्घ अवकाशांत जनता पहावी तों लिहावाचावयाला न येणारी, दीनदुबळी असलेली, आक्रोश करण्याला, पिवळण्यालादेखील समर्थ झालेली नाहीं ! कोठें आहेत ते ' झिरपे ' आणि ' झरे ! ' वरच्या उंचवस्थावरच्या तलावांतलें जिवंत पाणी खालीं झिरपून येण्यास तें मुरण्याची सोय पाहिजे. इंग्रजी ज्ञानाचा सांठा खालीं झिरपून जाण्यास तो मराठीच्या मुरमाड माळांतूनच मुरत गेला पाहिजे. आम्ही सुशिक्षित हेच वास्तविक वर वर्णिलेले ' झरे व झिरपे ! ' परंतु आम्ही अजून 'खडकाळ'च आहों ! कळवळ्याचे रसायन पाजून हीं खडकाळ रानें मुरमाड बनविलीं पाहिजेत म्हणजे त्यांना थोडी तरी चिकणाई येईल आणि मग तेव्हांच बाहेरील जगांतील अफाट ज्ञानाचे जिवंत झरे व झिरपे आमच्या इकडे फुटतील, एवढेंच नव्हें, तर जोरानें उंच उडूं लागतील. तेव्हांच मग सर्वत्र ज्ञानाची हिरवळ माजून आपणां सर्वांचा नेत्रसंतोष होईल !! "

## जुन्याची जाणीव

इतिहासाच्या अभ्यासाविषयीं जनतेंत जागृति उत्पन्न करणारे लेख पोतदारांनीं अनेक लिहिले आहेत. एके ठिकाणीं ते म्हणतात, " आम्ही परंपरावादी राहूनहि इतिहास-विमुखच राहिलेले आहोंत. पूर्वी घडलेल्या गोष्टींची अथवा चरितांचीं जंत्री दिली म्हणजे इतिहास सांगितला असें समजून चालतां यावयाचें नाहीं. या घटितांचा अर्थ लावून दाखवावा लागेल. नाहीं तर इतिहास म्हणजे नुसत्या नामावळ्या किंवा शकावल्याच होऊन राहतील. सत्याच्या कसोटीवर चिकित्सापूर्वक पारखून घेतलेलीं घटितें हें तर इतिहासाचें मूल द्रव्यच होय यांत शंका नाहीं. अशी पारखच शक्य नाहीं म्हणणारांच्या संशयवादाचें ग्राह्य तात्पर्य एवढेंच समजावें कीं, अशी पारख कठिण आहे ! डोळ्यादेखत घडणाऱ्या घटितांची तरी सर्व-मान्य पारख करतां येते काय ? म्हणून काय आपण आपले उद्योग थांब-विले आहेत ? मतें बनविण्याचें टाकून दिलें आहे ? आणि त्या मतांचे

धोरणानें कृतिहि आपण करीतच असतो ना ? मतें चूक वाटल्यास बदलतोहि ! मग वर्तमानकाळीं जो दोष आपण आनंदानें पत्करतों, तोच दोष भूत-कालावर लावून आमचा विचार थांबविण्याचें आम्हास प्रयोजन काय ? मानवी शक्तिच मुळांत मर्यादित आहेत. पण आहेत तेवढ्यांचा होईल आणि करतां येईल तेवढा विकास आपण केला पाहिजे. या विकसित शक्तींच्या आधारानें मिळेल तेवढा प्रकाश आपण मिळविला पाहिजे आणि जीवनाच्या अंधाऱ्या रात्रीची सुप्रभात केली पाहिजे. ”

## ही ग्रंथ-संपत्ति जतन करा

जुने ग्रंथ, जुनीं हस्तलिखितें म्हणजे आपल्या इतिहासाचा केवढा ठेवा! तो हळुहळु नाश पावत आहे याची हळहळ पोतदारांना तीव्रपणें वाटते. त्यांनीं श्रीधरस्वामींच्या चरित्रग्रंथास जो पन्नासपानी पुरस्कार लिहिला आहे, त्यांत ते म्हणतात, “ परवां दक्षिणेंत एका देवळांत उघड्याच ठेविलेल्या जुन्या ताडपत्री पोथ्या तशाच पडलेल्या ! कधी कचरापेटींत, कधीं वाण्याच्या रद्दींत, कधीं जलनिधींत तर कधीं अग्निकुंडांत याप्रमाणें लिखितांचा प्रत्यहीं नाश होत आहे ! शिवाय भाऊबंदकीच्या वांटण्या होतात तेव्हां जुनीं हस्तलिखितेंहि घराबाहेर जातात ! या देशांतून परक्यांनीं ग्रंथाची लूट कांहीं थोडी केली नाहीं. त्यांतील कांहीं आज कित्येक स्थळीं निर्वासित होऊन पडलीं आहेत. खेरीज उंदीर, घुशी, वाळवी, झुरळें इत्यादि कीटकांचे हल्ले लिखितांवर सतत होत असतात ! सांप्रतकाळीं लिखितें खाजगी घरांत किंवा मठा-देवळांत ठेवण्यापेक्षां त्यांची रवाजगी आपण होऊन सुस्थळीं करणेंच उचित टरेल ! घरीं योग्य संभाळणूक होणें कठीण !: यासाठीं मायामोह थोडा सोडावा लागेल पण त्यांत कल्याणच होईल. ”

## जुने शब्द वापरूं लागा

जुन्या मराठी वाङ्मयाची उपेक्षा जी झाली, तिच्यावर टीका करतांना पोतदार म्हणतात, “ जुन्या बखरी व जुनीं काव्यें यांतील शब्दसंपत्ति इत्यादि सर्व जमेला घेऊन जर आपण इंग्रजी वाक्संपत्तीचें ज्ञानबलानें

आकर्षण केलें असतें, तर आपले किती श्रम व गिरक्या वांचल्या असत्या? आपली किती शीघ्र प्रगति झाली असती ! जुन्याच रस्त्यावर नवी खडी पसरून व प्रसंग पडल्यास लोखंडी रूळ टाकून आपण झटकन येरझारा सुरू केल्या असत्या ! जुनी राजकारणी भाषा कमावलेली तयार होती. तेव्हां हां हां म्हणतां त्याच सांच्यांत गिबनग्रोट आपण सहज ओतून दिले असते! तवा तापलाच होता, तेव्हां त्या सिद्धाग्नीवर जुन्या पुरणपोळ्यांबरोबरच नवे रोट भाजून घेणें काय अवघड पडलें असतें ? पण त्या सिद्धाग्नीवर आपण राख साचूं दिली, क्वचित् पाणीहि ओतलें व नवीन भट्या बांधण्यासाठीं चिखलमाती तुडवूं लागलों ! याला काय म्हणावें ? पाऊणशें वर्षें गेल्यावर विष्णुशास्त्र्यांनीं भाता फुंकून जेव्हां ही राख उडाविली तेव्हां मग आपली चूक आपल्या ध्यानांत आली ! " पोतदारांच्या लेखा-भाषणाची शैलीच अशी आहे कीं, तींत जुन्या शब्दांचा उपयोग सोपेपणानें व समर्पकपणानें केला जातो.

## मराठीचा आग्रह

संस्कृत व इंग्रजी या भाषांच्या तुलनेनें मराठी दरिद्री असली तरी ती आपली मातृभाषा आहे हें ठसवितांना पोतदार म्हणतात, " संस्कृताच्या ज्ञानपर्वतावर उभें राहण्यांत आमच्या पंडितास जी प्रतिष्ठा वाटते ती मराठीच्या टेकाडावर उभें राहून खरोखर मनापासून वाटूं शकते काय ? समोरच इंग्रजीचा तुफान दर्या पसरलेला असून त्यावर जगांतील दीडशें कोटी प्रजा ऐटीनें नौकाविहार करीत आहे, अशा स्थितींत मराठीच्या छोट्या वापींत फेऱ्या मारीत रहावें अशी ईर्षा कोणी बाळगील हें कितपत शक्य आहे ? तेव्हां एकतर संस्कृताच्या गिरिशिखरावर विहार करावा; नाहींतर समोर इंग्रजीच्या अथांग सागरांत डौलानें संचार करावा असा मोह जर आमच्यांतील प्रज्ञावंतांना झाला तर त्यांत त्यांचा काय दोष आहे ? "

## साहित्यिकांचें मूल्यमापन

मराठींतील साहित्यिकांच्या कामगिरीचें वर्णन पोतदार आपल्या कुंचल्याच्या दोनचार रेषांनींच किती कसबानें करतात पहा. " आगरकरांच्या

लेखणींतून आवेशाबरोबरच कांहीं नटवेपणाची झांक आपणांस आढळून येते. पुढें टिळकांच्या लेखणीचें राज्य चालू झाल्यावर ' केसरीं ' त तलवारीचें पाणी सतत चमकत राहिलें. परंतु हें पाणी पिणाऱ्याच्या पोटांत आग भडकल्याशिवाय राहत नसे. केळकरांच्या लेखणीचें राज्य सुरू झाल्यावर साहित्यिक निर्झराचें मधुर जल लोकांस मनसोक्त प्राशन करण्याची संधि मिळाली. टिळक आणि खाडिलकर यांच्या शब्दांत वाचकांच्या वृत्तींत चळवळ उत्पन्न करून त्यांना उड्डाण करावयाला लावण्याचा गुण अमूप दिसून येत होता. तर केळकरांच्या शब्दांत वाचकांच्या वृत्तींना स्थिरावून वठणीवर आणण्याचा गुण अधिक दिसून येत होता. ' केसरी '-तील लेखांना केळकरांनीं जी नवी आणि रम्य अशी साहित्यिक झळाळी लावली, त्यामुळे रसिक वृत्तीच्या सुशिक्षित वर्गामध्यें त्यांनीं ' केसरी '-विषयीं नवीन आकर्षण निर्माण केलें.

" महाराष्ट्रांतील असंख्य तरुणांचीं मनें आपल्या लेखणीला बांधून ' काळ 'कर्त्यांनीं त्यांना भावनेच्या स्वर्गलोकांतील देवतांचा दरबार दाखविला. लो. टिळक समोर उभे असतांना त्यांना अदबीनें नमस्कार करीत करीत शिवराम महादेव परांजपे यांनीं हा चमत्कार करून दाखविला. परांजपे यांच्याप्रमाणें स्वर्गभरारी मारून उंच आकाशांत यथेच्छ विहार करणें किंवा टिळकांप्रमाणें जमीन फोडून पाताळांतील शेषाच्या टाळूचा भंग करणें असला हव्यास केळकरांच्या लेखणीनें धरला नाहीं. पण आपल्या असंख्य वाचकांना याच पृथ्वीवर विचारांच्या रम्य उद्यानांत सुखद संचार त्यांनीं यथेच्छ घडविला."

"केळकरांनीं 'केसरी'च्या खरतर नखाग्रावर कलेचीं कांकणें चढविलीं" या एका वाक्यांतच पोतदारांनीं केळकरांच्या साहित्याचे गुण–दोष किती खुबीनें प्रगट केले आहेत !

नगर संमेलनाच्या अध्यक्षपदावर उभे राहून पोतदार श्रोत्यांना हटकतात, "आपण मराठीशींच एकनिष्ठेनें आपला संसार करणार आहांत काय ? असा सरळ व खडा सवाल मी आपणांस टाकीत आहें. प्रत्यक्ष मराठी संमेलना-निमित्त आपण जमला आहांत, तेथें हा प्रश्न जाणून बुजून, नम्रपणें पण

प्रगटपणें, विचारीत आहें. 'नातिचरामि' असा गंभीर घोष करून आपणांपैकीं प्रत्येकजण, सर्वांच्या साक्षीनें, माझ्या प्रश्नाला होकार करणार यांत शंका नाहीं. नाहीं तर तुम्ही येथें आला असतात तरी कशाला? तुमच्या अंतः-करणांतून निघणारा हा प्रतिज्ञाघोष मला स्पष्ट ऐकूं येत आहे. पण तो मी येथें तुमच्याकडून वदवून घेतला. एवढ्याचसाठीं कीं, तो ऐकण्यास आतुर असलेले आमच्या वेल्हाळ देशींचे मायबाप जे ज्ञानेश्वर, ते येथें आपल्या सर्वेंद्रियांचे कान करून बसले आहेत, त्यांचा संतोष व्हावा!" यांत किती प्रेरणा आहे! हळुवार भावना आहे!

मराठीचा स्वीकार व पुरस्कार केला, तरी संस्कृतचा तिरस्कार कर-ण्याचें कारण नाहीं, उलट तिचा आधार घेतलाच पाहिजे, हें सांगतांना पोतदार म्हणतात, "देशी भाषांचा राजमार्ग जेव्हां जोरानें वाहूं लागला, तेव्हां आमच्या श्रेष्ठ व पूज्य देववाणीला देव्हाऱ्यांत जाऊन बसणें भाग पडलें. नाहीं तरी देवांनीं देव्हाऱ्यांतच नव्हे तर कोठें बसावयाचें? सृष्टि-क्रमानें घडणाऱ्या अशा घटनांनीं व्यथित होण्याचें कारण काय? देशी हें चलनी नाणें आहे आणि संस्कृत हें आमचें शिलकी भांडार आहे. आमचा नित्याचा सर्व व्यवहार आम्ही निपटून देशींतूनच करणार आणि उणें पडेल तेथें संस्कृताच्या भाडारांतून लागेल तेवढी व लागेल तशी उचल करणार!"

## खपतें तेंच लिहावें काय?

'खपेल तेंच लिहावें' अशा बाजारी वाङ्मयाचा निषेध पोतदार पुढील समजावणीचा स्वरांत करतात, "वाङ्मयांत भोजनाप्रमाणेंच सर्व रस पाहिजेत. ब्रम्ह्याच्या षड्रसनिर्मितीपेक्षां कवींची नवरसनिर्मिति अगदीं दिढीनें नसली तरी सवाईनें तरी खचित सरस आहे. कडू, गोड, आंबट, खारट, तुरट सर्व रस वाङ्मयांतहि चाखावयास मिळाले पाहिजेत. विनो-दाचा विरंगुळा समाजाला मिळवून देणारे लेखक समाजाचे उपकारकर्ते होत. आतां पानांत सर्व पदार्थ वाढलेले असले, तरी खाणारांनीं आपलें प्रकृतिमान पाहूनच सेवन केलें पाहिजे. प्रकृति, वय, इत्यादींचा विचार करून सेव्यासेव्य पदार्थ आणि सेवनाचें प्रमाण ठरवावें लागेल. वाढणा-

ऱ्यांनीं वाढलें म्हणून खाणाऱ्यांनीं जसे सर्व खाऊं नये, तसें खाणारा खातो आहे मग आपण कशाला काळजी करा, अशी वृत्ति वाढणारांचीहि नसावी. समाजांत खपतें आहे, मागणी आहे ना, म्हणून वाटेल तें लिहावें, हें कांहीं योग्य नाहीं. वाचकांपेक्षांहि लेखकांवर एक प्रकारें अधिक जबाबदारी पडते."

## भाषा-बंधूंना हाक !

शेवटीं आपल्या भाषा-बंधूंना हाक देतांना पोतदार 'पोटींच्या कळवळ्यानें ' म्हणतात,

" भाषाबंधु तोच आमचा खरा बंधु ! मग त्याचा खरा धर्म कांहींहि असो; किंवा त्याचा वर्ण कोणताहि असो; त्याचें मत कांहींहि असो किंवा त्याची पत केवढीहि असो ! आम्हीं सारे एकजात मराठी ! ज्याची आद्य भाषा मराठी तो आमचा आणि आम्हीं त्याचे ! आम्हीं सारे एक ! आमचे धर्म भिन्न असले तरी आम्हीं वादप्रतिवाद करूं पण तो मराठींत करूं. येथें मराठीच्या राज्यांत आम्हीं कोणाचे कूळ पाहणार नाहीं कीं मूळ तपासण्याच्या भानगडींत पडणार नाहीं ! आम्ही भांडूं पण मराठीत भांडूं ! आम्ही सुखसंवाद करूं तेहि मराठींत आणि दुःखविलाप करूं तेहि मराठींत! आम्ही विनोद-क्रीडा करूं तीहि मराठींत आणि आम्ही प्रतिभा-विलास करूं तेहि मराठतिच ! आम्ही शोकगीतें गाऊं तींहि मराठींत आणि विजयघोष करूं तेहि मराठींतच ! असा एकविध भाव धरून एकरूप प्रेमाचा संसार आम्ही मराठीशीं करूं ! आणि आमची 'नातिचरामि' प्रतिज्ञा पुरी करूं !"

मायभाषेच्या उपासनेचें फल काय ? पोतदार सांगतात,

" मराठीची अवहेलना झालेली आपणांस सहन न झाली पाहिजे. मराठीविषयीं सर्वांचीं अंतःकरणें बाळपणापासून नितांत प्रेमवृत्तीनें भरून ओसंडून गेलीं पाहिजेत, असें केलें पाहिजे. जर करूं तर आपल्या राष्ट्राची काया पालटेल; मराठीचे दुर्दिन संपतील; मराठीचें बळ वाढेल; मराठी आपला सर्व भडसा पुरवील; ती आपल्याला हसवील, रिझवील; नाचवील; मराठीचा ' झेंडा ' सर्वत्र मिरवेल !"



# हरिभाऊ आपटे : : : १६

"आपटे-युग" अशी स्वतंत्र पाटीच मराठी कादंबरीच्या मंदिरांतील एका विभागास लावावी लागेल, इतका हरिभाऊ आपटे यांचा लेखन-क्षेत्रांतील विक्रम मोठा आहे. एखाद्या शहरांत निरनिराळ्या रस्त्यांना मोठमोठ्या माणसांचीं नांवें दिलीं जातात. तीं नांवें मिळण्यापूर्वींहि त्या रस्त्यावरून कैक सामान्य माणसें ये-जा करीत असतात आणि नांव मिळाल्यानंतरहि शेंकडों लोकांची रहदारी तेथें चालू असतेच. पण त्या रस्त्याला नांव मिळतें तें त्या रस्त्यानें जाणाऱ्या एकाच ठळक व्यक्तीवरून. हरिभाऊंच्या पूर्वींहि मराठींत कादंबऱ्या लिहिल्या जात होत्या आणि पुढेंहि त्यांचें पीक पुष्कळच तरारून आलें. पण मराठी कादंबरीच्या प्रवाहाला हरिभाऊंनीं जें एक निराळें वळण दिलें, त्याचा ठसा कायम राहिला आहे.

## सत्य-सृष्टीचें चित्रण

नदीच्या प्रवाहाची दिशाच बदलण्याइतकें हें अचाट काम होतें. 'गुल-बकावली,' 'मंजुघोषा,' 'मुक्तामाला' अशा केवळ कल्पित व अद्भुत कथा रंगविण्यांतच पूर्वीचे कादंबरीकार आपली शक्ती खर्च करीत. पण हरिभाऊंनीं कादंबरी–जगांत क्रांति केली. याच भूमीवरून चालणारीं, याच समाजांत वावरणारीं, आपल्यासारखेच सुखदुःखाचे, हर्षक्रोधाचे, मानापमानाचे प्रसंग अनुभवणारीं, आपल्या भोंवतालचींच बरींवाईट, पण हाडामांसाचीं, खरीखुरीं, जिवंत पात्रें, यथातथ्य रंगवून, आणि सत्यसृष्टींतील वास्तव घटनाच तेवढ्या चित्रित करून, हरिभाऊंनीं मराठी कादंबरींत नवयुग सुरू केलें, म्हणूनच त्यांना 'आद्य कादंबरीकार' म्हणतात.

## खरीखुरीं पात्रें

आपल्या कादंबऱ्या सत्य वाटण्यासाठीं, हरिभाऊंनीं त्यामध्यें जशीं खरीखुरीं माणसें व वास्तव घटना घातल्या; त्याचप्रमाणें भाषाहि त्यांना शोभेशी अगदीं साधी, सोपी, सरळ वापरली. ती इतकी घरगुती आहे कीं, बायकापोरांना–किंबहुना म्हाताऱ्याकोताऱ्या आजींबाईंनाहि-सहज समजावी. स्त्रियांची भाषा तर हरिभाऊ इतकी हुबेहूब लिहीत कीं, खुद्द स्त्रियांनाहि तशी लिहितां येणार नाहीं. त्यांची 'पण लक्षांत कोण घेतो ?' ही कादंबरी जिनें वाचली किंवा ऐकली नाहीं, आणि वाचतां वाचतां किंवा ऐकतां ऐकतां जिच्या डोळ्यांतून आंसवें गळलीं नाहींत, अशी स्त्री सुशिक्षित महाराष्ट्रांत तरी विरळा. त्याचप्रमाणें 'गड आला पण सिंह गेला' या त्यांच्या छोट्याशा पण उत्कृष्ट कादंबरींत रंगून गेला नाहीं असा विद्यार्थी सांपडणें कठीण. 'उषःकाल' मधील सांवळ्या हा तर बालवाचकांना आपला एक सवंगडीच वाटतो! आणि त्यांतील नानासाहेब म्हणजे तरुणांच्या भावनांचा पुतळाच ! 'मी' मधील भावानंद हा शेंकडों तरुणांना आपल्या जीवनाचा मार्ग दाखवीत आहे—संसार कीं राष्ट्रसेवा ? हें नित्याचें कोडें उलगडण्यास मदत करीत आहे—त्यांचें जीवन ध्येयनिष्ठ बनवीत आहे. आणि ते शंकर मामंजी, ती यमू, ती दुर्गा, ते शिव-

रामपंत, तो डॅडी,—हीं सारीं पात्रें आपल्या आजूबाजूला वावरत आहेत, असेंच सर्वसामान्य वाचकांस वाटतें. संभाजी व कलुषा हे मानवी स्वभावाचे उच्चनीच नमुने. त्यांचीं चित्रें 'केवळ स्वराज्यासाठीं' या कादंबरींत ज्यांनीं ज्यांनीं पाहिलीं; त्यांच्या त्यांच्या डोक्यांत तीं सदैव घोळत राहिलीं, स्मृतींत रुतून बसलीं, स्वप्नांत खेळत राहिलीं.

## समाज-सुधारणेचें साधन

हरिभाऊंनीं दहा सामाजिक व अकरा ऐतिहासिक कादंबऱ्या रचल्या. त्यांपैकीं तीन सामाजिक व चार ऐतिहासिक कादबऱ्या अपूर्ण आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्यांचीं कथानकें खिस्तपूर्व तीनशें ते खिस्तोत्तर सतरावें शतक या दोन हजार वर्षांच्या कालखंडांतील आहेत. सामाजिक कादंबऱ्यांचीं कथानकें वर्तमानकालांतील व मध्यम वर्गांतील आहेत. त्यांतहि स्त्रियांच्या दुःखांना वाचा फोडण्याचें काम हरिभाऊंनीं अत्यंत प्रभावीपणें केलेलें आहे. सामाजिक सुधारणेचें जें विचार–चक्र आगरकरांनीं महाराष्ट्रांत सुरू केलें, त्याला गति हरिभाऊंनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून दिली. स्त्रीशिक्षण, पुनार्विवाह इत्यादींचा पुरस्कार त्यांनीं जितक्या तीव्रतेनें केला, तितकाच केशवपनासारख्या क्रूर चालींचा निषेधहि कडाडून केला. समाजाचीं मनें गदगदा हलविण्याचें कार्य हरिभाऊंच्या कादंबऱ्यानीं केलें. हरिभाऊंच्या हातांत कादंबरी ही केवळ मनोरंजनांची सतार नव्हती, तर समाजसेवेची समशेर होती.

## एकत्र कुटुंबांतील अनुभव

हरि नारायण आपटे यांचा जन्म खानदेशांतील पारोळे गांवीं ता. ८ मार्च १८६४ सालीं झाला. त्यांचें मूळचें नांव बालकृष्ण होतें. मुंबईस इंग्रजी तीन यत्तेपर्यंत त्यांचें शिक्षण झालें. १८७८ सालीं त्यांचें बिऱ्हाड पुण्यास आलें; तेव्हांपासून चाळीस वर्षें, आयुष्याच्या अखेरपर्यंत, हरिभाऊ पुण्यासच राहिले. पुण्यानें त्यांना विद्या दिली, स्फूर्ति दिली आणि कीर्ति पण दिली. त्यांचें कुटुंब मोठें होतें, त्यांतील कांहीं कांहीं व्यक्तींचीं

प्रतिबिंबें ' मी ' कादंबरींत पहावयास सांपडतात. ते रागीट तात्या पंतोजी, ते थापेबाज रावजी, ती प्रेमळ आजी, हीं सर्व ' मी ' मधील मंडळी हरिभाऊंनीं आपल्या कुटुंबांत आपल्या बारक्या नजरेनें पाहिली होती. एकत्र कुटुंबांत होणारा मनाचा कोंडमारहि त्यांनीं अनुभविला होता. सूक्ष्म दृष्टीनें दुसऱ्याच्या बोलण्याचालण्यांतील लकबा हेरून त्यांच्या नकला करण्याचा नाद हरिभाऊंना लहानपणापासून होता. घरांत. शाळेंत, मित्र-मंडळींत ते नकला करीत व सर्वांना हसवून सोडीत. त्यांची आई १८६८ सालीं मरण पावली. हरिभाऊ चवथ्या वर्षींच आईविरहित झाले. आईच्या प्रेमाची भूक त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत मातचें वात्सल्य रंगवून भागविली. आई गेली, वडील गरीब, पण आजी मात्र त्यांचे लाड करी. आईनंतर प्रेमाची पाखर घालणारी त्यांची चुलतीहि त्यांच्या वयाचे आठवें वर्षीं निधन पावली.

## मुंजींत वाङ्‌निश्चय !

तथापि हरिभाऊंचें बालपण मोठ्या मजेंत गेलें. ते हट्टी व खोडकर होते. आजी किंवा चुलती तांदूळ निवडण्यास बसली म्हणजे तांदळाचें ताटच छोटा हरि उडवून देई. एकदां तर मुंबईस असतांना त्यांनीं दिवाळींत भर रस्त्यावर फटाके उडविले. मुंबईस रस्त्यांवर फटाके उडविण्यास मनाई असे. लगेच पोलिसदादा आला आणि त्यानें हरिभाऊंस पकडलें—पोलिस-ठाण्यावरसुद्धां नेलें. चुलते वकील होते. ते कोर्टांतून घरीं आले, तेव्हां त्यांना आपल्या पुतण्याचा पराक्रम कळला. त्यांनीं त्याला पोलिसांच्या तावडींतून सोडवून आणलें. हरिभाऊंची मुंज त्यांचे नववे वर्षीं पुण्यांत झाली. मुंजीच्या वेळीं शेजारच्या गोखले वकीलांची बायको भर पंक्तींत म्हणाली, " आजी, आमची मथुरी हरीला द्यायची बरं कां ! या दोघांचा जोडा मोठा सुंदर शोभेल." हें सहज बोलणें पुढें खरें झालें. कल्पनासृष्टीची सत्यसृष्टी झाली. हरिभाऊंचा विवाह त्याच मुलीशीं झाला. शहाजी–जिजाईच्या लग्नाची आठवण सर्वांस सहजच झाली.

## लेखनाची हौस

हरिभाऊ बुद्धीनें हुशार होते. आणि त्या बुद्धीला पैलू पाडण्यास त्यांना शिक्षक मिळाले तेहि अलौकिक. पुण्याच्या सरकारी हायस्कुलांत हरिभाऊंनीं नांव घातलें. तेथें प्रो. जिनसीवाले हे महापंडित संस्कृत शिकविण्यास होते. त्याशिवाय घरी संस्कृत शिकविण्यासाठीं एक शास्त्रीबुवा ठेवलेले होते. त्यांच्याजवळ हरिभाऊंनीं संस्कृतांतील काव्य–नाटकांचें अध्ययन केलें. गणितांत मात्र त्यांना अगणित अडचणी यावयाच्या. त्या विषयाची त्यांना नावडच होती. त्यांना हौस मराठी, इंग्रजी, संस्कृत या भाषांतील साहित्याची. त्यांत ते यथेच्छ डुंबत. नुसतें वाचत नसत, तर लिहीतहि. "पुरी हौस फिटली" ही गोष्ट त्यांनीं इंग्रजी पांचवींत असतांना लिहिली–आणि तीहि वर्ग चालू असतांना. दुपारच्या सुट्टींत ती त्यांनीं आपल्या मित्रांना वाचून दाखविली. इंग्रजी कवितांचें भाषांतर ते हां हां म्हणतां करीत. इंग्रजी सहावींत असतांना 'मेडोज टेलर' याच्या दोन इंग्रजी कादंबऱ्यांचें भाषांतर हरिभाऊंनीं पार पाडलें होतें.

## शास्त्रीबुवांची छाप

साहित्याची भक्ति हरिभाऊंच्या हृदयांत अंकुर धरीत होती. त्याच वेळीं समाजसेवेची बुद्धीहि त्यांच्या ठिकाणीं निर्माण करणारे एक लोकोत्तर शिक्षक त्यांना लाभले. ते म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर! सरकारी हायस्कुलांत ते शिकवीत असत. पण त्याहिपेक्षां त्यांची 'निबंधमाला' तरुणांच्या गळ्यांतील ताईत बनली होती. निबंधमालेंतील रसरशीत राष्ट्रभक्ति आणि अवीट भाषामाधुरी यांकडे हरिभाऊंचें चित्त सहजच ओढलें गेलें. "शास्त्रीबुवांप्रमाणें आपणहि मोठे लेखक होणार" अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. शास्त्रीबुवांनीं आपल्या स्वातंत्र्यपूर्ण वृत्तीचा साक्षात्कार १८८० सालीं सर्वांना घडविला. सरकारी नोकरीची रुपेरी बेडी त्यांनीं ताडदिशी तोडून टाकली आणि स्वतंत्र शाळेचें निशाण फडकविलें. या त्यांच्या बाणेदार वर्तनाचा परिणाम विद्यार्थि–वर्गावर विजेसारखा झाला. हरिभाऊंनीं चार महिनें आधीं सरकारी हायस्कूल सोडलें

आणि न्यू इंग्लिश स्कूलच्या उद्घाटनाच्या दिवशीं, ते त्या नव्या शाळेंत अभिमानानें हजर राहिले. पहिल्या दिवशीं शाळेंत जीं एकोणीस मुलें हजर होतीं, त्या बिनीच्या तुकडींत हरिभाऊ होते. गुरुजींच्या धडाडीचा कित्ता शिष्यांनीहि गिरविला. नव्या शाळेंत काय? एकाहून एक देदीप्यमान तारे शिक्षकवर्गांत झळकत होते. ते चिपळूणकर, ते टिळक, ते आगरकर, ते वामनराव आपटे ते वासुदेवशास्त्री खरे—जणुं कांहीं तेजस्वी नक्षत्रमालाच तेथें चमकत होती. यांतूनच शिवरामपंत परांजपे निघाले आणि तसेंच हरिभाऊ आपटेहि निघाले.

केवळ परिक्षेकडे लक्ष न देतां हे सारे शिक्षक शिकवीत असत आणि विद्यार्थ्यांच्या मनांत त्या त्या विषयाची गोडी उत्पन्न करीत व देशभक्ती-चीहि लागवड जातां जातां करीत. क्रमिक पुस्तकांशिवाय इतर वाङ्मय वाचण्याची जी आवड हरिभाऊंच्या अंगीं होती, ती या वातावरणांत सहजच वाढीस लागली. त्यांनीं शाळेंत असतांनाच शेक्सपिअर व मोलिअर यांचीं नाटकें, स्कॉट व रेनॉल्ड यांच्या कादंबऱ्या, कीट्स व शेले यांचीं काव्यें वाचून काढलीं.

## प्रतिज्ञा केली

विष्णुशास्त्री १८८२ सालीं, ता. १७ मार्च रोजीं, एकाएकीं निधन पावले. विद्यार्थ्यांना वीज कोसळल्यासारखेंच वाटलें. हरिभाऊंचें कोवळें हृदय तर व्याकुळ झालें. स्मशानयात्रेस जातांना त्यांच्या हृदयांत शोकाचे कल्लोळ उठले. त्यांना वाट काढून देण्यासाठीं, हरिभाऊंनीं ‘ शिष्य-जन-विलाप ’ नांवाची ८९ श्लोकांची कविता लिहिली. शास्त्रीबुवांच्या दहाव्या दिवशीं ती छापून प्रसिद्ध झाली. किंमत दोन आणे ठेवली होती. दोन दिवसांत हजार प्रति खपल्या, पुस्तकांवर हरिभाऊंनीं आपलें नांव घातलें नव्हतें. आगरकरांनीं या काव्याची स्तुति केली. थोड्याच दिवसांत हरि-भाऊंच्या या पहिल्या काव्याची दुसरी आवृत्ति निघाली. त्याच्या शेवटीं हरिभाऊ शास्त्रीबुवांना असें आश्वासन—आश्वासन कसलें? गुरूच्या पायावर हात ठेवून शपथच घेतात कीं,

" जो जो कृत्यसमूह या पुरिमधें धैर्यें तुवा स्थापिला
तो तो चालविण्यासि जन्म खरचूं सारा अम्ही आपुला. "

' जीवित-सार ' या नांवाची कविता हरिभाऊंनीं हायस्कुलांत असतांनाच केली. लॉंगफेलोच्या एका इंग्रजी कवितेचें तें भाषांतर आहे. पण तें भाषांतर आहे, असें मुळीं वाटतच नाहीं. ही कविता शाळेच्या क्रमिक पुस्तकांतहि घेतली होती. त्यामुळें ती विद्यार्थ्यांच्या चांगल्या परिचयाची आहे.

थोर महात्मे होउनि गेले । चरित्र त्यांचें पहा जरा ।
आपण त्यांच्यासमान व्हावें । हाचि सांपडे बोध खरा ॥

अशा त्यांतील कैक ओळी सुभाषितांप्रमाणें सर्वांच्या तोंडी खेळत आहेत.

## गुरूवर टीका

गद्यलेखनाकडेहि हरिभाऊंची लेखणी यावेळीं वळली होती. त्यांचे रसिक गुरु प्रि. आगरकर यांनीं ' केसरीं'त एक लेखमाला लिहून कालिदासापेक्षां भवभूति श्रेष्ठ आहे असें म्हटलें होतें. हरिभाऊंचें मत कालिदास श्रेष्ठ असें होतें. तसा लेख त्यांनीं लिहिला. तो ' केसरींत ' छापूनहि आला. अर्जुनानें गुरु द्रोणाचार्यांवर बाण फेंकण्यापैकींच प्रकार होता हा. गुरुहि मोठे गुणग्राहक. त्यांनीं आपल्या शिष्याची वाहवाच केली. गुरु-शिष्याच्या युद्धांतील दुसरी चकमक 'हॅम्लेट' नाटकाच्या निमित्तानें घडली. त्या नाटकाचें भाषांतर आगरकरांनीं विकार—विलासित' या नांवानें प्रसिद्ध केलें. हरिभाऊंचें वाचन जसें संस्कृत, तसें इंग्रजीहि विशाल व सूक्ष्म होतें. त्यांनीं ' विकार-विलासिता'वर टीका करणारा एक लेख लिहिला आणि तोहि चांगला बहात्तर पानांचा. ' निबंध—चांद्रिका ' या मासिकांत तो छापून आला. अठरा वर्षांच्या आपल्या शिष्यानें आपल्या नाटकांतील गुणदोष इतक्या मार्मिकपणें जाणले व प्रसिद्ध केले, याचें विद्याप्रेमी आगरकरांना केवढें कौतुक वाटलें ! त्यांनीं हरिभाऊंना बोलावून त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें.

साहित्यक्षेत्रांतील अशा मोहिमामागून मोहिमा जिंकीत हरिभाऊ १८८३ मध्यें मॅट्रिक झाले. वास्तविक ते याच्या आदल्या वर्षींच पसार व्हावयाचे. पण गणित विषयाची धोंड मध्यें आडवी आली. पूर्वपरीक्षेमध्यें त्यांना गणित विषयांत फक्त पांच गुण पडले !

इंग्रजी पांचवींत असतांनाच, वयाचे पंधरावे वर्षी, त्या काळच्या रूढिप्रमाणें, हरिभाऊंचें लग्न १८७९ सालीं झालें. हुंडा अजिबात घेतला नाहीं. वाङनिश्चय मुंजींतच झाला होता. मथुला ' रमा ' हें नांव सासरीं मिळालें. ती निरक्षर होती. तिला शिकविण्याचे हरिभाऊंनीं पुढें पुष्कळ प्रयत्न केले. पण त्यावेळीं बायकांनीं पुस्तक हातांत घेणें हें अब्रह्मण्यम् वाटे. त्यामुळें स्त्री–शिक्षणाच्या या कैवाऱ्याची स्त्री फारशी शिक्षित झाली नाहीं.

## मराठीसाठीं झुंज

मॅट्रिकमधून निसटलेले हरिभाऊ डेक्कन कॉलेजांत १८८३ सालीं गेले. तेथें काय ? त्यांची वाचनाची हौस मोकाट सुटली. कॉलेजमध्यें अभ्यासाचें, परिक्षेचें, किंबहुना हजेरीचेंहि फारसें कडक बंधन नसे. तेव्हां हरिभाऊ आपला सारा वेळ मिल व स्पेन्सर, बर्क व बेकन, मेकॉले व जॉन्सन यांचें वाङ्मय वाचण्यांत घालवीत असत. इंग्रजी कादंबऱ्यांचा तर त्यांनीं फडशा पाडला. कांहींकांहींचीं पारायणें केलीं. मिलचें ' सब्जेक्शन ऑफ वुइमेन ' (स्त्रियांचें पारतंत्र्य) हा ग्रंथ त्यांनीं पुनः पुनः अभ्यासिला. त्यांतील विचारांमुळेंच समाजसुधारणेची प्रेरणा हरिभाऊंना मिळाली. कॉलेजमधील वाचनालयाचे हरिभाऊ चिटणीस झाले. त्यांनीं अहवाल वाचतांना अशी सूचना केली कीं, वर्गणीपैकीं कांहीं रक्कम मराठी ग्रंथ घेण्यासाठीं खर्च करावी. मातृभाषेचा असा अभिमान त्यांना होता. पण " मराठी वाङ्मय इंग्रजीच्या दर्जाचें नाहीं. " अशी समजूत त्यावेळच्या विद्वानांची ! डॉ. भांडारकर व प्रि. राजवाडे यांनीं हरिभाऊंची सूचना मोडून काढली. पण या गुरुजनांना विरोधूनहि हरिभाऊंनीं आपला आग्रह तडीस नेला. वाचनालयांत मराठी ग्रंथ येऊं लागले.

## त्रिवार अपयश

कॉलेजांतील गमतीची शीग म्हणजे संमेलनांतील नाटक. विष्णुशास्त्री चिपळूणकर, न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर वगैरे पुढें थोरथोर साहित्यिक झालेल्या विद्यार्थ्यांनीं कॉलेजच्या नाटकांत कामें केलीं. हरिभाऊंनींहि एका इंग्रजी नाटकांत सोंग घेतलें होतें. टेनिस खेळण्याचा त्यांना शोक होता. हास्य–विनोदांत कॉलेजमधील पहिलें वर्ष कसें चुटकीसरसें गेलें. पण त्या सर्व आनंदावर विरजण घालावयास ती बया तेथें आलीच. ती म्हणजे परीक्षा. एकदां नव्हे, दोनदां नव्हे, तीनदां, हरिभाऊ कॉलेजमधील पहिल्या परीक्षेंत गचकले! गणिताच्या खड्ड्यांतच ते पडत!! १८८५ सालीं टिळक-आगरकरांचें फर्ग्युसन कॉलेज निघतांच पहिल्या दिवशींच्या विद्यार्थ्यांत हरिभाऊंचें नांव होतेंच. टिळकांसारखा प्राध्यापक गणित शिकविण्याला. पण उपयोग काय! साहित्यानें त्यांच्या मेंदूभोवतीं अशी कांहीं भक्कम तटबंदी उभारली होती कीं, गणिताला आंत पाऊलच ठेवतां येऊं नये. चुलत्याच्या आज्ञेवरून हरिभाऊ पुनः डेक्कन कॉलेजांत गेले. पण कॉलेज बदललें म्हणून गणिताची नावड बदलेल काय? नांव नको. तो त्यांचा शत्रु तेथेंहि त्यांचा पाठलाग करीत आलाच. “ या परीक्षांनीं तर मोठाच त्रास दिला आहे. कांहींहि इतर वाचावयास जा, त्यावेळीं आपण हें वाचण्यापेक्षां आपल्या अभ्यासाचेंच पुस्तक वाचल्यास बर, असें वाटून तें हातीं घेतलेलें पुस्तक निमूटपणें एकीकडे ठेवावें लागतें. ' अशी स्पष्ट तक्रारच त्यांनीं एका खाजगा पत्रांत केलेली आहे. तीनदां प्रयत्न करूनहि प्रिव्हीयसच्या परीक्षेचें कुलुप उघडत नाहीं, असें पाहून हरिभाऊंनीं १८८६ सालीं कॉलेजच्या शिक्षणास रामराम ठोकला.

## पहिल्या कादंबरीचें स्वागत

बरणींतील वीज न पावली तर न पावो, पण आकाशांतील विद्युल्लता मात्र हरिभाऊंवर प्रसन्न होती. कॉलेजांतील बंदिस्त शारदेनें त्यांच्याकडे पाठ फिरविली; पण जगांतील सरस्वतीनें त्यांच्यावर वरदहस्त ठेवला. कॉलेजमध्यें असतांनाच त्यांची पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली व मान्यता

पावली. तिचें नांव ‘ मधली स्थिती ’. ती ‘ पुणें वैभव ’ या सनातनी साप्ताहिकामध्यें क्रमशः छापून आली. एक एक प्रकरण वाचून होतांच साने, महाजनी, रानडे वगैरे रसिक विद्वानांनीं कादंबरीच्या लेखकाची तोंड भरून तारीफ केली. हा लेखक कोण ? त्याचें नांव अज्ञात होतें. पण, “ हें कांहीं निराळेंच पाणी आहे, नवेंच तेज आहे ” असें जो तो म्हणूं लागला. पूर्वीच्या गुलबकावलीछाप कादंबऱ्यापेक्षां या कादंबरीची जातच निराळी आहे, असें टीकाकारहि म्हणूं लागले. आपल्या आजूबाजूच्या माणसांचींच सुरेख प्रतिबिंबें या कादंबरींत पाहून वाचक चकित झाले. स्त्री-शिक्षणासारख्या नव्या विषयावर कादंबरींत पाडलेला प्रकाश पाहून सुधारकांना आनंद वाटला, तर सुधारकांच्या भानगडी व कुलंगडीं रंगविलेली पाहून सनातनी खूष झाले.

एकदां हरिभाऊंचे वडील नानासाहेब आगगाडींतून प्रवास करीत होते. गाडींत त्यांच्या ओळखीचा एक मनुष्य भेटला. त्यानें बोलतां बोलतां ‘ मधली स्थिती ’ या कादंबरीची फार स्तुति केली आणि हळूच गुपित म्हणून सांगितलें, ‘ अशी ही कादंबरी आपल्या चिरंजीवांनींच लिहिलेली आहे. ” आपला ‘ तात्या ’ इतका चांगला लेखक आहे, हें समजल्यावर नानासाहेबांना केवढा आनंद वाटला ! या यशापुढें परीक्षेंतील अपयश त्यांना तुच्छ वाटलें.

पहिल्यापासून हरिभाऊंचें कथा-लेखन सहेतुक होतें. ‘ कादंबऱ्यांचें उद्दिष्ट ’ या नांवाचा एक लेख लिहून त्यांनीं त्यावेळींच आपलें असें मत जाहीर केलें होतें की, “ मनोरंजन हा कादंबरीचा आद्य उद्देश आहे हें खरें, पण गोड बोलून समाजाचे दोष दाखविणें व त्यास उन्नतीच्या मार्गावर नेणें हाहिं एक कादंबरी—लेखनाचा महत्त्वाचा उद्देश आहे. ”

## संपादकाच्या खुर्चीवर

कादंबरीकार हरिभाऊंच्याभोंवतीं साहित्यिकांचें मित्रमंडळ जमूं लागलें. काशीताई कानिटकर यांना तर हरिभाऊ बहीणच मानीत. त्यांचे पति गोविंदराव हे हरिभाऊंचे स्नेही होते. या मित्रमंडळीनीं १८८६ सालीं

' मनोरंजन ' मासिक सुरू केलें. त्यांत हरिभाऊंची ' गणपतराव ' कादंबरी येऊं लागली. मासिकाच्या संपादनाचें बहुतेक काम हरिभाऊच करीत. मासिकाला मोठें यश लाभलें—म्हणजे वर्षाच्या शेवटीं सुमारें तीनशें वर्गणी-दार मिळाले. त्या वेळच्या मानानें हें पुष्कळच होतें. ' निबंध-चंद्रिका ' हें मासिकहि उच्च दर्जाचें होतें. पण दोन्ही मासिकांची आर्थिक स्थिति लंगडीच होती. या दोन मासिकांचें एकीकरण १८८७ मध्यें हरिभाऊंनीं घडविलें. पुढें तेच त्याचे संपादक होते. हें जोड-मासिक १८९२ मध्यें बंद पडलें. ' सुधारक ' व ' ज्ञानप्रकाश ' यांचे संपादक म्हणूनहि हरिभाऊंनीं कांहीं काळ निर्वेतन काम केलें. या संपादकीच्या अनुभवाचा फायदा घेऊन हरिभाऊंनीं पुढें एक अपूर्व साप्ताहिक सतत सत्तावीस वर्षें स्वतःच्या हिंमतीनें चालविलें आणि महाराष्ट्रांत मोठें नांव केलें. त्याचें नांव ' करमणूक ! '

## ' फणीकरंड्याच्या पेटी ' पर्यंत

' करमणूक ' पत्राचा नमुना अंक १८९० सालच्या ऑक्टोबर महिन्यांत हरिभाऊंनीं काढला. ' लहानापासून थोरांपर्यंत सर्व स्त्री-पुरुषांचें मनोरंजन करून ज्ञानदान देणारें पत्र ' असें ब्रीद करमणुकीच्या मुखपृष्ठावर छापलेलें असे. आपला उद्देश व्यक्त करतांना हरिभाऊ लिहितात, " केसरी, सुधारकादि पत्रें आपल्या कुशल लेखणीनें जें काम निबंधांच्या द्वारें करतात तेंच काम हें पत्र मनाची करमणूक करून करणार ! जी गोष्ट जनसमूहानें अवश्य करावी म्हणून केसरी, सुधारक एखाद्या कठोर पित्या-प्रमाणें कठोर शब्दांनीं सांगणार व समाजाचें अप्रशस्त वर्तन झाल्यास, वेळीं वाक्प्रतोदाचे तडाखे लगावणार, तीच गोष्ट हें पत्र प्रेमळ मातेप्रमाणें गोड गोड शब्दांनीं व चांगल्या चांगल्या गोष्टींनीं अप्रशस्त वर्तनाबद्दल मायेचें शासन करणार ! ज्यांस पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाण-खान्यांतील टेबलापासून फणीकरंड्याच्या पेटीपर्यंत कोणाच्या हातीं पडलें तरी, हवें त्यानें, हवें त्याच्यादेखत, निःशंकपणानें वाचण्यास हरकत नाहीं, असें पत्र पाहिजे असेल त्यांनीं अवश्य करमणुकीचे वर्गणीदार व्हावें."

## ‘ करमणुकी ’ ची तारीफ

विजयादशमीच्या मुहूर्तावर ‘ करमणूक ’ पत्राचा पहिला अंक निघाला. त्यांत ‘ पण लक्षांत कोण घेतो ’ या हरिभाऊंच्या कादंबरीचें पहिलें प्रकरण आलें. त्या प्रकरणानें वाचकांचीं हृदयें सप्पादिशीं जिंकलीं गेलीं आणि दुसऱ्या अंकांसाठीं शनिवारची वाट वाचक पाहूं लागले. या कादंबरी-शिवाय केशवसुतांच्या कविता, पाश्चात्यांचीं चरित्रें, विनोदी चुटके, विचार-पूर्ण निबंध वगैरे नानाविध सदरांनीं नटलेलें हें पत्र महाराष्ट्रांत अत्यंत लोकप्रिय झालें. न्या. तेलंग, प्रा. केळकर वगैरे विद्वानांनींहि पहिल्या वर्षानंतर या पत्राची मुक्तकंठानें प्रशंसा केली. “ सात दिवसपर्यंत या पत्राकडे डोळे लागलेले असतात.” अशी स्तुति सौ. रमाबाई रानडे यांनीं केली. ‘ करमणुकी ’ इतकें सभ्य, सात्त्विक, विनोदी व हितकारी साप्ताहिक मराठी भाषेंत आजपर्यंतहि निघालेलें नाहीं. हरिभाऊ हे जसे अद्वितीय कादंबरीकार, तसेंच त्यांचें साप्ताहिकहि अद्वितीयच

## ‘ आनंदाश्रमा ’चा आधार

समाजकारणांत ‘ सुधारक ’ म्हणून आणि राजकारणांत ‘ प्रागतिक ’ म्हणून, हरिभाऊंनीं थोर राष्ट्रसेवा केली. त्यांचे चुलते नामांकित वकील होते. त्यांनीं वकिलीवर लाखो रुपये मिळविले. त्यांतून त्यांनीं पुण्यास ‘ आनंदाश्रम ’ नांवाची एक संस्था स्थापन केली. जुन्या संस्कृत ग्रंथांचा संग्रह व प्रकाशन करणें आणि बारा मुलें व पांच संन्यासी यांना आश्रय देणें हें या संस्थेचे उद्देश. संस्थेसाठीं मुबलक पैसा ठेवलेला आहे. तिची सारी व्यवस्था हरिभाऊंकडे सोपविली होती. त्यामुळें पैशाची विवंचना हा प्रश्नच हरिभाऊंच्या आयुष्यांत उत्पन्न झाला नाहीं.

## स्थानिक स्वराज्याची सेवा

१८९७ सालापासून पुण्यांत प्लेगनें धुमाकूळ मांडला. त्या भयंकर रोगाच्या तडाख्यांतून लोकांना वाचविणें, आजाऱ्यांची शुश्रूषा करणें इत्यादि कामें हरिभाऊंनीं दहा वर्षें स्वयंसेवक म्हणून केलीं. या त्यांच्या

निरपेक्ष व निरलस सेवेबद्दल समाजानें व सरकारनें त्यांची मोठी वाहवा केली. सरकारनें तर त्यांना ' कैसर-इ-हिंद ' हें पदक बाक्षिस दिलें. पुढें १९१८ साली इन्फ्लुएंझाची सांथ भडकली. तेव्हांहि हरिभाऊ लोकांच्या फार उपयोगीं पडले. त्यावेळीं ते पुणें नगरपालिकेचे अध्यक्ष होते. म्हणून त्यांनीं ' नूतन मराठी शाळेंत 'च एक स्वतंत्र दवाखाना काढला.

सरकारनें १९०० सालीं त्यांची नेमणूक नगरपालिकेंत केली. अठरा वर्षें ते त्या स्थानावर होते. १९१५ ते १९१८ हीं तीन वर्षें तर ते अध्यक्षच होते. स्कूल बोर्डाचे सभासद म्हणूनहि त्यांनीं तेरा वर्षें काम केलें. त्यांतील सहा वर्षें ते बोर्डाचे अध्यक्ष होते. याशिवाय न्या. रानडे यांच्या डेक्कनसभेचे चिटणीस म्हणून त्यांनीं दुष्काळाचे वेळीं काम केलें. विष्णुशास्त्र्यांच्या स्मरणार्थ निघालेल्या ' नूतन मराठी विद्यालयांत ' शिक्षक म्हणूनहि त्यांनीं निर्वेतन काम चारपांच वर्षें केलें. त्या संस्थेच्या ' न्यू पूना कॉलेज 'ला त्यांनीं आपला पांच हजार रुपये किंमतीचा ग्रंथसंग्रह नजर केला.

## पदवीधरांचे परीक्षक

मुंबई विद्यापीठाचे पदवीधर कांहीं हरिभाऊ नव्हते, पण पदवीधरांचे परीक्षक मात्र ते होते. 'Are you an M. A.?' असा प्रश्न त्यांना एकदां कोर्टांत विचारला असतांना त्यांनीं ताडकन् उत्तर दिलें, " I am the maker of M. A. s." हरिभाऊंची विद्वत्ता ओळखून मुंबई विद्यापीठानें त्यांना १९०५ सालापासून बारा वर्षें एम्.ए.चे परीक्षक नेमलें होतें. सीनेटचेहि ते सभासद होते. साहित्यावर इंग्रजी–मराठींतून व्याख्यानें त्यांनीं पुष्कळ दिलीं. ' मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालया'मध्यें १९११ सालीं त्यांनीं ' विदग्ध वाङ्मय ' या विषयावर व्याख्यान दिलें. तें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें आहे. १९१२ सालीं अकोला येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाचें अध्यक्षपद हरिभाऊंकडे आलें. त्या अध्यक्षपदावरून त्यांनीं ' महाराष्ट्र वाङ्मयाची उन्नति ' करण्याचे विविध उपाय सुचविले. मॅट्रिकपर्यंत शिक्षणाचें माध्यम मराठी असावें, कॉलेजमध्यें मराठी भाषा हा आवश्यक

विषय असावा वगैरे सूचना त्यांनीं केल्या. १९१९ सालीं त्यांनीं प्रकृति बरी नसतांहि पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढें साक्ष दिली. त्यानंतर सुमारें एक महिन्यानेंच, ता. ३ मार्च १९१९ रोजीं त्यांनीं इहलोकची यात्रा संपविली.

## कौटुंबिक सुखाचा अभाव

हरिभाऊंना कौटुंबिक सुख असें फारसें लाभलें नाहीं. त्यांची पहिली पत्नी दुसऱ्या मुलाच्या बाळंतपणांत १८९१ सालीं मरण पावली. त्यामुळें उद्विग्न होऊन हरिभाऊंनीं साखर व विडा खाणें वर्ज्य केलें आणि गादीवर निजणें सोडलें. दुसरें लग्न करण्याचें त्यांच्या मनांत मुळींच नव्हतें. पण आजीच्या निकराच्या आग्रहानें आणि इतर आप्तांनीं अब्रोला धरल्यानें त्यांनीं तें १८९२ मध्यें केलें. ते सुधारकी मताचे असल्यानें विधवेशीं पुनर्विवाह करावा हें त्यांना इष्ट वाटत होतें. पण तेथेंहि 'आनंदाश्रमाची' जबाबदारी आड आली. तेव्हां अकरा वर्षें वयाच्या व मराठी पांच यत्ता शिकलेल्या वेणुताईशींच त्यांनीं दुसरें लग्न केलें. १९०५ मध्यें त्यांना एक मुलगी झाली. तिचें नांव शांता. पण तिला सर्वजण म्हणत ताई. ती हरिभाऊंना जीव कीं प्राण वाटे. १९१३ सालीं ती देवाघरीं गेली. तेव्हां हरिभाऊंना आपला प्राणच उडून गेल्यासारखें वाटलें. तेव्हांपासून त्यांनीं चहा वर्ज्य केला. ना. गोखले व सौ. काशीताई कानिटकर या मानलेल्या बंधुभगिनींमुळेंच हरिभाऊंच्या जीवनांत काय आनंद उरला असेल तो असेल.

## स्वतः निर्मिलेलें जग

पण हरिभाऊंचा खरा आनंद म्हणजे वाचन व लेखन. या बौद्धिक आनंदांत ते सतत डुंबत असत. मराठी, संस्कृत व इंग्रजी या भाषांप्रमाणेंच बंगाली, फ्रेंच वगैरे भाषांतील साहित्याचा आनंदहि ते लुटीत. आणि लेखनाच्या साहाय्यानें तर त्यांनीं कादंबरीचें एक विशाल व मनोहर असें एकवीसमजली स्वतंत्र मंदिरच उभारलें. तें मंदिर निरनिराळ्या व्यक्तींनीं गजबजलें होतें. त्यांत राजे होते तसेच रंक रहात होते, दुष्ट होते

तसे दुष्टहि नांदत होते. दीन, दुःखी स्त्रिया होत्या तसे त्यागी, देशभक्त पुरुषहि वावरत होते. त्यांच्या चिंतनांत, निर्मितींत, संगतींत व स्मृतींत हरिभाऊंचा सारा काळ निघून जाई. पहाटे तीन वाजतां उठून दोन-अडीच तास ते लेखन करीत, तें अत्यंत तन्मयतेनें. ‘ सूर्यग्रहण ’ ही कादंबरी लिहितांना, तिच्यांतील साध्वी माता रणदेवी नदीच्या घाटावरून वर येत असतांना कांही ‘ नोडग्यांनीं ’ तिच्या नाकावर गुद्दा मारला व तिच्या नाकांतून भळभळ् रक्त वाहूं लागलें, हा करुण प्रसंग रंगवितांना हरिभाऊंच्याच हृदयाचें पाणी पाणी झालें आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रु गळाले. अशा तल्लीनतेमुळेंच त्यांच्या कादंबऱ्यांत जिवंतपणा उत्पन्न झाला आहे आणि त्यामुळेंच वाचक स्वतःला विसरून त्या कादंबऱ्यात समरस होतो.

## समाजाचें दर्शन

निरनिराळ्या निमित्तांनीं हरिभाऊंना प्रवास पुष्कळच घडला. त्यामुळें मनुष्य-स्वभावाचें ज्ञान त्यांना भरपूर मिळालें. ‘ आनंदाश्रमांत ’ राहिल्या-मुळें आणि तेथें दररोज दूरदूरचे स्वामी-संन्यासी वगैरेंची ये-जा असल्यानें मानवी स्वभावाचे विविध नमुने हरिभाऊंना घरबसल्या पहावयास मिळतच होते. पण काश्मीरपासून सिलोनपर्यंत त्यांनीं देशभर प्रवास केला असल्या-मुळें त्यांच्या या ज्ञानांत चांगली भर पडली. हृषिकेश येथें हिमालयाचें व काशी येथें गंगेचें त्यांनीं दर्शन घेतलें होतें. दिल्ली-आग्रा, मथुरा-वृंदावन, इत्यादि शहरेंहि त्यांनीं पाहिलीं होतीं. शिवाय, ज्या ऐतिहासिक स्थळांचें वर्णन त्यांना आपल्या कादंबऱ्यांत करावयाचें होतें, तेथेंहि ते जाऊन आले होते. स्थळें काय किंवा पात्रें काय, हरिभाऊंनीं सत्यसृष्टींत प्रत्यक्ष पाहिलेलींच होतीं. आपण कोठें तीं पहात नाहीं ? पण प्रतिभेच्या साहाय्यानें कल्पनेचे रंग भरून व बुद्धीच्या साहाय्यानें सुसंगति निर्माण करून त्यांची वास्तव वाटणारी सृष्टि निर्माण करणारे हरिभाऊ एखादेच ! “ माझ्या कादंबऱ्यांत एकहि पात्र असें नाहीं कीं, जें व्यवहारांत मीं प्रत्यक्ष पाहिलें नाहीं.” असें हरिभाऊ स्पष्ट म्हणत. त्याचबरोबर वाचकहि

असें म्हणतो कीं, " हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत एकहि पात्र असें नाहीं की, जें कल्पनेच्या कुंचल्यानें त्यांनीं रंगविलेलें नाहीं." दगड तोच पण त्यांतून शिल्पकार निरनिराळ्या सुंदर मूर्ति आपल्या कसबानें निर्माण करतो. महत्त्व आहे तें त्या कसबाचें.

## साधेपणाची मौज

" खरोखर साधेपणांत जी काय मौज आहे, ती कशांत नाहीं. " असें एकदां हरीभाऊंनीं आपल्या पत्रांत लिहिलें होतें. ती साधेपणाची मौज हरिभाऊंच्या कादंबऱ्याइतकी दुसरीकडे ,कोठें, कधींच पहावयास मिळणार नाहीं. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत तर पात्रें साधी, प्रसंग साधे, भाषाहि साधीच. यमू आणि दुर्गी, भाऊ आणि यशवंतराव हीं पात्रें सर्वसामान्य माणसासारखींच आहेत. प्रसंग तरी काय ? कोठें लखोटा हरवला, तर कोठें घराला कुलूप दिसलें ! फारच रोमांचकारक घटना म्हणजे आजोबानें किंवा बाबानें बायकोच्या श्रीमुखांत दिली अथवा यमूनें भावाचा चावा घेतला ! अलीकडील कादंबऱ्यांप्रमाणें, खुनामागून खून आणि अपघातांमागून अपघात, असे चित्त थरारविणारे प्रसंग हरिभाऊंच्या कथा–सृष्टींत विरळा ! पण साध्या विषयांतून मोठा आशय काढण्याचें कौशल्य हरिभाऊंचें होतें. एका विद्वानानें म्हटलें आहे कीं, हातांतून हातरुमाल गळणें अशासारख्या सामान्य प्रसंगांतूनहि शेक्सपीयर भूकंपाचे धक्के बसावितो,ही त्याची प्रतिभेची करामत.तीच हरिभाऊंच्या लेखणींत होती.

## घरगुती भाषा

हरिभाऊंची भाषा तर काय ? सोलीव द्राक्षेंच. अगदीं घरगुती बोली. सोपेसोपे शब्द व लहान लहान वाक्यें. कृत्रिम अलंकार शोधूं गेल्यासहि सांपडणें कठीण. जशी संस्कृतची तशी इंग्रजीचीहि छाप शब्दावर किंवा वाक्यरचनेवर पडलेली आढळावयाची नाहीं. खाष्ट, कर्दनकाळ, आक्रस-ताळी, तिन्हीसांजा, जरीबुट्टी इत्यादि हरिभाऊंनीं वापरलेले शब्द आतांच्या लेखनांत, झिजलेल्या नाण्याप्रमाणें, चालेनासे झाले आहेत त्या

त्या प्रसंगाचें चित्र वाचकांच्या डोळ्यापुढें ठसठशीतपणें उभें करण्यासाठीं हरिभाऊ बारीक तपशीलाचें वर्णन तर करीत, पण त्याबरोबरच त्याला पोषक असे नादानुसारी शब्दहि योजीत. दडदड धावावें, वसकन् अंगावर येऊन, तणतणून चालतां झाला, चेहरा खरकन् उतरला, पटकन उचलून, सूं निघाला, धूम ठोकली, कडकडीत जमदग्नीचा अवतार, इत्यादि साधे साधे शब्द पण किती अर्थवाहक आहेत. तसेच बोलण्यांतील किनई, तुंग्, यंव्, वा, यांचा उपयोगहि हरिभाऊंनीं मोठ्या चातुर्यानें करून घेतला आहे. म्हणी योजण्यांत तर त्यांचा हातखंडाच आहे. ‘ अचंबला ’, ‘ तुडुंबला ’, ‘ विस्मयली ’ अशी नवीन क्रियापदें त्यांनीं किती तरी बनविलीं व रूढाविलीहि !

## तीन पिढ्यांचा चित्रपट

हरिभाऊंचें कादंबरी–लेखन जितकें कलापूर्ण, तितकें हेतुपूर्णहि होतें. त्यांच्या प्रत्येक कादंबरीत समाजाला हितकारक असा कांहींना कांहीं विचार हेतुपुरःसर मांडलेला दिसतो. ‘ मधली स्थिती ’ मध्यें त्यांनीं सुधारकांच्या व्यसनीपणावर टीका केली आहे. ‘ पण लक्षांत कोण घेतो ’ मध्यें विधवांच्या केशवपनांतील क्रूरता चव्हाट्यावर मांडली आहे. यशवंतराव खरे, आजच व गणपतराव या कादंबऱ्यांत तत्कालीन राजकारणाचे पडसाद उमटविले आहेत. ‘ मी ’ मध्यें संन्यासी देशभक्ताचें चित्र रेखाटलें आहे. त्याचेंच दहा वर्षांनीं सत्यसृष्टींत झालेलें रूपांतर म्हणजे ना. गोखले यांचा ‘ भारत सेवक समाज ’. भयंकर दिव्य वगैरे इतर कादंबऱ्यांतहि सुशिक्षितांच्या संसारांतील दोषांवर व दुःखावर त्यांनीं नेमकें बोट ठेवलें आहे. साधारणतः तीन पिढ्यांचा चित्रपट हरिभाऊंच्या सामाजिक कादबऱ्यांत पहावयास सांपडतो.

## स्वराज्याची लालसा

ऐतिहासिक कादंबऱ्यांचा पल्ला याहून मोठा आहे. ‘ चंद्रगुप्त ’ मध्यें चाणक्य व राक्षस यांचे राजकीय डावपेंच त्यांनीं रंगविले आहेत. ‘ वज्रा-

घात'मध्यें विजयनगरचा इतिहास चितारलेला आहे. पृथ्वीराज व जयचंद याची दुही ' कालकूट ' मध्यें उघड केली आहे. शिवकालीन कादंबऱ्या तर चढत्यावाढत्या गोडीच्या आहेत. त्यांतील कोणती कोणापेक्षां सरस हें सांगणेंच कठीण. ' उषःकालांत ' स्वराज्याचें तोरण बांधलेलें आहे, तर 'सूर्योदयांत' अफझुलखानाचा वध मोठ्या बहारीनें रंगविला आहे. 'सूर्यग्रहणांत' शिवाजीमहाराजांची आग्र्याहून सुटका हा विषय हाताळला आहे; तर ' गड आला पण सिंह गेला ' यामध्यें ' तानाजीरावांच्या पराक्रमाचा गद्य पोवाडा ' आहे. ' केवळ स्वराज्यासाठीं ' यांतील संभाजीमहाराजांचा अमानुष अंत वाचून कोणाच्या हृदयांतून रक्तबिंदु गळणार नाहींत ? ' मध्यान्ह ' व ' म्हैसूरचा वाघ ' या कादंबऱ्यामध्यें पेशवेकालीन इतिहास आणलेला आहे. या ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्ध होत असतांना महाराष्ट्राचें वातावरण स्वराज्याच्या भावनेनें तापत चाललें होतें. शिवाजीमहाराजांचा उत्सव जागजागीं गाजत होता. त्यांच्या रायगडाववरील समाधीचा जीर्णोद्धार होत होता. ऐतिहासिक विभूतींच्या स्मृतींतून भावी स्वराज्यासाठीं स्फूर्ति मिळविण्याचे प्रयत्न चाललें होते लो. टिळक व्याख्यानें देत होते, प्रा. परांजपे पुराणें सांगत होते आणि हरिभाऊ ऐतिहासिक कादंबऱ्या लिहीत होते. तिघांचीं साधनें भिन्न दिसलीं, तरी साध्य एकच होतें.

## यमुनेची आत्म-कथा

हरिभाऊंची खूप गाजलेली पहिली कादंबरी म्हणजे ' पण लक्षात कोण घेतो. ' घराघरांतून बायका-पुरुषांनीं तिचीं किती पारायणें केलीं असतील आणि कितीं टिपें गाळलीं असतील ! यमुना नांवाच्या एका विधवेनें स्वतःच आपली करुण कहाणी लिहून ठेवली होती आणि ती तिच्या बंधूनीं आपल्या हातीं आणून दिली, असा आभास हरिभाऊंनीं उत्पन्न केला आहे. तो सत्य वाटण्यासाठीं भाषा अगदीं घरगुती, अगदीं स्त्रियांना साजेशी वापरलेली आहे. ' मातृहीन ' असे संस्कृत शब्द न वापरतां, ' आईविरहित ' किंवा ' आईपोरकी ' असे सोपे शब्द योजले आहेत.

तसेंच ' आधींच तारे, त्यांत शिरलें वारे ', ' मानें खाईना पानें ' ' पक्वान्नाचा घास, तोंडीं पडायला विघ्नांची रास ' अशा म्हणी मधून मधून पेरलेल्या आहेत. वायकांच्या बोलीला त्या किती शोभून दिसतात. आपल्या आईच्या गुणांचें वर्णन अनेक ठिकाणीं यमुनेनें केलेलें आहे. एके ठिकाणीं कृतज्ञतेनें यमुना म्हणते, " आईच्या शिक्षणानें नम्रता, नीटनेटकेपणा, विनय, उद्योगीपणा, मितव्यय इत्यादि गोष्टी जर माझ्या मनांत आधींच रुजल्या नसत्या, तर त्याला पुढें मिळालेल्या शिक्षण-जलानें अंकुर येऊन त्याचे वृक्ष बनून फुलें–फळें कधींच दृष्टीस पडतींना ! आमची आई म्हणजे एक देवता होती, यांत मला तर तिळमात्र संशय नाहीं. या माउलीची थोरवी वर्णावी तेवढी थोडीच आहे."

## बाल-विवाहाचें कल्पना-चित्र—

त्या वेळच्या लहान परकऱ्या मुलींच्या चित्तांत लग्नासंबंधीं कसे गोड विचार खेळत असत, याचें चित्र यमूनें पुढील शब्दांनीं काढलें आहे.

" शेजारपाजारच्या सात सात आठ आठ वर्षांच्या मुलीं लग्न झालेल्या माहेराहून सासरीं आणि सासऱ्याहून माहेरीं येतांना पाहिल्या व त्यांच्या अंगावरील दागदागिने पाहिले, म्हणजे मला वाटे कीं, आपलें लग्न केव्हां एकदां होईल, आणि आपणहि असेच दागदागिने अंगावर चढवून नागगोड्यांनीं भूषविलेला असा वेणीचा शेपटा पाठीवर लडबड करीत, बिंदी कपाळावर चढवून, पुतळ्यांची, हरपर रेवड्यांची वगैरे माळा गळ्यांत घालून त्यांतील कारलें पोटावर लडबडवीत, वाळ्यातोरड्यांच्या नादावर ठमकत-मुरडत-चालत इकडे तिकडे केव्हां हिंडूं; त्याचप्रमाणें नव्या नवरीस पहायला येणाऱ्या लोकांनीं आपणांस 'नवऱ्याचें नांव घे ' म्हणून सांगावें आणि मग आपण बळेंच मुरका मारून लाजलाजून पुरेसें करावें; आणि शेवटीं नाइलाज म्हणूनच जणूं काय घेतें असें बाह्यतः दाखवून परंतु मनांत तर मोठी हौस असून तें फार प्रिय असें नांव घेण्यास केव्हां आपणांस सांपडेल; लोकांच्या मुलींप्रमाणें आपणांसहि नवऱ्याच्या पुढें जेवायला बसून त्याच्या तोंडांत घास देण्याचा सुप्रसंग कधीं येईल असें मला वाटूं लागलें होतें."

## — आणि सत्य चित्र !

पण असा ‘ सुप्रसंग ’ येण्याऐवजीं यमूवर वाईटांतला वाईट प्रसंग ओढवला. तिचें सारें आयुष्य म्हणजे दुःखांची एक मालिकाच झाली. त्या दुःख मालेची सुरवात तिला ‘ पहाण्या ’पासूनच झाली. यमू म्हणते, “ गुरांच्या बाजारांत कसाई लोक मेंढरीं, बकरीं घेतात त्यावेळीं त्यांची कशी काय परीक्षा करितात तीहि मला ठाऊक नाहीं; किंवा हौशी लोक चांगलेसे घोडे घेतांना कशी काय परीक्षा करितात तीहि मला ठाऊक नाहीं; पण मी जें ऐकिलें आहे तेवढ्यावरून मला वाटतें, कीं आम्हां मुलींना पहायला येणारी मंडळी आमची परीक्षा करितात ती अगदीं त्याच मासल्याची असली पाहिजे. अंतर एवढेंच कीं, त्या गुरांना कळत नसतें, आणि आम्हां मुलींना कळत असतें.”

त्यावेळीं स्त्रीवर्गाची स्थिति किती असहाय्य झाली होती हें सांगतांना यमू लिहिते, “ बाहुल्यांच्यापेक्षां आमची स्थिति फार वाईट; कारण आम्ही जें करूं त्याचें त्या बाहुल्यांस सुखदुःख कांहींच नाहीं, आमच्या करण्याचें बरेवाईट परिणाम त्यांस भोगावे लागत नाहीत. आमच्या वडील माणसांचे करण्याचे परिणाम आम्हांला आमच्या परिपक्व वयांत भोगावे लागतात. तेव्हां आम्हां या चालत्याबोलत्या बाहुल्याची स्थिति कितीं वाईट बरें ! आम्ही डोळे असून आंधळ्या, कान असून बहिऱ्या, जीभ असून मुक्या, हात असून थोट्या, आणि पाय असून लंगड्या.”

## रूढिविरुद्ध बंड

अज्ञान व रूढि यांच्या जात्यांत भरडल्या जाणाऱ्या स्त्रीवर्गाचा उद्धार कसा होईल हाहि विचार यमूनें सांगून ठेवला आहे. तो असा, “ मी आपल्या भगिनींना उपदेश करणार तो असा कीं, “ बायांनो, घराच्या बाहेर आपण पाऊल टाकणें म्हणजे आपण नागिणीच्या फडेवर पाय ठेवण्यासारखें समजा, परंतु तसें करण्यास भिऊं मात्र नका. आपल्या दाराशीं जी ही दुष्ट रूढिरूप नागीण आज किती दिवस पसरली आहे, तिला कोणीहि—त्यांतून आपणा बायकांची तर गोष्टच विचारूं नका—

वलांडून जायची तयारी करूं लागला कीं, तिनें आपली प्रचंड फडा एकदम वर करून आपल्या लाखों तोंडांनीं त्याचा दंश केलाच म्हणून समजा. अशी स्थिती आहे, तर आतां घरांत घरांत तरी किती दिवस बसायचें ? आपले जन्माचे सोबती आणखी आपण, दोघांनीं मिळून जर तिच्या फडेवर जोरानें पाय दिला, तर तिचीं कांहीं तोंडें चेंपलीं जातील ना ? तिच्या अंगावर पाय पडला, तर ती आपल्याला चावेल, अशी भीति धरून मरण येईपर्यंत घरांतच चुळबूळ करण्यापेक्षां, आपण आपल्या पतींच्या साह्यानें त्या दुष्ट सर्पिणीच्या नरडीवर एकदम पाय दिला, तर किती सुख होणार आहे ! ''

## सुधारणेचें वादळ

यमूच्या आयुष्यांतील आनंदाचे प्रसंग म्हणजे तिनें आपल्या पतीबरोबर मुंबई येथें घालविलेले थोडेफार दिवस ! सुजाण व सुस्वभावी कुटुंबांच्या संगतींत व सभा, चर्चा करण्यांत तिनें आनंद लुटला. पण त्याचे परिणाम यमूच्या सासरच्या मंडळींवर काय झाले पहा, '' दिवसा अतिशय उकडलें, संध्याकाळीं एकाएकीं पण फारसें न गरजतां खूप ढग आकाशांत येऊन विजा लवूं लागल्या व उगीच हळूंच मधेंच गडगडलें, कीं समजावें फार प्रचंड पावसाची सर येणार, मुसळधार लागणारच, वादळच होणार म्हणून ! आमच्या घरांत या वेळीं अगदीं हुबेहूब तशीच स्थिती झाली होती. आमच्या मुंबईतील कृतीच्या तापानें पुण्याच्या मंडळीस फारच त्रास झाला. शंकरमामंजीरूप वाऱ्यानें आपलें होतें नव्हतें तें बळ एकत्र करून किती तरी ढग एके ठिकाणीं करून ठेवले होते. आजेसासूबाई किती तरी दाबीत, पण मधून मधून त्यांचें बडबडणेंरूपी गडगडणें एखादवेळ तरी ऐकूं येईच. धाकट्या मामेसासूबाईंची जिव्हाविद्युल्लता मधून मधून चमकूं लागलीच आमच्या बनुवन्सं टिटवीप्रमाणें ' ट्याव् ट्याव् ' करून लवकरच वृष्टि होणार, तुम्हांस सळो कीं पळो करणार असें सुचवीत होत्या. ''

## कारुण्याचे झरे

वंगभूमींत जशीं जागोजाग पाण्याचीं तळीं, तशीं या कादंबरींत ठायीं

ठायीं करुणरसपूर्ण स्थळें. तीं वाचून कोणाचा कंठ गहिंवरून येणार नाहीं ? कोणाचे डोळे डबडबणार नाहींत ? एकदां यमू आपल्या भावाला म्हणते, " दादा, मी आतां एवढी झालें म्हणतोस आणखी या असल्या गोष्टी आपल्याबद्दल लोक कां बोलतात, एवढें ठाऊकदिखील असूं नये ना रे ? तुझ्याखेरीज मला कोणीं नाहीं, मला तूं कीं तुला मी. म्हणून ना मी जी ती गोष्ट तुला सांगायला येतें ! कांहीं एवढसं झालं, कीं दादाला सांगायचं, कांहीं करायचं झाल कीं दादाला विचारायचं तें कां बरं ? आणखी तूं हें असं करतोस ? आई असती तर ! "

हे शब्द माझ्या तोंडून निघतात न निघतात तोंच त्याचे डोळे भरून आले आणि तो एकदम माझा हात धरून मला म्हणतो, " पुरे, पुरे यमे, मला तूं आणखी तुला मी, हीच गोष्ट खरी. आणखी ही मी जाणून नाहीं असें कां तूं समजतेस ? "

आईचा मृत्यु, पतीचा अंत इत्यादि प्रसंग तर दुःखदायक आहेतच, पण त्या सर्वांवर कळस म्हणजे यमूचें बळजबरीनें केशवपन करण्यांत येतें तो ! स्वप्नांत आईची भेट झाल्याचे प्रसंग घालून हरिभाऊंनीं कारुण्याला अद्‌भुततेची जोड दिलेली आहे. तसेंच दुर्गीच्या हृदयद्रावक उपकथानकाची गुंफण करून हरिभाऊंनीं करुणरसाचा उत्कर्ष केला आहे. ज्या शंकर-मामंजींनीं यमूला इतकें छळलें, त्यांनाच तिनें हें पुस्तक अर्पण केलें. त्या अर्पण–पत्रिकेच्या शेवटीं वाचकाच्या हृदयाला चटका लावणारे शब्द तिनें लिहिले आहेत. ते शब्द हे—" त्यांच्याच प्रसादानें लवकर जग सोडून जाणारी त्यांची आवडती सून "

## कादंबऱ्यांचा कोहिनूर

हरिभाऊंच्याच काय, पण मराठींतील सर्व कादंबऱ्यांचा कोहिनूर म्हणजे ' मी ' ! चौकस, हूड व उपद्व्यापी असा लहानपणचा भाऊ–किंवा भावड्या–पुढें शिक्षण घेतो, शिवरामपंताच्या तालमींत तयार होतो आणि ध्येयवादी संन्यासी असा ' भावानंद ' बनतो व समाजसेवक संन्याशांची संस्था स्थापन करतो. हा सारा कथाभागच उदात्त आहे. त्याचें चित्रण

तितक्याच उदात्त रीतीनें हरिभाऊंनीं केलेलें आहे. 'पण' प्रमाणेंच 'मी'— हि आत्मचरित्रवजा कादंबरी आहे.

शिवरामपंतांची मुलगी सुंदरी हिची प्रथम भेट अगदीं बालवयांत झाली. त्या भेटीचें वर्णन भाऊ कसें गंमतीनें करतो पहा. " आई, गले हाच मला नौला आवलतो. तो नतो दादा म्हनतात तो ? हा दे मला ! " हे शब्द, आपले दोनहि हात पाठीमागें कमरेवर एकांत एक घालून, मधेंच डोळ्यावर आलेली केसाची बट मागें सारून, पुनः हात जिथल्या तिथें नेऊन, किंचित् वांकत व सरळपणानें माझ्याकडे पहात मोठ्या गंभीरपणानें तिनें उच्चारिले आणि जणूं काय आतांच्या आतां आई काय निकाल करील तो चटकन् समजला पाहिजे म्हणून आपल्या आईकडे अगदीं आतुरतेनें पहात उभी राहिली ! "

## शाळेंतील मौजा

ही झाली घरांतील बालपणची मौज. आतां शाळेंतील गंमत ऐका. एका विद्यार्थ्याचे उरावर बसून भाऊ मारामारी करीत असतांना पाठीमागून मास्तर आले. त्यांच्याशीं झालेला पुढील संवाद किती हास्यकारक आहे पहा.

" हं; मग काय ? भागूबाई तुझ्याकडे आली पाहिजे काय ? आणतों आं आतां तुझ्यापुढें······( हाताला हिसका देऊन ) भागुबाई तुझ्यापुढें आली पाहिजे नाहीं कां ? अं ? "

" नाहीं मास्तर······नाहीं सर······नाहीं सर······" आमचे त्या प्रश्नावर उत्तर आलें.

" नाहीं ? नाहीं मास्तर ? अं ! आतां मला म्हणालास, भागूबाई पुढें कां नाहीं येत म्हणून ? "

" नाहीं सर ·····नाहीं सर······तसं नाहीं सर······तुम्हांला नाहीं भागूबाई सर. "

" आम्हांला नाहीं भागूबाई, सर ? भागूबाई सर म्हणजे काय ? अं काय रे ? "

" नाही. सर. मी नाहीं सर······भागुबाई तुम्ही असं म्हटलं. " आपण बोलतों आहोंत काय? आणि आपला बोलण्याचा हेतु काय माझ्या कांही ध्यानांत येईना. मनांत बोलायचें एक आणि तोंडून निघे तिसरेंच कांहीं.

" तेंच. तेंच तर मी म्हणतों आहे. भागूबाई तुम्ही, असं म्हटलंस ना? "

" नाहीं सर. तुम्ही नाहीं सर. मी नाही सर······"

" मग कोण सर? " आमचे सर माझ्या खांद्यावर सपाटून एक हिसका देऊन व तोंड वेडेंवांकडें करून म्हणाले.

## महात्मा कोण?

बालपणचा पूर्वार्ध संपला, पुढील आयुष्य कसें घालवावे याबद्दल भाऊच्या चित्तांत तीव्र झगडा सुरु झाला. पण दैवाची वक्रता. संसार न करतां राष्ट्रसेवा करण्याची प्रतिज्ञा ज्या क्षणीं भाऊनें केली, त्याचवेळीं शिवरामपंत व ताई त्याला सांगावयास आले, " तूं सुंदरीशीं लग्न कर. " काय करावें, असा प्रश्न त्याला पडला. त्यानें शिवरामपंतांचा सल्ला विचारला. त्यांनीं आपल्या मुलीचा विचार बाजूला ठेवून भाऊच्या थोर ध्येयवादास पाठिंबाच दिला. त्यांच्या विचाराचा व वाणीचा जोर किती आहे पहा.

" जों जों अडचणी येतील, तों तों ज्यांना स्फुरणच चढत जाणार; जों जों विघ्नें येणार तों तों जे अधिक अधिकच निष्काळजी; जों जों अनपेक्षित प्रसंग येणार, तों तों ज्यांच्या निश्चयाचीं मुळें अधिकाधिकच मनांत गढत जाणार; असे पुरुष अत्यंत विरळ. खरे महात्मे ते! बाकीचे लोक कसले? गतानुगतिक मात्र! बाकीच्या लोकांच्या धैर्याची ज्योत विघ्नाची झुळूक येईपर्यंत. ती झुळूक आली कीं, ही ज्योत मावळलीच. खऱ्या महात्म्यांचें धैर्य रानांत पेटलेल्या वणव्याप्रमाणें विघ्नांचा व दुर्धर प्रसंगांचा वारा जों जों सपाट्यानें वाहूं लागेल तों तों त्यांचा धैर्याग्नि सपाट्यानें भडकतच जाणार. लहानसा दिवा उगीच कोठें वाऱ्याची झुळूक आली कीं पटकन् मालवतो. रानांत पेटलेला अग्नि वावटळीनें अधिकच भडकतो. साधारण लोक आणि धैर्यशाली लोक यांच्यांत अंतर हेंच."

## करारी स्त्रीचा नमुना

भाऊची बहीण ताई. तिचें नशीब ‘ पण ’ मधील यमूसारखें खडतर. पण ताई मोठ्या धीराची व कराराची. संकटांचे पर्वत फोडून पुढें वाट काढणारी गंगा नदीच. स्वतः शिक्षण घेऊन इतर भगिनींना तें देण्याची ताईची उभारी. व्यसनी नवऱ्यानें तिचा क्रूर छळ केला, तेव्हां ती माहेरीं आली. माहेराहून तिला आपलेकडे नेण्यासाठीं तिचा नवरा आला, तेव्हां त्या नरकांत न जाण्याचा निर्धार ताई पुढील निकराच्या शब्दांनीं सर्वा-समक्ष बोलून दाखविते:—“ येत नाहीं ! येत नाहीं ! ! येत नाहीं ! ! !” जशी एखादी हताश झाल्यामुळें प्राणावर उदार झालेली मृगी आपली शिंगें रोखून पारध्याच्या अंगावर धांवते, त्याप्रमाणें ताईच्या तोंडून हे शब्द बाहेर पडून ती संतापाच्या भरांत किंचित् पुढें सरसावली. ती संतापानें अतोनात फणफण फणफण करीत होती. “ येत नाहीं ! येत नाहीं ! ! येत नाहीं ! ! ! ” असें तीन वेळां म्हटल्यानंतर क्षणमात्रच स्तब्ध राहिली. आपल्या बायकोच्या अंगीं इतकें पाणी असेल व तें फार दाबदाबून राहून एकदम बंधारा फुटल्यानंतर अशी जबर उसळी मारून आपल्या अंगावर येईल, असें दादासाहेबांस वाटलें असेलसें, दिसलें नाहीं.”

ताई म्हणजे केवळ एक नमुना—एक प्रतिनिधि. त्या वेळच्या पांढरपेशा स्त्रियांच्या एकंदर असहाय्य स्थितीबद्दल ताईनें आपल्या भावाला पुढील विचार ऐकविले आहेत, “ तितक्यांत तिनें आपला उद्वेग दाबलासें केलें आणि त्या अश्रुपुरांत चकाकणाऱ्या आपल्या स्तिमित नेत्रांनीं मजकडे पाहून म्हणते, “ भाऊ, तुझं ठीक आहे, तूं म्हणशील तेव्हां तुला जातां येईल. पण बाबारे, आम्ही घरांत असलेलीं मुकीं जनावरें ! कोणी मारलं, मार खाल्ला पाहिजे. जा म्हटलं गेलं पाहिजे. नको म्हटलं, थबकलं पाहिजे.”

## भारत-सेवकांची संस्था

ताईचा, सुंदरीचा व शिवरामपंतांचा त्याग करून भावानंदानें आपला एकाकी मार्ग आंखला. तेव्हां प्रथम त्याला वाटलें, “ अफाट, अतिशय

अफाट दर्या. त्यांत एकच लहानशी होडी आणि तींत बसलेला एकच खलाशी. त्या खलाशानें जिकडे पहावें तिकडे पाण्याखेरीज त्याला कांहीं दिसूं नये. अशीच आपली स्थिती आहे काय ?" पण नाहीं. एकामागून एक त्याला निष्ठावंत अनुयायी मिळूं लागले. त्यांतूनच त्याची संस्था जन्मास आली. वाल्मीकीनें जसें आधीं रामायण लिहिलें आणि मग राम–चरित्र घडलें, तसें हरिभाऊंनीं ज्या संस्थेचें चित्र रंगविलें, त्याच संस्थेला त्यांचे स्नेही ना. गोखले यांनीं १९१० सालीं मूर्त स्वरूप दिलें.

## स्वाभिमानी विद्यार्थ्याचें शब्द-चित्र

गरीब पण स्वाभिमानी विद्यार्थ्याचें बालपण चित्रित करण्यासाठीं हरिभाऊंनीं एक स्वतंत्रच कादंबरी रचली आहे. तिचें नांव 'यशवंतराव खरे.' बारा वर्षांच्या या पोराच्या मनांतील अपमानाची चीड, महत्त्वाकांक्षा, आईविषयींचें प्रेम व संशय, इत्यादि किती तरी भावना मूर्तस्वरूपांत या कादंबरींत हरिभाऊंनीं दाखविल्या आहेत. शब्द-चित्रांचे सुरेख नमुने तर अनेक आहेत ! एकदां अपमान असह्य झाल्यावर यशवंतराव पर्वतीकडे जातो–आत्महत्येचाहि विचार करतो. तप्त परिस्थितींतील त्या संतप्त मुलाचें शब्दचित्र हरिभाऊ किती सांगोपांग व हुबेहूब करतात पहा, "तो जात होता कुठें ? त्याच्या मनांत काय होतें ? काय असेल तें असो ! तो आपल्या घराच्या वाटेकडे नुसती दृष्टिदेखील न देतां तडक उलट वाटेला चालला. जातां जातां गांवाच्या बाहेरही गेला. भिकारदासाच्या बागेवरून पर्वतीच्या रस्त्याला चालला. काय ? आपल्या आईला एकटी सोडून देऊन पळून जाण्याचा त्याचा बेत होता ? किंवा कोठें तरी जाऊन मनमुराद एकदां रडून घ्यावें असें त्याला वाटत होतें ? तो पुढेंच चालला. ऊन म्हणजे कोण मी म्हणत होतें. त्याच्या पायांत जोडा नाहीं, घामाच्या धारा चाललेल्या, तोंड अतिशय लाल झालेलें; परंतु त्याचें लक्ष त्याच्या मनांत जी एक गोष्ट घोळत होती, जो एक बेत त्याच्या अंतःकरणांत चालला होता, त्याच्याखेरीज दुसरें कांहीं त्याला दिसत नव्हतें. तापलेले रस्ते, क्षणोक्षणीं लागणारे खडे, पोटांत भूक लागल्यामुळें होणारा भयंकर कहर—एकादेखील गोष्टीकडे

त्याचें लक्ष गेलें नाहीं. तो आपला तडक चालला होता. जातां जातां तो पर्वतीच्या पायऱ्यांपाशीं आला. मागेंपुढें न पाहतां वर चढूंच लागला. त्याच्या मनांत कांहीं तरी विलक्षण निश्चय झालेला होता. एक, दोन तीन, दहा, पंधरा पायऱ्या चढला. थोडा वेळ बसला, पुनः आणखी कांहीं पायऱ्या चढला, पुन: बसला. होतां होतां वर गेला. तो पर्वतीच्या देवळाकडे न वळतां तडक विष्णूच्या देवळांत गेला, आणि तेथें देवाला नमस्कार करून त्या देवळापाठीमागील वीज पडून गेलेल्या इमारतीच्या नुसत्या खिडक्या आहेत त्या बाजूस गेला. ”

यशवंतरावाची आई म्हणजे कारुण्याची मूर्तिच ! तिचें शब्द-चित्र पहाः —

“बिचारी गंगाबाई ! त्याची ती सिंहगर्जना एकदम कानीं पडल्याबरोबरच दचकूनच काय, दळतां दळतां होणाऱ्या श्रमांचें कांहीं वाटूं नये म्हणून आपल्या मंजुळ, पण करुणापूर्ण अशा आवाजानें म्हणत असलेलें गाणें बंद करून खुंट्यावर हात टेंकून तटस्थपणें त्याच्याकडे पहात राहिली.”

## गरिबीचें वर्णन

यशवंतरावाच्या घरची गरिबी हरिभाऊंनीं पुढील चार वाक्यांत चालती-बोलती केली आहेः—“ सुमारें आठ वाजून गेले, कृष्णी अंथरुणावर जागीच होती; पण गोविंदा केव्हाच झोंपीं गेला होता. एक रॉकेलचा दिवा, ज्याचा धूर सगळा इकडे तिकडे होतो आहे, असा भिंतीशीं ठेवला होता; आणि त्याच्याजवळ यशवंतराव खालीं बुक ठेवून अगदीं मान वांकवून मनन करीत होतासें दिसलें. गंगाबाई आंथरुणावर पाय असे ताठ करून व एका हातावर एक कानशील ठेवून बसली होती, कृष्णी आईची चौघडी पांघरून पण जागीच आपल्या दादाकडे पहात होती. इतक्यांत दादाच्या एका डोळ्याच्या पापण्यांवरून ओघळून येऊन एकदम एक थेंब टप्कन् त्याच्या बुकावर पडला.”

क्वचित् चव-पालटीसाठीं हरिभाऊ प्रौढभाषा वापरून उपहासहि करीत. एका टवाळ वृत्तपत्राची चेष्टा त्यांनीं किती गंमतीनें केली आहे पहाः—

" एडिटोरिअल पीठा ! सकल-कला-शास्त्र-निधि-संरक्षका ! सकलविद्यों-दधि-मंथन-दंडा ! सकल-कला-गुण-सेना-नायका ! तुझ्या असंख्य गुणांचें वर्णन करतां करतां विद्यादेव जो गणेश त्याची लेखणी व सहस्रमुख जो शेष त्याच्या अशेष जिव्हाही शिणतील, मग माझ्यासारख्या पामराची काय कथा ! तुझ्या दर्शनानें सहस्राक्ष इंद्रदेखील थक्क होईल, मग मी होईन यांत काय नवल ! "

## विनोदाचे नमुने

' कर्मयोग ' या अपूर्ण कादंबरींत कॉलेजांतून एम्. ए. होऊन बाहेर पडलेला नायकच सुरवातीपासून दाखविलेला आहे. चंद्रशेखराची वृत्ति चिकित्सक, बुद्धिवादी, किंबहुना नास्तिक दाखविलेली आहे. पण स्वामी अखंडानंद यांची गांठ पडल्यापासून त्याच्या ईश्वरविषयक विचारांत चल-बिचल होत आहे. त्याचे वडील गणपतराव हेहि त्याला आपल्या इच्छे-प्रमाणें वागण्यास वाव देत आहेत. याला काळी पार्श्वभूमि म्हणजे भाऊ-साहेब व त्यांचे चिरंजीव. भाऊसाहेबांचें सारें बोलणें अहंकारी व आचरट. विनोदासाठीं त्याचा खासा उपयोग होतो. आपल्या अडाणी व भांडकुदळ पत्नीचें वर्णन तें कसें करतात पहा.

" कोण म्हणतों मी स्त्रीशिक्षणाविरुद्ध आहें म्हणून ? आमच्या पंडिता-बाईकडे बघा. ( कुटुंबाला तें नेहमीं पंडिताबाई म्हणत. ) त्यांना सबंध भगवद्गीता सार्थ सभाष्य पाठ येते आहे. त्यांना व्याहायला सांगा. तुमच्या मोठमोठ्या लिहिणारांना खालीं पहायला लावतील. वक्तृत्व करायला सांगा. तिच्यापुढें कोणाचें वक्तृत्व टिकणार आहे ! अे हो हो हो हो ! जसा कांहीं घो धो धो धो पाऊस पडतो आहे ! आषाढांतला पाऊस पडतो आहे ! आहे माहिती ? आज तुमच्या कानडा देशांत गव्हर्नर जनरल कोण आहे तेंसुद्धां सांगेल. याचं नांव स्त्रीशिक्षण. आणखी तें मी आमच्या पंडिताबाईंना दिलं आहे. त्या प्रत्यक्ष सरस्वतीचा अवतार आहेत. त्यांना तुम्ही कोणताही प्रश्न टाकण्याचा अवकाश ! खाड् खाड् उत्तरें देतील."

## जिज्ञासेची घोडदौड

सामाजिक कादंबऱ्यांचा एक नवाच प्रवाह जसा हरिभाऊंनीं सुरू केला, तसाच ऐतिहासिक कादंबऱ्यांचाहि दुसरा प्रवाह त्यांनी जोरानें खेळविला. स्वराज्य-प्राप्तीसाठीं हरिभाऊंच्या वेळीं चळवळी चालत आणि त्यांत मवाळ, जहाल असें पक्षहि असत. त्या वेळच्या तरुण पिढीच्या अंतःकरणांत भावनांचे जसें तुंबळ युद्ध चालें, तसेंच सुमारें तीनशें वर्षांपूर्वीं शिवाजीच्या वेळींहि होत होतें. म्हणून हरिभाऊंनीं मुख्यतः शिवकालीन प्रसंगावरच आपल्या ऐतिहासिक कादंबऱ्या उभारल्या. त्यांतील पहिली म्हणजे ' उषःकाल '. तिनें सर्वांना चटकाच लावला. पहिल्या पानांतील घोडेस्वाराबरोबर वाचक जो चालूं लागतो, तो जिज्ञासेनें, उत्कंठतेनें शेवटच्या ४०४ व्या पानापर्यंत जाऊन पोंचतो. श्रीधरस्वामींची सुटका, समर्थ--शिवाजी भेट आणि सुलतानगड सर करणें एवढे तीनच प्रसंग, पण हरिभाऊंनीं ते अगदीं घोळघोळून वर्णिले आहेत आणि वीररस व करुणरस यांमध्यें बुचकळून काढले आहेत !

' फुलें कुसकरिलीं ! कुणि ग मेल्यानं पायदळीं तुडाविलीं '

हें वेडीचें गाणें तर वाचकाचें हृदय भेदून जातें.

अद्‌भुत प्रसंगांची मालिका आपल्या अनुभवास कशी आली याचा विचार करतांना किल्लेदाराचें तरुण, तेजस्वी पुत्र नानासाहेब म्हणतात, " आपण सहजीं वाट चुकलों काय, इकडे आलों काय, हें देऊळ पाहिलें काय, हे गोसावी कोण, बलभीमाच्या आसनाखालीं केवढें थोरलें तरी भुयार, त्या भुयारांत केवढें थोरलें अंबाबाईचें देऊळ, त्या देवळांत तीं किती हत्यारें, त्या मोठमोठालीं कुलपें अडकविलेल्या केवढाल्या तरी पेटया. एकंदरींत सर्वच कांहीं विलक्षण कारखाना ! आणि इतकें सगळें कोणाच्या ताब्यांत ! तर वरच्या मारुतीच्या देवळांत बसणाऱ्या एका गोसाव्याच्या, आणि आतां पाहातों तों दोन कानफाटे व आणखी एक गोसावी आले असून हा पहिला गोसावी मोठया सलगीनें त्यांच्या पाठीवर थाप वगैरे मारून बोलून ' तुझें काम झालें का ? ' वगैरे प्रश्न विचारीत आहे. या गोसाव्याचें एवढें काम तें काय असणार ! आणि ते करण्या-

साठीं यानें आपल्यासारखेच दुसरे गोसावी अगर कानफाटे कोणाकडे तरी पाठवावे याचा अर्थ काय? " अशा अद्‌भुत प्रसंगांचें वर्णन हरिभाऊ किती सहज करतात पहा.

"वेळ अगदीं संध्याकाळची. झाडी किर्र दाट. पाऊलवाट जेमतेम दिसते न दिसते इतक्याच बेताची. त्या वाटेनें दोन माणसें झपझप चाललीं होतीं. एक माणूस मोठा असून खूप झपाट्यानें चालला होता व दुसरा लहान पोऱ्या होता. त्यांचे मनांतून थोड्याच वेळांत कोणता तरी गांव गांठावा असें होतें, असें दिसलें. क्षणोक्षणी अंधकार त्यास गांठीत होता. आणि तेहि जणूं काय अंधकारास मागें सारण्याकरितां जीव घेऊन धांवत होते. "

उत्कंठा जागी करण्यासाठीं 'तो घोडेस्वाराच्या कानांत कुजबुजला आणि लगेच स्वाराची चर्या पालटली' असे गूढ प्रसंग मधून मधून घातलेले आहेत.

## स्वभाव-चित्रणांतील कौशल्य

एखाद्या व्यक्तीचें स्वभावचित्र तपशीलवार रेखाटण्यांत हारिभाऊंचा हातखंडा आहे. मुसलमान सरदारानें अपमान करतांच, श्रीधरस्वामींची अवस्था काय झाली, याचें वर्णन करून हरिभाऊंनीं 'स्वभावोक्ति' अलंकार किती सुदर साधला आहे! हरिभाऊ लिहितात, "हीं अक्षरें त्याच्या कानीं पडतांच त्याच्या अंगांतील प्रत्येक शीर आणि शीर तटाटून फुगून उभी राहिली. त्याच्या त्या विशाल कपाळाच्या तीन शिरा तर नुसत्या अशा बोटासारख्या तटाटून दिसत होत्या. त्याचे डोळे इतके कांहीं क्रूर व तिरस्कारपूर्ण दिसत होते, कांहीं पुसूं नये. कृष्णवर्ण व झुबकेदार भुवयांखालून त्यानें त्या मुसलमान सरदाराकडे टवकारून पाहिलें. त्या पहाण्यांत अत्यंत अर्थ भरलेला होता, हें अगदीं उघड आहे. त्यानें त्याच आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं पुन. एकदां आपल्या त्या कुबडीकडे पाहिलें व त्या मुसलमान सरदाराच्या उराकडे पाहिलें आणि मग आपल्या वेषाकडे पाहिलें. नंतर " अजून वेळ आली नाहीं, " असें आपल्याशींच पुटपुटला, आणि स्तब्धपणें उभा राहिला."

## शिवाजीचा पुतळाच !

अशा आपल्या कुशल कुंचल्यानें हरिभाऊंनीं शिवाजीमहाराजांचें शब्दचित्र इतकें बहारदार रेखाटलें आहे कीं वा ! एखाद्या शिल्पकारानें बारीक छिनीनें शिलेंतून कोरलेला जणुं शिवाजीचा पुतळाच. महाराज व त्यांचा घोडा या दोहोंचेंहि वर्णन हरिभाऊ पुढीलप्रमाणें करतातः—

" डोळे अतिशय पाणीदार व फार मोठे, परंतु त्यांचा विशेष त्यांची विशालता नसून त्यांत तळपणारें अद्वितीय तेजच होय. त्यांचें नाक मोठें असून गरुडाच्या चोचीसारखें होतें. तो शरिरानें फार भव्य होता असें नाहीं. त्याची मूर्ति बरीच ठेंगणी असावी असें स्पष्ट दिसत होतें. तारुण्याची पताका अद्यापि त्याच्या ओंठावर व हनुवटीवर विशेषसी झळकूं लागली नव्हती. त्याचा पोशाख अगदीं साधा, एक पायघोळ अंगरखा आणि मराठेशाही पायजमा असून डोक्याला त्या वेळचें तें लहानसें कांहीं मराठेशाही थाटाचें पागोटें होतें. त्याचे चंचल नेत्र एकसारखे जिकडे तिकडे फिरत असून जणूं काय सर्व दिशांकडे काय चाललें आहे त्याचें तो एकदमच ग्रहण करीत होता असें दिसलें. ज्या घोड्यावर तो बसला होता तो घोडा अस्सल भीमथडी अवलादीचा असून तीनतीनदां वरखालीं, वर खालीं अशा माना करीत चालला होता. जणूं काय आपल्यावर स्वार झालेल्या आपल्या धन्याबद्दल त्यास गर्व वाटत असून तो इतरांस तुच्छ करीत आहे ! तीनतीनदां लगाम चावण्याची आणि फुर्रफुर्र करण्याची त्याची ऐट पाहून कोणासहि असें वाटलें असतें कीं, घोडा असावा तर असाच असावा. "

शिवाजीमहाराजांचें अंगांत देवी भवानीचा संचार होई. तें दृश्य रेखाटतांना हरिभाऊ लिहितात,

" शिवबाचें मन तर इतकें एकाग्र झालें कीं, त्यास आतां आजूबाजूस कोणी आहे कीं नाहीं याचें मुळींसुद्धां भान असेल असें दिसलें नाहीं. त्याचें चित्त अगदीं त्याच्या कुडींतून पार दूर गेलें असून दुसऱ्या कोणत्या तरी लोकांत, दुसऱ्या कोणत्या तरी प्राण्याकडे पाहण्यांत अगर बोलण्यांत

गुंतलें असावें असें स्पष्ट दिसलें. इतक्यांत देहाचें भान इतकें नाहींसें झालें कीं, देहाला निचेष्टता येऊन मस्तक भवानीच्या मूर्तीच्या अगदीं पदकमलावर पडलें. तथापि त्याला उचलण्यास कोणीहि पुढें झालें नाहीं."

## निसर्गाची जोड

ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्यें तीव्र भावनेचे उत्कट प्रसंग फार घालतां येतात. त्या तीव्र भावना केवळ शब्दांनीं मूर्तिमंत उभ्या करणें, हें मोठ्या कौशल्याचें काम आहे. तें कौशल्य हरिभाऊंना चांगलें साधलें आहे. नाना तऱ्हेच्या पात्रांची गर्दी असून व रहस्यमय प्रसंगांतून त्यांना न्यावयाचें असूनहि प्रत्येक पात्राचें वैशिष्ट्य हरिभाऊ इतक्या बारकाव्यानें रंगवितात कीं, तें तें पात्र वाचकांच्या स्मृतींत कायमचें कोरलें जातें. 'उषःकाल'-मधील सांवळ्याला कोण विसरेल? 'केवळ स्वराज्यासाठीं' या कादंबरींतील किल्लेदारीण कोणाच्या स्मृतिवरून पुसली जाईल? 'गड आला'-मधील कमलदेवी काल्पनिक असली तरी तिचें विस्मरण कोणास होईल? काल्पनिक पात्रांतहि हरिभाऊ जिवंतपणा ओतीत, मग प्रत्यक्ष जिवंत व्यक्ति हरिभाऊंनीं किती यथार्थपणें चालत्याबोलत्या केल्या असतील?

'केवळ स्वराज्यासाठीं' या कादंबरींत मुख्य प्रसंग दोनच—एक म्हणजे संभाजीमहाराजांची अमानुष हत्त्या आणि दुसरा रायगड किल्ल्यावरील फितुरी. हे दोन्ही प्रसंग हरिभाऊंनी विस्तवाच्या अक्षरांनींच लिहिले आहेत. संभाजीला अटक झाल्याची दुष्ट वार्ता राजारामाच्या कानावर पडली त्यावेळीं तो रायगडावर होता. तेथें तो दहा वर्षे संभाजीच्या नजरकैदेंत होता. तरी त्या उदार आत्म्याचा संताप किती झाला हें निसर्गाच्या साहचर्यानें हरिभाऊंनीं वर्णिलें आहे. आरंभींच ते लिहितात, "ऐन पर्जन्याचे दिवस. आकाश मेघांनीं पूर्णपणें व्याप्त झालेलें होतें. त्यांत रात्रीची वेळ, आणि ती रात्रहि कृष्णपक्षांतल्या चतुर्दशीची. अशा वेळीं रायगड येथें एका वाड्याच्या माडींत एक तरुण गृहस्थ एखाद्या सांपळ्यांत धरून ठेवलेल्या क्रूर व्याघ्राप्रमाणें येरझारा घालीत होता. माडींत एका बाजूस एक मोठी थोरली समई तेवत होती. येरझारा घालणाऱ्या गृहस्थाची चर्या आणि

आकाशाची चर्या ही अगदीं समानरूप होती. ज्याप्रमाणें प्रचंड पर्जन्य पडूं लागल्याचीं सर्व चिन्हें आकाशांत दिसत होतीं, त्याचप्रमाणें त्या खोलींत फेऱ्या घालणाऱ्या गृहस्थाच्या मनांतहि अनेक विचारांचा पर्जन्य पडत असावा अशा प्रकारचीं चिन्हें त्याच्या चर्येवर दिसत होतीं. काळ्याकुट्ट अशा ढगांनीं व्याप्त झालेल्या आकाशपटलाप्रमाणेंच त्याचें मुखपटल दुःखोद्वेगांनीं व्याप्त झालेलें दिसलें. बाह्य प्रदेशांत वाऱ्याचें सोसाटणें मधून मधून ऐकूं येत होतें; त्याचप्रमाणें या पुरुषाच्या मुखावाटेंहि उद्विग्न असे सुस्कारे निघत होते ”

## सिंहाचा चडफडाट

याच्या उलट संभाजीची स्थिति मुक्तपणें, स्वैरपणें, बेभानपणें राज्यकारभार केल्यामुळें त्याच्या साऱ्या वृत्ति मोकाट बनलेल्या. औरंगजेबाच्या कैदेंत सांपडतांच तो ‘ सांपळ्यांत सांपडलेल्या सिंहासारखा ’ खवळला. त्या वेळचें त्याचें स्वभावचित्र हरिभाऊंनीं कसें रंगविलें आहे, पहा.

“ सांपळ्यांत सांपडलेल्या सिंहाप्रमाणेंच संभाजीची हुबेहूब अवस्था झालेली होती. त्या शूर प्राण्याला सांपळ्यांत घालून अतोनात पिडलें, त्याची उपासमार करून त्याचीं अस्थिचर्में उरविलीं तथापि त्याच्या डोळ्यांतील तेज जसें अणुरेणुमात्र कमी होत नाहीं; उलट अंतर्यामीं भडकत जाणाऱ्या संतापाग्नीनें जसें तें वाढतच जातें, त्याप्रमाणेंच हुबेहूब संभाजीची अवस्था झाली होती. त्या सिंहाला ज्याप्रमाणें अगदी अनावर अशी अस्वस्थता उत्पन्न होते त्याप्रमाणेंच संभाजीलाहि झाली होती आणि तो आपल्या तंबूंत एकसारखा इकडून तिकडे तिकडून इकडे करीत होता. मध्येंच त्याला अगदीं स्वस्थ उभें राहून विचार करीत बसण्याची लहर येई. आणि ती लहर सुमारें पांचसात मिनिटें टिकते न टिकते तों पुनः कबजीपाशीं जाऊन कांहींतरी भडभड बोलण्याची लहर येई.”

शूर संभाजीला पार्श्वभूमी शोभणाऱ्या भेकड कलुशाचें केविलवाणें चित्रहि हरिभाऊंनीं मार्मिकतेनें काढलें आहे. त्याचे लोचट उद्गार ऐकून संभाजी त्वेषानें म्हणतो,

" तेंच. तेंच मी म्हणतो तेंच. तूं हालांना भितोस. मी या अपमानाला भितों. मला हा अपमान नको. कितीही हाल झाले तरी हरकत नाहीं असं वाटतं, आणखी या अपमानापेक्षां कितीही हाल करून त्यानं जीव घेतला तरी पत्करला. अरे, मला त्यानं आपल्यापुढें नेऊन एकदां उभं करावं, नाहीं तर त्यानं तरी माझ्यापुढें येऊन उभं रहावं म्हणजे हा शिवाजीमहाराजांचा बच्चा कितीही बहकला, तरी त्याचं पाणी कसं आहे तें त्याला दाखवील "

## स्वराज्याची ज्योत

स्वराज्याची स्फूर्ति त्या वेळच्या बायकापोरांतहि कशी संचरली होती, याचें मूर्तिमंत उदाहरण म्हणजे रायगडच्या फितूर किल्लेदाराची राष्ट्रभक्त पत्नी. ती आपल्या बेइमान नवऱ्याला आवेशानें म्हणते,

" बोला बोला ! काय बोलायचं असेल तें होऊं द्या." किल्लेदारीण जाहली जाऊन म्हणाली, " आतां या घटकेस काय तें बोला. माझी मान कापणार ? मला सुळीं देणार ? मला सोयराबाईसाहेबांसारखी भिंतींत चिणून मारणार ? करा, तें तरी करा, म्हणजे स्वराज्याशीं तुम्ही केलेला बेइमानपणा पहाण्याला हे डोळे रहाणार नाहींत. हे कान तुमच्या त्या गोष्टी ऐकणार नाहींत. आणखी हें शरीर तुमच्याबरोबर देशमुखीण म्हणून घेण्यालाही रहाणार नाहीं उठा, आपल्या निमकहराम साथीदारांना बोलवा आणखी मला त्या कड्याखालीं लोटून द्या म्हणजे मी आनंदानं, ' सुटलें ' ' सुटलें ' म्हणत एका टेपाडावरून दुसऱ्या टेपाडावर हबकत धबकत खालीं जाऊन राम म्हणेन ! "

## संतिणीचें शब्द-चित्र

प्रारंभीं तरी देशभक्ताच्या कपाळीं हाल व यातनाच येतात. किल्लेदारिणीला एका तळघरांत कोंडून ठेवण्यांत आलें पण तिच्या अंगांत वीज संचरिली होती. ती चोरवाटेनें बाहेर पडली. तिनें संतिणीचा वेष घेतला. फितुरीमुळें राजमाता व बाल छत्रपती मोंगलांच्या हातीं लागले. तेव्हां त्या

मोंगलांच्या छावणींत या संतिणीनें प्रवेश करून घेतला. तो कसा याचें वर्णन वाचण्यासारखें आहे. संतिणीचें शब्दचित्र हरिभाऊ पुढीलप्रमाणें रेखाटतात.

" अशा वेळीं छावणीच्या अगदीं दुसऱ्या टोंकाला ओढ्याच्या कांठीं एक संतीण बसून देवाचें भजन-पूजन करीत होती. तिचें वस्त्र अगदीं शुभ्र, गळ्यांत तुळशीची माळ आणि हातांत चिपळ्या. ती यावेळीं परमेश्वराचें भजन करण्यांत अगदीं तल्लीन होऊन गेली होती. प्रथमतः तिनें आपल्या पडशींतून विठोबारखमाईच्या मूर्ति बाहेर काढल्या. नंतर आपण स्नान करून त्यांचें यथासांग पूजन केलें. धूपदीप सर्व दाखविल्यानंतर तिनें आपली एकतारी छेडण्यास आरंभ केला व घुंगरूं लावलेल्या लहानशा मत्स्याकृति चिपळ्यांचा मंजुळ ध्वनि काढण्यास सुरवात केली. प्रथमतः ' हरि हरि " असा स्वर काढण्याबरोबरच तेथून जवळच पलीकडे असणाऱ्या मंडळींपैकीं कित्येकांची तिच्या त्या मधुर अशा कंठानें चित्तवृत्ति आकर्षून घेतली. आणि नंतर पुढील पद गाण्यास तिनें आरंभ करतांच, कोठें तरी साखर आहे असें कळल्याबरोबर मुंग्याची रांग जशी लागते, त्याप्रमाणें त्या संतिणीच्या बसण्याच्या जागीं छावणींतील मंडळींची नुसती थाप जमली. "

## सृष्टि-सौंदर्याचें चित्र

सृष्टिवर्णनाची हौस हरिभाऊंना फारशी नाहीं, तसेंच तात्त्विक विवेचन करण्यांतहि त्यांची लेखणी रमत नाहीं. मनांतील अमूर्त भावनांना मूर्त करणें हेंच त्यांचें खरें कसब. तथापि अपवाद म्हणून कोठें कोठें वर्णन आलें आहे, विवेचनहि आलें आहे. ' वज्राघात ' या कादंबरीचा प्रारंभच मुळीं एका रमणीय व विस्तृत वर्णनानें त्यांनीं केला आहे. 'धेनुकुंजांतील' एका उद्यानामधील सरोवरांत एक सुंदरी नौका-विहार करीत आहे असा सुंदर प्रसंग हरिभाऊंनीं निवडला आहे. त्याचें वर्णन करतांना ते म्हणतात, " तो एकंदर देखावाच मोठा रमणीय होता. सभोंवतालीं दाट अशी लहान-मोठ्या वृक्षांची गर्द राई, मध्यभागीं ती विस्तीर्ण पुष्करिणी, व तिचें

जल प्रफुल्लित कमलांनीं शोभिवंत व स्वच्छ. तें स्वभावसिद्ध शुभ्र असून चंद्रप्रकाशानें विशेषच शुभ्र दिसत होतें. त्या कालचा एखादा कवि जर तो मनोरम देखावा पहाण्यास असता, तर त्याच्या प्रतिभेला किती तरी स्फूर्ति झाली असती! एका चंद्राच्या ऐवजीं तीन चंद्र दिसले असते. एक आकाशांत, एक वातावरणांत आणि एक त्या पुष्करिणीच्या जलविस्तारांत."

काळाचा महिमा कसा असतो, याचें विवेचन करतांना 'वज्राघात' कादंबरींत हरिभाऊ एके ठिकाणीं लिहितात,

"डोंगरावरून नदी निघाली म्हणजे ती समुद्राला जाऊन मिळेपर्यंत तिचा ओघ एकसारखा खालीं चाललेला असतो. त्या ओघाची गति तरी कोठें कोठें कुंठित होऊन पाणी एकाच जागीं तुंबून राहतें; परंतु काळाच्या ओघाची गति तशी नाहीं. ती कोठें तुंबत नाहीं. तो ज्यास जाऊन मिळाला आहे, असा समुद्रहि अद्यापि माणसांना सापडावयाचा आहे. त्याचा ओघ कशाला जुमानीत नाहीं; कशाला अडत नाहीं; त्याची गति सरळ पुढें. कोणाचें मन मोडेल, कोणाचें दुःख वाढेल, त्याबद्दल त्याला कींव नाहीं; त्याच्या ओघानें तो चालला आहे. त्याच्या सपाट्यांत जें काय कोणाचें हिताहित होईल तें होईल, तो त्या सगळ्यापासून अगदीं अलिप्त आहे."

## हरिभाऊंचें स्थान

मराठी कादंबरी–वाङ्मयांत हरिभाऊंचें स्थान वरचें आहे, किंबहुना अद्याप पहिलें आहे असें म्हटलें तरी चालेल. विषयाचा मर्यादितपणा व वर्णनाचा पाल्हाळिकपणा हेच काय ते त्यांच्या लेखनांतील प्रमुख दोष. पण कादंबरी-लेखनाचे किती तरी गुण त्यांच्या लेखणींत भरलेले आहेत. कल्पनेची भव्यता, खोल तळमळ, कुशल स्वभाव–रेखन, उत्कट रस–निर्मिति आणि मानवी मनाचे पातळ पातळ पडदे उलगडून दाखविण्याचें कौशल्य इत्यादि अलौकिक गुणसंपदेमुळें आमच्या मराठींतील हरिभाऊ हे बंगाली–मधील शरद्‌बाबूंच्या किंवा रशियनमधील गॉर्कीच्या पंक्तींत मानानें बसूं शकतात.

## दोन कादंबरीकारांचीं मतें

हरिभाऊ आपटे, फडके व वामनराव जोशी या तिघां कादंबरीकारांचें श्रेष्ठत्व कशांत आहे हें कादंबरीकार खांडेकर पुढील अलंकारिक भाषेनें सांगतात, " हरिभाऊ म्हणजे समुद्र. क्षितिजापर्यंत नाचत जाऊन मावळतें सूर्यबिंब पकडूं पाहणारी, पर्वतप्राय लाटांच्या खळखळाटानें क्षणोक्षणीं निनादून जाणारी, मोठमोठ्या गलबतांना आणि जहाजांना लीलेनें आपल्या पृष्ठभागावर खेळण्याप्रमाणें नाचविणारी जीवनाची प्रतिनिधी असलेली शक्ती ! प्रो. फडक्यांची कादंबरी म्हटलें कीं, एक प्रसन्न विस्तीर्ण तलाव डोळ्यापुढें उभा राहतो. या तलावांत कमळें फुलतात. तिथें चांदण्या रात्रीं नौकाविहार चालतो या जलाशयाच्या कांठावर गुल्हौशी मंडळी हवा खाण्याकरितां येऊन बसतात आणि वायुलहरींनीं उठणारे मंद मंद तरंग पाहून मोहून जातात पण त्यांच्यांत जसें सागराच्या भव्यतेचें दर्शन होत नाहीं, तसें नदीचें प्रवहित्वहि आढळत नाहीं. वामनरावांची कादंबरी मात्र रानावनांतून वाहत येणाऱ्या एखाद्या नदीसारखी आहे. ती जातां जातां भोंवतालचा भूभाग समृद्ध बनविते, अनेक नगरांना जीवन-दान करते, ठिकठिकाणची घाण पोटांत घालून ती निर्मळ करीत करीत ती आपला मार्ग आक्रमते. तिच्यांत सागराची विशालता नाहीं, पण लहानशी कां होईना ती गंगा आहे. "

एकंदर मराठी कादंबरी-सृष्टींत हरिभाऊंची कामगिरी किती महत्त्वाची आहे याचें विवेचन स्वतः श्रेष्ठ कादंबरीकार असणारे प्रा. वामनराव जोशी यांनीं केलें आहे. ते असा आलेख काढतात कीं, " हरिभाऊंनीं मराठी कादंबरीला अद्भुततेच्या बालोचित कल्पना–विहारापासून परावृत्त करून वास्तवतेच्या भूमिकेवर आणून तेथील रमणीय, चिन्तनीय व लक्षणीय दृश्यांचा तिला नाद लाविला, आणि तिच्या क्रीडेला व्यवस्थित, कलायुक्त व विचारगर्भ स्वरूप दिलें. "

## प्रिं. वा. म. जोशी : : १७

"रागिणीकर्ते वामनराव " या नात्यानेंच प्रा. वा म. जोशी महाराष्ट्रांत जास्त ओळखले जातात. त्यांचे निबंधग्रंथ विद्वान लोकांमध्यें मान्यता पावलेले आहेत. पण सर्वसामान्य मराठी वाचकाला माहीत आहे वामन-रावांची 'रागिणी'च. आश्रमहरिणी, नलिनी, सुशिलेचा देव, इंदु काळे व सरला भोळे व स्मृति–लहरी या त्यांच्या कादंबऱ्या एकएका गुणांमुळें मराठी वाङ्मयांत विशिष्ट स्थान मिळवून बसल्या असल्या, तरी 'रागिणी'-मध्यें अनेक गुणांचा संगम झाला असल्यामुळें तिला महाराष्ट्र सारस्वतांत उच्च व अढळ स्थान प्राप्त झालें आहे.

श्री. हरिभाऊ आपटे यांच्यापूर्वींच्या कादंबऱ्या अद्‌भुत रसानें भरलेल्या असतात. त्या वाचतांना, वाचकाला आपण ढगावरून चाललों आहों असें वाटे. सारें रम्य पण मिथ्या. सारें रोमांचकारक पण काल्पनिक. वाचावें आणि विसरावें हेंच त्या कादंबऱ्यांचें महत्त्व. पण हरिभाऊंनीं आभाळांतील कादंबऱ्यांना जमिनीवर आणलें, खऱ्याखुऱ्या प्रसंगांत वावरणाऱ्या जिवंत पात्रांचें दर्शन घडविलें आणि वास्तव सृष्टीपुढें आरसा धरला. आभाळां-तून अंगणांत उतरलेल्या कादंबरी-वाचकाला वामनरावांनीं सुशिक्षित कुटुंबाच्या दिवाणखान्यांत नेऊन आरामखुर्चीवर बसविलें. 'रागिणी' कादंबरी १९१६ सालीं प्रसिद्ध झाली त्यावेळच्या तरुण सुशिक्षितांमध्यें जे विचार खेळत होते व ज्या आकांक्षा स्फुरत होत्या; त्यांचे पडसाद 'रागिणी'मध्यें स्पष्टपणें उमटले. त्यामुळें तरुण वाचकांच्या उड्या त्या कादंबरीवर पडल्या. त्यांच्या बुद्धीला व भावनेला–दोहींनाहि गुदगुल्या करण्यासारखे संवाद 'रागिणी'मध्यें भरपूर आहेत. तिचें टोपण नांवच मुळीं तिच्या जनकानें ठेवलें आहे—" काव्यशास्त्रविनोद. "

'रागिणी'च्या साऱ्या कथानकावर संस्कृत व इंग्रजी वाङ्मयाचें अत्तर–गुलाबपाणी वामनरावांनीं मुक्तहस्तानें शिंपलें आहे. " उत्तरा रागिणी यत्र

तत्र अक्का भवेत् सदा । भाऊ नाना यत्र तत्र । शास्त्रीबोबा भवेद् यथा ॥" अशा संस्कृत श्लोकानेंच पात्रांचा परिचय वामनराव करून देतात. स्त्री–शिक्षण, पुनर्विवाह, मानवाचे हक्क, परब्रह्माचें स्वरूप इत्यादि उच्च विषयांवरील वादविवादांचीं कारंजीं जागोजाग उडत आहेत. मुख्य नायक जो भय्यासाहेब, त्याला साधुसंतांचें वेड; त्यासाठीं तो संसार सोडून काशीला जातो, हिमालयावर राहतो. त्याच्या शोधार्थ निघालेल्या त्याच्या नातलगांवर कटोहांत जळून मरण्याचा प्रसंग ओढवतो. पण प्रियब्रह्मस्वामीच्या कृपेमुळें शेवट गोड होतो.

## ' गंगेसारखी पावन '

हिमालयाच्या निमित्तानें कादंबरीकारानें रम्य वर्णनाची संधि साधली आहे. त्यांच्या कल्पकतेला उडी मारण्यास अस्मानापर्यंत वाव मिळाला आहे. सर्वच पात्रें सुशिक्षित घ वादप्रिय. त्यांतले त्यांत 'उत्तरा' ही तोंडाची फटकळ व बुद्धीची तीक्ष्ण. तिला कोणी 'वावदूक' म्हटलें, तर कोणी 'तोंडाळ' म्हटलें, तर कोणी त्राटिका' म्हणूनही संबोधिलें. पण तीसुद्धां मनाची सरळ व हृदयाची प्रेमळ आहे. आणि तिची मैत्रीण रागिणी तर काय? प्रेमरसाची मूर्तीच आहे. हळूवार अंतःकरणाची, प्रेमळ स्वभावाची व उदारवृत्तीची ती खाणच आहे. भय्यासाहेबांना तिची संगती " गंगेसारखी, साधुसंगतीसारखी, कवीसंगतीसारखी पावन " वाटत होती. तशीच रागिणी कादंबरी मराठींतील सुबुद्ध वाचकांना वाटते.

## काव्याच्या कोंदणांत तत्त्वज्ञान

पदवीधर वाचक आपल्या डोळ्यापुढें ठेवून वामनरावांनीं 'रागिणी'ची रचना केलेली दिसते. तींत स्वभावापेक्षां किंवा कथानकापेक्षां तत्त्वचर्चेलाच प्राधान्य जास्त आहे. त्या चर्चेचे विषय जितके गूढ, तितकीच तिची भाषा कठीण. ' मानवजाति-दुर्निवार,' ' अत्यतिगामी,' ' असुलभपरितोष, ' ' स्नेहरज्जुबद्ध,' ' मात्सर्य—कलुषित,' ' आश्चर्य–भयाकुलता,' ' हर्षातिरेक—शिखर,' ' मातृहृदयाभिज्ञ,' इत्यादि संस्कृत

शब्दांच्या शिलावरून सर्वसामान्य कथा-वाचक ठेचाळूनच पडतो पण ज्याची संस्कृतमध्यें चांगली गती आहे, त्याला या कादंबरीचें वाचन आल्हाददायक वाटण्यासारखें आहे. वामनरावांच्याच भाषेंत सांगावयाचें तर "तात्त्विक चर्चा म्हटली म्हणजे ती दुर्बोध, शाब्दिक, उदास व विनोदरहित असावयाची, असा आपला ग्रह व अनुभवहि आहे, परंतु त्यांच्या तत्वचर्चेंत काव्य भरलें होतें, तें सुबोध व विनोदपरिपूर्ण होतें आणि गायनाप्रमाणें तें आनंददायक होतें. रागिणींतील प्रेमविवाद घनगर्जनेप्रमाणें कडाक्याचा आहे, विशल्य विनोद बालसूर्याप्रमाणें सुखद आहे व हास्यरसात्मक कोट्या विद्युल्लताप्रमाणें चमकत आहेत."

सत्याचें ज्ञान होणें किती बिकट आहे हें सांगतांना वामनराव 'रागिणींत' एके ठिकाणीं, पुढील रूपक योजतात—

"तत्वबोध हें एक निबिड व घोर अरण्याच्या मध्यभागीं असलेलें देवालय आहे. या देवालयाचें दर्शन घडण्याचें सुदैव फार थोड्याचेंच असतें. कारण हें अरण्य अज्ञानांधःकारानें व्याप्त झालेलें आहे. ऋषिवचनें, शास्त्रें, काव्यें इत्यादिकांचा प्रकाश नभोमंडळांतील तारकागणाच्या प्रकाशा-प्रमाणें या अरण्यांत अस्पष्ट व अंधुक पडतो. अशा या अरण्यांत संशयपिशाच्चें भ्रमण करीत आहेत व त्यांच्या किंकाळ्यांनीं हें अरण्य भयानक झालें आहे."

## हिमालयाचें शब्दचित्र

नगाधिराज हिमालयाचें वर्णन हा कालिदासापासून अनेक कवींचा आवडता विषय आहे. वामनरावांनीं तेथील निसर्गाचें तर वर्णन सूक्ष्मतेनें व रम्यपणें केलें आहेच, पण त्याशिवाय त्या निसर्ग-दृश्याचा मानवी मनावर काय परिणाम होतो हेंहि सांगितलें आहे. ते लिहितात—

"जगाच्या अवाढव्य विस्ताराची किंवा सौंदर्याची, भयानकतेची किंवा गूढतेची, जगांतील आनंदाची किंवा चमत्कारमयतेची एका ठिकाणाहून कल्पना यावी, अशी जर कोणाची इच्छा असेल, तर त्यानें तेथें जाऊन

उभें रहावें. अथवा कोणाला श्रीमत् असून पवित्र असलेली वनश्री पहावयाची असेल, रम्य असून उन्मादक नसलेलें सौंदर्य पहावयाचें असेल, तरीहि त्यानें तेथें जाऊन घटकाभर शांतपणें निरीक्षण केल्यास त्याची इच्छा सफल होईल ! ”

## सृष्टिसौंदर्याचें वर्णन

“ लहान मुलांचे व मुलींचे केश जसे हलतात, तसें लतावृक्षांवरचे कोमल पल्लव हलत होते. बालकांच्या कोमल रक्तहस्ताप्रमाणें लतांचीं कोंवळीं लाल पानें सूर्यकिरणांनीं अधिकच लाल झालीं होतीं. वृक्षांच्या कांहीं कोमल शाखा डुलत होत्या, नाचत होत्या व कांहीं जणूं काय माना डोलवून पांखरांना खेळावयाला बोलावीत होत्या. पांखरेंहि त्यावेळीं खेळण्याच्या रंगांत आलीं होतीं; लता झोपाळ्याप्रमाणें डुलत आहेत असें पाहून कांहीं पांखरें त्यावर जाऊन अधिक हलूं लागल्या म्हणजे तीं पांखरें आनंदानें चिंवचिंव करून ती मजा पहावयाला आपल्या सहचरांना अथवा सहचरींना सांगत होतीं. ”

तसेंच हिमालयावरील विविध वृक्षांचें केलेलें वर्णन वाचा—

“ तेथील सागवानांच्या कृष्णपांडुर, शुष्क, भटजींच्या अंग पुसण्याच्या पंचासारखीं भोकें असलेल्या, अशा पानांतून जीं सूर्यकिरणें पडलीं होतीं, त्यामुळें त्या शुष्क पानांनाहि एक प्रकारचें सौंदर्य व तेज आलें होतें. सावरीच्या उंच व पर्णहीन झाडांवरील ज्या लाल फुलांवर अस्तंगामी सूर्याचीं तिरपीं किरणें पडलीं होतीं, तीं साहेबांच्या मुलांच्या गालाप्रमाणें लाल दिसत होतीं, व बाकीचीं शोकाकुल मधुर युवतीच्या कपोलाप्रमाणें काळसरलाल दिसत होतीं. तेथील कांहीं चंपक वृक्षावरील पांढरीं फुलें, झाडांवर सुरपारंब्या खेळण्याकरितां बसलेल्या मुलाप्रमाणें, आनंदानें डुलत व हंसत होतीं. तेथील आम्रवृक्ष कांहीं पिंवळसर पांढऱ्या व कांहीं तांबडसर मोहरानें फुललेले होते, व ते आपला सुवास सर्व दिशांना पसरवीत होते. ”

## चिकित्सेचें कौशल्य

वामनरावांच्या लेखणीचें खरें बळ सूक्ष्म चिकित्सेंत आहे. रागिणीला भय्यासाहेबांच्या शब्दाचा भास झाला; या प्रकाराची किती निरनिराळ्या प्रकारांनीं वामनराव चिकित्सा करतात पहाः—

" हा सर्व प्रकार म्हणजे कल्पनाजन्य भ्रम असेल, रागिणीचें मन दुःखविव्हल झाल्यामुळें व तिचा स्वभाव भावनाप्रधान असल्यामुळें हा प्रकार म्हणजे तिच्या विकृतप्राय कल्पनेचा खेळ असेल; कदाचित् अन्य कारणांनीं झालेला हा दृष्टिभ्रम किंवा मतिभ्रम असेल; कदाचित् हें 'सर्वच स्वप्न असेल, किंवा कदाचित् ही आकृति म्हणजे एखाद्या महात्म्याची सूक्ष्म देहाकृति असून भ्रान्तचित्त व भ्रान्तमार्ग झालेल्या रागिणीला सन्मार्गावर आणण्याचा परोपकारबुद्धीनें त्या महात्म्यानें तिला साक्षात्कार दिला असेल कदाचित् तिच्या अंतरात्म्यानेंच सदसद्विवेक करून तदनुरूप तिला आज्ञा केली असेल व या आज्ञेला रागिणीच्या तत्कालीन कल्पनाप्राबल्यानें मूर्तस्वरूप प्राप्त झालें असेल. "

## विचारांचें मंथन

सत्य म्हणजे काय ? याची चर्चा कादंबरींतील निरनिराळीं पात्रें किती बारकाईनें व गंमतीनें करतात पहा—

" सत्य म्हणजे काय ? " शास्त्रीबुवा ओरडत आहेत.

" आमच्या बुद्धीला जें खरें वाटतें, तें सत्य ! " हा नानासाहेबांचा आवाज आहे.

" अहो, पण 'खरें' म्हणजे तरी काय ? " शास्त्रीबुवा शत्रूला शब्दांत पकडलें असें वाटून विचारतात. " खरें म्हणजे सत्य आणि सत्य म्हणजे खरें, हें मराठी दुसऱ्या इयत्तेंत शब्दाला प्रतिशब्द म्हणून ठीक आहे; पण 'सत्या'ची व्याख्या कराल कीं नाहीं ? "

" सत्याची व्याख्या कशी करतां येईल शास्त्रीबुवा ? "

आनंदराव मध्यें पडून वादाला निराळी दिशा देण्याकरितां म्हणाले, " प्रत्येक शब्दाची आधीं व्याख्या केल्याशिवाय बोलावयाचेंच नाहीं,

असें आपण म्हटलें तर 'व्याख्ये'चीसुद्धां आधीं 'व्याख्या' करावी लागेल आणि असें करूं लागलों, तर अनवस्थाप्रसंग येईल!"

"खरें आहे, पण तुम्हीं 'जग हें सत्य आहे', असें म्हणतां, तर आम्हांला 'सत्य' म्हणजे काय, कळायला नको का?" शास्त्रीबुवांनीं शांतपणें विचारलें.

"तुम्ही जग खोटें म्हणतां, तेव्हां तुम्हीच 'खोट्या'ची व्याख्या करा." नानासाहेब म्हणाले.

"आम्हाला व्याख्या करण्याची जरुर नाहीं. कारण सगळेंच खोटें आहे. 'कांहींच नाहीं!' तेव्हां व्याख्या तरी कसली करायची?" शास्त्रीबुवा म्हणाले.

"सगळें जग खोटें असेल, पण 'मी आहें', एवढे तर मला खरें म्हणायला नको का? मी खरा आहें का नाहीं?" आनंदराव मध्यें कलहविषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाले.

"तुमच्या या 'खरां'तला काना का काढून टाकाना!" शास्त्रीबुवा 'खर' शब्दावर ग्राम्य श्लेष करून म्हणाले.

## कोटीवर कोटि!

अशी चर्चा नीरस व निर्जीव होऊं नये म्हणून वामनरावांनीं कांहीं कांहीं वेळां पात्रांच्या तोंडीं साध्या कोट्याहि घातल्या आहेत. रागिणीनें "मोटारची हौस फिटली" या नांवाची एक गोष्ट लिहिली. तिच्यावर किती मौजेचा वादविवाद झाला पहा.

"खरे शास्त्रीबुवा, तुमच्या काव्याचे प्रदीप (दिवे) लावा एकदां!" नानासाहेब 'प्रदीप' शब्दावर कोटि करून म्हणाले. "प्रदीपहि लावूं!" शास्त्रीबुवा म्हणाले. "काव्यदेवतेपुढें आपला दीप ओवाळण्याची कांहीं लाज नाहीं!" "आणि तुमच्यासारख्या काव्यदेवतेच्या भक्तांभोंवतीहि आम्ही दिवे ओवाळूं!" उत्तरा म्हणाली.

"आम्ही कवि आहों, असें कधीं म्हटलेंच नाहीं. आम्ही टीकाकार आहों. आम्हाला तुमच्या या अलीकडच्या गोष्टी मुळींच आवडत नाहींत.

आतां ही रागिणीचीच गोष्ट घ्या! यांत काय आहे? कांहीं तत्त्वज्ञान आहे, का काव्य आहे, काय—आहे काय? रागिणीला वाईट वाटेल, पण खरें हें असें आहे."

"नाहीं ग रागिणी, गोष्ट चांगली आहे तुझी!" आईसाहेब रागिणीला उत्तेजन देण्याकरतां म्हणाल्या. "आवडीचं नि बाळूचं लगिन लावून दिलंस हें फार चांगलं केलंस." "लग्न लावून दिलें म्हणून गोष्ट चांगली होय?" शास्त्रीबुवा हंसत हंसत म्हणाले.

"मला नाहीं तुमच्याशीं वाद करतां येत!" आईसाहेब म्हणाल्या. "मी साधीभोळी बायको आहें. तुमच्याशीं वाद करायला उत्तराच बरी आहे आपली!" "उत्तरेशीं वाद करायला कोणीच टिकणार नाहीं!" शास्त्रीबुवा म्हणाले. "कोल्हापुरच्या अंबाबाईची घंटा जशी एकसारखी घणघण वाजत असते, तशी ही—"

"घणघण घंटेपेक्षां मुखस्तंभ शंख कांहीं चांगला नाहीं!" उत्तरा म्हणाली."

## सौजन्याची शिकवण

अशा सर्व विनोदांतून, संवादांतून, कथानकांतून वामनरावांना एकच सूत्र ओंवायचें आहे. तें म्हणजे सौजन्याचें. सौजन्याची शिकवण हा वामनरावांच्या लेखणीचा प्राणच. ती शिकवण किती गोड भाषेंत देता येते याचा एक नमुना पुढें दिला आहे.

'सत्त्वशील, साधुवृत्त स्त्रीपुरुष विपत्तींत पडले, तरी त्यांचें शील किंवा वृत्त बदलावयाचें नाहीं–दीपशिखा खालीं केली म्हणून ती अधोमुख होईल काय? झाडाला ताप झाला, म्हणून छाया देण्याचें कर्तव्यकर्म तें सोडील काय? लतांना थंडीचा, वाऱ्याचा, उन्हाचा ताप झाला म्हणून सुवासिक फुलें देण्याचें आपलें मधुर कर्तव्य त्या सोडतील काय? फुलांवर पावसाचा व गारांचा मारा झाला म्हणून तीं संतापानें दुर्गंधी देऊं लागतात काय? चंदनाला घासलें म्हणून तें काय सुगंध देण्याचें व्रत सोडील?"

## ‘ नलिनी ’चा निराळेपणा

वामनरावांनीं ‘ रागिणी ’ ला जितकें प्रसिद्धीस आणलें, त्यापेक्षां ‘ रागिणीनें ’ च वामनरावांना जास्त प्रसिद्धि दिली असें म्हटलें तरी चालेल. मराठी कादंबरीच्या जगांत एक नवें “ रागिणी–युगच ” सुरू झालें. रागिणींतील ‘ सन्मित्रांचे सत्कलह ’, ब्रह्मज्ञानाची भवति-न-भवति, सामाजिक विषयांचें मंथन या भागांमुळें तिचें कादंबरीत्व कमी झालेलें आहे, असा आक्षेप कांहीं टीकाकारांनीं घेतला; तो धुऊन टाकण्या-साठींच कीं काय, वामनरावांनीं अगदीं निराळ्या धर्तीची दुसरी कादंबरी लिहिली. तिचें नांव ‘ नलिनी.’ या कादंबरींत तात्त्विक चर्चेपेक्षां प्रसं-गांच्या गुंतागुंतीला प्राधान्य दिलेलें आहे. अर्थात तत्त्वचर्चा हा वामन-रावांचा मूळ स्वभाव अजिबात कसा जाणार ? कथानकाच्या संदर्भांत येत नसतांनाहि त्यांनीं तब्बल बारा पानें स्त्रीशिक्षणाची चर्चा निरनिराळ्या पात्रांकडून केलेली आहे. पण त्या चर्चेत ‘ रागिणीं ’तील माधुर्य नाहीं कीं प्रसन्नताहि नाहीं. सखोलता व विद्वत्ता मात्र आहे. पण असे वाद-विवाद ‘ नलिनींत ’ वामनरावांनीं बहुधा टाळलेलेच आहेत.

नलिनीचा मुख्य मालमसाला म्हणजे चोरी, खून, गुप्त-पोलिस, व्याभि-चार, बाँबचे कट हाच आहे. ‘ रागिणी ’ ही ओल्या नारळाच्या करंजी-सारखी असली, तर नलिनी तिखट करंजी आहे. एक कमलवेल तर दुसरी अग्निज्वाला. एकीचें वाचन म्हणजे चांदण्या रात्रींची सहल; तर दुसरीचें वाचन म्हणजे रखरखलेल्या वाळवंटांतून चालणें. वाचकांची जिज्ञासा वाढावी म्हणून ‘ नलिनी ’मध्यें पहिल्यापासून खुनाचें रहस्य गुप्त ठेवलें आहे, शुद्ध–अशुद्ध प्रेम-प्रकरणें खेळविलीं आहेत, जहाल-मवाळांचे खटकेहि दाखविले आहेत.

## धाकटी तशीच नकटी

पण रहस्यकथेची अस्वाभाविकता वामनरावांना साधणार कशी ? व रुचणार कशी ? त्यामुळें धड रहस्यकथा नाहीं, धड प्रपंचकथा नाहीं, धड तात्त्विक कथा नाहीं–अशी नलिनीची त्रेधा झाली आहे. एखाद्या

कवीनें गणित शिकवूं लागावें किंवा एखाद्या योद्धयानें गाण्याची मैफल सुरू करावी; तशी वामनरावांची ओढाताण ही घटनाप्रधान, रहस्यमूलक पण चिकित्साहीन कादंबरी लिहितांना झालेली दिसते. ' रागिणी ' वर लुब्ध झालेला मराठी वाचकवर्ग नलिनीवर नाराज झाला. असें होण्याचा धोका जाणण्याइतके वामनराव चतुर होते. म्हणून त्यांनीं ' नलिनी ' कादंबरीच्या प्रस्तावनेंतच दूरदर्शीपणानें असें लिहून ठेवलें आहे कीं, " नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये असें म्हणतात. ' नलिनी ' ही ' रागिणी ' ची धाकटी बहीण आहे आणि ती नकटीहि आहे असें कांहीं लोक म्हणतात. तेव्हां तिचें जीवित कठीण होण्याचा बराच संभव आहे. तथापि जनकाला आपली मुलगी नकटी असो किंवा धाकटी असो, ती प्रियच असावयाची. या न्यायानें नलिनी ही मला प्रिय असली आणि तिचें पाणिग्रहण करण्याविषयीं मी रसिकवर्गाला विनंति केली, तर मी विशेष दोषार्ह होईन असें वाटत नाहीं. "

## वर्णनाची वेठ

" नलिनी " चें नकटेपण झाकण्यासाठीं वामनरावांनीं कादंबरीचे नवे नवे अलंकार तिला घातले आहेत. आपल्या पूर्वींच्या किंवा पुढच्या कादंबऱ्यांत ते वर्णनें कटाक्षानें टाळतात. पण ' नलिनी ' मध्यें जेथें जेथें म्हणून वर्णन करण्याचा मोका येईल तेथें तेथें त्यांनीं तो साधला आहे. सुरवातीलाच डोंगरावरील रात्रीचा प्रसंग वर्णन करण्यासाठीं त्यांनीं सात पानें खर्चीं घातलीं आहेत. तसेंच बोटीवरील प्रवासाचें वर्णनहि त्यांनीं पुढें मोठ्या तपशिलानें केलें आहे. तेथे " वर्णनासाठीं वर्णन " अशी वेठ वारण्याचीच पाळी वामनरावांच्या लेखणीवर आलेली दिसते. कारण या सर्व वर्णनांत कवीची रम्य, सूक्ष्म, तरल प्रतिभा बहुधा कोठेंच चमकत नाहीं. सर्वत्र रुक्ष तपशील भरलेला. जकात नाक्यावरील सरकारी अधिकाऱ्यानें लग्नाच्या सामानाची यादी जशी भावनाशून्य मनानें उतरवून घ्यावी, तसाच प्रकार बऱ्याच ठिकाणीं झालेला आहे.

## सूक्ष्म टीका

कांहीं अपवाद म्हणून रमणीय भाग क्वचित क्वचित आढळतात. डोंगरावरील काळे दगड व पांढरी वाळू या विरोधाचें वर्णन करतांना वामनरावांची देशाभिमानी लेखणी लिहिते, " सामान्य माणसाला तरी तो देखावा पाहून एखादे वेळेस असें वाटण्याचा संभव आहे कीं, काळ्या रंगाच्या प्रचंड शिळा व त्याच रंगाचे लहानमोठे गोटे हे त्या प्रांतांतील मूळचे व खरे रहिवासी ' नेटिव्ह ' होत व पांढरी वाळू ही तेथें समुद्र-प्रवाहाबरोबर आलेली आगंतुक होय. पण असें म्हणावें तर ' नेटिव्ह ' काळे दगड तेथें उच्च स्थानीं नसावयास पाहिजे होते, व पांढऱ्या वाळूनें स्वतःस पायाखालीं तुडवून घेण्यापेक्षां केवळ आपल्या रंगाच्या जोरावर अधिक कर्तबगारीचें व मानाचें काम आपल्याकडे घ्यावयाचें होतें ! " हिंदुस्थानांत ' काळ्या आदमीला ' अधोगतीला नेऊन गोरे राज्यकर्ते त्यांच्या डोक्यावर बसले होते, या विषमतेवर वामनरावांनीं किती सूक्ष्म टीका जातां जातां केली आहे !

## वादळाचें वर्णन

समुद्रावरील वादळाचें वर्णन करतांना त्यांची काव्यसंपन्न लेखणी स्फुरण पावली आहे. ती लिहिते, " वाऱ्याला तर जणूं काय त्या दिवशीं वेडच लागलें होतें. तो सूं सूं सूं करीत सोसाट्यानें एकदम राक्षसासारखा येई व निघून जाई, पण लगेच क्षणार्धांत एक चक्कर घेऊन तो पुनः जणुं काय बोटीला खाऊन टाकण्याकरितां त्र्वताळून धांवत येई. वायूचें तांडव पाहूनच कीं काय, त्याच्या मैत्रिणी, म्हणजे समुद्राच्या लाटा, त्यांनींदेखील अकाण्ड-तांडव सुरू केलें. एखादी नागीण शेपटीवर उभी राहून, जीभ आंतबाहेर करीत, अंगावर चालून यावी तशा त्या प्रचंड लाटा, त्या बोटीला जणूं काय खावयाला येत होत्या. म्हशीएवढाले किंवा हत्तीएवढालेहि मासे पाणी भयंकर घुसळलें गेल्यामुळें घाबरून जाऊन कीं काय, पृष्ठावर अधिक वेळा डोकावूं लागलेले होते. कजाग सासूप्रमाणें विजा कडकडत होत्याच. एक बैल किंवा वाघ किंवा सिंह ओरडला म्हणजे त्याचे सजातीय जसे तितक्याच

जोरानें डुरकावणी किंवा गर्जना करूं लागतात, त्याप्रमाणेंच मेघांची गर्जना--प्रतिगर्जना चाललेली होती. ''

## सहज-सुंदर सुभाषितें

'' जाईच्या वेलांना किंवा प्राजक्तींच्या झाडांना बहर आला म्हणजे तीं जशीं अर्धवट उमललेल्या कळ्यांनीं रात्रीं शोभिवत दिसतात, तसें आकाश हें चांदण्यांनीं शोभिवंत दिसत आहे.'' अशीं सहजसुंदर वाक्यें कोठें कोठें आढळतात. त्याचप्रमाणें '' सोन्यामोत्यांचे दागिने किती जरी असले तरी त्यांचा जसा स्त्रियांना भार होत नाहीं, किंवा घरांत फाजील पुस्तकें आहेत असें ज्याप्रमाणें पुरुषाला कधींच वाटत नाहीं, त्याप्रमाणेंच आईबापांनाहि आपलीं मुलें कधीं नकोशी होत नाहींत.'' असें व्यावहारिक दाखलेहि वामनराव मधून मधून देतात.

अलंकारिक भाषा व तात्त्विक विचार या दोन्ही गुणांचा मेळ वामनरावांच्या लेखणीनें जेथें साधलेला आहे, तेथें वाचकाच्या बुद्धीला व भावनेला समाधान मिळतें. नेमस्त पक्षावर टीका करतांना वसंतरावांनीं जे उद्‌गार काढले आहेत, त्यांत हे दोन्ही गुण आढळतात. ते म्हणतात, '' माझं म्हणणं एवढंच कीं; नेमस्त लोक हॅम्लेटप्रमाणें फाजील विचार करतात. सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें विचार हा केव्हांहि चांगलाच; पण अतिविचाराच्या उन्हांत कोमल भावना करपून जातात, हें त्यांनीं समजलें पाहिजे, आणि प्रत्येक गोष्टीचं वजन पै-पैशाच्या मारवाडी तराजूंत करूं नये, तर आत्म्याची उन्नति, सदाचार-प्रीति, आत्मसंयमनाची संवय, देशाभिमानाची जागृति, इत्यादि गोष्टींना योग्य तें महत्त्व देऊन वजन ठरवावं. ''

स्त्री-पुरुषांच्या समतेचा तात्त्विक पुरस्कार करतांना वामनरावांच्या लेखणीला सहजच स्फुरण चढतें. ते विचारतात,

'' स्त्रियांची नीतिमत्ता आणि पुरुषांची नीतिमत्ता, यांकडे पाहतांना अशी भिन्न दृष्टि कां बरें असावी ? स्त्रियांची पापप्रवृत्ति जोग्वतांना सोन्याचा नाजुक कांटा आणि पुरुषांची पापप्रवृत्ति जोखतांना कोळशाचा ओबड-

धोबड कांटा कां बरें वापरण्यांत येतो ? एका वर्गाच्या दोषांकडे पाहतांना सूक्ष्मदर्शक यंत्र वापरण्यांत येतें आणि दुसऱ्याचे दोष पाहतांना उन्हाळ्याचे हिरवेगार चष्मे वापरण्यांत येतात, यांतील मर्म काय ? ''

## क्षमाशील वृत्ति

वर्णन असो, वादविवाद असो कीं भावनेचें चित्रण असो, त्या सर्वांतून सौजन्याचा धागा ओवण्यास वामनराव कधींच चुकत नाहींत. नलिनीचें कथानक कितीहि हाणामारीचें, चोरीखुनाचें, बायकांच्या पळवापळवीचें असलें, तरी एका पात्राच्या मुखांतून वामनराव सौजन्याचा, क्षमेचा व प्रेमाचा संदेश दिल्याशिवाय रहात नाहींत. ते म्हणतात, “ वास्तविक कोणत्याहि अपराधाकडे, मग तो पुरुषाचा असो वा स्त्रीचा असो, समाजानें सौम्य, उदार, क्षमाशील, न्यायनिष्ठुर नव्हे तर प्रेमसदय दृष्टीनें पहावें. चुकी कोणाच्या हातून होत नाहीं ? आतांपर्यंत आपल्या हातून झाली नाहीं, याचें कारण इतरांप्रमाणें आपणाला मोहकारक प्रसंग आले नाहींत हें आहे, मोह आवरण्याची शक्ति आपणांमध्यें अधिक आहे हें नव्हे, असें सामान्य माणसानें ध्यानांत ठेवावें व हें ध्यानांत ठेवून मग इतरांवर टीका करावी आणि कठोरता किंवा सौम्यता धरावी. ''

## नव्या तत्त्वज्ञानाची मीमांसा

‘ सुशीलेचा देव ’ ही वामनरावांची तिसरी कादंबरी. रहस्यमय कादंबरीची नवखी वाट टाकून वामनरावांची लेखणी पुनः चर्चात्मक कादंबरीकडे वळली त्यांनीं ‘ रागिणी ’ लिहून जी कीर्ति कमावली, ती वृद्धिंगत करण्याच्या योग्यतेची ‘ सुशीला ’ आहे. ‘ रागिणी ’नंतर वीस वर्षांनीं जन्मास आलेली सुशीला अधिक चिकित्सक व अधिक बंडखोर आहे. या दोन्ही बहिणींचा तोंडवळा एकच असला, तरी बदलत्या काळाचे परिणाम त्या दोघींच्या विचारावर झालेले दिसतात. रागिणीच्या वेळी सुशिक्षित समाजामध्यें जे विचार खेळत, जे वाद चालत व जीं ध्येयें स्फुरत; त्यांचें प्रतिबिंब वामनरावांनीं आपल्या कादंबरींत उमटविलें आहे. त्यानंतर एक पिढी गेली, एक महायुद्धहि होऊन गेलें

आणि नवे विचार, नवे वाद व नवें तत्त्वज्ञान जगभर पसरलें, त्यांचे पडसाद महाराष्ट्रीय तरुणांच्या डोक्यांत सहजच उमटूं लागले. त्यांचे ध्वनिलेखन वामनरावांनीं आपल्या नवीन कादंबरींत केलें, एवढेंच नव्हे तर, या नवीन विचारांच्या लाटेंत ग्राह्य काय—अग्राह्य काय, शाश्वत काय—चंचल काय, याची मीमांसा करून आपल्या तर्काच्या दृष्टीनें जें जें शुद्ध, योग्य व हिताचें वाटलें, त्याचें त्याचें मार्गदर्शनहि त्यांनीं केलें.

राजकन्यांना पूर्वीं मेण्यांतून व आतां मोटारींतून फिरावयाला मिळावें, तसें भाग्य वामनरावांच्या कादंबऱ्यांना लाभलें 'रागिणी' जन्मास आली तेव्हां मराठींत 'मनोरंजन' हें मासिक सुंदर व अग्रेसर होतें. त्या मासिकांतून ती कादंबरी क्रमशः प्रसिद्ध झाली. 'सुशीलेचा देव' वामनरावांच्या कल्पनेंत खेळत होती, त्यावेळीं 'रत्नाकर' मासिक श्रेष्ठ श्रेणीमध्यें होतें. त्या मासिकांतून ही कादंबरी अंकशः प्रकाशित झाली. तिचें रसिकांनीं चांगलें स्वागत केलें. १९३० सालचें 'भोजराज पारितोषिकहि' तिला मिळालें.

## देवाचा शोध

सुप्रसिद्ध आयरिश नाटककार मि. जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनीं 'A black girl in search of God' (देवाचा शोध करणारी काळी मुलगी) या नांवाचें एक छोटेसें पुस्तक लिहिलें आहे. त्याच विचाराचें सूत्र 'सुशिलेचा देव' या कादंबरीचें आहे. वामनरावांचें सुदैव असें की, शॉची 'काळी मुलगी' वामनरावांच्या सुशिलेनंतर जन्मास आलेली आहे. नाहींतर बिचाऱ्या वामनरावांवर वाङ्मय-चौर्याचा आरोप आला असता! महाराष्ट्रांतील मध्यमवर्गामधील एका सुशिक्षित मुलीचे मनांत 'ईश्वरविषयक कल्पनांच्या बाबतींत कसकशी क्रांति झाली' याचें चित्रण या कादंबरींत केलेलें आहे. रागिणीचा हळुवारपणा व उत्तरेचा स्पष्टवक्तेपणा या दोहोंचा संगम सुशीलेच्या स्वभावांत झालेला दिसतो. ती अंतःकरणानें जितकी कोमल आहे, तितकीच बुद्धीनें कठोर आहे. तर्काची अकुंठित धांव जाईल तेथपर्यंत जाण्यास ती तयार आहे. डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांच्या

'शेष प्रश्न' कादंबरींतील कमलेइतकीच जवळजवळ ती निर्भय व निर्भीड आहे. 'सुशीले' इतकी विचारी व चिकित्सक नायिका मराठी कादंबरीत तरी दुसरी नाहीं.

## ध्येय हाच देव

इतर मुलींप्रमाणेंच सुशीला ही लहानपणीं तांबड्या दगडाला फुलें वहात असे व 'देवबाप्पा' म्हटलें कीं हात जोडीत असे. पण पुढें दगडांत वा झाडांत देव नाहीं असें तिला वाटूं लागलें. "गगनांतले सगळे देव गगन–कुसुमाप्रमाणें खोटे आहेत." असे ती म्हणूं लागली. लग्न झाल्यावर ती पतीलाच देव मानूं लागली. पतिहि मातीच आहे असा अनुभव तिला आला आणि ती कल्पनाहि बुडबुड्याप्रमाणें लवकरच फुटली. तिला असें वाटूं लागले कीं, "देवपूजा ही देवाची मनधरणी आहे किंवा त्याला दिलेली लांच आहे. कागदाचा ताबूत किंवा मातीचा गणपति आपणच निर्माण करतो आणि मग पाण्यांत बुडवितो, त्याप्रमाणेंच आपण हरएक देव निर्माण केले आणि त्यांना आतां जल-समाधि देण्याची वेळ आली आहे." शेवटी "ध्येय हाच देव" या मतावर सुशिलेची मति स्थिर झाली.

## समाजवादाची छाननी

कादंबरीच्या सुमारें अर्ध्या भागांत आस्तिक्यवादाचा असा ऊहापोह केलेला आहे; तसाच उरलेल्या अर्ध्या भागांत समाजसत्तावादाचा विचार केलेला आहे. या दोन मुख्य वादांच्या अनुषंगानें किंवा निमित्तानें सत्य, ज्ञान, विवाह, इत्यादि विषयांचीहि चर्चा कादंबरीत आलेली आहे. सुशिलेच्या मुखानें वामनरावच आपले परिपक्व विचार बोलत आहेत असें वाटतें. नाट्यछटेप्रमाणें एकानेंच बोलत राहण्यापेक्षां सुशीला, सुनंदा, बाळू, रावबा वगैरे पात्रांच्या तोंडून, नाना प्रसंगांच्या निमित्तानें, स्वतः बोलण्याची युक्ति वामनरावांनीं या कादंबरीत साधलेली आहे. तो तो प्रसंग डोळ्या-पुढें उभें करणारीं रेखीव व सविस्तर वर्णनें किंवा वाचकांच्या भावना हलवून सोडणारे रसोत्कट प्रसंग यांना या कादंबरींत फारसें स्थान नाहीं.

खुद्द वामनरावच आपल्या कादंबरी–लेखनाची लकब सांगतांना म्हणतात, " माझं लक्ष बाह्य पोषाखादि गोष्टींपेक्षां आंतर व्यापारांकडे अधिक आहे. म्हणून हे व्यापार माझ्या ध्यानांत येतात आणि राहतात. अर्थात् त्याचं वर्णन मी करूं शकतों, आणि वर्णन जेथें चांगलें साधलेलें असतें तेथें वाचकांना बाह्य वर्णनाची उणीव फारशी भासत नाहीं. किंबहुना ज्याला त्याला आपल्या कल्पनेप्रमाणें मनश्चित्रें रंगविण्याची संधि मिळते."

## आजउद्यांची समाज-व्यवस्था

सध्यांची समाजव्यवस्था सर्वांनाच असंतुष्ट ठेवणारी आहे. म्हणून ती मोडून समाजवादी ( विश्वकुटुंबी ) व्यवस्था निर्माण करणें अवश्य आहे, असा सूर वामनरावांनीं निरनिराळ्या पात्रांच्या तोंडी लावला आहे. मुनंद-राव म्हणतात, " ही इमारत आज ना उद्यां–नाहींतर ५,००० वर्षांनीं–कोसळणार यांत शंका नाहीं आज सर्वत्र असंतोषाचा बाजार आहे. पुरुष बायकांच्या नांवानें खडे फोडतात, बायका पुरुषांच्या नांवानें बोटें मोडतात ! ब्राह्मणेतर ब्राह्मणांना शिव्या देतात, ब्राह्मण ब्राह्मणेतरांना पोकळ शाप देतात ! ( तसेंच भांडवलवाले व मजूर, ) आजच्या समाजांत गरिबांना अन्न नाहीं आणि श्रीमंत अजीर्णानें आजारी पडत आहेत ! मन सुसंस्कृत करण्याचें हें मंदिर नाहीं, तर ढोंगसोंग आणि हलकटपणा शिकविण्याची शाळा आहे." सध्यांच्या अनवस्थेच्या जागीं जी नवी समाजव्यवस्था यावयाची, तिचें शब्दचित्र सुशीलेनें पुढीलप्रमाणें रेखाटलेलें आहे. " आमची विश्वकुटुंबी संस्था ईश्वरवादी नाहीं, आणि निरीश्वरवादी नाहीं; आम्ही सत्यवादी आहोंत. सर्व लोकांना आमच्या राज्यव्यवस्थेंत विचार-स्वातंत्र्य व मत-स्वातंत्र्य असेल. विशिष्ट वर्गाचा इतर वर्गावर जुलूम असावा हें मतच मुळीं आम्हांला पसंत नाहीं."

## पत्ररूप कादंबरी

' इंदु काळे व सरला भोळे ' ही कादंबरी १९३४ सालीं प्रसिद्ध झाली. ती आहे अवघ्या सव्वाशें पृष्ठांची. पण ती रसिकांची लाडकी बनली. सोळा वर्षांत तिच्या चार आवृत्त्या निघाल्या. पत्ररूप कादंबरी-लेखनाची

प्रथा तिनें पुढें आणली म्हटलें तरी चालेल. प्रत्येक पात्र सहज पत्र लिहितें व त्या पत्रांतून कथानक आपोआप पुढें सरकतें, अशी जोड जमविणें कौशल्याचें असतें. तें कौशल्य वामनरावांनी चांगलें दाखविलें आहे. त्यामुळें कादंबरींत खरेपणा, जीवंतपणा आला आहे. पत्र–पद्धतीमुळें वर्णनाला पायबंद बसतो. तो वामनरावांना हवाच होता. त्यांना वर्णनाचा कंटाळाच. 'नलिनी'प्रमाणें कृत्रिम वर्णनाचा पसारा, आपल्या स्वभावाविरुद्ध, मांडण्याची पाळी वामनरावांवर या कादंबरीनें आणली नाहीं.

कोणाला एकाद्या चित्तवेधक प्रसंगावरून कथानक सुचतें, तर कोणाला एकादी लोकविलक्षण स्वभावाची व्यक्ति पाहून सुचते, परंतु वामनराव एकादें तत्व स्पष्ट करण्यासाठींच कादंबरी लिहितात. ते म्हणतात, 'इंदु काळे' मधील विनायकराव हा प्रथम कर्मयोग्याचं प्रतीक होता, नारायणराव पाठक हा ज्ञानमार्गाचा अनुयायी म्हणून कल्पिलेला होता आणि 'इंदु काळे' ही कलाभिमानी म्हणून कल्पिलेली होती. या कादंबरीच्या द्वारें मला असं सूचित करायचं होतं कीं, मनुष्याला केवळ ज्ञानानं समाधान होत नाहीं, केवळ कर्ममार्गानं पूर्णता येत नाहीं आणि केवळ कलासक्ति ही देखील अपुरीच आहे. तात्पर्य, सर्वांची एकवाक्यता केल्याशिवाय कृतार्थता नाहीं. एकाच्याच नादीं लागल्यानें असमाधान होण्याचा संभव. पण ध्येयवादी मनुष्याला या असमाधानांतच एक उच्च प्रकारचं समाधान वाटत असतं, हें मला शेवटीं सुचवावयाचं होतं."

## 'इंदु काळे' चें कथा-सूत्र

या कादंबरींत १९१९ ते १९३४ पर्यंतचा पंधरा वर्षांचा काल त्यांनीं पार्श्वभूमीसाठीं निवडला आहे. विनायकराव भोळे गांधीजींच्या साबरमती येथील सत्याग्रहाश्रमांत गेले, सत्याग्रहांत सामील होऊन दीड वर्षाची शिक्षा भोगून आले, नंतर खेड्यांत राहून ग्राम-सेवा करूं लागले व पुनः सात वर्षांची शिक्षा त्यांना झाली. अस्पृश्यता–निवारणाचा प्रचार व आचार केल्यानें त्यांचेवर सनातनी ग्रामस्थांनीं बहिष्कार टाकला; त्यांचीं दोन मुलें मृत्युमुखीं पडलीं व तेहि पुढें कालवश झाले; तरी त्यांची पत्नी सरला ग्राम-सेवेचेंच व्रत चालवीत राहिली असें हें साधें कथानक आहे. सरलेचा

भाऊ कंत्राटदार, त्याची पत्नी इंदु काळे ही गायनाची शोकीन. कला कां नीति ? या हिंदोळ्यावर झोके खाणाऱ्या तिच्या चंचल मनाला विनायकराव ( म्हणजेच वामनराव ) निश्चित उपदेश करतात--" कलेची आवड ठीक आहे, पण कलेपायी नीति आवडती होणें चांगलें नाहीं. गाण्यामध्यें ताना आणि आलाप यांचें बाबतींत गाणाऱ्याला थोडेंबहुत स्वातंत्र्य असलें, तरी त्यानें ' ताल ' केव्हांहि सांभाळलाच पाहिजे. त्याप्रमाणेंच कलेकरितां थोडेंबहुत स्वातंत्र्य इष्ट आहे, पण नीतिचें ' ताल-तंत्र ' संभाळलेंच पाहिजे. कलेची तहान भागविण्याकरितां नीतीच्या रक्ताचा घोट घेणें बरोबर नाहीं. " वामनरावांना ' संशयात्मा ' किंवा ' मंत्रचळे ' म्हणणारांनीं निदान हें त्यांचे निःसंदिग्ध मत तरी ध्यानीं घ्यावें.

## पोथीचें पांघरूण

' आश्रम–हरिणी ' ही लघु-कादंबरी वामनरावांची सर्वांत लाडकी. पाउणशें पानांच्या या कादंबरीला जुन्या पोथीचें स्वरूप दिलेलें आहे. ' श्रीपाराशर पुराणाची जुनी पोथी ' आपल्याला सांपडली अशी बतावणी कादंबरीकर्त्यानें केली आहे. ती बतावणी टिकविण्यासाठीं संस्कृत शब्दांची पखरण केलेली आहे. धौम्य ऋषि सांगतात, " आमच्या आश्रमांतील गुरुजीच्या अध्यापनामध्यें क्रीडनाची गोडी होती आणि क्रीडनामध्यें उदार नीतितत्त्वें बिंबविलीं जात होतीं. " हिंगणें येथील आश्रमांत गोडीनें शिकविणारे वामनरावच या गुरुजीच्या रूपानें आपल्या डोळ्यापुढें उभे रहात नाहीत काय ? दोन पति व एक पत्नी असा पेंच या कादंबरीत वामनरावांनीं उत्पन्न केला आहे. ' प्रथम–विवाहाइतकाच हा पुनर्विवाह मला शुद्ध व इष्ट वाटतो ' हें आपलें सुधारकी मत वामनरावांनीं या कादंबरींत १९१५ सालींसुद्धां मांडलें होतें. पण लोकभयामुळें त्यांनीं तो पुनर्विवाह झालेला कादंबरींत दाखविला नव्हता. गडकऱ्यांचीहि ' प्रेमसंन्यास ' मध्यें अशीच कुचंबणा झाली होती. ' सर्व जगताकडे समतेनें व प्रेमदृष्टीनें पाहणें-याचेंच नांव आत्मोन्नति ' हा आपला निश्चित सिद्धांत वामनरावांनीं याहि कादंबरींत मांडलेला आहे.

## आत्मचरित्राची छाया

'स्मृति–लहरी' हें वामनरावांचें अखेरचें पुस्तक म्हणजे आत्मचरित्रच आहे म्हटलें तरी चालेल. 'धोंडोपंत बर्वे' नांवाच्या व्यक्तीचे तोंडून वामनराव आपले पक्कमधुर विचारच प्रगट करीत आहेत. त्यांचे बोल, त्यांच्या क्रिया म्हणजे मधाच्या धारा आहेत. फुटलेलीं मनें सांधावींत, उसवलेलीं वस्त्रें शिवावींत, चुका–उणिवावर पांघरूण घालावें, प्रसंगीं खोटें बोलूनहि सर्वांना समाधान द्यावें, अशा स्निग्ध स्वभावाचा मधुर नमुना वामनरावांनीं निर्माण केला आहे: माधुर्य व ज्ञान ( Sweetness and Light ) यांचा संदेश पानापानांतून टबकत आहे. घरभर सुगंध पसरणाऱ्या पण स्वतः न दिसणाऱ्या एकाद्या उदबत्तीप्रमाणें ही कादंबरी आल्हादकारक व सुखदायक आहे.






## प्रा. फडके : : : १८

उद्यानांतील सुंदर मोर पाहण्याचा शीण कोणास येईल? आकाशांतील विविधरंगी इंद्रधनुष्य नजरेंत न सांठविणारा अरसिक कोण आहे? प्रा.फडके यांचें ऐटदार, मनोहर, अवीट असें ललित वाङ्मय वाचतांना कोण कंटाळेल? ते जसें ललित लिहूं शकतात, तसेंच शास्त्रीय लेखनहि करूं शकतात; जशी मराठींत तशी इंग्रजीतहि त्यांची लेखणी चालते, आणि जशी लेखणी तशीच वाणीहि. त्यांची लघुकथा असो, कादंबरी असो, निबंध असो, किंवा व्याख्यान असो, प्रत्येकाची रचना, एखाद्या प्रमाणबद्ध मंदिराप्रमाणें, अगदीं बांधेसूत असते. शब्दांच्या योजनेपासून कथानकाच्या रचनेपर्यंत, प्रत्येक अवयव कसा कोरीव–कांतीव! मराठींत कादंबरी–लेखनांतील बहिरंगाची कला तर त्यांनीं पूर्णत्वास नेली असें म्हटलें तरी चालेल.

भाषा, वर्णन, स्वभाव-लेखन, रस-परिपोष, कथानक-रचना—हें सारें कांहीं तंत्रशुद्ध व सरस.

"हरिभाऊ आपट्यांप्रमाणें चिरंजीव हो" असा आशीर्वाद प्रा. रामभाऊ रानडे यांनीं प्रा. फडके यांना ' अल्ला हो अकबर ' या त्यांच्या पहिल्या कादंबरीच्या प्रस्तावनेंत दिला. तो फडके यांनीं आपल्या पंचवीसतीस वर्षांच्या कथालेखनानें खरा करून दाखविला. अर्थात आपट्यांचा संप्रदाय निराळा आणि फडक्यांचा संप्रदाय निराळा. दोघांचे स्वभाव भिन्न, मार्ग भिन्न, ध्येयें भिन्न. फडक्यांच्या कथा-सृष्टींत, प्रेमाशिवाय विषय नाहीं, शृंगाराशिवाय रस नाहीं आणि यौवनाशिवाय पात्रें नाहींत, अशीच सर्वसाधारण स्थिति आहे. अपवाद असेल तर क्वचित.

## " कलेकरितां कला "

त्यांच्या कला-विलासी मनाची अशी समजूतच आहे कीं, " सामाजिक, धार्मिक अगर राजकीय क्रांति नाटकांनीं अगर कादंबऱ्यांनीं घडून येत नाहीं...नाटकें, कादंबऱ्या लिहिणारा लेखक पुढारी होऊं शकत नाहीं ..कला आणि क्रीडा या दोहोंचेंहि स्वरूप सारखेंच आहे...केवळ अंतःकरणांत दाटलेल्या भावनांना त्या त्या खेळांच्या निमित्तानें वाव मिळावा, आणि अंतःकरणांतल्या भावना व्यक्त होतांच मनुष्याला जो एक विलक्षण आनंद साहजिकपणेंच होत असतो तो अनुभवितां यावा एवढाच खेळ खेळण्यांत मनुष्याचा हेतु असतो."

## साहित्याचा दुहेरी उपयोग

याचा अर्थ इतकाच घेतला पाहिजे कीं, फडके यांच्या दृष्टीनें ललित-लेखन केवळ करमणुकीचें एक साधन आहे. याउलट गॉर्की, अप्टन्, सिंक्लेअर, बर्नार्ड शॉ, शरच्चंद्र चटर्जी, हरिभाऊ आपटे प्रभृति थोर थोर कलाभक्तांनीं रंजन व बोध या दोन्हींचा संगम आपल्या वाङ्मयांत केलेला आहे. उष्णता व प्रकाश या दोन्हींचा लाभ देणारे ते तेजोगोल होत. पण एखाद्यानें आपल्या समशेरीचा उपयोग केवळ शोभेसाठींच करावयाचें

ठरविलें, तर त्याला काय म्हणावयाचें ? तें शोभा देण्याचें काम मात्र फडके मोठ्या कौशल्यानें पार पाडतात. कला-चतुर लेखक म्हणून त्यांनीं चांगलें नांव कमावलें आहे.

## विद्याभ्यास व क्रीडाविलास

प्रा. नारायण सीताराम फडके यांचा जन्म ता. ४ ऑगस्ट १८९४ रोजीं झाला. नगर जिल्ह्यांतील कर्जत या खेडेगांवीं ते जन्मले. तरी दहाव्या वर्षापासून पुढील सारें शिक्षण पुण्यास झालें. वडील मामलेदार असल्यामुळें त्यांना बरेंच फिरावें लागे. त्यामुळें फडक्यांचें प्राथमिक शिक्षण स्थिरपणें होऊं शकलें नाहीं. १९०५ सालीं, वडिलांची बदली पुण्यास झाली, आणि पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें मराठी चौथ्या यत्तेंत फडके दाखल झाले. इंग्रजी तीन यत्ता वडिलांनीं घरींच करून घेतल्या. त्यामुळें नूतन मराठी विद्यालयांत ते एकदम इंग्रजी चौथींत जाऊन बसले. १९१० सालीं मॅट्रिकचें प्रवेशद्वार त्यांनीं ओलांडलें. नंतर ते फर्गसन कॉलेजांत गेले.

विद्याभ्यास व क्रीडाविलास या कॉलेजच्या दोन्ही अंगांचा भरपूर लाभ फडक्यांनीं घेतला. क्रिकेट व टेनिस खेळण्यांत ते पुढें असत. पत्ते खेळण्यांत ते पटाईत होते. नाटकांत भाग घेण्यास ते उत्सुक असत. या खेळांबरोबरच बौद्धिक विकासांकडेहि त्यांचें लक्ष असे. सभेंत सफाईदार भाषणें ते करीत. इंटरमध्यें असतांनाच त्यांनीं आपली पहिली गोष्ट लिहिली. त्या गुप्त-पोलिसी गोष्टीचा मोबदला त्यांना सोळा रुपये मिळाला. इतर वाचनहि त्यांनीं पुष्कळ केलें. १९१४ सालीं बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर १९१७ सालीं, त्यांनीं एम. ए. च्या परीक्षेंतहि तसेंच भरघोस यश मिळविलें. तत्त्वज्ञान विषयाचीं विद्यापीठाचीं पारितोषिकें त्यांनीं पटकाविलीं. ही दुसरी पदवी त्यांच्या हातांत पडण्या-पूर्वींच ‘ प्राध्यापकी ’ त्यांच्या गळयांत पडली. १९१६ सालीं न्यू पूना कॉलेज निघालें. त्याबरोबर फडके तेथें गेले व तर्कशास्त्र शिकवूं लागले. १९१८ सालीं मुंबई विद्यापीठानें २०० रुपयांचें बक्षिस लावलें होतें.

दादाभाई नौरोजी यांचें चरित्र लिहिणारास तें मिळावयाचें होतें. फडक्यांनीं महत्त्वाकांक्षा धरली आणि चरित्र लिहिलें. त्यांना तें बक्षिस मिळालें.

## वृत्तपत्र-सृष्टींतील अनुभव

या ना त्या निमित्तानें फडके यांचा पाय कांहीं प्राध्यापक-पदावर टिकूं शकलाच नाहीं. त्यांच्या प्राध्यापक पेशानें त्यांना दूर दूर फिरविलें. १९१९ सालीं म. गांधींनीं असहकारितेचें रणशिंग फुंकलें. तें ऐकतांच फडके यांच्या हृदयांतील भावना नाचूं लागल्या त्या भावनेसरशीं त्यांनीं प्राध्यापकाचा झगा झुगारून दिला. विद्यार्थ्यांनाहि कॉलेजांवर बहिष्कार घालण्याचा उपदेश करण्यासाठीं त्यांनीं खूप व्याख्यानें दिलीं. चरितार्थासाठीं त्यांनीं ‘ मराठा ’ या इंग्रजी साप्ताहिकांत सहसंपादकाचें काम केलें. ‘ केसरीं ’तहि ते हौसेनें ‘ विविध–विचार–तरग ’ लिहीत. १९२० च्या जूनपर्यंत वृत्तपत्रीय सृष्टीमध्यें फडके वावरत होते. पण त्यांना गांधीजींच्या चळवळीची गोडी वाटेना आणि त्यांचें मन वृत्तपत्रीय लेखनांत रमेना.

## नोकरीमुळें भ्रमंती

ते थेट दिल्लीच्या एका खिश्चन कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून गेले. तेथें त्यांचें वास्तव्यहि होतें एका खिश्चन कुटुंबांत. ही जागा हंगामी होती. एक वर्ष पुरें होतांच ते परत पुण्यास आले. १९२२ च्या जूनमध्यें सिंध-हैद्राबादमधील कॉलेजांत ते प्राध्यापक म्हणून गेले. तेथें ते सुमारें चार महिनेच राहिले. तेथून ते नागपूरच्या कॉलेजमध्यें १९२४ च्या जूनमध्यें दाखल झाले. तीनचार महिन्यांत तीहि नोकरी त्यांना, त्यांच्या विशिष्ट मतांमुळें, सोडावी लागली. पुनः ते वृत्तसृष्टीच्या आश्रयास आले. १९२५ पासून सुमारें वर्ष दीडवर्ष ते मुंबई येथील एका इंग्रजी पत्राचे संपादक होते. १९२६ च्या जूनपासून मात्र त्यांची ही भ्रमंती थांबली. त्यावेळीं ते कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांत प्राध्यापकाच्या खुर्चीवर जे जाऊन बसले, ते १९५१ सालीं सेवानिवृत्त होईपर्यंत.

## कादंबऱ्यांतील नवयुग

गेल्या पंचवीस वर्षांत कोल्हापूर येथें लाभलेल्या या स्थैर्यामुळें व स्वास्थ्यामुळें फडके यांचें हातून विविध व विपुल लेखन होऊं शकलें. त्यापूर्वींच्या भ्रमंतीमुळें त्यानीं देशांतील दिल्ली, हैद्राबाद, कराची, आग्रा, काशी, झांशी, अहमदाबाद वगैरे जीं निरनिराळीं शहरें पाहिलीं आणि ख्रिश्चन, मुसलमान, पारशी इत्यादि भिन्नधर्मीय कुटुंबियांचा जो सहवास त्यांना घडला; तो सर्व अनुभव त्यांना पुढील कादंबरी–लेखनाला भरपूर भांडवलासारखा उपयोगी पडला. कांहीं कांहीं कादंबऱ्यांसाठीं ते मुद्दाम गोवें, हैद्राबाद, काश्मीर वगैरे ठिकाणीं जाऊनहि आले. १९१७ सालीं प्रसिद्ध झालेली त्यांची 'अल्ला हो अकबर' ही कादंबरी 'त्यांची' म्हणतां येत नाहीं. कारण 'फडकेछाप' कोणतेच गुण तीमध्यें आढळत नाहींत. पूर्वींच्या कादंबरीकारांचें अनुकरण करूनच ती लिहिलेली आहे. तिचा मोबदला त्यांना मिळाला फक्त पन्नास रुपये ! त्यांच्या विशिष्ट गुणांची वानगी देणारी पहिली कादंबरी म्हणजे 'कुलाब्याची दांडी.' ती १९२५ सालीं प्रसिद्ध झाली. तिच्यांत कांहीं नवेंच पाणी आहे असें रसिकांनीं ओळखलें. १९२७ मध्यें 'जादूगार' व १९२८ मध्यें 'दौलत' या दोनहि रमणीय मानस-कन्यांनीं महाराष्ट्राला मोहिनीच घातली. या त्यांच्या अलौकिक कादंबऱ्या-पासून अपार लौकिक त्यांना मिळाला, पण प्राप्ति पैचीहि झाली नाहीं.

## साहित्यांतील मान–सन्मान

१९३१ सालीं त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'अटकेपार' कादंबरीचें भाषांतर त्यांनीं स्वतःच इंग्रजींत केलें आणि तें इंग्लंडमधील एका स्पर्धेसाठीं पाठविलें. त्या स्पर्धेंत त्यांना यश न मिळालें, तरी त्यांची महत्त्वाकांक्षा दिसून आली. उलट इंग्रजी भाषेंतील हॅमिल्टनप्रभृति टीकाकारांच्या ग्रंथांचा आधार घेऊन व स्वतःच्या बुद्धिकौशल्याचा उपयोग करून फडके यांनीं १९३४ सालीं 'प्रतिभा–साधन' नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यांत इंग्रज ग्रंथकारांचें ऋण मान्य न केल्यानें, त्या ग्रंथावर टीकेचें काहूर माजलें. त्यासाठीं 'प्रतिभा–साधन समिति' नेमण्यांत आली. तिनें फडक्यां-

चा उदारपणें गौरव करून असा निर्णय जाहीर केला कीं, हॅमिन्टनच्या ग्रंथाची दाट छाया 'प्रातिभा–साधन' ग्रंथावर पडली आहे आणि त्या ग्रंथाचा निर्देश फडक्यांनीं करावयास हवा होता. हा ग्रंथ कोणाहि होतकरू लेखकानें अवश्य वाचलाच पाहिजे असा आहे. त्याला द. म. साहित्य संमेलनानें पांचशें रुपयांचें पारितोषिक देऊन त्याचा योग्य तो गौरव केला.

फडक्यांच्या थोर साहित्यसेवेबद्दल वादच नव्हता. त्यांच्या कथा, त्यांच्या कादंबऱ्या, त्यांच्या गुजगोष्टी, त्यांचीं चरित्रें, त्यांचीं नाटकें या सर्वांचा सत्कार महाराष्ट्रानें मोठ्या प्रेमानें केला आहे. १९३९ सालीं, मिरज येथें भरलेल्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें. एवढेंच नव्हे, तर रत्नागिरी येथें १९४० सालीं भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थानींहि त्यांची निवड झाली.

## कथा–लेखनाचें तंत्र

कथा काय किंवा कादंबरी काय, त्याचें एक शास्त्र आहे, तंत्र आहे. तें कसें अभ्यासावें हें फडके यांनी ' प्रतिभा–साधनांत ' गोड भाषेनें, समर्पक दाखल्यांनीं व सुसंगत विवेचनानें मांडलें आहे. खुद्द स्वतःहि ते आपलें लेखन तसेंच करतात. घर बांधण्यापूर्वी किंवा लढाई करण्यापूर्वी जसा नकाशा काढावा लागतो, तसा आपल्या कथानकाचा, स्थल–कालाचा व पात्राप्रसंगाचा तपशीलवार नकाशा आपण तयार करतों–आणि त्यांत पेंचप्रसंग, निरगांठ व उकल यांचीं स्थानें ठरवून व विरोधी विकारांचे संघर्ष घालून, सुखदुःखाच्या छायाप्रकाशाची मौज उडवून देतों असें ते म्हणतात. आपल्या कथा–लेखनाची प्रक्रिया कशी असतें हें सांगतांना ते एके ठिकाणीं लिहितात, " प्रत्येक कादंबरी लिहितांना माझ्या मध्यवर्ती कल्पनेचा मूर्त अवतार म्हणून मी प्रथम कोणत्या तरी एका व्यक्तीची शक्य तितकी रेखीव कल्पना आपल्या मनाशीं करीत आलों आहे. ही कल्पना जितकी पक्की व स्पष्ट असेल, तितक्या प्रमाणांत बाकीच्या मुख्य पात्रांचीं निर्मिति करणें सुलभ जातें असा माझा अनुभव आहे. कथानकापेक्षां स्वभाव–वर्णनाला अधिक महत्त्व दिलें पाहिजे. "

## पात्रांचा जिवंतपणा

स्वभाव-लेखन हुबेहूब करण्यांत फडके यांचा अगदीं हातखंडा. प्रत्येक व्यक्तीचा पोशाख, शरीरयष्टि, माना वेळण्याची किंवा नाकपुड्यांची हाल-चाल करण्याची लकब, या बहिरंगाप्रमाणेंच त्याच्या मनांतील विचार-विकारांच्या लाटा, बुद्धि व भावना यांचे संघर्ष इत्यादि अंतरंगहि फडके बारीक बारीक तपशिलानीं फार सुंदर रंगवितात. त्या त्या प्रसंगांत तें तें पात्र कसें बोलेल याचा सहज उद्गारच त्यांच्या संवादांत ऐकावयास मिळतो. त्यामुळें सारीं पात्रें खरीखुरी, हाडामासांचीं, जिवंत आहेत असें वाटून वाचक त्यांच्या सुखदुःखाशी समरस होतो. फडक्यांचीं पात्रें वास्तव असतात, संवाद स्वाभाविक असतात, वर्णनें सांगोपांग असतात आणि प्रसंगांची गुंफण संगतवार असते. त्यामुळें सर्व कादंबरी वाचतांना आपण कोणत्या तरी एका नव्या पण प्रत्यक्ष कुटुंबांत जाऊन-राहून-बोलून आलों असा ठसा वाचकाच्या चित्तावर दीर्घकाळ उमटतो.

## नंदन-वनाचा थाट

संपत्तीनें श्रीमंत, वयानें तरुण व शिक्षणानें प्रगत-असेच नायक-नायिका फडके बहुधा निवडतात. ‘रहावयास सुंदर राजवाडा, खावयास सुग्रास मिष्टान्न, हिंडाफिरावयासाठीं दिमतीला मोटार’ अशा परिस्थितीवर ‘जादूगार’चा चित्रकार नायक लोळत असतो. फडक्यांच्या मित्र-परिवारांत चित्रकार, गायक, पेटीवादनपटु, नट-नटी, अशा रसिकांचा भरणा असल्यामुळें त्यांचीं प्रतिबिंबें कोणत्या ना कोणत्या पात्रांत उमटणें स्वाभाविकच आहे. त्यांचा नायक रेल्वेनें जाईल तर सेकंड क्लासनेंच, आणि तो प्रवास करील तो लोणावळे, महाबळेश्वर, काश्मीर येथलाच. साधा लेखक असला तरी त्यांचा नायक तुरुंगांत गेला कीं अ वर्गांत, हॉटेलचें बिल व्हावयाचें चारपांचशें रुपयांचें व तें गुपचुप भरून जावयाचा एखादा दोस्त! यक्षनगरींतून सारा संचार चाललेला! वसंतसेनेच्या निरनिराळ्या चौकांतील देखावे पाहून चकित होणाऱ्या विदूषकासारखीच वाचकाची अवस्था होते.

‘प्रवासी’चा नायकहि विस्मित होण्यासारखा दिवाणखान्यांतील देखावा

पहा. "खोलीभर अंथरलेले निरनिराळ्या रंगांचे अस्सल मखमलींचे उंची गालिचे, भारी किंमतीचे बैठकीचे सामान, कोंपऱ्याकोंपऱ्यांत मांडलेल्या निरनिराळ्या आकाराच्या टेबलांवर ठेवलेल्या मूल्यवान् पंजाबी घाटाच्या पितळी कुंड्यांत डोलणारीं 'पाम' जातीचीं झाडें, भिंतीवरचे बिलोरी आणि सुंदर देखावे, फ्रेंच पद्धतीचे उंच प्रशस्त खिडक्यांपुढें झुलणारे रंगीत पडदे इत्यादि वस्तूंचें दृश्य फिकटगुलाबी छटेच्या विद्युद्दीपांनीं टाकलेल्या प्रकाशांत राजाभाऊंना एखाद्या स्वप्नांतल्या दृश्याप्रमाणे वाटलं. मनावरचा विस्मयाचा परिणाम ओसरूं देण्यासाठीं तो क्षणभर दारांत उभा राहिला. आणि मग त्यानें दृष्टि वर करून समोर पाहिलें, तों एका राजशाही मंचकावर गुडघाभर उंच गादीवर रेशमी अभ्ऱ्यांच्या उंची उशागिऱ्यांचा मानेखालीं आधार घेऊन नीलांबरी पडली असलेली त्याला दिसली."

## सृष्टीचीं विविध स्वरूपें

सकाळ–संध्याकाळ, समुद्र, पर्वत, निरनिराळे ऋतु–इत्यादि सृष्टीचें वर्णन सूक्ष्मतेनें व रम्यतेनें ते करतात. ग्रीष्म, वर्षा, शरद्, शिशिर वगैरे ऋतूंचें वर्णन 'प्रवासी' कादंबरींत फडके यांनीं बहारीनें केलें आहे.

"वसंतऋतु आला तसा गेला. ग्रीष्मऋतूंत रात्री लहान होऊन दिवस मोठे झाले, वाऱ्याची दिशा बदलली, जलाशयांतलें पाणी आटून गेलं, आणि प्रखर सूर्यतापानं जमिनीला भेगा पडल्या. पुढें आभाळांत हलके हलके ढग जमूं लागले, वादळी वाऱ्यांना सुरवात झाली, आणि विद्युल्लतेचा कडकडाट होऊन वर्षाकालास प्रारंभ झाला. रानोमाळ गवत माजलं, शेतं उंच उंच वाढलीं, लहानमोठी झाडं पल्लवभारानं आच्छादित झालीं, मृदु आणि उग्र वासानं दाही दिशा दरवळून गेल्या, तांबड्या गलिच्छ पाण्यानं नदी-नाले खवळले, आणि पंखांत चोंची खुपसून कुडकुडणारे पक्षी 'बाबा रे, थांबव आतां ही वृष्टि !' अशी वरुणराजाची प्रार्थना करायसाठीं चिवाचिवाट करूं लागले.

## वर्णनाचा एकजीवपणा

'वर्णनाकरितां वर्णन' हें जुनें धोरण फडके यांना पसंत नाहीं. निसर्गाचें

असो वा व्यक्तीचें असो, बहिरंगाचें असो वा अंतरंगाचें असो,—कोणतेंहि वर्णन पात्राच्या स्वभावलेखनाला मदत करणारें व त्याच्या मनोवृत्तीवर प्रकाश पाडणारें असलें तरच तें करावयाचें अशी त्यांची प्रशंसनीय पद्धत आहे. नुसत्या सूर्योदयाचें वर्णन अलगपणें ते करणार नाहींत. 'अटकेपार'-मध्यें सूर्योदयाचें वर्णन आहे, पण ते नायकाच्या मनोवृत्तीला 'अस्तर' शोभण्यासारखें आहे. तें वर्णन असें—"शेवटीं अंगावरचें पांघरूण दूर टाकून तो उठला. त्यानें खिडकी उघडून चूळ भरून टाकून बाहेर पाहिलें. वारा अगदीं बंद असल्यामुळें वृक्षांच्या फांद्या अगदीं निश्चल होत्या. जणूं ते सारे वृक्ष त्याच्या काकांच्या चित्रांतले रंगवलेले वृक्षच होत. पक्षी डोळ्यांपुढें फारसे दिसत नव्हते, पण त्यांचे अनेक स्वरांतले विविध शब्द मात्र ऐकूं येत होते, व त्यांतच किनाऱ्यावरील लाटांच्या गंभीर ध्वनाचा अस्पष्ट अवशेष मिसळल्यासारखा वाटत होता. जवळपास फारशी फुल-झाडें किंवा फुलवेली दिसत नव्हत्या. परंतु आसमंतात् अनंत रानफुलें फुललीं असलीं पाहिजेत. कारण हवेंत जिकडेतिकडे एक विलक्षण गंध दरवळला होता."

## तपशीलवार वर्णन

मोटारचा अपघातसुद्धां फडके किती यथार्थपणें व तपशिलानें करतात हें 'अटकेपार'मधील पुढील दोन उताऱ्यांवरून कळून येतें. "मोटार डौलदार रीतीनें चढत खूपच वेगानें वर आली पण अगदीं बरोबर घाटमाथ्यावर ती पोंचली असेल नसेल तोंच "ठां !" असा एकदम बार झाला. हांकणारानें ब्रेक दाबला, तरी गाडी दोनचार ढांगा तशीच पुढें फरफटत गेली; "करॉं ! किरॉं !' असें ब्रेकच्या घर्षणानें आवाज झाले."

फडक्यांची कला—लोलुप दृष्टि पडक्यामोडक्या खेड्याकडे फारशी वळत नाहीं. पण जेव्हां वळते तेव्हां तेथलें वर्णनहि त्यांची लेखणी कौशल्यानें करते. "उन्माद" मधील एक वर्णन पहा—

## खेड्यांतील प्रसंग

"मराठेगड्यांच्या पैरणी आखाड्याच्या मातीनं लालसर रंगाच्या झालेल्या दिसत होत्या, अन् पुष्कळांच्या उंचसर भरीव मानेभोंवतीं

चांदीच्या अगर सोन्याच्या ताइतांचे काळे रेशमी दोरे शोभत होते. एका कोपऱ्यांत गांवच्या खंडोबाच्या देवळांतले वाजंत्री बसले होते. त्यांच्या डोक्यांवर तांबडीलाल पागोटीं होतीं; कमरेला घोंगड्या कसलेल्या होत्या आणि कपाळावर भंडारा अन् उघड्या पिळदार अंगाला लाल माती फासलेली होती. हे लोक मधूनच आपल्या ढोलाचा पडघम् आवाज काढीत आणि कर्कश सुराच्या सनया वाजवूं लागत. आणि त्यांतच शिंगाची उंच कर्णभेदक आरोळी उठली, कीं कांहीं एका विलक्षण स्फूर्तिदायक लढाऊ वृत्तीच्या लहरी वातावरणांत उत्पन्न होत. कुस्त्या सुरू झाल्या व एका-मागोमाग निकालांत निघूं लागल्या, तेव्हां साऱ्या प्रेक्षकांचा उन्माद वाढूं लागला. ''

## निसर्गाचीं विविध दर्शनें

लोणावळे येथील वनश्रीचें वर्णन फडके पुढील शब्दांनीं ' दौलत 'मध्यें करतात, '' लोणावळ्याची मजेदार हवा, सलगी होण्यापूर्वी एकमेकांशीं जरा संकोचानें पण लवकरच हातांत हात घालण्याच्या इच्छेनें वागणाऱ्या बालकांप्रमाणें फार दूरदूरहि नाहीं व फार जवळजवळहि नाहींत असें बसलेले लहानमोठे बंगले, कोणाचें भय न बाळगतां खुशाल ऊन्ह खात उघड्या मैदानावर येऊन पसरलेल्या सर्पाप्रमाणें लांबसडक लहानमोठे रस्ते, रस्त्यांच्या दुतर्फाचे वृक्ष व त्यांवर किलबिलाट करणारे पक्षी आणि सभों-वार एकदोन मैलांच्या टापूंत जिकडे तिकडे दिसणारी डोंगर—पठारांची वनश्री—''

चांदणी रात्र आणि समुद्रावरची ! त्या रम्य दृश्याचा चतुर चितारी फडक्यांइतका दुसरा कोण असूं शकेल ? ' जादूगार ' मध्यें ते लिहितात, ''डेकवरचें चांदणें खरोखरच रमणीय होतें. समुद्र शांत होता तरी बोलघेवड्या माणसाची बडबड जशी कांहीं झालें तरी थांबत नाहीं त्याप्रमाणें पाण्याच्या छोट्या छोट्या लहरी बोटीच्या अंगावर उड्या घेऊन ' चुळुक '—'चुळुक' असा आवाज करीतच होत्या. वारा जवळ जवळ बंद होता, पण मित-भाषी माणसानें मधूनच एखादा उद्गार काढावा त्याप्रमाणें त्याची सूक्ष्म

झुळुक मधून मधून वहात होती. आकाशांत पूर्णप्राय चंद्र तरंगत होता आणि खालीं पाण्यांत पडलेलें त्याचें प्रतिबिंब जलतरंगांमुळें विचालित होऊन समुद्रांत कोणी तरी रजतपत्राचे तुकडे उधळल्याचा भास होत होता.''

अशा सूक्ष्म व सविस्तर, रम्य व रेखीव वर्णनांमुळें कादंबरीच्या वाचकाला आपणच त्या त्या स्थानीं आहोंत असा भास होतो.

## वर्णनावर अलंकारांचा साज

समुद्राच्या लाटांची क्रीडा फडके यांनीं किती मनोहरपणें 'अटकेपार'-मध्यें चित्रित केली आहे:—"भरतीचा ऐन भर असल्यामुळें लाटांवर लाटा उसळून ज्या रेषेवर येणाऱ्या जाणाऱ्या लाटांची टक्कर होई, तेथें एकसारखा पांढऱ्या सफेत फेंसाचा खेळ चालला होता. जणूं दुधाच्या घागरी घेऊन तीराकडे धांवत येणाऱ्या तरुण गोपिकांच्या हांतून धांवपळींत घागरी पडून फुटल्या होत्या व दुधाच्या धारांचा सडा झाला होता. लाटा जितक्या आवेगानें येत तितक्याच वेगानें परत जात; त्यामुळें येणाऱ्या लाटा वल्लभाच्या भेटीला धांवणाऱ्या अभिसारिकाच आहेतसें वाटे, तर परतलेल्या लाटा परपुरुषाच्या कामचेष्टेनें भेदरून पळणाऱ्या कुलांगना तर नव्हेत असा भास होई. प्रत्येक लाट गर्जून आपटली कीं तिच्या पाण्याचा झोतच्या झोत सुधीर बसला होता त्या जागेपासून दहावीस हातांपर्यंत चढे; आणि त्या झोताचे हजारों फांटे लहानमोठ्या धोंड्यांच्या मधल्या फटी-फटींतून घुसत, ते बिळाकडे चपळाईनें धांव घेणाऱ्या शुभ्र सर्पांप्रमाणें वाटत. लाट हबकून परत फिरली कीं तिच्या गर्जनेचा ध्वनि ओसरून जाई व मग दुसरी लाट हापटून गर्जेपर्यंत त्या दगडाधोंड्यांत घुसणाऱ्या झोतांचा सळ-सळाटच कानीं येई. जणूं सर्पांच्या उपमेंत न्यून राहूं नये म्हणून ते फूत्कारच चालू होते.''

यमुना नदींतून जाणाऱ्या नौकेचें शब्द-चित्र पहा—"एखादी वत्सल आई ज्याप्रमाणें आपल्या बालकाचें एकदां या गालाचा व एकदां त्या गालाचा असे पटापट मुके घेत असते त्याप्रमाणें यमुनेच्या लाटा एकदा नौकेच्या या बाजूला व एकदां त्या बाजूला अशा चुंबीत होत्या. या

स्पर्शामुळें उत्पन्न होणारा अस्पष्ट आवाज किती मंजुळ आणि मोहक होता ! अत्यंत कुशलतेनें सारंगी वाजविणारा आपलीं बोटें सारंगीच्या तारांवर अगदीं हळूच, ठेवलीं न ठेवलीं अशा तऱ्हेनें खेळवितो, त्यावेळीं सारंगींतून जितके मुग्ध परंतु हृदय हलवून सोडणारे नादतरंग निघतात तितकाच गोड तो आवाज होता ! ”

## स्वभाव-लेखनाची जादू

ललित लेखकाची खरी करामत या वर्णनांपेक्षां अंतरंग रंगविण्यांतच असते. माणसाचें मन अणूसारखें-सूक्ष्म, अदृश्य, अमूर्त. तें वाचकापुढें मूर्त व साकार करून मांडणें ही केवढी अजब किमया ! तींत ते जादूगार आहेत. 'दौलत' ही त्यांची कादंबरी म्हणजे बालगंधर्वांनें सहज मारलेली मधुर तानच ! तरुण-तरुणीचे भाव त्यांतून निनादित झालेले-त्यांची अंतरंगेंच जणुं उकलून दाखविलेलीं-हृदयाची दौलत दडलेली असते ती उधळलेली. पण 'अटकेपार' ही कादंबरी जणुं कांहीं पैज मारून रचलेली. एकाद्या वस्ताद गवयानें, मुरब्बी तबलजीची व सारंगीवाल्याची साथ घेऊन, उंची वाद्ये जमवून, ठेवणींतील चिजा गाव्यात; तशी बैठक 'अटकेपार'ची आहे. भाषेचें वैभव, सृष्टीचें वर्णन, स्वभावाचें चित्रण, तत्त्वज्ञानाच सिंचन-सर्व कांहीं ओतप्रोत भरलेलें आहे. कमी कांहींच पडूं द्यावयाचें नाहीं, अशा तयारीनेंच जणुं फडके 'अटकेपार' लिहावयास बसले. उपमा-श्लेष-उत्प्रेक्षादि अलंकार त्यांची वाग्वधू सहसा घालीत नाहीं. पण या कादंबरींत तिच्या अंगाखांद्यावर भरगच्च अलंकार घातलेले आहेत.

एकाद्या संगमरवरी पुतळ्यावर चोहोंबाजूंनीं प्रकाशाचे झोत सोडावेत, त्याप्रमाणें नायक-नायिकांच्या मनःस्थितीवर प्रकाश पाडणारे नाना प्रसंग फडके रंगवीत असतात. 'जादूगार'मधील नायिकेचें नांव इंदुमती. कालिदासाच्या इंदुमतीचें नांव मुद्दाम देऊन तितकीच ती रमणीय वठविण्याचा विडाच फडके यांनीं उचलला काय ? तिनें चित्रकार आनंदरावाला चित्राचें 'मॉडेल ' म्हणून बसण्यास नकार दिला; तेव्हां तिची मनःस्थिति कशी झाली हें दाखविण्यासाठीं ताईचें मत, तारिणीचा अभिप्राय व

समुद्र–कांटावरील आंग्ल तरुणीचा संवाद–हा सारा चित्रपट फडक्यांनीं हळूहळू उलगडला आहे. हेंच त्यांचें कौशल्य !

## अंतरंगाचीं छायाचित्रें

परीक्षेसाठीं मुंबईस निघालेल्या मुलींच्या सहजरम्य संवादापासून 'दौलत' कादंबरीची सुरुवात झाली आहे. परीक्षेनंतर विद्यार्थ्यांची मनोवृत्ति कशी असते, त्यांचे संवाद कसे चालतात, याचें चित्र फडके यांनीं कसें रेखाटलें आहे, पहा—"परीक्षेच्या पेपरमधील शेवटचा प्रश्न लिहितांना लिहिणाराची मनःस्थिती कशा प्रकारची असते तें ज्यांना त्या मनःस्थितीचा अनुभव नाहीं त्यांना कितीहि वर्णन करून सांगितलें तरी कळणें कठिण आहे. तो प्रश्न लिहावयास लागणारी अर्धी घटका युगासमान वाटते. परीक्षेनंतर लाभणारा सुखाचा काळ डोळ्यासमोर असतो. पण चंद्रकोर पुनः पुनः झांकून दृष्टिआड करणाऱ्या एखाद्या विरल मेघपटलाप्रमाणें तो प्रश्न त्यांच्या आड येत असतो. बोटांचे सांधे दुखूं लागलेले असतात, रोज सहा तास लिहून लेखन-साहित्याचा कंटाळा आलेला असतो, अभ्यासाला मन विटलेलें असतें, आणि चार दिवस सारखा डोळ्यापुढें राहिलेला परीक्षेच्या मंडपाचा देखावा दृष्टीला असह्य झालेला असतो. आतां अर्ध्या घटकेनें हें सारें संपणार अशी आशा मनाला सुखवीत असते, तर उलट ही अर्धी घटका–हा भोग भोगल्यावाचून गत्यंतर नाहीं, हा विचार मनाला जाचत असतो."

## सहजरम्य संवाद

परीक्षा आटोपली. नंतर निर्मला व अविनाश समुद्रकांठावर बोलत बसलीं होतीं. तेव्हांचा त्यांचा संवाद किती सहज व समयोचित आहे, पहाः—" ...विशेष बडें गिऱ्हाईक भेटल्यामुळें आपण त्यासाठीं अगदीं खास चांगला माल निवडून काढीत आहोंत असा बहाणा करून, शेवटीं एक नारळ पसंत करून, नारळविक्यानें डाव्या हातांत उभा धरला व उजव्या हातांतील सुऱ्यानें त्याच्या कोंवळ्या कवचाचीं शकलें उडविण्यास प्रारंभ केला.

त्याच्याकडे पहात निर्मला म्हणाली, ' आमचे परीक्षकहि आतां आमची अशीच कत्तल करणार, नाहीं ? "

' हो, अन् नारळाच्या पाण्याप्रमाणें मधुर लिहिणं एखाद्या पेपरमध्यें त्यांना सांपडलं तर त्याचा आस्वाद घेण्याइतका रसिकपणा त्यांनीं दाखविला तर नशीबंच म्हणायचं ! "

## स्त्री-मनाचें चित्रण

तरुण मुलींच्या मनांत शिरण्याचें फडक्यांचें कसब असामान्य आहे. प्रणयभंग झालेल्या नायिकेसंबंधीं तिच्या मैत्रिणी कशा कुजबुजतात हें त्यांनीं ' समरभूमीं'त पुढीलप्रमाणें दाखविलें आहे.

" काल तिच्या घरीं जाऊन मी तिला विचारलं, सिनेमाला येतेस कां, तर म्हणाली, नको. मग म्हटलं, फिरायला जाऊं, तरी म्हणे नकोच. "

" स्वारी बदलली आहे खास. काय झालं आहे कुणास ठाऊक ? "

" हृदय तपासून पहायला पाहिजे बाईसाहेबांचं. "

" खरंच ग खरंच ! मला वाटतं, तेंच चोरीला गेलं असावं. "

" अग चल, तुझं आपलं कांहीं तरीच. तिचं हृदय चोरीस जायला ती कांहीं तुझ्यासारखी सुटीत मुंबईला गेली नव्हती. "

" पहा पहा हिची अक्कल ! जशा कांहीं हृदयाच्या चोऱ्या मुंबईसच होतात अन् इतर कुठें होत नाहींत. "

" मग तुझं म्हणणं काय, बकुलवाडीच्या एखाद्या शेतकऱ्यावर आपल्या शोभनेचं मन जडलं आहे ? "

" शेतकरी असेल नाहीं तर एखादा हरिजन असेल. नाहीं तरी हरिजनांच्या उद्धाराचा हा काळ आहेच कीं नाहीं ? "

आणि मग पक्ष्यांनीं किलबिल करून सुस्वर काढावेत त्याप्रमाणें त्या विद्यार्थिनींच्या घोळक्यांतून मनसोक्त हास्याचे ध्वनी उठत, आणि ते ऐकून आजूबाजूचे विद्यार्थी चेष्टेनं ' आहे बुवा ' असं एकमेकांत म्हणत, तेव्हां त्या सगळ्याजणी बागेतलं तें ठिकाण सोडून आपल्या विश्रांतीच्या खोलीकडे धांवत जात. त्यावेळीं मग एखादीची वहाण पायांतून निसटे, एखा-

दीचा पदर फुलझाडाला अडके, आणि एखादीच्या हातांतली पुस्तकं निसटून खालीं वाळूवर पडत. ''

हर्षोत्फुल्ल नायिका कशी वागते हें ' जादूगार 'मध्यें फडके यांनीं बारकाईनें वर्णिलें आहे. त्या कादंबरीची नायिका इंदुमती—'' कॉलेज सुटल्यानंतर वर्गांतून बाहेर पडून जों त्या भव्य दगडी इमारतीच्या पायऱ्या उतरूं लागली, तोंच समोरून समुद्राच्या पाण्याने जड व ओलसर झालेला वाऱ्याचा झोत जोरानें आला व त्यामुळें तिच्या साडीचा पदर एकदम उडाला. वाऱ्याच्या त्या धिटाईचें जणूं काय कौतुक करण्यासाठींच, आपल्या सुंदर भुंवया उंच करून मंदस्मित करीत इंदुमतीनें पदर सांवरला, आणि दुपारच्या ऐन उन्हांत तळपणाऱ्या समुद्राकडे क्षणभर दृष्टि टाकून ती पुनः पायऱ्या उतरूं लागली. ''

## शब्दांच्या शिल्पकृति

इंदुमतीचें शब्द-चित्र फडके यांनीं किती कोरीव व मोहक काढलें आहे पहाः—'' नेहमींच मोहक दिसणाऱ्या इंदुमतीच्या चेहऱ्यावर यावेळीं दवबिंदूंनीं धुतलेल्या पुष्पाप्रमाणें विलक्षण टवटवी आलेली दिसत होती. विस्मयाने प्रश्न विचारल्यावर कांहीं वेळ तिचें तोंड तसेंच उघडें राहून पालवींतून डोकावणाऱ्या कुंदकळ्यांप्रमाणें तिचे दांत दिसत होते, आणि दोन्ही नाकपुड्या किंचित् प्रसरण पावून वायुलहरींनीं थरारणाऱ्या गुलाबाच्या पाकळ्यांसारख्या भासत होत्या. तिच्या नेत्रांच्या नेहमीच्या तेजांत एक प्रकारच्या लाडिकपणाचें मार्दव मिसळल्यासारखें दिसत होतें, आणि तिच्या भुंवयांत नागिणीची मोहक वक्रता आणि चपलता आणि पुष्पवेलीचा नाजुकपणा एकत्र सांठविल्यासारखें वाटत होतें.''

इंदुमतीच्या ' धनुष्यकृति भुंवयांची चंचल क्रीडा ' तर पुनः पुनः फडके हौसेनें रंगवितात. तशीच दुसरी मोहक मूर्ति शोभनेची. ' समरभूमी'-ची ही नायिका कशी उभी होती याची कल्पना पुढील वर्णनावरून कोणाला येणार नाहीं ! '' ऐन तिसऱ्या प्रहरच्या पूर्ण प्रकाशांत शोभना खरोखरच एखादा चित्रासारखी शोभत होती. ती तांबड्या किनारीचं

साधंच काळं पातळ नेसली होती, पण तें तिला किती खुलून दिसत होतं ! डाव्या हाताचा पंजा कमरेवर टेकून उभं राहण्याच्या तिच्या ठराविक लकबीप्रमाणें ती यावेळीं उभी होती आणि आपल्या मामांशीं बोलतां बोलतां त्यांना कसला तरी प्रश्न विचारतांना उजव्या हाताचीं बोटं हनुवटी-खाली लावून ती त्यांच्याकडे पहात होती. अशा वेळी तिच्या मुद्रेवर एक विलक्षण मधुर भाव खेळत असे, व तिचे कांहींसे पिंगल वर्णाचे टपोरे डोळे पहाणाराला अधिकच टपोरे वाटत. ”

‘ स्त्री-सौंदर्याचे कारागीर ’ म्हणून फडके विख्यात असले, तरी पुरुष-पात्रांचें चित्रणहि त्यांना साधतें. तसे प्रसंग कमी एवढेंच. ‘ अटकेपार ’-मधील नायकाची सांगोपांग मूर्ति पहा—“ त्याची शरीरयष्टि उंचट, मजबूत आणि बांधेसूद होती, व पावलें टाकण्याची त्याची लकब पहातांच त्याच्या स्वभावांतला दृढनिश्चय, साहसप्रियता आणि महत्त्वाकांक्षा कोणीहि ओळखलीं असती. त्याचे कपडे साधे होते, पण त्याच्या अंगावर सफाईनें बसल्यामुळें शोभत होते. दोन दिवसांच्या मुक्कामानें तांबूस झालेल्या त्याच्या धोतराचा कसलेला काचा त्याच्या कमरेपासून एकेका टांचेपर्यंत तंग राहून शोभत होता, आणि अंगांतल्या शिकारी थाटाच्या गरम कोटाचे फुगीर खिसे कमरेच्या दोन्ही बाजूंस डौलानें झुलत होते. कोटाची कॉलर मानेच्या दोन्ही बाजूंनीं अशा ऐटीनें खालीं उतरून पहिल्या गुंडीवर पोंचली होती कीं, जणूं आपल्या अंगाखालच्या पराक्रमी छातीचा आणि प्रेमळ हृदयाचा त्यानें अभिमान धरला होता.”

## रंगभूमीचा भास

एकाद्या कला-प्रदर्शनांत निरनिराळ्या मूर्ति व पुतळे जसे आपण डोळे भरून पाहतो, तशीं सुस्पष्ट शब्द-चित्रें फडके यांच्या कथा-सृष्टींत किती तरी दिसतात. एकाद्या विशिष्ट प्रसंगीं, विशिष्ट मनोवृत्तींतील व्यक्ति कशी वागत असेल, हें दुर्बिणीप्रमाणें प्रतिभेनें टिपून फडके बहारीनें रंगवितात. “ दौलत ”मधील नायिका निर्मला एका प्रसंगांत कशी चित्रित केली आहे पहा—“ त्यावेळीं तिनें डाव्या हातांत कप धरला होता व उजव्या हातां-

तील चमचा ती कपांत उगीचच हलकें हलकें फिरवीत होती. तिच्या मनगटावरील सोन्याच्या साध्या बांगड्या हालल्यामुळें दिव्याचा प्रकाश त्यांवर पुनः चमकला."

निर्मलेची एक मैत्रीण काय करीत होती व निर्मला आलेली पाहतांच ती काय म्हणाली, तें पहा.—" दुसऱ्या दिवशीं सकाळीं निर्मला कमळकडे गेली तेव्हां कमळ आरशापुढें बसून केस विंचरीत होती. निर्मलेला पाहतांच डाव्या हाताच्या मुठीत धरलेला केशभार आणि उजव्या हातांतील फणी तशीच ठेवून हंसत, व डोळे विस्फारून आणि ओठ चंबूसारखे करून आश्चर्य दाखवीत ती उद्गारली, " ओहो ! सूर्य इकडे कुठें उगवला !—बैस. येवढं केस विंचरणं पुरं करूं ना ? "

" हो, हो. सावकाश. " खालीं सतरंजीवर बसत निर्मला म्हणाली."

हें सूक्ष्म व सहज वर्णन वाचलें म्हणजे रसिक वाचकाच्या डोळ्यापुढें रंगभूमीवर चाललेला एकादा प्रवेशच उभा राहत नाहीं काय ?

आणखी एक शब्द-शिल्प. प्रवासांतील चंचला राजभाऊकडे येत आहे याचें वर्णन कसें केलें आहे तें वाचा. " चंचला दाराआड होती. ती पुढें सरकली. तिनं आपला पदर नीट ओढून घेतला, केस दोन्ही कानांवर दाबले आणि ती मंद गतीनं पावलं टाकीत पुढं आली.

सोन्याच्या चौकटींत बसवलेलं एखादं सुंदर चित्रच आपल्याकडे सरकत आल्यासारखं राजाला वाटलं."

## वात्सल्याचा शिडकाव

युव-युवतींचें प्रेम हा फडक्यांचा खास विषय. पण त्याला उठाव देण्यापुरता वात्सल्य व करुण या रसांचाहि शिडकाव फडके हलक्या हातानें करतात. ' दौलत 'मधील छोट्या अकल्पितेचा खेळकरपणा पहा—

" अकल्पिता आली ती सरळ निर्मलेच्या मांडीवर जाऊन एखाद्या हक्काच्या जागेवर बसावें त्याप्रमाणें बसली व तिची हनुवटी उजव्या हातानें आपल्याकडे वळवीत म्हणाली, " ताई ! मी आंग धुवायच्या वेळेस मुलींच लडे नाहीं."

" खलं ? " तिचा चटकन मुका घेऊन निर्मलेनें कौतुक केलें.

" आतां तूं मला खाऊ देनाल आहेश ना ? "

" हो, हो ! आतां आपन बाजालांत जाऊं अन् खाऊ, खेल खूपखूप आनूं. तूं येनाल आहेश ना माझ्याबलोबल ? "

निर्मलेच्या त्या बोलण्यानें अकल्पितेला इतका आनंद झाला कीं, कांहीं बोलून उत्तर देणें तिला जणुं अप्रशस्त वाटलें. तिनें नुसती आनंदानें मान हालविली व निर्मलेच्या कुशीत सरकून व तिच्या वक्षःस्थलावर डोकें टेंकून तिच्या हातांतील सोनेरी बिलवराशीं ती खेळूं लागली !!

## मानसशास्त्रीय चिकित्सा

एकाच माणसाच्या अंतःकरणांत दोन मनाचा झगडा कसा चालतो हें रंगवितांना फडके लिहितात—" वात्सल्य बोबड्या शब्दांत म्हणालें,

" या पोरीला तूं प्राणाहून प्यार समजतोस, आणि तिची जन्मगांठ घालायच्या वेळेस तिला कशापासून सुख आहे तें विचारीत नाहींस ? "

पण कीर्तीची हांव घोगऱ्या स्वरांत म्हणाली,

" मूर्ख आहेस, या चिमुरड्या पोरीची लहर कसली चालू देतोस ? सय्यद काय वाईट आहे ? आणि तो तिला नापसंत असला तरी कुळाचा मोठेपणा तुला वाढवायचा आहे कीं नाहीं ? "

परदेशाहून स्वदेशीं येणाऱ्या माणसांच्या मनाची धांदल व उत्कंठा आगबोटीवरून उतरतांना किती व कशी होते याचें शब्द–चित्र "दौलत"-मध्यें पुढीलप्रमाणें रेखाटलें आहे. " दक्षिण आफ्रिकेहून आलेली मेल-बोट धक्क्याला नुकतीच लागली असल्यामुळें बंदरावर जिकडे तिकडे एकच गर्दी उसळली होती. दोन मैत्रिणी एकत्र याव्या व एकीला आपलें मूल कौतुकानें द्यावयाचीं व दुसरीला तें तितक्याच कौतुकानें घ्यावयाची घाई व्हावी, त्याप्रमाणें ती बोट व बंदराची जमीन यांची अवस्था झाली होती. अथवा एकीच्या कडेवरून झांप टाकून दुसरीच्या खांद्यावर जाणाऱ्या मुलाप्रमाणें बोटींतल्या उतारूंची स्थिती झालेली दिसत होती, असें म्हणणें कदाचित् अधिक यथार्थ ठरेल.............बोटीवरचें आयुष्य संपतांच तिसऱ्या दर्ज्याचे उतारू वर येऊन कठड्याशीं सर्वांची सरमिसळ झाली होती, आणि दौलत व दारिद्य यांचे खांद्याला खांदे घासले जात होते.

ऐहिक आयुष्यांतून उठून जातांनाहि साऱ्यांचे दर्जे निपटून समान व्हावयाचे आहेत, याचें त्या देखाव्याकडे पाहून स्मरण होण्यासारखें होतें.”

## अलंकारांचा समर्पक वापर

भाषेच्या अलंकारांची दौलत फडके हे ‘ अटकेपार ’मध्यें मुठी भरभरून उधळीत आहेत. विरहानें होरपळलेल्या नायिकेला तिचा प्रियकर भेटला तेव्हांचें वर्णन पहा:—“ ज्या रूपसंपन्न तरुणानें तिच्या खड्याचा चाप परत आणून दिला होता, त्याची हास्यवदन मूर्ति तिच्या अंतश्चक्षूंपुढें स्पष्ट उभी राहिली, आणि ती पाहतांच तिचें सर्वांग एका विलक्षण सुखकारक संवेदनेनें पुलकित झालें. जणूं प्रखर अग्निवृष्टि संपून अमृततुल्य धारांची एकदम वृष्टि झाली. जणूं रुक्ष वाळवंटांतला कष्टदायक प्रवास संपून नंदन-वनाच्या सीमेवरील पुष्पवाटिकेंत तिचें पाऊल पडलें. जणूं ग्रीष्म ऋतूंतल्या सूर्य–संतापानें विव्हल झालेल्या तिच्या सुकुमार देहावर कोणी हलक्या हातानें चंदनाची सुगंधी उटी घातली !”

उलट, नायकाच्या कानीं नायिकेच्या हास्याची लहर आली, तर त्याला वाटलें, “ हसण्याची लकेर नव्हे, स्वर्ग–संगिताची ती तानच होतीसें त्याला भासलें. स्फटिकासारखी जलधारा पायऱ्यापायऱ्यांवरून उड्या घेत असतां तिच्या लाडिक नृत्याचाच जणूं ध्वनि निघाला. जणूं टपोरे मोती सरांतून ओघळून टपटप पडले. कोवळें तारुण्य आणि रसाळ कंठमाधुरी यांच्या मिलाफाचे बुंदच जणूं मोहोळांतून मधाचे थेंब टिबकावे तसे टिबकले.”

आणखी कांहीं समर्पक व सुंदर उपमा पहा—

“ ऐन घाटमाथ्यावर अतिवृष्टींत सांपडलेलीं गुरख्यांचीं पोरें चिंब भिजून जाऊन कुडकुडूं लागावीं तशा त्याच्या त्या असमंजस कल्पना कुडकुडूं लागल्या व त्यांना आपल्या अंतःकरणांत निवाऱ्याची जागा देतां देतां त्यांचीं त्रेधा उडाली. ”

“ टेबलावरील घंटा त्यानें इतकी निर्दयपणें दाबलीं कीं, कसाबाच्या पहिल्या स्पर्शाबरोबर मेंढरानें ब्य ऑं ऽ ऽ ऽ असा लांबलचक विलाप काढावा त्याप्रमाणें घंटेंतून ‘घर्र र्र र्र ऽ ऽ ऽ ’ असा गुदमरलेला आवाज किती वेळ तरी निघत होता. ”

"फुलझाडांच्या ताटव्यांत एखाद्या उधळलेल्या बैलाचें पाऊल पडतांच तोंपर्यंत त्या ताटव्यांत असूनहि रंग–साहश्यामुळें नजरेस न आलेलीं कितीक फुलपांखरें पंखांची मनोहर उघडझाप करीत उठलेलीं दिसावींत तसें त्याच्या मनाचें झालें."

## सुविचारांचें सूचन

आनंद–केवळ आनंद–हें जरी फडके यांनीं आपल्या कलेचें ध्येय मानले असलें आणि एकाद्या तत्त्वाचा बोध कलेमार्फत करणें हें जरी त्यांना अनावश्यक वाटलें; तरी त्यांच्या नजरेचा पहारा चुकवून, केव्हां केव्हां, कोठें कोठें, कांहीं कांहीं विचारांचा प्रवेश त्यांच्या कादंबऱ्यांत होतोच. "दौलत" या कादंबरींत भय्यासाहेब वकिलांच्या द्रव्यदृष्टींत कसें अंजन पडलें हें सांगतांना फडके म्हणतात,

"चंद्रदर्शनानें कमलिनी फुलावी त्याप्रमाणें अविनाशाच्या बोलण्या-चालण्यानें निर्मलेचें हृदय पुलकित झाल्याचा प्रत्यय तिच्या मुद्रेवर कसा मिळतो तें शोधण्यांत त्यांना गंमत वाटत होती. लोकांच्या दौलतीपेक्षां लोकांच्या अंतःकरणाची सूक्ष्म हालचाल पहावयाची त्यांना आतां गोडी लागली होती आणि लोकांना सुखी करावयाचें असेल तर दौलत ओतून नव्हें, तर अंतःकरणाच्या समाधानाची जी एक दौलत प्रत्येकाजवळ असते तिच्यांत भर घालूनच केलें पाहिजे ही समज त्यांना आली होती."

## यशाचें बीज

'प्रवासी'पासून फडक्यांनीं राजकीय कादंबऱ्या लिहावयास सुरुवात केली असें मानलें जातें. पण खऱ्या अर्थानें त्यांची कोणतीच कादंबरी राजकीय नाहीं. राजकारणाची किनार कादंबरीच्या शालूला ते जोडूं लागले इतकेंच. श्रीमंत तरुणांचा शहरी शृंगार हाच 'एको रसः' त्यांच्या सर्व कादंबऱ्यांत आहे. पात्रांचीं व स्थलांचीं नांवें तेवढीं बदललेलीं, पण तेंच वातावरण, तेच प्रसंग, त्याच क्रिया व तोच रस असा सर्वत्र थाट आहे. एका कादंबरीचें नांव 'समरभूमि', पण खरोखर आहे ती स्मर–भूमिच ! प्रणय–वर्णनाच्या पुष्पहारांत राजकीय वृत्तांतांची

कात्रणें मधूनमधून हिरव्या पानासारखीं गुंफलेलीं आहेत. तीं वगळून वाचक मुख्य कथाभाग वाचीत जातो. तो इतका मोहक असतो आणि त्याची भाषा इतकी मृदु, लयबद्ध व समतोल असते कीं, त्यामुळें फडक्यांच्या कादंबरीचें वाचन म्हणजे हिरवळीच्या हिरव्यागार गालिच्यांवर लोळणें किंवा मऊ मऊ बर्फावरून खेळणें अथवा रेशमाच्या लुसलुशीत पायघड्यावरून चालणेंच वाटतें. रुक्षता, पुनरुक्ति, पाल्हाळ किंवा अव्यवस्था या दोषांचे कांटेकुटे कुठेंच बोचावयाचे नाहींत. मोहोरांचा मत्त गंध दरवळत आहे, कोकिलाचे मादक कूजन चालू आहे, पानांची शीतल छाया सर्वत्र पसरलेली आहे व फळें मधुर रसानें ओथंबलेलीं आहेत—अशा डेरेदार आम्रवृक्षाचीच उपमा फडक्यांच्या कादंबरी-वाङ्मयाला द्यावीशी वाटते.





# भा. वि. वरेरकर : : : १९

**श्री.** न. चिं. केळकर म्हणजे चिकित्सक टीकाकार. त्यांनींहि मुक्तकंठानें प्रशंसा करावी अशी कादंबरी श्री. भा. वि. ऊर्फ मामासाहेब वरेरकर यांनीं १९२८ सालीं लिहिली. या कादंबरीचा मोठा इतिहास आहे आणि तोहि फार गमतीचा आहे. ‘ गतभर्तृका पुणें ’ या टोपण नांवानें वरेरकरांनीं ही कादंबरी प्रसिद्ध केली. त्यांचें हें सोंग इतकें बेमालूम वठलें कीं, त्यामुळें केळकरहि पुरे फसले. पुण्यांतील कोणी एक विधवा आपली करुण कहाणी या पुस्तकांत लिहीत आहे अशी समजूत केळकरांची झाली. आणि त्यांनीं पुस्तक वाचून खालीं ठेवतांच मोकळ्या मनानें असा अभिप्राय दिला कीं, ‘ दोनतीन पानें उलटण्यापूर्वींच माझें मन पुस्तकानें इतकें ओढून घेतलें कीं, सर्व काम टाकून मीं तें ५॥ वाजेपर्यंत वाचून संपविलें.

मी खरोखर सांगतों कीं, इतकी सरळ व उदात्त अशी सामाजिक गोष्ट मी फार वर्षांत वाचली नाहीं. वर्णित चरित्र प्रत्यक्ष संसारांत घडून येण्या-इतकें साधें व संभाव्य; पण गोष्टीच्या दृष्टीनेंहि अत्यंत सुरस असेंच आहे. पुस्तक वाचीत असतां डोळ्यांतून कितीतरी पाणी गेलें असेल ! पूर्वी ह. ना. आपटे यांची 'पण लक्षांत कोण घेतो ?' ही कादंबरी 'करमणुकीं'-तून प्रसिद्ध होत असतांना विद्यार्थिदशेंत मी वाचली, व त्यानंतर आज ही. पण आपट्यांच्या त्या कादंबरीपेक्षां ही कादंबरी मला अधिक चटकदार वाटली. " साहित्यसम्राटाच्या या मानपत्रापेक्षां अधिक मोटी शिफारस ती काय असूं शकणार ?

## पहिल्या वर्गांतील कादंबरी

" भाषा निदान आपटे यांच्या भाषेसारखी आहे " ही केळकरांनीं केलेली प्रशंसा वरेरकरांना किती भूषणावह आहे ! याच्याहि पुढें जाऊन केळकर लिहितात, " आपट्यांच्या कादंबऱ्यांत पाल्हाळ असे, पण या कादंबरींत आटोपशीरपणा फार साधल्यामुळें थोडक्यांत उत्कृष्ट परिणाम होतो. पृष्ठ १३९ वरील चार ओळी वाचतांच 'शाबास' असे उद्गार माझ्या तोंडानें आपोआप उच्चारले. भाषेंत साधेपणा, प्रसाद व ठसठशीत-पणा किती वाटला म्हणून सांगूं ? ग्रंथकार स्त्री म्हणून जेन आस्टिनची आठवण झाली. स्वभावचित्रें उत्कृष्ट साधलीं आहेत. काका, ताई, चंदु-सर्वच पात्रें कशीं रेखीव आहेत ! सावत्र आई, सावत्र लेक यांचे संबंध उलटसुलट कितीतरी कुशलतेनें रंगविले आहेत.........ग्रंथकर्त्रीच्या वाङ्मय-नैपुण्यामुळें मी तरी तिला पहिल्या वर्गांत बसविण्यास तयार होईन. "

या कादंबरीचें नांव ' विधवा कुमारी.'

## टीकेचे विषय

अशी पहिल्या वर्गांत बसण्यासारखी ललित कादंबरी निर्माण करणारे वरेरकर नाट्यसृष्टींतहि मानाचें स्थान मिळवून बसलेले आहेत. हरिभाऊ

आपट्यांची केवळ घरगुती भाषाच त्यांनीं उचलली आहे असें नव्हे; तर आपली कला लोक-जागृतीसाठीं वापरण्याचा त्यांचा गुणहि वरेरकरांनीं घेतला आहे. अर्थात कलेच्या दृष्टीनें आपटे हे वरेरकरांपेक्षां किती तरी उंच–सर्वच मराठी कादंबरीकारांच्या शिरोभागीं शोभणारे ! पण आपट्यांपेक्षां वरेरकर नाट्यलेखनांत अधिक यशस्वी झाले आहेत. पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक-अशी जेवढी म्हणून नाट्य-विषयांची मराठींत स्थित्यंतरें झालीं आणि संगीत, गद्य, एकप्रवेशी इत्यादि नाट्य-तंत्राचीं जीं विविध स्वरूपें बदलत गेलीं; त्या सर्वांचें प्रतिबिंब वरेरकरांच्या नाट्यसृष्टींत पहावयास मिळतें. ‘ सोन्याचा कळस ’ हें त्यांचें एक गाजलेलें नाटक आहे. त्याच्या कथानकावरच आधारलेली ‘ धांवता-धोटा ’ ही त्यांची कादंबरीहि लोकप्रिय झाली. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचें क्षेत्र सामान्यतः पुण्यांतील पांढरपेशा स्त्रीवर्ग हें असे; पण वरेरकरांना पांढरपेशांचा अगदीं तिटकारा –आणि त्यांतहि पुणें म्हटलें कीं, त्यांचें पित्त भडकलेंच. किंबहुना थोड्या विनोदानें असें म्हणतां येईल कीं, पुणें, पांढरपेशा, पदवीधर व पुरुषवर्ग हा चतुर्विध ‘प’ कार समाजावर अपकार करणारा आहे अशीच भावना त्यांना जडलेली आहे ! तो एक त्यांचा मनोगंडच होऊन बसला आहे. या चतुष्टयावर ते दांतओंठ खाऊन तुटून पडतात. कोंकणचा कैवार व अबलांचा उद्धार हीं त्यांच्या तळमळीचीं स्फूर्तिस्थानें होत. कोंकणांत त्यांचें पूर्व-आयुष्य गेल्यामुळें त्याचा जसा त्यांना अभिमान आहे, तसाच, त्यांचें उत्तर आयुष्य मुंबईत जात असल्यामुळें तेथील कामगारांविषयीं त्यांना मोठा जिव्हाळा वाटतो. पुरुषशाहीविरुद्ध त्यांची लेखणी जितकी कडाडून उठते, तितकीच भांडवलशाहीवर ती त्वेषानें चाबूक उडविते.

## चौफेर कथा-लेखन

जन्म, शिक्षण व नोकरी या तिन्ही नात्यांनीं वरेरकरांचा कोंकणाशीं घनिष्ट संबंध आला आहे. १८८३ सालीं चिपळूण येथें त्यांचा जन्म झाला. मालवण, दापोली व रत्नागिरी येथें त्यांचें शिक्षण झालें. विद्येच्या मुलखांत त्यांना दूरदूरच्या मजला मारतां आल्या नाहींत. दुय्यम शिक्षणा-

वरच त्यांना आपली तहान भागवावी लागली. मॅट्रिक होण्यापूर्वींच पोस्ट-खात्यांत नोकरी धरली. पुढें ती सोडून ते मुंबईस आले. नाटकाचा छंद त्यांना लहानपणापासून होता. १९०७ सालीं त्यांनीं 'कुंजविहारी' हें नाटक रचलें. तेव्हांपासून आतांपर्यंत सतत ४५ वर्षे मामांची लेखणी अखंड चालू आहे. सत्तरीच्या घरात पोंचले, तरी रहस्यकथेसारखें तरुणांचें वाङ्मय ते लिहीत आहेत. नाटकें व कादंबऱ्या याप्रमाणेंच लघुकथा व पट-कथा यांचेंहि पीक त्यांनीं विपुल प्रमाणांत काढलें आहे.

## शरद्बाबूंचा अवतार

आणखीहि एक चिरस्मरणीय कार्य त्यांनीं करून ठेवलें आहे. तें म्हणजे शरद्बाबूंच्या कथासृष्टीचें मराठींत अवतरण. खरोखर वंगभूमींतील ही गंगाच वरेरकरांच्या भगीरथ प्रयत्नामुळें मराठीच्या मुलखांत वाहूं लागली. डॉ. शरच्चंद्र चतर्जी म्हणजे बंगालीमधील मूर्धाभिषिक्त कथा-सम्राटच. उभ्या भरतवर्षांत त्यांच्या तोडीचे कथाकार विरळा. जसें डॉ. रवींन्द्रनाथ टागोर, तसेंच डॉ. शरच्चंद्र चतर्जी हे अद्वितीय लेखक. बंगालच्या या 'रवि–चंद्रांना' जागतिक कीर्ति लाभली आहे. काव्यक्षेत्रांत रवींद्रांचें स्थान जितकें उंच, तितकेंच कथाक्षेत्रांत शरद्बाबूंचें. एक ध्येय-वादाची गगनभरारी मारणारा, तर दुसरा वास्तवतेच्या भूमीवरून कलेची गंगा वाहविणारा. विप्रदास, भैरवी, बडी दिदी, भारती, इत्यादि शरद-बाबूंच्या कादंबऱ्या जगांतील कोणत्याहि भाषेला हेवा वाटण्यासारख्या आहेत. शरदबाबूंच्या बहुतेक सर्व कादंबऱ्यांचीं भाषांतरें मराठींत करण्याचें बिकट काम वरेरकरांनीं आपल्या उतारवयांतहि पार पाडलें याबद्दल महाराष्ट्रीय वाचक–वर्ग त्यांचा कायमचा ऋणी राहील; एवढेंच नव्हे तर, आपल्यापुढें एक उच्च आदर्श ठेवल्याबद्दल मराठी लेखकवर्गहि त्यांना कृतज्ञ राहील. वरेरकरांच्या चौफेर साहित्यसेवेचा गौरव १९४५ सालीं झाला. त्यावर्षीं धुळें येथें भरलेल्या साहित्य–संमेलनाचें अध्यक्षस्थान त्यांना अर्पण करण्यांत आलें. त्या स्थानाचा सदुपयोग करण्यासाठीं त्यांनीं महाराष्ट्रभर वर्षभर दौरा काढला व जनतेंत साहित्याविषयीं जागृति केली.

## यमूच्यापुढें मथू

कादंबरीकार म्हणून वरेरकरांना कीर्ति मिळाली. 'विधवा कुमारीपासून, हरिभाऊंची ' पण लक्षांत कोण घेतो ' ही कादंबरी जशी यमूची कहाणी आहे, तसेंच हें मथूचें आत्मचारित्र आहे. यमूसारखाच मथूचाहि बाल-विवाह झालेला, सासरचा जाचहि तसाच; पण यमूपेक्षां मथू पुढच्या काळांतील आणि म्हणून अधिक बंडखोर आहे. स्त्रीशिक्षण, बालविवाह पुनर्विवाह वगैरे सामाजिक सुधारणांचा पुरस्कार आगरकरांच्या आवेशानें या कादंबरींत केलेला आढळतो. विधवांनीं कुंकू कां लावूं नये ? त्यांनीं पुनर्विवाह कां करूं नये ? पुराण कां सांगू नये ? या प्रश्नांचीं उत्तरें मथूनें आपल्या जळत्या वाणीनें व रोकड्या कृतीनें दिलेलीं आहेत. मथूचे वडील पुराणिक होते. रूढीनें अंध झालेल्या सनातनी म्हाताऱ्याचें प्रतीक म्हणजे मथूचे बाबा. त्याचप्रमाणें तिच्या सासरचे नानासाहेब हेहि सनातनी पक्षाचें नवे पण हीन प्रतीक. ते अठरा रुपये पगारावर 'केसरी' कचेरींत कंपॉ-झिटरची नोकरी करतात, श्री. खाडिलकरांपेक्षांहि आपण अधिक चांगला अग्रलेख लिहिल्याची थाप ठोकून देतात आणि सामाजिक सुधारणेला यथेच्छ लाखोली वाहतात. टिळकांविषयीं आदर पण केसरीवर राग, हे आपले दोन्ही विकार वरेरकरांनीं नानासाहेबांच्या द्वारें सहज प्रगट केले आहेत.

## विधवांना मार्ग दाखविला

मथू अकरा वर्षांची असतांनाच तिचें एका बिजवराशीं लग्न करण्यांत आलें. त्याचें वय बावन्न वर्षांचें होतें. आणि त्याला पहिली मुलगी होती ती तीस वर्षांची. तिची आई आतां मथू झाली; पण तिनेंच मथूचा आई-प्रमाणें सांभाळ केला. पुढच्याच वर्षीं मथूला वैधव्य आलें. तिला सासरीं अपशब्दच काय, पण मारहाणहि सोसावी लागली. आई वारली; मथू पोरकी झाली. बाबांनीं दुसरें लग्न केलें; मथू अनाथ झाली. तिचें सासर तुटलें; माहेर खुंटलें. तरी तिची महत्त्वाकांक्षा जबर. तिनें संस्कृत व इंग्रजी शिकण्यास सुरवात केली. ताई व काका यांनीं तिला पाठिंबा दिला. चंदूनेंहि हातभार लावला. मुंबईच्या मिशन स्कूलमध्यें राहून मथूनें मॅट्रिकची परीक्षा

दिली. जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळवून ती उत्तीर्ण झाली. चंदूच्या सूचनेवरून तिनें एकदां पुराण सांगितलें. त्यांत तिच्या पीडलेल्या आत्म्याचा उमाळा उसळला होता. त्यामुळें लोकांना तें पुराण अलौकिक वाटलें. तिचे निंदकहि स्तुतिपाठक बनले. म्हाताऱ्या बायांना तर तिच्या अंगांत देवीचा संचार झाला असाच भास झाला. पुणें, मुंबई वगैरे ठिकाणीं तिचीं पुराणें झाली. तिचें नांव छापून आलें. त्यामुळें सनातनी समाजानें विरोध सुरू केला. तो तिला असह्य झाला. शेवटी काकांच्या साहाय्यानें 'स्वदेशाला रामराम ' ठोकून ती विलायतेला गेली.

## सत्यनिष्ठा व निर्भयता

अशा या कथानकांत हृदय हलविणारे प्रसंग किती तरी आहेत. समाजाचें जबरदस्त दडपण आणि तें झुगारून देऊन वर येण्याची मथूची अनिवार धडपड--हा संघर्ष शेवटपर्यंत वाचकाचें चित्त वेधून घेतो. सत्यकाम जाबालाच्या गोत्रांतील मथू खऱ्याची चाड व खोट्याचा तिटकारा बाळगणारी असते. सत्यांतून निर्माण होणारी निर्भयता तिच्या नसानसांतून रसरसत असले. " प्राण गेला तरी आज मी लग्नाला जाणार नाहीं " असे निर्धाराचे व कराराचे उद्गार ती धैर्यानें काढते. तिची चौकसबुद्धीहि विलक्षण आहे. " खरे म्हणजे काय ? पुनर्विवाह म्हणजे काय ? ही जनता कोण ? " इत्यादि प्रश्न ती लहान वयांतहि विचारते. ' मला माझ्या स्वतःच्या मताप्रमाणं वागायचं आहे ' अशी गर्जना ती करते आणि वागतेहि तशीच.

## आईचें स्वभाव-लेखन

बिजवराशीं लग्न होण्याच्या वाटाघाटी सुरू झाल्या, तेव्हांपासून मथूचें हृदय पिळवटून निघूं लागलें. तिच्या दुःखांत तिला धीर देणारी, तिच्या पाठीवरून हात फिरविणारी व तिच्या डोळ्यांतील आसवें पुसणारी एक काय ती आई. तिचें स्वभाव–लेखन स्पष्ट व जिवंत आहे. त्या दोघी आपलें दुःख एकमेकींत मिसळून कमी करीत होत्या. आईच्या अश्रूनेंच

मथूच्या हृदयांतील आग विझत होती. त्या दोघींच्या अश्रु-मीलनामध्यें गंगा-यमुनांचें पावित्र्य होतें. तें प्रगट करतांना वरेरकर लिहितात. "आई पुनः हुंदके देऊन रडूं लागली—त्यासरशीं मलाहि रडें कोसळलें. आम्ही दोघीहि घटकाभर फुलून फुलून रडत होतों. आसवांत आसवें मिसळलीं जात होतीं; हुंदक्यांना हुंदक्यांची साथ मिळत होती—आणि धडधडणाऱ्या हृदयांचे ठोके एका आवाजांत पडत होते."

मुलीच्या दुःखानें दुःखी होणाऱ्या आईचें शब्दचित्र वरेरकरांनीं एके ठिकाणीं इतकें कौशल्यानें काढलें आहे कीं, तें हरिभाऊंनींच रंगविलें आहे असें वाटतें. तें असे, "पोथी गुंडाळून बाबा खोलीबाहेर निघून गेले. आई तशीच बसून राहिली होती. खोलीच्या कोपऱ्यांत समई मिण-मिण तेवत होती. आईच्या डोळ्यांतील एक अश्रुबिन्दु माझ्या गालावर पडला. मी उशीवरून डोळे उघडून आईकडे पाहिलें. इतक्यांत आईचीहि नजर माझ्याकडे वळली. आईच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. ती रडत नव्हती, एवढेंच. माझी नजर तिच्या नजरेला खिळलेली पहातांच माझ्या मस्तकावर हळूंच हात ठेवून ती म्हणाली, "जागी होतीस वाटतं ?"

## वर्णन-शैलीचे नमुने

लहान मुलीच्या जीवनांत लग्न म्हणजे आनंदाची केवढी पर्वणी. त्या लग्नसमारंभाचें वर्णन, 'पण' मधील यमुना कशी करते हें पूर्वीं दिलेंच आहे. आतां मथू कसें करतें पहा.

"बनीच्या घरीं लग्नाची मारे जय्यत तयारी चालली होती. सांडगे-पापड घालण्याच्या गडबडींत बनीहि स्वतः मिसळली होती. मी येत असलेली पहातांच, हातचा पोळूपाट दूर लोटून बनी चटकन् उभी राहिली आणि म्हणाली, "या आजीबाई !" मला मेल्याहून मेल्यासारखें झालें. बनीची आईही कांहीं कमी नव्हती. बनीला दाबण्याच्या मिषानें ती म्हणाली, "बने, वडील माणसांना असं टाकून बोलू नये." बनी धांवतच गेली आणि तिनें एक पाट आणून मला बसावयाला दिला. बसावें कीं न

बसावें ह्याचा विचार करीत, मी तशीच उभी राहिलें होतें. जमलेली मंडळी माझ्याकडे पाहून आपसांत फिदीफिदी हंसत होती. ”

## स्त्री-शिक्षणांतील विघ्नें

लग्नानंतर एका वर्षांत मथूला वैधव्य आलें. तिचें सासरच तुटलें. तिनें शाळेंत जावयास सुरवात केली. त्यावेळीं शिकणाऱ्या मुली थोड्या असत. त्यामुळें त्यांची कुचेष्टा पुरुषवर्ग करीत असे. तो त्रास आपल्याला किती प्रकारांनीं भोगावा लागला आणि त्याचा आपल्या मनावर परिणाम काय झाला, हें सांगतांना मथू लिहिते,

“ आम्ही दोघी रस्त्यानें जाऊं लागलों म्हणजे रस्त्यावरील मंडळी आम्हांला पाहून इतके चमत्कारिक उद्गार काढीत कीं, त्यामुळें पुरुषांबद्दल आम्हांला तिटकाराच उत्पन्न होत असे. त्या भाषणांत सभ्यतेचा लवलेशहि नसे—अश्लीलपणाची ती परमावधि होती. सुबुद्ध म्हणवणाऱ्या पुरुषांच्या तोंडून इतकी हलकट भाषा येते तरी कशी ह्याचें मला आश्चर्य वाटे. रस्त्यानें जातांना त्यांनीं आमच्यावर कागदाचे बोळे किंवा खडे मारावे, खांकरावें, खोट्या शिंका काढाव्या—असें नित्य चाललेलें असे. आम्ही रस्त्यानें जातांना वर नजर करून पहातहि नसूं—पण चुकून एकादे वेळीं वर झालीच तर, त्यांनीं डोळे मिचकवण्यास कमी करूं नये. पुरुषजातीचे हे घाणेरडे मासले पाहून मला पुरुषजातीची अगदीं शिसारी येऊं लागली. ”

## विधवेचें जिणें

घरांत व घराबाहेर—सर्वत्र मथूला हाल सोसावे लागत होते. त्यावेळीं विधवेचें आयुष्य म्हणजे नरक-यातनचा भोगणें होतें. विधवेची अनुकंपनीय स्थिती वर्णन करतांना मथू म्हणते,

“ विधवेचे जिणें किती चमत्कारिक ! स्त्री असूनही स्त्रीपणाचा अधिकार नाहीं, कुठं कशावर सत्ता नाहीं, जबाबदारी पुरुषाची—पण जन्म मात्र नुसता स्त्रीचा ! कुणाच्या आधाराशिवाय गत्यंतर नाहीं—पण आधार

मात्र कुणाचाच नसतो! कुठें काडीची सत्ता नाहीं आणि गुलामगिरी मात्र सर्वांचीच! कुणी कसेंहि वागवलें तरी, तक्रार करायला जागा नाहीं, मन मोकळें करून कुणाशीं बोलेन म्हटलें तर, जिव्हाळ्याचे कुणीच नाहींत."

## एक नवी समाज-सुधारणा

हा चोहोबाजूंनीं होणारा कोंडमारा मोडून टाकण्याचें धैर्य मथूनें दाखविलें. ती सासरच्या कोंडवाड्यांतून बाहेर पडली आणि शाळेंत जाऊं लागली. ही त्यावेळीं एक बंडखोरीच होती. दुसरी बंडखोरी म्हणजे कुंकू लावण्याची. विधवा झाल्यावरहि कुंकू लावण्याचा नवा पायंडा मथूनें पाडला. याचें कारण सांगतांना ती असा युक्तिवाद करतें, " कुंकू आपलं जन्माचं वैभव आहे. सौभाग्याचा संबंध फक्त मंगळसूत्राशीं आहे. पतीनं मंगळसूत्र बांधलं — त्याच्यामागं तें वाढवलं. कुंकू आपलं हक्काचं आहे, तें कांहीं आपल्याला पतीनं लावलेलं नाहीं — पतीच्या निधनानंतर तें काढून टाकण्याचा आपणाला मुळींच अधिकार नाहीं. आम्ही विधवा कुंकू लावीत नाहीं हा — माझ्या मतें शास्त्राचार नसून अनाचार आहे. "

केशवपन, पुनर्विवाह, प्रेमविवाह यांच्याइतकी क्रांति करणारा कांहीं हा कुंकवाचा विषय नाहीं. पण त्याचाहि तितक्याच तीव्रतेनें प्रचार वरेरकर करतात.

## मनःस्थितीचें चित्र

मथूचें संस्कृतचें शिक्षण सखोल झालें होतें. तिच्यापुढें वैधव्याचें रखरखीत वाळवंट पसरलें होतें. त्यांत त्या शिक्षणानें कांहीं शीतल झरे उत्पन्न करतां येतात कां हें पहावें, म्हणून चंदूनें तिला पुराण सांगण्यास सुचविलें. तिनेंहि तें मान्य केलें. पुराणिकबुवाचा थाट जमला. " या मथूशास्त्री " असें म्हणून काकांनीं प्रोत्साहन दिलें. वक्तृत्वाचा तो पहिला प्रसंग. त्यावेळीं मथूचीं स्थिती काय झाली याचें चित्र वरेरकरांनीं फार बारकाईनें रेखाटलें आहे. मथू म्हणते, " माझ्या उरांत धडकी भरली—पाय लटलट कापूं लागले. कशीबशी जाऊन मी व्यासपीठावर बसले आणि

" स जयति सिन्दुर्वदनः " म्हणून बाबांप्रमाणें पुराणाला सुरवात केली, बाबा संहिता वाचून नुसता श्लोकाचा अर्थ सांगत असत—पण मी अर्थ सांगूं लागलें असतां, त्याचा विस्तार मला आपोआप सुचूं लागला. मी स्पष्टीकरण करूं लागले —आणि त्यामुळं, पुराण अगदीं रंगांत आलें. सर्वांना तो प्रकार जसा अगदीं नवीन होता तसा मलाही नवीनच होता—पण मला तो कसा सुचला हें माझें मलाच कळलें नाहीं. ती पुरञ्जन राजाची कथा होती—सांगतां सांगतां मला नवीन नवीन व्याख्या आपोआप सुचूं लागल्या आणि मी स्फूर्तीच्या भरांत बेफामपणें बोलत सुटलें. "

## जिव्हाळयांचें महत्व

दुःखांत सुख मानून, संकटांना संधि समजून आणि निराशेंतून आशा धरून, मथू शिक्षणाची एकएक पायरी चढत होती. शेवटीं ती मॅट्रिकमध्यें पास झाली—आणि तीहि जगन्नाथ शंकरशेटची शिष्यवृत्ति मिळवून. त्यावेळीं ती म्हणते, "हा आनंद मी कुणाला सांगू ? ह्या आनंदाची भागी मिळवायला माझ्या मायेचें कुणींहि माणूस त्या वेळीं माझ्याजवळ नव्हतें.

तो आनंद मला दुःखाहूनहि दुःखदायक झाला. "

तिच्या आनंदाचें एक स्थान म्हणजे चंदू होता. " चंदूच्याच उदयानें माझ्या जीवन-समुद्रांत निरनिराळ्या लहरीं उत्पन्न झाल्या." असें मथू म्हणते.

## उत्तरार्धांतील पुनरुक्ति

'विधवा कुमारी'चा उत्तरार्ध म्हणजे 'परत भेट' ही कादंबरी १९३३ सालीं प्रसिद्ध झाली. आपल्या सर्वच कादंबऱ्या वरेकरांनीं स्वतः न लिहितां दुसऱ्याला सांगून लिहवून घेतल्या आहेत. पण 'परत भेट' लघुलिपीनें लिहिलेली मराठींतील पहिलीच कादंबरी. लघुलेखनामुळें अवघ्या तेवीस तासांत कादंबरीचें निवेदन लेखकाला पुरें करतां आलें.

मथू विलायतेला गेली हिंदुस्थानांतील समाजस्थितीला कंटाळून. पांच वर्षांनीं ती विलायतेहून येथें परत आली पण येथील समाज-स्थिति पूर्वींसारखीच तिला तापदायक व उद्वेगकारक आढळली. मायभूमीला भेटण्याची तिला अनिवार इच्छा होती. " बराच वेळ कठड्याला टेकून,

मुंबईच्या धक्यावर माझ्याकडे डोळे मिचकावून पहाणारे ते दिवे मी किती तरी वेळां न्याहाळले होते. त्या दिव्यांच्या लुकलुकण्यांतून हिंदुस्थानचा लुकलुकता संदेश मला दिसून येत होता " ये ! ये ! आतां किती दिवस बाहेर राहशील ? " असें डोळे मिचकावून माझी मायभूमि मला म्हणते कीं काय, असें मला वाटत होतें." असें आपल्या आगबोटीवरील मनः-स्थितीचें चित्र मथूनें रेखाटलें आहे. तिनें समुद्र–गमनाबद्दल प्रायश्चित घेतलें नाहीं. म्हणून सनातनी समाजानें तिचा छळ आरंभिला. हें बहिष्कार –प्रकरणच कादंबरीच्या पूर्वार्धाला पुरलें आहे. पुढें चंदू व त्याची बायको यांच्या खटक्यांनाच प्राधान्य आलें आहे. मथूच्या या जीवनांत हृदयस्पर्शी घटनाहि फारशा घडल्या नाहींत. पूर्वींच्याच प्रसंगांची पुनरावृत्ति व पूर्वींच्याच विचारांची पुनरुक्ति त्यांत आली आहे. त्यामुळें नावीन्याची ओढ कादंबरीत फारशी नाहीं. शेवटीं पुराण चालू असतांना बाबांची भेट मथूला होते व ते तिची प्रशंसा करतात एवढाच काय तो रसपूर्ण प्रसंग आहे. शेवटीं मथू मिशनऱ्यांच्या शाळेंत शिक्षकाचें काम करतें.

## कामगारांचा कैवार

विधवांचा उद्धार हा ' विधवा कुमारी ' या कादंबरीचा विषय जितका हृदय हलविणारा; तितकाच कामगारांचा कैवार हा ' धांवता धोटा ' या कादंबरीचा विषय अंतःकरणांतील भावना हेलावणारा. मुंबईत मुंग्या-प्रमाणें कामगारांची वस्ती. पण त्यांच्यांत ज्ञान नाहीं, संघटना नाहीं, धैर्य नाहीं. प्रतिकार-शक्ति नाहीं, उलट आहे विस्कळितपणा व व्यसनीपणा. त्यामुळें दैन्यांत, कष्टांत, हालांत, अज्ञानांत, घाणींत, जुलमांत लाखों काम-गारांना आपलें जिणें कंठावें लागतें. त्यांच्या श्रमाच्या घामावर गिरणीवाले श्रीमंतीचें पीक काढतात. एका मुंबईत श्रीमंतीचे दोन ध्रुव नांदत आहेत. त्या दोन्ही ध्रुवांचें एकत्र दर्शन घडविणारी कादंबरी म्हणजे वरेरकरांची ' धांवता धोटा ' हीच. तिच्या अणूरेणूमध्यें कामगारांचे श्वासोच्छ्वास भरलेले आहेत. गिरणगांवचें व मलबार हिलवरचें–अशीं दोन्ही वातावरणें वरेरकरांनीं खुबीनें एकत्र रंगविलीं आहेत.

## कथानकाचें सूत्र

कारखानदार व कामगार—या दोघांचीं दोन जगें अगदीं भिन्न. त्यांचा सांधा जोडण्यासाठीं या कादंबरींत वरेरकरांनीं असें दाखविलें आहे कीं, एका गिरणीवाल्याचा मुलगा 'काश्मीरला जातों' असें म्हणून परळच्या कामगारवस्तींत गेला व कान्होबा या नांवानें वावरूं लागला. कामगारांची सत्यस्थिति जाणावी या हेतूनें तो तेथें रहात होता. त्यासाठीं त्यानें गिरणींत मजुराची नोकरीहि धरली. त्यामुळें त्याला मॅनेजरचा उद्दामपणा प्रत्यक्ष पहावयास मिळाला आणि त्याबरोबर त्यानें त्या मॅनेजरला लाथेनें तुडविलें. त्या पराक्रमामुळें मजुरांनीं त्याला आपले पुढारी बनविलें. त्यानें एक संपहि चालविला. त्यामध्यें लाठीमार, गोळीबार—सारे प्रकार झाले. शेवटीं तो विलायतेला गेला.

त्याची वाग्दत्त वधू हंसा. ती एका कारखानदाराची मुलगी. श्रीमंतीचा तोरा तिच्या ठायीं नव्हता. त्यामुळें ती मजुरांच्या चाळींत जात असे. त्या चाळींत बिजली नांवाची एक बंडखोर, जहांबाज तरुणी होती. तसाच होता एक म्हातारा कामगार. त्याचें नांव बाबा शिगवण. त्याच्या तोंडून वरेरकरांनीं आपलें मजूरविषयक तत्त्वज्ञान प्रगट केलें आहे. त्याचा नातू पांडू कथानकावर वात्सल्यरसाचे तुषार उडवितो.

## उत्सुकतेची खुबी

कान्होबानें वेषांतर केलेलें असल्यामुळें कादंबरींत पहिल्यापासूनच रहस्यमयता व त्यामुळें उत्सुकता उत्पन्न झाली आहे. त्याच्या अंतःकरणांतील उपजत श्रीमंती व त्यानें पांघरलेली गरिबी या दोन वृत्तींचे हेलकावे व झगडे वरेरकरांनीं मोठ्या कुशलतेनें रंगविले आहेत. बाबा शिगवणच्या दरिद्री कुटुंबांत त्याला माणुसकीचा, प्रेमाचा, जिव्हाळ्याचा केवढा खाजिना आढळतो! बिजलीचें तेज पाहूनहि त्याचे डोळे दिपतात. त्याचें प्रेमच तिच्यावर जडतें. बिजली व हंसा या दोन ध्रुवांवर रहाणाऱ्या स्त्रिया. पण त्यांची गांठ घालून देऊन व त्यांच्या जीवनांचे गोफ एकमेकांत गुंतवून वरेरकरांनीं मोठी मौज निर्माण केली आहे. हंसाची मोटार परळमध्यें

मजुरांच्या वस्तींत येते, याचे किती विचित्र पडसाद मजूर–स्त्रियांच्या तोंडून निघतात ! त्या मोटारींत बसून बिजली हंसाच्या बंगल्यावर जाते, याचे परिणाम मजुरांच्या चाळीवर व कारखानदारांच्या बंगल्यावर किती भिन्न भिन्न होतात, हेंहि वरेरकरांनीं मोठ्या चातुर्यानें दाखविलें आहे. परळला राहूनच काश्मीरहून आल्याची बतावणी कान्होबा करतो, तो प्रसंगहि बहारीचा आहे.

क्रोध, करुणा, मत्सर, वात्सल्य इत्यादि नाना रसांच्या लाटा या कादंबरींत उचंबळतात. त्यामुळें ही कादंबरी सुमारें पांचशें पानांची असूनहि कंटाळवाणी कोठेंच होत नाहीं. गिरण्यांची मालकी मजुरांनीं मागावी हा विचार या कादंबरींतून वरेरकरांनीं मराठींत प्रथमच मांडला. मजुरांचेहि दोष दाखवून ते दूर करण्याचा उपदेश बाबाच्या जळजळीत वाणीनें वरेरकरांनीं केला आहे.

## सहज साधलेली कोटि

कादंबरींत प्रसंगपरत्वें भिन्न भिन्न स्थळांचीं वर्णनें व वेगवेगळ्या व्यक्तींचीं चित्रणें पुष्कळच आलीं आहेत. एक धूर, पण त्याचे प्रकार किती ! आणि त्यांचे परिणाम तरी किती ! धुरावर कोटी करून विरोध दाखवितांना वरेरकर लिहितात—" गिरणीचा धूर, कापसाच्या भुशाच्या धूर, रस्त्यावरच्या धुळीचा धूर, घासलेटाच्या टमरेलाचा धूर आणि अन्न शिजवायच्या चुलीचा धूर, असं सगळ्या धुराचं एकीकरण करून तें आम्ही रोज पचवीत असतों. कोंकणात धूर दिसला कीं घराला आग लागली असं कोणाला तरी वाटतं, पण इथं धूर नसला तर पोटाला आग लागतें. हा धूर आम्ही पचवतों म्हणून वाळकेश्वर-महालक्ष्मीला सोन्याचा धूर निघतो आहे. या धुरानं आमचं काळीज जळून जातं आहे, म्हणूनच मोटारींतून फिरणाऱ्या गिरणीवाल्यांचीं पोटं वाढताहेत. या धुरानं आमचीं तोंडं काळीं पडताहेत म्हणूनच श्रीमंत लोक उजळ माथ्यानं मोटारी उडवीत आहेत. आमचं खरं अन्न म्हणजे धूर."

मजुरांचें आयुष्य किती तापदायक असतें हें बाबा शिगवण आवेशपूर्ण वाणीनें सांगतो. तो म्हणतो, " चंगळ आहे खरी; पण ती दारिद्र्याची—

उठतां बसतां लाथाबुक्क्या खाण्याची--चंगळ आहे अर्ध्यापोटीं मरण्याची. आम्ही असे मरत आहोंत म्हणूनच तुमच्या चैनी चालल्या आहेत. आमच्या पिळलेल्या हाडाच्या रसानं तुमचे देह पुष्ट झाले आहेत. जाणूनबुजून छळ करायचा, चवदा चवदा तास नोकरांचा छळ करायचा, आणि वर चंगळ आहे काय? म्हणून विचारायचं, हें गाद्या-गिरद्यांत लोळणाऱ्या गिरणीवाल्यांनाच शोभायचं."

## प्रेरक भाषा

सर्कशींतील रिंगमास्तर चाबूक उडवून जनावरांना जसें दाबांत ठेवतों, तसा बाबा शिगवण कडाडतोः—" तुम्ही गाढवांची शिंगरं, पगाराचा वारा कानांत शिरतांच चौखूर उधळून जातां, म्हणूनच तुमच्या पाठीवर हे गोण्या लादतात. अशी एक पांचा बोटांची मूठ करा, घट्ट आंवळा आणि टोसा लगावा, कीं पहा वर्मीं घाव बसतो आहे कीं नाहीं तो!

" कमी तास मागूं नका. अधिक मजुरी मागूं नका. कमी काम मागूं नका. जास्त माणसं मागूं नका. मागायचं असलं तर गिरण्या मागा. मागायची असलं तर मालकी मागा. ती तुमच्या सत्तेची आहे. तुमच्या रक्ताचे खच पडले आहेत तिच्या पायीं. तुमच्या पोरांबाळांचे प्राण गेले आहेत तिच्यापायीं. देव प्रसन्न झाला तर त्याच्याकडे काय नुसता भोपळा मागायचा? देवाकडे मागायचं म्हणजे देवाचं देवपण मागावं लागतं."

मजुरांच्या दारुबाजीचे दुष्परिणाम बाबाला पक्के माहीत असल्यामुळें तो म्हणतो " तुम्हां गिरणबाबूंचा कधीं सत्यानाश होणार असेल, तर दारूच्या पायींच होईल. तुमचा प्रत्येक संप या दारूच्या पायींच मोडेल. तुमच्या प्रत्येक चळवळीच्या मुळाशीं सुरुंगासारखी ही पातळ दारू आहे. आधीं लढाईच्या सामानाची तयारी करा. लोकांत शिस्त उत्पन्न करा, निर्व्यसनी व्हा आणि मग संप पुकारा, तरच तुम्हांला यश येईल."

## शब्द-चित्रें

कांहीं कांहीं स्वभावचित्रें या कादंबरींत वरेरकरांनीं फार सुंदर रेखाटलीं आहेत. सुरवातीसच परळ येथील सत्यनारायणापुढें पैसा न ठेवतां नमस्कार

करून जाणारा कान्होबा भेटतो. अठरावीस वर्षांच्या त्या तरुणाचें शब्द-चित्र वरेरकरांनीं कसें रेखाटलें आहे पहा, " कान्होबा ताकदवान होता. शरीर कमावण्याचे धडे त्यानें आखाड्यांतून घेतले होते; त्यामुळें रस-रसणारें रक्त नोकराच्या तेव्हा उत्तरानें उसळून निघालें यांत नवल नाहीं. त्याचा चेहरा लालबुंद झाला होता, मस्तकावरच्या शिरा ताडताड उडत होत्या. डोळे रागाच्या बेफाम आवेशानें बाहेर फुटून निघतील कीं काय, असें वाटत होतें. बेफाम रागाच्या अनावर वाऱ्यानें चढून वळवळणारी हाताची मूठ त्यानें केव्हां उगारली व तिचा ठोसा सुपरिंटेंडेंटच्या छातींत केव्हां दिला, हें कुणाला कळलेंदेखील नाहीं. "

हंसा व बिजली या दोन्ही तरुणी सुंदर होत्या, पण त्यांच्या सौंदर्यांत अंतर काय होतें हें सांगतांना वरेरकर लिहितातः—" बिजलीहि तितकीच सुंदर होती. पण बिजलीच्या डोळ्याची खळबळ आकाशींच्या बिजली-सारखी होती. बिजलीच्या चेहऱ्यावर गंभीरपणा नव्हता; पण सत्याचें तेज तिच्या चेहऱ्याच्या प्रत्येक रेषेंत दृग्गोचर होत होतें. बिजलीच्या हाल-चालीहि चित्रकाराला नव्या कल्पना सुचविणाऱ्या होत्याच; पण त्यांचा प्रकार मात्र पहिल्या चित्राच्या अगदीं उलट होता. श्रीमंतांच्या टेबलावर बहुमोल सोन्याच्या फुलदाणींत गुलाबाचें पाणी शिंपडून ठेवलेलें फूल आणि आकाशींच्या दवानें टवटवीत झालेलें रानांतल्या वेलीवरचें फूल या दोहोंच्या सौंदर्यांत जो फरक हृदयपूर्ण चित्रकाराच्या नजरेला दिसेल, तोच फरक दोघींच्या तुलनेनें कान्होबाला दिसला. "

## रसपूर्ण स्थळें

बाबा शिगवणाच्या गरीब घरांत कान्होबाला जो जिव्हाळा आढळला, त्याचा एक उद्रेक म्हणजे कान्होबाला पहिला पगार झाला तो दिवस. त्या दिवशीं " पगाराची रक्कम म्हातारीच्या पुढें ठेवून कान्होबानें तिच्या पायावर डोकें ठेवलें. तिनें मोठ्या प्रेमानें त्याला उठवून बसविलें, हाताचीं बोटें मोडून त्याच्यावरून ओवाळली आणि त्याच्या मस्तकावर हात ठेवून उदंड आयुष्याचा आशीर्वाद दिला.

कान्होबाच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. म्हातारीनें पगाराची रक्कम उचलून पुनः त्याच्या खिशांत टाकली. कान्होबा कांहीं केल्या ऐकेना. बळेंच ती रक्कम म्हातारीच्या हातावर ठेवून त्यानें तिची मूठ वळविली आणि तो म्हणाला, " अजूनपर्यंत पैशावांचून माझं कांहीं अडलं नाहीं आणि आतांच कोणत्या तोंडानं मी हे पैसे खिशांत टाकूं ? जेव्हां जरूर लागेल तेव्हां मागतोंच आहे पूर्वीच्यासारखा ! "

म्हातारीच्या डोळ्यांतूनही आनंदाश्रूंच्या धारा येत होत्या."

## समतेचा पुरस्कार

स्त्रीपुरुषांच्या समतेचा एकांतिक पुरस्कार मोठ्या हिरिरीनें वरेरकरांनीं ' गोदू गोखले ' या कादंबरींत केला आहे. पूर्वार्धात तिच्या लहानपणीं घडलेल्या गोष्टी दिल्या आहेत आणि उत्तरार्धात तिच्या कॉलेजमधील जीवनाचा अनुभव चित्रित केला आहे. ' विधवाकुमारीं'तील मथूप्रमाणेंच, तीहि मॅटिकमध्यें चौदाव्या वर्षी जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळविणारी-किंबहुना पाहिली आलेली असते. एका मुलीनें इतकें उच्च यश मिळवावें याचें वैषम्य, मत्सर, रागहि पुरुष-विद्यार्थ्यांना वाटतो. फार काय, तिच्या भावालाहि वाटतो असें वरेरकरांनीं दाखविलें आहे. टवाळ मुलांनीं विद्यार्थिनींची पुलावर बसून चेष्टा केली, तर त्यांना कॉलेजचे प्राचार्य कडक शासन करीत नाहींत, याचें कारण त्यांच्या अंगीं मुरलेला पुरुषजातीचा अभिमान असें वरेरकर सांगतात, तेव्हां त्यांचा पुरुषद्वेष किती परमावधीला पोहोचला आहे व तो किती मिथ्या आहे, निराधार आहे हें कोणालाहि पटतें. पुरुषशाहीप्रमाणेंच पुणेशाहीच्या तिटकाऱ्यांचेंहि तुणतुणें वरेरकरांनीं याहि कादंबरींत वाजविलें आहे, तेंहि असेंच अकारण आहे.

## समाज-सेवेची सर्वांगीण दृष्टि

स्त्री-पुरुष आणि मालक-मजूर या वर्गभेदाविरुद्ध वरेरकरांनीं आपलें तिखट हत्यार जसें जोरानें चालविलें आहे; तसेंच तें समाजांतील इतर अनेक दोषांवरहि उगारलें आहे. आय. सी. एस्. झालेल्या श्रीमंत सुशिक्षिताची थिल्लर वृत्ति त्यांनीं ' तरतें पोलाद ' या कादंबरींत धारेवर

धरली आहे, तर ' पेटतें पाणी ' या कादंबरींत दारूबाजीमुळें घडणारा अनर्थ वर्णिला आहे, ' सात लाखांतील एक ' यांत गांवकीचें चित्र त्यांनीं उभें केलें आहे. तर ' द्राविडी प्राणायाम 'मध्यें सट्टेबाजीमुळें संसाराची धूळधाण कशी होते हें ' लाजवंती 'च्या चरित्रावरून दाखविलें आहे. ' भानगडगल्ली ' या कादंबरींत १९३० सालच्या राजकीय चळवळीचा इतिहास आत्मचरित्राच्या रूपानें मांडला आहे. समाजाला पोषक असे पुरोगामी विचार, हरिभाऊ आपल्यांच्या घरगुती भाषेनें, पण त्यांच्याहून अधिक तीव्रतेनें मांडण्यांत वरेरकर यशस्वी झाले आहेत. पात्रानुरूप भाषा, स्वभावाचा परिपोष व रसाची उत्पत्ति या कला-गुणांचें प्रमाण त्यांच्या लेखणींत मर्यादितच असलें, तरी गोमस्या भाषेंत चोखटे विचार चटकदारपणें मांडण्यांत त्यांचा हातखंडा आहे.





## सौ. मालतीबाई बेडेकर : : २०

कांहीं कांहीं कादंबरीकार आपल्या नांवाचें नाटकच करतात ! ‘ विधवा कुमारी ’ ही कादंबरी रचणारी ‘ गतभर्तृका ’ महाराष्ट्रांत किती कुतूहलाचा विषय बनली होती ! तसेंच ‘ संदेशभाऊजींना ’ पत्र लिहिणारी ‘ वत्सलावहिनी ’ याच्या लेखणीनें महाराष्ट्राला विस्मयाचें व कौतुकाचे केवढे धक्के दिले ! तशीच ‘ विभावरी शिरूरकर ’ या नांवाच्या लेखिकेनेंहि १९१३ सालीं खूप खळबळ माजविली. फरक इतकाच कीं, पहिल्या दोन नांवाचे बायकी बुरखे पांघरणारे पुरुष निघाले, पण तिसऱ्या नांवाच्या पडद्याआड होती एक स्त्रीच. तरीसुद्धां कांहीं चौकसबुद्धीच्य डोकेबाज टीकाकारांनीं पूर्वींच्या अनुभवावरून असा शोध लावला कीं,

विभावरी शिरूरकर हें नांवसुद्धां एखाद्या पुरुष–लेखकानेंच धारण केलें असावें. एवढेंच नव्हे तर श्री. वरेरकर यांच्याकडेच कांहीं लोक मिस्किलपणें बोट दाखवूं लागले.

## रहस्याचा स्फोट

याचें एक कारण तर असें कीं, त्यांनींच पूर्वीं बायकी बुरखा पांघरून 'विधवा कुमारी' ही कादंबरी महाराष्ट्रापुढें टाकली आणि साहित्यसम्राटासहि चकविलें. या टकवाटकवीइतकेंच दुसरेंहि एक कारण वरेरकरांवर आळ येण्यास पुरेसें होतें. तें म्हणजे 'भा. वि. वरेरकर' या नांवांतील अक्षरांचीच जरा फिरवाफिरव केली कीं, 'विभावरी शिरूरकर' हें नांव तयार होतें. कांहीं उद्योगी लोकांनीं तर मुंबई विद्यापीठाचीं जुनीं दप्तरें, गुप्त पोलिसांच्या अभिनिवेशानें, पालथी घातलीं. पण त्यांना 'विभावरी शिरूरकर बी. ए.' हे अपेक्षित–किंवा संशयित–नांव गवसलें नाहीं. असे कैक रिकामटेकडे संशोधक संभ्रमाच्या डोहांत गटंगळ्या खात असतांना खुद्द लेखिकेनेंच पुढें एका प्रगट भाषणांत जाहीर केलें कीं, "विभावरी शिरूरकर म्हणजे मी–बाळूताई खरे!"

## पी. ए. ची पदवी

बाळूताईचा जन्म अलिबाग जिल्ह्यांतील आवास ह्या गांवीं १९०६ सालीं झाला. त्यांचें बालपण घोडनदी येथें गेलें. त्यांचे वडील बहुश्रुत व समाज-सुधारक होते. त्यांना तीन मुलगे व पांच मुली झाल्या. या पांचहि मुलींनीं जोड–पदवीधर होण्याइतकें शिक्षण घेतलें. घरची स्थिती गरिबीची. परंतु त्यांच्या आई इंदिराबाई ह्या मोठ्या महत्त्वाकांक्षी व कर्तबगार. त्यांनीं स्वतः पंचवीस वर्षें डेअरीचा धंदा व्यवस्थितपणें चालविला. दासबोध, नवनीत, संस्कृत श्लोक वगैरे बाळूताईकडून वडिलांनीं पाठ करून घेतलें होतें. बाळूताईची बुद्धि मूळची चणचणीत. दहाव्या वर्षींच त्या मराठी सातवी यत्ता उत्तीर्ण झाल्या. १९१७ सालीं त्या हिंगण्याच्या वसतिगृहांत दाखल झाल्या. तेथील परीक्षाहि भराभर उतरून त्या १९२३ सालीं 'गृहीतागमा' (त्यावेळची जी. ए.) झाल्या. प्रिं. अण्णासाहेब कर्वे व प्रि. वामन-

राव जोशी या दोन थोर गुरूंची छाप त्यांच्या अंतःकरणावर पडली. १९२८ सालीं, अलंकार–मंजूषा नांवाचा संशोधनपर प्रबंध लिहून त्यांनीं ' प्रदेयागमा ' ( पी. ए. ) ही पदवी पटकावली.

## अनुभवाचें भांडवल

पुण्याच्या कन्याशाळेंत शिक्षिका म्हणून १९२३ सालापासून बाळूताई काम करूं लागल्या. तेथें आपल्या गुणांनी त्या मुख्याध्यापिका झाल्या. तेरा वर्षे शिक्षकी केल्यानंतर १९३६ सालीं त्यांनीं ती नोकरी सोडली. या शिक्षकींतील अनुभवांचें प्रतिबिंब ' हिंदोळ्यावर ' या त्यांच्या कादंबरींत पडलेलें आढळतें. १९३७सालीं सोलापूर येथील 'गुन्हेगार जमातीच्या वसाहतींत ' सरकारी अधिकारी म्हणून त्यांनीं काम पत्करिलें. त्या जमातीच्या गुलामी जीवनाचें त्यांनीं जवळून निरीक्षण केलें. त्याचें फल म्हणजे त्यांची 'बळी' ही कादंबरी. त्या गुन्हेगारी वातावरणांत तीन वर्षे काढल्यावर, त्यांनीं ती नोकरी सोडली. १९३८ सालीं त्यांचा विवाह श्री. विश्राम बेडेकर यांच्याशीं झाला. त्यामुळें सौ. मालतीबाई बेडेकर या नांवानेंच त्या वावरूं लागल्या. सांप्रत समाजवादी पक्षांत राहून त्या सार्वजनिक कार्य करीत असतात. ' साखरपुडा ' या बोलपटाची कथा त्यांनीं लिहिलेली आहे. ' पारध ' व ' वहिनी आली ' या दोन नाटिकाहि त्यांनीं रचिल्या आहेत. ' विभावरी शिरूरकर ' या नांवानें त्यांनीं जसें ललित लेखन केलें, तसेंच आपल्या खऱ्या नांवानें ' अलंकार–मंजूषा ' व हिंदुव्यवहार–धर्म–शास्त्र' हे दोन गंभीर प्रबंध रचले. दुसऱ्या प्रबंधाच्या कामीं श्री. का. न. केळकर यांचें सहकार्य त्यांनीं घेतलें होतें. त्यांच्या भगिनी सौ. कृष्णाबाई मोटे याहि चांगल्या लेखिका व कार्यकर्त्या आहेत.

## समाज–सेवा व साहित्य–सेवा

मालतीबाईंचीं मतें ठाम, भाषा धारदार आणि विषय वास्तव असतात. गेल्या शंभर वर्षांत महाराष्ट्रामध्यें कवयित्री, कथा लेखिका, कादंबरीकर्त्री म्हणून पुष्कळ महिला पुढें आल्या आहेत. परंतु मालतीबाईप्रमाणें सामाजिक दृष्टीनें क्रांतिकारक विचार कलात्मक रीतीनें मांडणाऱ्या लेखिका

थोड्या. गेल्या शंभर वर्षांत राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणारी महाराष्ट्रीय महिला एखादी तरी सांपडेल कीं नाहीं याची वानवाच ! पण सामाजिक कार्य करणाऱ्या स्त्रिया बऱ्याच आहेत आणि ललित लेखन करणाऱ्या तर त्याहून अधिक आहेत. परंतु सामाजिक कार्य व ललित लेखन हीं दोन्ही कामें करणाऱ्या मालतीबाईसारख्या लेखिका विरळा. समाजाच्या प्रत्यक्ष अनुभवाप्रमाणेंच नवीन शास्त्रीय विचारांची बैठकहि त्यांच्या लेखनाला लाभलेली आहे.

## कथावस्तूंतील क्रांति

मालतीबाईंच्या कादंबऱ्यांचें स्वरूप अंतर्बाह्य वास्तव आहे. मराठी कादंबरींच्या प्रारंभ-कालांत अद्‌भुत कथानकें रंगविलीं जात. त्यानंतर राजा किंवा एखादी थोर विभूति यांच्या गौरवाचीं कथानकें पुढें आलीं. परंतु कादंबरीकाराची दृष्टि जसजशी चिकित्सक बनत गेली, तसतसा वरिष्ठ वर्गाचे दोष व कनिष्ठ वर्गाचे गुण यांनाहि कादंबऱ्यांत वाव मिळूं लागला. एक व्यक्ती केवळ गुणसंपन्न व दुसरी केवळ दोषसंपन्न अशी फाळणी करण्याची अवास्तव पद्धत बंद झाली. प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव गुणदोष-पूर्ण असतो, या सत्यस्थितीचें प्रतिबिंब मराठी कादंबऱ्यांत उमटूं लागलें. अस्पृश्य, शेतकरी, कामकरी, यांच्या कळवळ्याचा पूर मराठी कादंबऱ्यांत एके काळीं आला. त्यांत त्या वर्गाची केवळ उजळ बाजूच सहानुभूतीनें रंगविली जात असे. पण आतां अशा दीनदरिद्री वर्गांतहि द्वेष, मत्सर, व्यसनादि दुर्गुण भरलेले असतात, ही सत्यस्थितीहि पुढें येत आहे. मनुष्य हा मनुष्यच आहे—देव नाहीं किंवा दानव नाहीं असें यथार्थ चित्रण करणारे जे थोडेफार कादंबरीकार सध्यां मराठींत आहेत, त्यांत मालतीबाईंना मानाचें स्थान खास आहे. त्यांच्या डोक्यांत समाज-शास्त्राचे विचार आहेत आणि त्यांच्या हृदयांत समाजाविषयीं कळकळ आहे. तशीच त्यांची लेखणी निर्भय व निःसंकोच आहे. जे विकार प्रगट करण्यास दुसरे लेखक कचरतील, तेहि त्यांची लेखणी बेडरपणें मांडूं शकते. या सर्व गुणांमुळें त्यांच्या पात्रांत जिवंतपणा व कादंबऱ्यांत जळ-जळीतपणा आलेला आहे.

## लेखिकांचें कार्य

पशूंतून मानव हळूहळू कसा उत्क्रांत होत जातो, याचा चित्रपट मालतीबाईंनीं ' बळी ' या कादंबरीत उलगडून दाखविला आहे. अमेरिकेंतील गुलामांचे अमानुष हाल आपल्या लेखणीनें जनतेपुढें मांडून त्यांचीं मनें प्रक्षुब्ध करणारी एक स्त्रीच होती. तिचें नांव मिसेस स्टोव्ह. ( Stowe ) तिनें ' अंकल टॉम्स कॅबिन ' नांवाची कादंबरी लिहिली आणि गुलामगिरी गाडण्यास प्रेरणा दिली. मालतीबाईनीं गुन्हेगार जातींतील लोकांची दुर्दशा ' बळी ' या कादंबरींत आपल्या भेदक वाणीनें रंगविली. पण गुन्हेगार जातींना स्वतंत्र होण्याचें श्रेय कांहीं त्यांच्या लेखणीला घेतां येणार नाहीं. कारण कॉंग्रेस सरकारनें त्या जातींना मुक्त केल्यानंतरच ' बळी ' ही कादंबरी बाहेर आली आहे. परंतु कांटेरी तारांच्या कुंपणांत मानवजात किती अधोगत अवस्थेला पोंचली होती, याचें परिणामकारक चित्रण मराठींत प्रथमच करण्याचें श्रेय मात्र त्यांचेंच !

## माणसांचा कोंडवाडा

चोरी हेंच चरितार्थाचें साधन करणारे मांग—गारुडी, कैकाडी—पारधी वगैरे अनेक वन्य जाती आपल्या समाजांत आहेत. त्यांची स्वतंत्र वसाहत करण्याचा कायदा ब्रिटिश सरकारनें पूर्वीं केला होता. त्या वसाहतीभोंवतीं एकेरीं—दुहेरी कांटेरी तारा असत आणि त्या वसाहतींतील लोकांना दिवसांतून एकदां, दोनदां, तीनदां हजेरी द्यावी लागे. कैदखान्यांतील वॉर्डर्सच्या जुलमालाहि लाजवतील असे अत्याचार त्या गुन्हेगार स्त्री-पुरुषांवर होत. कांहीं ठिकाणीं त्यांच्या वसाहतीची व्यवस्था खिस्ती मिशनऱ्याकडे असे. तेथें तर धर्मांतराची पोळी पिके. सारी कंगाली, सारीं व्यसनें, सारे गुन्हे यांची जणुं जत्राच त्या वसाहतींत भरे. गुन्हेगार सुधारण्याऐवजीं बिघडूं मात्र लागत. म्हणून कॉंग्रेस सरकारनें १९५० सालीं त्या कांटेरी तारा तोडल्या आणि गुन्हेगारांना माणुसकीच्या स्वतंत्र वातावरणांत आणून सोडलें.

## विकासाची धडपड

या क्रांतीचें चित्रण ललित वाङ्मयांत करावयाचें, तर तें एकाच व्यक्तीला डोळ्यापुढें ठेवून केलें पाहिजे. कोणतीहि ललितकृति परिणामकारक होण्यासाठीं, समुदायाऐवजीं एक व्यक्ती घेणें, तात्त्विक विचारापेक्षां भावना रंगविणें, आणि अमूर्तापेक्षां मूर्ताकडे लक्ष वेधणें अवश्य असतें. म्हणूनच लेखिकेनें ' आबा ' हा विकासशील तरुण नायक म्हणून निवडला आहे. तो मूळचा त्या गुन्हेगार वसाहतींतलाच. पण व्ह. फा. झालेला, इंग्रजी सहावीपर्यंत शिकलेला आणि सेवाग्रामच्या गांधीबोर्डिंगांत राहून आलेला. त्यामुळें त्याच्या डोळ्यांत समतेचें, स्वाभिमानाचें, माणुसकीचें तेज खेळूं लागलें होतें. त्या नव्या डोळ्यांनीं तो त्या जुन्या वसाहतींकडे पहात होता. त्याचें शरीर नरकांत रुतलें होतें, पण मन स्वर्गांत भराऱ्या मारीत होतें. त्याच्या जिवाची ओढाताण चालली होती. या घाणेरड्या दरींतून आपण वर निघावें आणि आपल्या जातभाईंनाहि वर काढावें अशी त्याची तळमळ व धडपड. या तळमळीचें व धडपडीचें वास्तव चित्रण या कादंबरींत तुटक व तिखट भाषेनें केलेलें आहे.

## चोर-वस्तीचें वर्णन

पानवडच्या चोरवस्तींत 'जगानें पापासारखी ओवाळून टाकलेली मानवता धांपा टाकीत तळमळत पडली होती.' ती बस्ती चरितार्थासाठीं बाहेर पडे, तेव्हांचें दृश्य कसें दिसे? तर " पोटाचे भलेबुरे सारे मार्ग चोखाळायला संभावित माणसांप्रमाणें ती वस्ती रोज खोऱ्याबाहेर पडे. पोलिसांच्या नजरेखालीं रांगा नि रांगा. कितीक स्त्रिया, कितीक पुरुष नि कितीक पोरें. ब्रह्मयानें माणसें निर्माण करतांना उरलीसुरली ओंगळ माती चिवडून टाकलेली—जणुं रस्त्यानें जिवंतपणाचें नाटक करून जात होती. सुंदरता अवकळा घेऊन स्त्रीरूपानें धांवत होती. ओजस्विता आणि तेज हतबुद्ध होऊन पुरुषांच्या मातींत लुप्त झालें. पोरें रानोमाळ हिंडत होतीं."

## गिरणींतील लोंढे

पानवडीजवळच गगनवाडी नांवाचें गांव होतें. तेथील गिरणींत काम

करणाऱ्या मजुरांची स्थिति कशी असे ? " सकाळचे सहा वाजले कीं असंख्य कष्टाळू दरिद्र्यांना सामावून घेणाऱ्या गिरण्या भुकेनें जणुं आक्रंदून " या ऽऽ " म्हणून आपले बळी पोटांत घेत आणि संध्याकाळीं सहा वाजले कीं पुनः आक्रंदून माणसांचीं चिपटीं बाहेर टाकीत. त्यावेळीं गगनवाडीच्या रस्त्यावर दरिद्र्यांचीं पेवें फुटल्यासारखी मजूरमंडळी बाहेर पडत आणि आपल्या खुराड्यांतील ममतेच्या आश्रयाकडे धांवत. "

तेथलें किळसवाणें स्वरूप लेखिकेनें पुढील मोजक्या शब्दांनीं वर्णिलें आहे.

" आबा वस्तीवर आला तों ती वस्ती जणुं रोमारोमांचें मुख उघडून ओरडत होती. गिरण्यांतून बाहेर पडलेले पोटार्थी जीव घर म्हटल्या जाणाऱ्या मोकाट जमिनीकडे धांवत सुटले होते. ताडी पिऊन, झिंगून बायका आणि पुरुष मोठमोठ्यानें ओरडत होते. अंतःकरणांतला सारा द्वेष, तिटकारा, मनमानेशी अमंगल वाणी पेहरून ओकला जात होता. सारा दिवस एकटेपणानें कुत्र्याच्या पोरांसारखी केकाटत राहणारीं पोरं आईबाप आल्याच्या आनंदांत अधिकच असहायपणें केकाटूं लागली आणि श्रमांनीं जेर झालेल्या आयांच्या मायेचे झरे आटून त्या पोरांच्या पाटींत रट्टे घालूं लागल्या. "

## ' आई सांपडली '

त्या चोरवस्तीतील घरें कशीं होतीं ? " तें घर म्हणजे एका माणसाला हातपाय पसरून निजतां येईलशी झोपडी, त्यांत रांगत जावें लागे असें कवाड. खिडकीं नाहींच. कुडांतून जाळ्या–जळमटें, कीड-मुंगीची रहदारी. मडक्यांत न झाकलेलें अस्वच्छ पाणी, मलिन कपड्यावर पसरलेलें अमंगल अन्न–अमंगल माणसें. " आबा त्या बोर्डिंगांतील स्वच्छ व प्रशस्त वातावरणांतून अशा खुराड्यांत आला होता. त्याचें मन गुदमरूं लागलें. त्याला किळस आली तेथील ओंगळ स्त्री–पुरुषांची—प्रत्यक्ष आईबापाचीहि !

किती तरी वर्षांनीं आबा आपल्या आईला भेटावयाला आलेला होता. त्याचें सुशिक्षित चित्त सळसळत असतें. गिरणींत, स्टेशनवर काबाड-

कष्ट करून हमालीचे चार आणे सरळपणानें मिळविण्याचा प्रामाणिक उद्योग त्यानें करून पाहिला. पण त्याला सरकारी अधिकाऱ्यांनीं, समाजानें-सर्वांनींच हिडीसफिडीस करून वागविलें. त्याच्या कर्तृत्वशक्तीला मोकळें रान कोठेंच दिसेना. तेव्हां चोरीचा आडमार्ग पतकरावा असें त्याला वाटूं लागलें. शेतांतील कणसें चोरून कापून त्यानें घरीं नेलीं. दुष्काळी कामांतील उपासमार व हालअपेष्टा पाहून त्याचा जीव कासावीस झाला. त्याचे तीन भाऊ अन्नान्न करीत मेले. हें दिसतांच तो बेफाम झाला. त्यानें टेकडीवरील शिळा ढकलून मॅनेजरला जमीनदोस्त केलें.

## आबाचें सजीव स्वभाव-चित्र

चोरी-खून हीं ‘ पापें ’ आबानें विकाराच्या भरांत केलीं. पण नव्या समतेच्या विचारांमुळेंहि त्यानें दंगल केली. हॉटेलांत घुसून स्पृश्याबरोबर तो व त्याचे दोस्त चहा घेऊं लागतांच तेथें मारामारी झाली. तो जखमी झाला व आठ दिवस तुरुंगांत गेला. गिरणी-कामगारांनीं वसाहतींतील जुलमीसाहेबांची मोटार मोडली-जाळली ! ‘ लाल-बावटा ’च्या एका पुढाऱ्यानें आबाला हाताशीं धरलें. तसेंच, एकदां ग्रहणाच्या रात्रीं ‘ दे दान सुटे गिरान ’ म्हणून ओरडत घराघरांपुढून धांवतांना एका मुलीच्या हातांतील पाटली आबानें चोरली. तो पकडला गेला. पहातो तों ती मुलगी आपल्या भागवत मास्तराची. त्या गुरुजींनीं त्याला मुक्त केलें, एवढेंच नव्हे तर, प्रेमानें जवळ केलें. ‘ ला मिझरेबल ’ या कादंबरींतील धर्मगुरूची क्षमाच तेथें अवतरली. भागवतगुरुजींनीं पुढें आबाला एक जिवावरल्या जोखमीचें काम सांगितलें. तें म्हणजे रेल्वे उलथण्याचें. त्या चळवळींत विध्वंसा ( Sabotage ) चा समावेश होता. त्याप्रमाणें गोऱ्या सैनिकांची गाडी आबानें आपल्या दोस्तांच्या साहाय्यानें उलथली. शौर्य, कर्तृत्व, महत्त्वाकांक्षा या गुणांप्रमाणेंच सूड, मत्सर, निराशा अशा विकारांनींहि आबाचें अंतःकरण ग्रासलेलें असल्याचें दाखविलें आहे. त्याचें नामी व राई यांच्याशीं वर्तन त्याच्या वयाला व वृत्तीला स्वाभाविक असेंच आहे. लेखिकेनें आबाची हाडामांसाची जिवंत मूर्ति उभी केली आहे.

## क्रांतीच्या यशाचा आनंद

राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा आनंद या वसाहतींतील लोकांना विशेषच मिळाला. "लुळ्यापांगळ्या पोरांबद्दल आईला अधिकच माया वाटते. त्या मागासलेल्या लोकांच्यासाठीं काँग्रेस सरकार वाटेल तें करायला तयार होतें. त्यांना म्हणे गिरणींत, शाळेंत, निरनिराळ्या खात्यांत, कुठेंहि नोकऱ्या ! सगळ्यांच्या आधीं !" ही क्रांति अल्पावधींत घडलेली आबानें आपल्या डोळ्यांनीं पाहिली. तेव्हां त्याला किती आनंद वाटला !

## स्वाभाविक शेवट कोणता ?

'बळी' कादंबरी येथेंच संपविणें स्वाभाविक झालें असतें. पण वास्तवतेला कारुण्याची धार पाहिजे, सत्यसृष्टि दुःखमयच आहे या रूढ संकेताला बळी पडूनच की काय, मालतीबाईंनीं कादंबरीचा शेवट दोन पानांत घाईघाईनें असा केला आहे कीं, वसाहतींतील कांहीं लोकांनीं भुकेमुळें दरवडा घालावयाचें ठरविलें. त्याला आबानें विरोध केला, तेव्हां 'आपल्या मार्गांतील सात्त्विकतेची धोंड त्यांना असह्य झाली' व त्यांनीं आबाच्या डोक्यांत धोंड टाकून त्याला ठार केलें ! यामुळें लेखिकेला आपल्या नायकाच्या मस्तकावर हुतात्म्याचा मुकुट चढवितां आला, तरी कादंबरीचा शेवट कृत्रिम झाला यांत शंका नाहीं. पण मानवतेचा अंधारांतील एक कोपरा उजळणारी 'बळी' ही कादंबरी स्वतंत्र परंपरेची आहे हें कोणीहि कबूल करील.

## स्त्री-मनाचा आरसा

स्त्रियांची मनोव्यथा स्त्रियांनींच स्त्रियांच्या भाषेंत मांडली, तर ही किती परिणामकारक होईल ! हरिभाऊ आपटे स्त्रियांसारखी भाषा लिहीत हें खरें, पण खुद्द स्त्रीलेखकानेंच स्त्रीमनाचें चित्र काढलें तर तें किती जिवंत वठेल, अशी वाचकांना जिज्ञासा. पण बालगंधर्वासारखा एखादा पुरुषनट जसा कोणत्याहि नटीपेक्षां स्त्रीभूमिका अधिक हुबेहूब वठवतो, तसें अलौकिक यश हरिभाऊंचें आहे. त्यांच्याइतकी स्त्री-मनाची उकल स्त्री-सहज भाषेनें करूं शकणारा लेखक—किंवा लेखिका—मराठी भाषेमध्यें निर्माण

झालेला नाहीं. प्रेमविव्हल युवतींच्या मनांचीं आंदोलनें प्रा. फडके कुशलतेनें रेखाटतात. तसेंच कौशल्य गीता साने, मुक्ताबाई दीक्षित, कुमुदिनी प्रभावळकर, शांताबाई नाशिककर, शांता शेळके, वगैरे लेखिकांनीं थोड्याफार प्रमाणांत साधलेलें आहे. पण त्यामध्यें अग्रस्थान आहे विभावरी शिरूरकर यांचेंच. ‘ कळ्यांचे निःश्वास ’ या आपल्या लघुकथा-संग्रहानें त्यांनीं आपल्या या कौशल्याची चमक महाराष्ट्रीय वाचकांना दाखविली. त्याच कौशल्याचे कवडसे ‘ विरलेलें स्वप्न ’ व ‘ हिंदोळ्यावर ’ या त्यांच्या कादंबऱ्यांतहि चकाकतांना दिसतात. ‘ बळी ’ ही कादंबरी अर्थात् अगदीं स्वतंत्र धर्तीची.

## रोजनिशीचा अभ्रा

‘ विरलेलें स्वप्न ’ ही कादंबरी वैशाख व रोहिणी या दोन प्रेमी जीवांच्या रोजनिशांतील उताऱ्यांची बनलेली आहे. या कादंबरींत मालतीबाईनीं आपल्या टोपण नांवाचें समर्थन असें केलें आहे कीं, “ खरं म्हणजे नांवांत काय आहे ? मापांत काय आहे तेंच कां नाहीं पाहूं ? मापाकडे नुसती ओझरती नजर टाकून “ भरल्या जीवनराशींत असं नाहींच ” असं कां म्हणावं ? ”

मानवाचें अंतरंग सहानुभावानें पाहणें हेंच, लेखिकेच्या दृष्टीनें, ललितकलेचें मर्म. या कादंबरींत वैशाख व रोहिणी यांच्या मनाचे हेलकावे अशा सहानुभावानें चित्रित केले आहेत. पण त्यांची भाषा वासरीला ( रोजनिशीला ) साजेशी सहज, लवचिक नाहीं—निबंधासारखीं ‘ कडक इस्त्रीची ’ आहे. शिवाय त्या उताऱ्यांची लांबीहि रोजनिशीला न झेपण्याइतकी मोठी आहे. शैली व लांबी याप्रमाणेंच या उताऱ्यांतील विषयसुद्धां ‘ वासरी ’ला न शोभण्यासारखे आहेत. वासरी म्हणजे जिवाभावाची सखी. आपल्या मनाच्या खोल तळांतील भलेबुरे विचार एकांतांत व्यक्त करण्याचें तें स्थान. फोटोच्या स्टुडिओमध्यें जशी ‘ डार्करूम’ असते, आणि तिच्यामध्यें बाहेरचा एकहि किरण शिरणें जसें अनिष्ट असतें, तशीच एकांत व निवांत स्थिति वासरीची असली पाहिजे. वासरी म्हटली कीं, तिच्यांत

व्याख्यानबाजी किंवा वर्णनें अथवा संवाद यांना वावच नसतो. मनांतील खळबळीचें तेवढें प्रतिबिंब त्यांत दिसावें.

विरळ छपाईच्या सुमारें शंभर पानांच्या या कादंबरींत कथानक असें फारसें नाहींच. ध्येयनिष्ठा व प्रेमनिष्ठा यांच्या रस्सीखेंचींत तरुण जीवांची ओढाताण कशी होते, याचा एक नमुना दाखविलेला आहे. " गंजलेल्या आयुष्याचा वीट आलेल्या " रोहिणीला ओढ आहे ध्येयवादी वैशाखची. त्याला आपल्या भोंवतालच्या व्यक्ती म्हणजे " सारे विझलेले निखारे वाटतात." तो स्वतः श्रीमंत असतो. त्याच्या ' घरांतील माणसांपेक्षां नोकराचाकरांची संख्या दीडपट आहे '—त्याला ' सुखाचं अजीर्ण ' झालेलें आहे. पण त्याला पुढें पुढें जाण्याची इच्छा आहे—' सारं विश्व पालथं घालायला ' जणुं तो निघालेला आहे.—' बेलगाम वारूवर स्वार होऊन ' तो बेफाम दौड मारीत आहे. या कर्तव्याच्या भडकलेल्या ज्योतीवर रोहिणीचा जीव पतंगाप्रमाणें उडी घेत आहे. " एका बिंदुकल्याभोंवतीं सबंध पोतीचें तबक विणावें तसें सारा दिवस माझे सारे विचार एका व्यक्तीभोंवती विणले जात असतात." असें ती लिहिते.

## अचलेचें स्वभाव-चित्र

' कळ्यांचे निःश्वास ' म्हणजे सुशिक्षित कुमारींच्या मनांतील आंदोलनांचीं शब्दचित्रें. तीं चित्रें रंगविणाऱ्या आपल्या लघुकथांनीं मालतीबाईंनीं महाराष्ट्राला एक धक्का दिला. तसाच दुसरा धक्का देणारी त्यांची पहिली कादंबरी म्हणजे ' हिंदोळ्यावर '. व्यसनी नवऱ्यापासून दहा वर्षें दूर राहिलेली अचला ही या कादंबरीची नायिका. ती बी. ए. झालेली असते आणि मोठ्या धीराची व संयमाची असते. आपल्या मनांतील दुःख आपल्या मनांतच ठेवून ती ' नवऱ्याच्या अब्रुवर पांघरूण ' घालते. नवऱ्यावर दोन महिने पकडवॉरंट सुटलेलें असतांनाहि त्याबद्दल ती माहेरीं ब्र काढीत नाहीं. आपल्या अंतःकरणांत तेवत असलेली ज्वाला ती कोणालाहि दिसूं देत नव्हती. " साऱ्या आयुष्यभर झगडूनहि धीरानें तोल सावरून रहाणारी, बुद्धि-भावनांनीं सारखेच वर्चस्व गाजविलेली " अशी

ती करारी स्त्री होती. नवऱ्याला सात वर्षें सक्त मजुरीची शिक्षा झाल्यावर अचलेनें प्रथम अकोला येथें शिक्षकिणीची नोकरी पत्करली. नंतर नागपूर येथें तिनें शाळेंत नोकरी धरली. तेथें तिचा परिचय विराग नांवाच्या तरुण वकिलाशीं होतो. तो " सुखवस्तु, बुद्धिमान, करारी, तुटक वृत्तीचा आहे. " कटु अनुभवामुळें त्याची वृत्ति अशी झाली होती कीं, " मला कोणत्याहि गोष्टीनें भान हरपण्यासारखा आनंदहि होत नाहीं व दुःखहि होत नाहीं " असें तो म्हणे. त्याला अचलेबद्दल सहानुभूति वाटू लागली. समान मनोवृत्तीमुळें दोघांचीं हृदयें एकमेकांशीं जोडलीं गेलीं आणि शेवटीं दोघेंहि एकत्र राहूं लागले.

## भावगीताची आर्तता

अशा या एकेरी कथानकांत लेखिकेनें विविध रंग व रस भरण्याची जादू केली आहे. नवऱ्यानें टाकलेल्या स्त्रीनें आपल्या हृदयांत उसळणाऱ्या प्रेमाच्या लाटांना वाट कशी करून द्यावी ? हा प्रश्न सबंध कादंबरीभर कुशलतेनें खेळविला आहे. सामाजिक संकेत असा कीं, तिनें आपलें जीवन एकाकीपणेंच मुक्या मनानें घालविलें पाहिजे. पण शिक्षणानें चौकस व बंडखोर बनलेलें मन स्वस्थ कसें बसणार ? तें पुनः पुनः उसळ्या घेतें. समाजांतील निरनिराळ्या दृश्यांची व प्रसंगांची प्रतिक्रिया अचलेच्या जिवंत मनावर होते. एकीकडे तिला प्रेमाची ओढ असते, मातृत्वाची भूक असते; तर दुसरीकडे समाजाचें बंधन असतें, रूढीची तटबंदी असते. अशा रस्सीखेचींत तिच्या मनाची विलक्षण ओढाताण होते. पुढें मागें, मागें पुढें असें, घड्याळांतील लंबकाप्रमाणें, तिचें मन सारखे हेलकावे खातें. हिंदोळ्यावर—म्हणजे झोपाळ्यावर—बसलेला माणूस जसा पुढें जातो व मागें येतो आणि पुनः पुढें जातो; तसें उलटसुलट झोके अचलेचें मन घेत असतें. त्यांचें शब्दचित्र या कादंबरींत हलक्या हातानें, नाजुकपणानें काढलेलें आहे. सारी कादंबरी म्हणजे एक भावगीतच आहे—अचलेल्या हृदयाच्या तारा पिळवटल्यामुळें त्यांतून निघालेले आर्त सूर कादंबरीच्या पानापानांत निनादत आहेत.

## सूक्ष्म भावनांची उकल

संसारांतले लहान लहान प्रसंग, पण अचलेच्या एकाकी व मुकणाऱ्या जीवनावर त्यांचे किती विलक्षण परिणाम होत होते! तिच्या प्रणय-भावनेवर व मातृत्वाच्या इच्छेवर सिंचनच होत होतें तें! "लहान मुलांचा लळा असलेली अचला भुकेल्या नजरेनें सगळें पहात होती. संयमानें ती भूक मारीत होती." पण संयमाच्या राखेखालीं कितीहि झाकून ठेवले, तरी भावनेचे निखारे फुलविणारे वारे जीवनांत काय थोडे सुटतात? सिंधुवहिनीचीं डोहाळ जेवणें झाली–अचलेच्या हृदयांत वादळें उठलीं. राधिकेनें आपल्या बाळाला निजविण्यासाठीं वात्सल्यानें ओथंबलेल्या ओंव्या म्हटल्या–अचलेच्या आईपणाच्या अतृप्त आकांक्षा उंचबळल्या. राजाईनें स्वतः पाट लावल्याची वार्ता आनंदानें सांगितली–अचलेच्या मनाचा भरलेला घडा हिंदकळला. तिच्या प्रेमभावनेनें वैराग्याचे बांध फोडले आणि अखेर अचला विरागच्या आश्रयास गेली. तिच्या मनांतील या साऱ्या झटापटींचा चित्रपट लेखिकेनें सुंदर रेखाटला आहे.





## वि. स. खांडेकर : : : २१

दिवाळींतील दारूकाम पहातांना मुलांना केवढी मौज वाटते ! तसाच विस्म-याचा आनंद खांडेकर आपल्या वाचकांना देतात. फटाक्यांचे सर उडत जावेत, त्याप्रमाणें त्यांच्या कोट्यांमागून कोट्या फुटत जातात. चंद्रज्योतीचा प्रकाश पहाणाऱ्यांचे डोळे दिपवितो; तशा चकित करणाऱ्या उपमांमागून उपमा खांडेकर पेटवीत जातात. आणि भुईनळ्यावर ठिणगी पडतांच त्यांतून जोरानें व वेगानें रुपेरी–सोनेरी फुलें आकाशांत उंचउंच उडत जातात ना ? तशीच खांडेकरांची तेजःपुंज कल्पकता उसळून उठते. पानापानाला —किंबहुना वाक्यावाक्याला—वाचकानें चकित व्हावें, आनंदित व्हावें, उन्नत व्हावें–अशा तेजस्वी, सुंदर व उदात्त कल्पना खांडेकरांच्या वाङ्मयांत ओतप्रोत भरलेल्या आहेत.

+ ३०

## कल्पकतेचे कुबेर

कोंकणांत पावसाच्या सरीमागून सरी येतात; तशा खांडेकरांच्या डोक्यांत कल्पनेमागून कल्पना ओसंडत असतात. इंग्रजी किंवा संस्कृत ग्रंथ वाचून-वाचून, त्यांतील उपमा-उत्प्रेक्षा आठवून-आठवून आपलें लेखन सजविणारे ते कष्ट-कवि नाहींत. जमीन फोडून ऊन पाण्याचीं कारंजीं जशीं उंच उंच उडत असतात, तसे खांडेकरांच्या हृदयांत कल्पकतेचे फवारे सहजगत्या बाहेर पडतात. त्यांचे लेख वाचणेंच काय, पण त्यांचें संभाषण ऐकणें म्हणजेसुद्धां समुद्राच्या लाटांचा खेळ पहाण्यासारखेंच आहे. रेशमी रेतीवर बसून समुद्राच्या फेसाळ लाटांचा अखंड क्रीडा घटकान्-घटका एखादा रसिक जसा पहात असतो, तसा तरुण वाचक खांडेकरांच्या लेखन-भाषणांतील अकुण्ठित कोटीबाजपणा पाहून आश्चर्यानें थक्क होतो. उपमा-उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांची लयलूट त्यांच्या वाङ्मय-सृष्टींत आहे. खरोखर ते कल्पकतेचे कुबेर आहेत; तसेच ते आहेत कोट्यधीशहि !

## कोल्हटकरांचा वारस

"कोल्हटकरांच्या गादीचा वारस आहे हा !" अशी प्रशंसा खांडेकरांची १९१५ सालीं केली. कोणीं केली ही प्रशंसा ? आणि कोणाजवळ ? मराठी नाट्यकलेचा राजहंस बनलेले बालगंधर्व यांच्यापाशीं नाट्याचार्य गडकरी यांनीं खांडेकरांबद्दल हे उद्गार काढले. पुढें पुढें तर खुद्द विनोदाचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकरच सांगत, " हा माझा दत्तक मुलगा आहे. " या कल्पनासृष्टीप्रमाणें सत्यसृष्टींतहि दत्तक जाण्याचा योग खांडेकरांना लाभला. त्यांचें मूळचें नांव गणेश व वडिलांचें नांव आत्माराम. वडील सांगली संस्थानांत मुनसफ होते. ते १९११ सालीं वारले. खांडेकरांच्या कुटुंबाला खडतर दिवस आले. १९१६ सालीं कोंकणांतील एका जमिनदार चुलत्यानें खांडेकरांना दत्तक घेतलें. त्यामुळें " गणेश आत्माराम ' चा " विष्णु सखाराम " झाला.

## वाङ्मयाचा नाद

खांडेकरांचा जन्म सांगली येथें ता. १९ जानेवारी १८९८ रोजीं

झाला. मराठी व इंग्रजी शिक्षण तेथेंच झालें. इंग्रजी चौथ्या इयत्तेपासून ते शिष्यवृत्ति मिळवीत गेले. १९१३ सालीं ते मॅट्रीकची परीक्षा उत्तीर्ण झाले-आणि तेहि मुंबई विद्यापीठाच्या हजारों विद्यार्थ्यांत आठवा क्रमांक कमावून. शाळेच्या 'चिमण्या जगांती'ल क्रमिक पुस्तकांची बांधली शिदोरी घेऊनच खांडेकर थांबले नाहींत, त्यांनीं इतर वाचन मनसोक्त केलें. हरिभाऊंची 'उषःकाल' कादंबरी त्यांनीं एका रात्रींत वाचून संपविली; देवलांचें 'शारदा' नाटक तर तोंडपाठच केलें. तसेंच कोल्हटकरांचें विनोदी वाङ्मय. 'सुदाम्याचे पोहे' ते मोठ्या चवीनें सेवन करीत. कोल्हटकरांचें 'वधूपरीक्षा' नाटक पहाण्यासाठीं, खांडेकर सांगलीहून मिरजेस पायीं चालत गेले. मराठींतील इतर ग्रंथांचेंहि वाचन ते आवडीनें करीत होते. नाटक-कादंबऱ्यांत तर ते रंगून जात.

## उच्च शिक्षणाला पायबंद

मॅट्रीक झाल्यावर खांडेकर पुण्यास आले आणि फर्ग्युसन कॉलेजांत दाखल झाले. त्यांना एक शिष्यवृत्ती मिळाली होती. पण पुण्याची रहाणी, कॉलेजची फी, यांचा खर्च कसा भागणार? दोन शिकवण्या त्यांनीं धरल्या. तरी पैशाची ओढाताण चालूच होती. दत्तक-विधानानंतर ती थांबेल अशी खांडेकरांना आशा होती. सरस्वतीप्रमाणें लक्ष्मीचाहि वरदहस्त आपल्या मस्तकावरून फिरूं लागेल असें मनोराज्य ते करीत होते. पण तें धुळीस मिळालें. दत्तक घराण्यांतून त्यांच्या शिक्षणाला आर्थिक मदत तर कांहीं मिळाली नाहींच, पण उलट त्यांचें मानसिक स्वास्थ्य मात्र हिरावलें गेलें. दत्तक वडिलांचा स्वभाव खांडेकरांच्यापेक्षां अगदींच निराळा होता. त्यामुळें त्या दोघांत खटके उडूं लागले. सावंतवाडीला दोनतीन वर्षें खांडेकरांना काढावीं लागलीं.

## आधिभौतिक ताप

हा काळ केवळ काळजी करण्यांत गेला. तेथें त्यांच्या पाठीस मलेरिया लागला. गरिबी पांचवीला पूजलेलीच होती. त्यांत भर दत्तक घराण्याच्या कटकटीची, आणि आतां तिला साथ मिळाली रोगाची! शरिराच्या

त्वचेप्रमाणेंच रुग्णावस्था खांडेकरांना यापुढें कायमची चिकटली. ताप असणें ही जणुं त्यांची ‘ प्रकृती ’च ठरली. आपल्या विनोदी स्वभावानें ते म्हणतात, “ माझ्या आतांपर्यंतच्या तापाच्या अंशांची संख्या मोजावयाची झाली, तर ती शेंकड्यांनीं, हजारांनीं मोजतां येणार नाहीं—लाखांनींच मोजावी लागेल. ” दारिद्र्य व रोग या ऐरण–घणांच्या तावडींत सांपडलेल्या त्यांच्या बुद्धींतुन कल्पनेच्या ठिणग्या मात्र सतत उडत असतात. जणुं तापानें त्यांची प्रतिभा तापतच जाते. गरिबीची छळणूक किंवा रोगांची गांजणूक यांची काळी छाया त्यांच्या लेखनावर कोठेंच पडलेली आढळत नाहीं हें विशेष. उलट त्यांची बुद्धि फुलपांखराप्रमाणें स्वच्छंदानें उड्या मारीत आहे, झऱ्याप्रमाणें बागडत आहे व नक्षत्राप्रमाणें चमकत आहे. त्यांची सारी वाङ्मय–सृष्टी हंसतमुख आहे.

## जीवनासाठीं कला

खांडेकरांचें वाङ्मय म्हणजे एक टुमदार अष्टकोनी बंगलाच होय. लघुकथा, रूपक–कथा, कविता, टीका, लघु–निबंध, कादंबरी, नाटक व पटकथा हे आठ पैलू त्यांच्या साहित्याला पडलेले आहेत. सुमारे पंचवीस वर्षांत या आठी क्षेत्रांत त्यांनीं विपुल लेखन केलें आणि कमीअधिक प्रमाणांत पण चांगलें यश कमावलें. त्यामुळें त्यांच्याविषयीं नुसतें प्रेमच नव्हे तर आदरहि महाराष्ट्रीय वाचकांना वाटतो. त्यांचें कोणतेंहि लिखाण सदभिरुचीला दुखविणारें नाहीं किंवा नीतीची लक्ष्मण–रेषा ओलांडणारे नाहीं. उलट त्यागाचे, समाजसेवेचे, देशभक्तीचे उदात्त विचारच त्यांच्या मधुर रसवंतींतून वहात असतात; किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, कला व जीवन यांचा सुंदर मेळ खांडेकरांनीं घातला आहे. कांहीं ललितलेखकां-मध्यें कलेला उधाण भरती आलेली दिसते; पण बोधाच्या नांवानें रखरखीत वाळवंट !—त्यावर नीति व सदभिरुचि मासोळ्याप्रमाणें तडफडत असावयाच्या. उलट ललित वाङ्मयांतून प्रचाराचेच नगारे बडविणारे कांहीं लेखक आहेत; पण त्यांच्यापाशीं कला इतकी थोडी असते कीं, त्यामुळें त्यांच्या लेखनाला ‘ ललित ’ हें विशेषण लावणें कठीण जातें. खांडेकरांच्या

लेखनांत नीतियुक्त व हेतुमूलक कलेचा रम्य विलास पाहावयास सांपडतो.

इतका प्रतिभासंपन्न प्रचारक मराठीमध्यें हरिभाऊ आपट्यांनंतर दुसरा कोणी झालेला दिसत नाहीं. त्यांनीं आतांपर्यंत सुमारें २० लघुकथा–संग्रह प्रसिद्ध केले, १०० लघु-निबंध लिहिले, १५ कादंबऱ्या रचल्या, ६ नाटकें रंगविलीं, ५० रूपक-कथा चितारल्या आणि टीकालेख तर २००–३०० लिहिले. आणि हें सारें निरामय, निर्मल व प्रसन्न वाङ्मय त्यांनीं निर्माण केलें, तें मानसिक, शारीरिक किंवा आर्थिक स्वास्थ्य बिलकूल नसतांना. उलट गरिबीशीं, रोगाशीं, प्रतिवादींशीं झगडत असतांनाच त्यांनीं ही साहित्याची सुरंगी व सुगंधी बाग फुलविली.

## शाळेंतील कार्य

चरितार्थ चालविण्यासाठीं खांडेकरांनीं शिक्षकाचा पेशा पत्करला. १९२० सालीं कोंकणांतील शिरोडें येथील इंग्रजी शाळा त्यांनीं चालवावयास घेतली. शाळेंत विद्यार्थी किती होते ? तर ५०–६०. आणि शाळेचे प्रमुख म्हणून खांडेकरांना पगार किती ? तर २० रुपये. 'उल्का' कादंबरींत भाऊसाहेबांच्या थोर मनाचें जें चित्र खांडेकरांनीं रेखाटलें आहे, तें बऱ्याच ठिकाणीं खुद्द त्यांचेंच आहे असें वाटतें. कांहीं गांवकऱ्यांचाहि त्रास शाळेला सोसावा लागला. तथापि खांडेकरांनीं आपल्या चिकाटीनें त्या शाळेचा विकास केला. घरांत भांड्यांच्याऐवजीं गाडगी व कंदिलाच्या ऐवजीं दौत वापरून दारिद्र्याचें विष खांडेकर पचवीत होते, पण शाळेत विद्यार्थ्यांना ज्ञानामृत देत होते. पुढें त्या शाळेंतील विद्यार्थ्यांची संख्या दोनशेंवर गेली.

## लेखनाचे अंकुर

खांडेकरांच्या लेखनाचा प्रारंभ वयाच्या सोळाव्या वर्षी झाला. १९१४ सालीं ' रमणी-रत्न ' नांवाचें नाटक लिहून त्यांनीं तें वासुदेवशास्त्री खरे यांना दाखविलें. १९१९ सालीं त्यांचा पहिला टीकालेख ' नवयुग ' मासिकांत प्रसिद्ध झाला. तो कवि केशवसुतांसंबंधीं होता. १९२३ सालीं

'घर कोणाचें ?' ही त्यांची पहिली गोष्ट प्रसिद्ध झाली. १९२४ सालीं सावंतवाडी येथें 'वैनतेय' नांवाचें साप्ताहिक निघालें. त्याच्या वाङ्मय-विभागाचे संपादक खांडेकर होते. त्या निमित्तानें विनोदी व टीकापर लेख त्यांनीं बरेच लिहिले. १९२५ सालापासून लघुकथा लिहिण्यास त्यांनीं नियमितपणें सुरवात केली. 'रत्नाकर' मासिकांत त्यांच्या कथा प्रसिद्ध होऊन रसिक विद्वानांच्या प्रशंसेस पात्र झाल्या. 'कोल्हटकरांचीं नाटकें' हा त्यांचा विस्तृत टीका-लेख 'मनोरंजन' मासिकाच्या पांच अंकांत प्रसिद्ध झाला. सौभाग्य-लक्ष्मी, त्रिदळ, इत्यादि पुस्तकांच्या सडेतोड परीक्षणामुळें त्यांची कीर्ति 'निर्भीड टीकाकार' म्हणून झाली. १९२८ सालीं त्यांनीं 'रंकाचें राज्य' नांवाचें नाटक चार दिवसांत लिहून काढलें. याशिवाय आणखीं पांच नाटकेंहि त्यांनीं लिहिलीं. कविताहि बऱ्याच रचल्या.

## चौफेर आपत्ति

'हृदयाची हांक' या नांवाची त्यांची पहिली कादंबरी १९३० सालीं प्रसिद्ध झाली. आणि पहिली पटकथा १९३६ सालीं त्यांनीं लिहिली. 'छाया' या बोलपटाची ती कथा बक्षिसाला पात्र ठरली. गडकरी व आगरकर यांचे चरित्र-ग्रंथहि त्यांनीं लिहिले. लेखनाच्या या चौफेर उत्कर्षाचे वेळींच त्यांच्या आपत्तींत आणखी भर पडली. १९२८ सालीं सांगली येथें कृष्णा नदीच्या कांठीं त्यांना सर्पदंश झाला. १९३३ सालीं तर त्यांना कोंकणांतील फुरसेंच चावलें. या दंशांतून ते वांचले, पण नळराजाप्रमाणें, त्यांच्या शरीरावर विकृति पसरली. रोग, गरिबी, खटले व दंश या चोहोबाजूंनीं पेटलेल्या संकटाच्या वणव्यांतहि खांडेकरांच्या कल्पनेचीं फुलें उमलत होतीं—त्यांच्या रमणीय वाङ्मयाची मोहिनी महाराष्ट्रावर पडत होती.

## अध्यक्षपदांच्या माळा

खांडेकरांच्या या संपन्न साहित्यसेवेचें चीज महाराष्ट्र कौतुकानें करीत होता. १९३४ सालीं बडोदा येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या कथा—

विभागाचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें. पुढील वर्षी पुणे येथें भरलेल्या ‘ शारदोपासक संमेलनाचें ’ अध्यक्षस्थानहि त्यांना अर्पण करण्यांत आलें. मडगांव व मुंबई येथील प्रांतिक संमेलनांच्या अध्यक्षपदाच्या माळा त्यांच्या गळ्यांत घालण्यांत आल्या. १९४० सालीं जमखिंडी येथें भरलेल्या ‘ दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ’ अध्यक्षत्व त्यांना बहाल करण्यांत आलें आणि मराठी साहित्यांतील मोठा मान त्यांना त्याच्या पुढील वर्षी लाभला. १९४१ सालीं सोलापूर येथें भरलेल्या ‘ महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या ’ सिंहासनावर त्यांना अध्यक्षपदाचा अभिषेक करण्यांत आला. आदल्या वर्षीचें संमेलनाध्यक्ष प्रा. फडके यांनीं त्यांची त्या वेळीं मुक्तकंठानें स्तुति केली.

## पहिली कादंबरी

खांडेकरांची पहिली कादंबरी १९३० च्या मार्चमध्यें प्रसिद्ध झाली. तिचें नांव ‘ हृदयाची हांक. ’ माणसाला आयुष्यांत पैशाची, सत्तेची, ज्ञानाची —अशा निरनिराळ्या हांका ऐकूं येतात. पण आपलें आयुष्य सुखाचें करावयाचें असेल, तर मनुष्यानें हृदयाच्या हांकेकडेच—म्हणजेच प्रेम-भावनेकडे—लक्ष दिलें पाहिजे असा संदेश या कादंबरीनें दिला. दोन हृदयें प्रेमाच्या भावनेनें जोडलीं गेलीं तरच त्यांचें जिवन सुखमय होतें— त्यांचेंभोंवतीं गरिबी किंवा अज्ञान कितीहि पसरलेलें असे ना कां ? झोपाळ्यांतील अडाणी खेडुतांच्या संसारांतहि जो आनंद खेळत असतो, तो कैक राजवाड्यांत नांदणाऱ्या विद्वानांचें कुटुंबांत सांपडत नाहीं, त्याचें कारण हेंच. हें तत्त्व स्पष्ट करण्यासाठीं खांडेकरांनीं तीन तरुण जोडपीं निवडलेलीं आहेत. त्यांच्या जीवनाचे धागेदोरे गुंफण्यासाठीं खून, अपघात, विषप्रयोग इत्यादि रोमांचकारक प्रसंगांच्या गांठीहि दिलेल्या आहेत. पण साऱ्या पात्रांच्या मुखांतून एकटे एक खांडेकरच बोलत आहेत असें वाटावें, अशी एकसुरी व कृत्रिम भाषाशैली या कादंबरीची आहे. त्यांतच व्याख्यानबाजीच्या वावटळी उठलेल्या आहेत. त्यामुळें या कादंबरीला पहिलेपणाशिवाय दुसरें फारसें महत्त्व नाहीं.

## आत्मचरित्राचा अंश

यानंतर चार महिन्यांनीं ‘ कांचनमृग ’ ही खांडेकरांची दुसरी कादंबरी प्रसिद्ध झाली. आपल्या काव्यमय कल्पनांनी ही कादंबरी नटविण्याचा प्रयत्न खांडेकरांनीं केला आहे. तिच्यांत जिव्हाळाहि भरपूर आहे. किंबहुना खांडेकरांच्या आत्मचरित्राचा हा एक खंडच आहे म्हटलें तरी चालेल. एम. ए. झालेला सुधाकर प्रोफेसरी झिडकारून खेड्यांत शाळा काढतो व राष्ट्रसेवेचा प्रारंभ करतो, हें मुख्य सूत्र या कादंबरीचें आहे. खुद्द खांडेकरांनीं शिरोड्यास शाळा चालवावयास घेतली आणि त्या कार्यांतले कांटेकुटे व खांचखळगे यांचा अनुभव घेतला. त्या सर्वांचें प्रतिबिंब या कादंबरींत स्वच्छ उमटलेलें दिसतें. गांवगुंडीचा इतका कटु अनुभव सुधाकराला येतो कीं, त्याला कांहीं काळ चोहोंकडे निराशा वाटूं लागते. पण ‘खरा शिक्षक म्हणजे उत्कृष्ट मूर्तिकार. दगडांतून देव निर्माण करण्याचें कौशल्य साध्य करण्याकडे त्याचें सारें लक्ष असलें पाहिजे. ’ हा विचारच सुधाकराच्या मनांत स्थिरावतो.

## सामाजिक सुधारणा

या ग्रामसेवेबरोबरच विधवांच्या उद्धाराचा विषयहि खांडेकरांनीं या कादंबरींत ठळकपणें रंगविला आहे. ‘ पण लक्षांत कोण घेतो ’प्रमाणेंच तरुण–विधवेचें केशवपन हा याहि कादंबरीचा उत्कर्ष—बिंदु आहे. केशवपनाची सुधेवर सक्ती होणार त्या क्षणापासूनच कथानकांत क्रांति होते आणि सुधेचा सुधाकरांशीं पुनर्विवाह होतो, असें दाखविलें आहे. सुधेचा सासरा सदानंद संन्यासी होऊन मधून मधून प्रगट होतो, आणि सत्पक्षाला साहाय्य करतो, या कथानकाचें कलम मुख्य कथानकावर करून खांडेकरांनीं अद्‌भुत रसहि खेळविला आहे.

## स्वकीय संस्कृतीचें वातावरण

हरिभाऊंप्रमाणेंच नव्यानव्या म्हणीहि या कादंबरींत खांडेकरांनीं पुष्कळच पेरलेल्या आहेत. ‘ बायकांची हांव म्हणजे कागदाची नांव,’ ‘ जिथें पैका तेथें धोका,’ ‘ राबणारांना धत्तुरा, इतरांना मानाचा तुरा,’ ‘ लॉटरींत

घातला रुपाया कीं, मनांत घाली बंगल्याचा पाया,' अशा म्हणी विखुरलेल्या आहेत. त्यांनीं कोंकणचें प्रादेशिक वातावरण बऱ्याच ठिकाणीं निर्मिलेलें आहे. स्वकीय संस्कृतीचें स्मरण करून देणारे पौराणिक दाखलेहि पुष्कळ ठिकाणीं दिलेले आहेत. त्यामुळें वाचकाला आपलेपणा वाटतो. मूळ कादंबरीचें नांवच पौराणिक कथांतून निघालेलें आहे. त्याचा आशय व्यक्त करतांना खांडेकर म्हणतात, " रावणानें सीतेचें हरण करण्याकरतां मारीच राक्षसाला कांचनमृगाचं रूप देऊन पाठविलं. त्या कांचनमृगाला सीता भुलली; आणि रामाला मुकली. आपणां सर्वांच्या आयुष्यांत अशीच फसगत होत असते. लहानपणीं आळस भुलवितो, तारुण्यांत रूप आणि पैसा यांची भूल पडते, म्हातारपणीं दगडाच्या देवांना संतुष्ट केलं कीं, सर्व पापं धुऊन निघालीं असं मनुष्याला वाटूं लागतं. पण खरं सुख आळसांत नसून उद्योगानं संपादन केलेल्या विद्येत आहे, नवराबायकोच्या रूपांत नसून त्यांच्या एकमेकांसाठीं तळमळणाऱ्या हृदयांत आहे, पैशांत नसून परोपकारांत आहे, दगडी देवांच्या पूजेंत नसून देवमाणसांना त्यांच्या कार्यांत साहाय्य करण्यांत आहे. "

## रमणीय सुभाषितें

उपमा व सुभाषितें हें तर खांडेकरांच्या लेखणीचे श्वासोच्छ्‌वासच होत. ' रातांधळ्याला जसें उजाडल्यावाचून दिसत नाहीं, त्याप्रमाणें रागानें आंधळ्या झालेल्या माणसाचा राग ओसरल्यावरच त्यांच्याशीं युक्तिवाद करतां येतो, ' किंवा ' ऊन पाणी थोडेसें निवल्यावरच पिता येतें, हें ओळखून त्यांनीं मुलाला कोणतेहि प्रश्न विचारले नाहींत. ' अथवा 'कळींतला सुगंध वायु घेऊन जातो, पण तिचा भार वेलीला सोसावा लागतो. परके लोक आणि आप्तेष्ट यांच्यांतहि हाच फरक आहे. ' अगर 'पांखराला पंखांचा आणि नवऱ्याला बायकोचा भार होत नाहीं. ' तसेंच ' पांखरांची चपलता, प्रातःकालाची सौम्य उज्ज्वलता, निर्झराचा खळखळाट, यांचा त्रिवेणी संगम मुलामध्यें दिसतो. ' अशीं वाक्यांमागून वाक्यें पानापानांवर आढळतात. तीं सुभाषितांप्रमाणें सुंदर व अर्थपूर्ण असतात. अशाच

धाग्यादोऱ्यांनीं कादंबरीचा सारा पट विणलेला आहे. मात्र त्यामुळें कांहीं वेळा वाचकांचें लक्ष अर्थापेक्षां किंवा भावनेपेक्षां या वरपांगी शब्दलीलेवरच खिळून रहातें. ‘ दीर व कीर ’ अशा क्लिष्ट कोट्याहि क्वचित आढळतात. ‘ वातानं तर तुझे पाय धरलेच आहेत, आतां दररोज एक-एक मुलीचा बाप येऊन ते धरणार. ’ अशी ‘ पाय धरणें ’ या शब्दावर कोटी सुधाकर करतो. अशी कांहीं ना कांहीं शाब्दिक चमत्कृति नसलेली वाक्यें विरळाच. एखाद्या जवाहऱ्याच्या दुकानांत गेल्यावर हिरे, मोतीं, पांचू, माणिक, नीळ वगैरे विविध रत्नें दृष्टीस पडावींत, त्याप्रमाणें खांडेकरांच्या लेखनांत नानाविध शब्दालंकारांचें व अर्थालंकारांचें तेज सतत डोळे दिपवीत असतें. पण ‘ सप्तर्षींचे पुंज कानांत घालून केसांत गुरुशुक्र खोंवणाऱ्या आणि चांदण्याचें शुभ्र पातळ परिधान करणाऱ्या रजनीदेवीप्रमाणें सुधा त्यांना भासली ’ या वर्णनावरून सामान्य वाचकांना काय बोध होणार ?

## वाद-सभेचें स्वरूप

व्यक्तीचा स्वभाव-विकास, किंवा रसाचा परिपोष आणि एकंदर स्वाभाविकता यांचें प्रमाण खांडेकरांच्या कादंबऱ्यांत कमी असतें. एक उदाहरणच द्यावयाचें तर ‘कर्मयोग ’ या कादंबरींत हरिभाऊ आपटे यांनीं कॉलेजचा अभ्यास पुरा करून घरीं जाणाऱ्या नायकाचें शब्दचित्र कसें सरस रंगविलें आहे तें पहावें, आणि ‘ कांचनमृगांत ’ खांडेकरांनीं तोच प्रसंग कसा रेखाटला आहे तें पहावें. सांगलीच्या गणपतीघाटावर कॉलेजच्या विद्यार्थ्यांचें जें संभाषण चालतें, तें एखाद्या वादविवाद सभेप्रमाणें वाटतें- प्रेमळ मित्रांचा रसपूर्ण संवाद कांहीं तो नव्हे. ग्रामसेवा हीच राष्ट्रसेवा हा मंत्र ठसविण्यासाठीं सुधाकर सांगतो,

“शहरांची सुधारणा करून देशाची उन्नति करणें हा कांचनमृग आहे. खेडीं सुधारतील तेव्हांच देश सुधारेल. शहरें हीं हिंदमातेचीं वस्त्रें मानलीं तर खेडीं हीं तिचीं हाडें आहेत. हीं हाडें एकसारखीं झिजत असतांना नुसतीं सुंदर वस्त्रें परिधान करून तिच्या मुखावर तेज येणार नाहीं. ”

विधवेची दुर्दशा वर्णन करतांना खांडेकर लिहितात,

" कृपणानें पुरून ठेवलेल्या हंड्यांतील लक्ष्मीप्रमाणें तिची बुद्धि फुकट जाणार, वाळवीनें खाऊन टाकलेल्या उत्कृष्ट हस्तलिखित ग्रंथाप्रमाणें हिचें प्रेमळ हृदय जगाच्या दृष्टीनें असून नसल्यासारखेंच होणार."

संस्कृतांत बाण आपल्या 'कादंबरींत' रम्य कल्पनांचीं सहस्रधारांचीं कारंजीं उडवितो; तो मान मराठींत खांडेकरांकडे सहजच जातो. अचपळ कल्पनेच्या मागें त्यांची लेखणी धांवत सुटते.

## बालकाचें वर्णन

लहान बालक म्हणजे आनंदाचें स्थान. त्याचें वर्णन खांडेकरांनीं पुढील कल्पनारम्य भाषेनें केलें आहे. " लहानशा मूर्तींत आपलें त्रिभुवन सांठलें आहे. सुधाचे दोन डोळे हेच आपले चंद्रसूर्य, सुधाचें हंसणें हेंच आपलें गंगास्नान, सुधानें मांडीवर येऊन डोकें टेकणें हेंच आपलें ऐश्वर्य, घरून जातांना अगर घरीं आल्याबरोबर ती जो नमस्कार करते तेंच आपलें साम्राज्य. प्राणांवाचून कुडीला जशी किंमत नाहीं त्याप्रमाणें सुधावांचून आपल्याला हें जग म्हणजे नुसतें स्मशान होईल."

बाल–लीलांचा आनंद सुधा आपल्या कल्पना–सृष्टींत कसा घेत आहे, हें सांगतांना खांडेकर म्हणतात, " त्रिभुवनांतील साधूंचा ब्रह्मानंद बालकाचें रूप धारण करून आपल्या पोटाशीं बिलगला आहे, नंदनवनांतील सर्व पुष्पांची कांति त्या बालदेहावर विलसत आहे. देवदानवांनीं समुद्रमंथन करून काढलेलें अमृत त्या चिमण्या डोळ्यांत तुडुंब भरून वाहत आहे, गंधर्वांच्या गाण्यांना ताल धरण्याकरतां बाळ आपल्या पायांतील वाळा वाजवीत आहे, त्याच्या एका गालावर उषा व दुसऱ्या गालावर संध्या त्याचे मुके घेत बसल्यामुळें अस्फुट ओष्ठांतून सूर्याची प्रभा फांकलेली दिसत आहे, 'अगबाई, बाळ प्यायला लागलें. लबाडा, कुणी रे तुला शिकविलं हें सारं ? थांब गुलामा, तिकडंच सांगतें आतां हं' असें आपण म्हणत आहों, असें सुधेला वाटलें."

## आईची थोरवी

आईला जसें हें बालकाचें प्रेम, तसेंच बालकालाहि आईचें ! आई हेंच

त्याचें त्रिभुवन, आई हेंच त्याचें परब्रह्म, आई हेंच त्याचें सर्वस्व. त्या आईचें स्तोत्र खांडेकर पुढील शब्दांनीं गातात. " समुद्रांत अनंत रत्नें असलीं तरी मोत्याचें रक्षण त्याच्या शिंपल्यामुळेंच होत असतें. त्याप्रमाणें या जगांत कोट्यवधि बुद्धिमान माणसें असलीं तरी आपल्या फारशा न शिकलेल्या व साध्याभोळ्या आईची सर दुसऱ्या कोणालाहि येणार नाहीं. तिचा वरदहस्त हेंच आपलें आकाश, तिची मांडी हीच आपली पृथ्वी, तिनें अंगावरून हात फिरविला कीं, अमृतानें स्नान करून आलेल्या वायूची आपल्याला आठवण होते, आपल्या डोक्यांत आगीचे डोंब उसळले असले तरी तिच्या अश्रूंच्या चार थेंबांनीं ते विझून जातात. आईच्या प्रेमापुढें त्रिभुवनांतलि संपत्ति कवडीमोलाची आहे, तिच्या हास्यांत जगांतील सारी वत्सलता सांठलेली असते. आईचें प्रेम नास्तिकालादेखील आस्तिक करील. "

## निसर्गाचीं शब्दचित्रें

कथानकाच्या चौकटींतहि खांडेकर अशा अलंकारांची इतकी उधळपट्टी करतात; मग जेथें निसर्गाचें वर्णन करावयाचें आहे तेथें त्यांच्या लेखणीला किती मोकळें रान सांपडत असेल ! रानाचें वर्णन करतांना ते म्हणतात, " रानांत जिकडे पाहावें तिकडे झाडेंझुडपें होतीं. गाण्याची तान ऐकतांच डुलणाऱ्या रसिकाप्रमाणें वाऱ्याची झुळुक येतांच या झाडांचीं पानें हलत. जणुं काय रसिक वृक्ष टाळ्या वाजवून वायूच्या गायनाचें अभिनंदन करीत होते. एका देशाच्या निशाणाखालीं गोळा झालेल्या अठरापगड जातीप्रमाणें निरनिराळीं झाडें त्या वनभागांत खांद्याला खांदा लावून उभीं होतीं. मधूनच दिसणाऱ्या एखाद्या आंब्यावर हिरवे घोंस लटकलेले पाहून एकत्र खेळणाऱ्या बालकांच्या जमावाची कुणालाहि आठवण झाली असती. "

समुद्र हा तर कवींचा लाडका विषय. त्याच्या लाटांची अखंड क्रीडा वर्णन करतांना कोणा कवीला शीण वाटेल ? खांडेकर लिहितात, " संध्यासमुद्रांतील विविध लहरींचें नर्तन पहावें कीं, खोल तळ्याप्रमाणें खालीं पसरलेल्या अफाट दरींत तरंगांप्रमाणें हालणाऱ्या झाडाझुडपांच्या शेंड्याकडे

पहावें ? डावीकडे किल्ल्याच्या भव्य तटाप्रमाणें पसरलेला डोंगर सुंदर कीं उजवीकडे समुद्राच्या भव्य लाटांप्रमाणें दिसणाऱ्या सह्याद्रीच्या निळसर रांगा अधिक सुंदर? साऱ्या विश्वांतील वनस्पतींचें हें संमेलन पाहिल्यावर जगांत मरुभूमि आहे याच्यावर कुणाचा तरी विश्वास बसेल कां ? जिकडे पहावें तिकडे हिरवेंगार. बालकाचें हास्य, पत्नीचा शृंगार आणि मातेचें वात्सल्य यांचा त्रिवेणीसंगम त्या सृष्टिसौंदर्यांत प्रतिबिंबित झाला होता. आधीव्याधींचें माहेरघर असणारा मनुष्यदेह टाकून नवपल्लव होऊन वृक्षावर झोंके घ्यावेत, वायुलहरी होऊन या सौंदर्यसागरांत पोहत रहावें, एखादें पाखरूं होऊन पानांच्या तालावर गाण्याला सुरवात करावी, किंबहुना देहाची एवढीदेखील उपाधी न बाळगतां पश्चिमेकडल्या तेजोरसांत विलीन व्हावें अशी इच्छा यावेळीं सुधाकरांच्या मनांत उत्पन्न झाली.''

## सौंदर्य-सागरांच्या सीमेवर

नुसता समुद्र झाला. पण एकीकडे शेतांतील पिकाचा सागर, तर दुसरीकडे समुद्रांत पाण्याचें पीक—अशा दोन सौंदर्य-सागरांच्या सीमेवर उभें राहून खांडेकर लिहितात, " उजव्या बाजूला हिरव्यागार भातशेतीनें भरलेला मळा डुलत होता; डाव्या बाजूला तेजस्वी सूर्यकिरणांनीं नटलेला समुद्र झुलत होता. वाऱ्याच्या झुळकेसरशीं एकीकडे भाताचीं रोपें झुळझुळत, तर दुसरीकडे जललहरी सळसळत. भातांना फुटूं लागलेल्या लोंबराप्रमाणें लाटांवरला फेंस सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्या प्रेक्षकाला रमवूं शकला असता. आळीपाळीनें या दोन सागरांकडे थोडा वेळ पाहून त्या दोघी पुढें चालूं लागल्या. समुद्राच्या सहवासानें वाळवंटही नाचरें झालें होतें, म्हणूनच कीं काय वाळूचे बारीक कण एकमेकांचा पाठलाग करीत हवेंत धांवत होते. लाटांची क्रीडा पाहण्याचा मोह वारुणीला अनावर झाला आणि शिवमंदिराकडे न वळतां त्या दोघीही पाण्यांत जाऊन उभ्या राहिल्या. पाण्यांखालून झरझर नाहींशी होणारी वाळू, कड्यावरून उड्या टाकणाऱ्या लहान धबधब्याप्रमाणें दिसणाऱ्या लाटांच्या रांगा, लाटा किनाऱ्याकडे आल्या म्हणजे कुरळ्या केंसाप्रमाणें चालणारी त्यांची क्रीडा,

पोलक्याच्या झालरीप्रमाणें वाटणारा त्या लाटांवरील फेंस, या साऱ्या गोष्टी किती वेळ पाहिल्या तरी नुकत्याच आपण पाहूं लागलों आहों असें वारुणीला वाटलें. ”

साधा पाऊस ! पण त्यावर लढाईचें रूपक खांडेकर कसें सांगोपांग चढवितात. पहा:—“ आकाशांत युद्धाचा नगारा वाजला. लगेच काळीं चिलखतें घातलेले मेघसैनिक इकडे तिकडे फिरूं लागले. त्यांनीं रणदुंदुभि वाजवून निशाण मधूनच फडकावण्याला सुरवात केली. त्या मेघांना भिऊनच कीं काय वारा पृथ्वीवर पळत आला. प्रीतीप्रमाणें भीतीही सांसर्गिक असल्यामुळें भयभीत वायूचा स्पर्श होतांच झाडेंही थरथर कांपूं लागलीं. आकाशाच्या बागेंत फुललेल्या तारकापुष्पांचा मेघांनीं केव्हांच चेंदामेंदा केला होता. थोड्याच वेळांत त्यांनीं शरवृष्टि आरंभिली आणि पावसाच्या सरीवर सरी कोसळूं लागल्या. ”

अशीच अलंकारिक भाषा नायक–नायिकांपासून मोटार–ड्रायव्हर व कारखान्यांतील कामकरिणी येथपर्यंत सर्वांच्या तोंडीं आहे. त्यामुळें पात्रांतील स्वाभाविकता उणावली आहे. पण समाजाविषयीं व्यापक दृष्टीनें विचार करण्याची शिकवण ही कादंबरी वाचकाला देते आणि तीहि काव्यपूर्ण कल्पनेच्या व रसपूर्ण भावनेच्या द्वारें.

## ‘ उल्के ’तील स्वभाव–लेखन

या गुणांचा विकास ‘उल्का’ या कादंबरींत पहावयास सांपडतो. ‘ध्रुवा’-नंतर थोड्याच दिवसांनीं ही कादंबरी महाराष्ट्र रसिकांच्या हातीं पडली आणि त्यांनीं तिचें मोठें कोडकौतुकहि केलें. ‘उल्का’ ही एका खेड्यांतील शाळामास्तराची मुलगी. राष्ट्रसेवा करण्याच्या बुद्धीनें खेड्यांत वीस रुपयांवर शिक्षकी करणारे ध्येयवादी भाऊ, हें भाऊसाहेब खांडेकरांचेंच प्रतिबिंब आहे असें बऱ्याच ठिकाणीं वाटतें. सरस्वतीची सेवा करण्यासाठीं लक्ष्मीकडे पाठ फिरविल्यामुळें भाऊंना अनेक संकटें सोसावीं लागतात. त्यामुळें क्वचित् निराशेचे, पश्चात्तापाचे झटके त्यांना येतात. पण त्यांचा स्वभाव धीरोदात्त आहे. आत्म्याचें लग्न जनसेवेशीं लावण्याची ओढ त्यांना आहे.

ते गडकऱ्यांचे मित्र आहेत. त्यांच्या कविताहि कादंबरींत मधूनमधून दिलेल्या आहेत. कांहीं रूपक–कथाहि कथासूत्रांत गोंवलेल्या आहेत. दोन-दोन, तीन–तीन पानांचीं पत्रेंहि बरींच आहेत. ही कादंबरी म्हणजे उल्केचें आत्मचरित्र आहे. ' पण लक्षांत कोण घेतो ' मध्यें यमुना आपली कहाणी सांगते, तशी उल्का या कादंबरींत आत्मवृत्त निवेदन करते, पण दोहोंत तफावत किती ! यमुनेची भाषा अगदीं घरगुती आणि प्रसंग अत्यंत जिव्हाळयाचे, तर उल्केची भाषा कोटीबाज व अलंकारयुक्त आणि प्रसंग प्रेमाच्या ठरीव ठशाचे. तथापि खांडेकरांच्या इतर कोणत्याहि कादंबरीपेक्षां उल्केंतील पात्रांचें स्वभावलेखन अधिक ठसठशीत आहे. त्यामुळें तीं तीं पात्रें जिवंत वाटूं लागतात आणि त्यांच्या सुखदुःखांशीं वाचक समरस होऊं लागतो.

## ध्येयवादी नायिका

उल्केचें कथानक एवढेंच कीं, तिच्यावर वसंतराव व माणिकराव हे दोघे तरुण प्रेम करतात. पण ते दोघेहि लग्न करतात दुसऱ्या मुलीशींच. प्रणय–भंगानें होरपळलेली उल्का, अखेर एका श्रीमंत बिजवराच्या गळ्यांत माळ घालते. पुढें ती गरोदर असतांनाहि 'नवरेशाही व नोकरशाही' या दोघांचाहि कायदेभंग करून सहा महिने तुरुंगांत जाते. या मुख्य कथानकाच्या आजूबाजूला दुय्यम पात्रांचे कांहीं गौण प्रसंग रेखाटले आहेत.

जगांत दारिद्र्याचा समुद्र पसरला आहे याची जाणीव उल्केला हळुहळु होऊं लागली. ती चंद्रकांतानें स्पष्ट करून दिली. सगुण नांवाच्या मजुरा-वरून गोष्टी निघाल्या असतां " चंद्रकांतानें त्याची सर्व हकीगत सांगितली. सगुण अलीकडे आजारीच होता. घरीं पाठवायला त्याला पैसे कुठून मिळणार ? भावाचें पत्र आलें, " पैसे पाठीव; नाहींतर जप्तींत घर जाणार. " तेंच भ्रमांत त्याच्या डोक्यांत घोळत होतें.

मला वाईट वाटलेलें पाहतांच चंद्रकांत म्हणाला, ' उल्का, एक सगुण पाहून रडतेस तूं. पण सारं परळ–परळच कशाला ? मुंबई, हिंदुस्थान–असल्या सगुणांनींच भरून गेलें आहे. डोळ्यांत समुद्र असला तरी आटून जाईल तो रडून रडून ! "

‘ आणि तो आटून गेला म्हणजे वडवानल बाहेर पडेल त्यांतून ! ’

## प्रवास–वर्णनाचें चित्र

सावंतवाडीहून बेळगांवला सारवट–गाडींतून जाण्याचा योग उल्केला आला. त्यावेळीं ती दहा वर्षांची होती. घाटांतून रात्रीचा तो प्रवास तिला फार आनंददायक वाटला. त्या प्रवासाचें वर्णन ती पुढील आल्हादक शब्दांनीं करते. ‘ बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांचा मंजुळ आवाज ऐकून कुणी तरी घंटा वाजवून देवाची पूजा करीत आहे असा भास होत होता. उजवीकडे डोंगरावर पडलेलें चांदणें पाहून तर शंकराच्या पिंडीवर दुधाचा अभिषेक होत आहे असेंच एखाद्या भाविक कवीनें म्हटलें असतें. एका बाजूला दरी धुक्याची चादर पांघरून निजली होती. मधूनच खडकांतून वाहणारे पाण्याचे ओघळ चांदण्यांत हिऱ्यासारखे चमकत असत. फुलें आणि पानें यांचा मंद अस्फुट सुगंध वाऱ्याच्या झुळकेबरोबर येऊन जाई. जिवलग मित्रानें जातां जातां हळूच कानांत आनंदाची गोष्ट सांगावी तसा तो सुवास वाटे. ”

## समुद्राचीं नाना रूपें

सूर्यास्त आणि तोहि समुद्रावरचा—किती रम्य प्रसंग ! कैक कादंबरी-काऱ्यांच्या कुंचल्यानें रंगविलेला. खांडेकरांची उल्का म्हणते, “ सूर्य समुद्रांत बुडायला लागला त्यावेळीं केवढी गंमत दिसली. जणुं कांहीं समुद्राच्या पाण्यांत कुणी तरी सोन्याची घागर बुडवीत आहे. थोडा वेळ मी समुद्राच्या पाण्याशीं खेळलें. मोठ्या मोठ्या दिसणाऱ्या लाटा हंसत-खिदळत किनाऱ्याकडे येत. पहिल्यांदा त्यांची भीति वाटे. पण चंद्रज्योत पेटली कीं तिच्यांतून फुलें गळावींत त्याप्रमाणें लाट चटकन फुटे आणि जिकडे तिकडे फेंसच फेंस होई. जर लावलेल्या अस्मानी साडीसारख्या दिसणाऱ्या या समुद्राकडे किती वेळ पाहिलें तरी मला पुरें होईना. ”

आणि समुद्रावरील सूर्योदय ! तो तरी कमी रम्य असतो काय ? आनंदांत बुडालेल्या उल्केला तर वाटलें, “ बोट धक्क्याकडे जाण्याकरितां वळली. समोरच सूर्योदय होत होता. त्याचे ते पिवळसर किरण माझ्या

अंगावर पडले. सृष्टिदेवतेची किती सुंदर अष्टपुत्री होती ती ! त्या किरणांनीं पाण्यांत सोनेरी स्तंभ निर्माण केले. माझ्या धुंद मनाला वाटलें, मी सोन्याच्या द्वारकेंत आहें. माझा श्रीकृष्ण माझ्याजवळच उभा आहे. मी त्याची रुक्मिणी. रुक्मिणीला सत्यभामेसारखी मत्सरी सवत होती याचा विसरच पडला मला."

समुद्र व खाडी यांचें संबंध पाहून उल्केला पुरुष व स्त्री यांचें नातें आठवलें. ती म्हणते, "बिचारी खाडी समुद्राला मिळते. समुद्र रंगांत आला कीं खाडीला भरती येते. तो रागावून दूर गेला कीं—खाडी म्हणजे वाळवंट होतं नुसतं ! खाडीचं सारं जीवन समुद्रावर अवलंबून ! स्त्रीचेंहि असेंच नाहीं कां ?"

## समाजवादाची तुतारी

'दोन ध्रुव' ही कादंबरी १९३४ सालीं प्रसिद्ध झाली. ती क्रमानें तिसरी असली, तरी गुणानें पहिली आहे. कृत्रिम अलंकार व रुक्ष व्याख्यानें यांचें ओझें या कादंबरीवर लादलेलें नाहीं. भाषा सहजसुंदर आहे. मधूनमधून संवाद पुष्कळ पेरलेले आहेत. संविधानकाची बांधणीहि कौशल्यानें जिज्ञासा-वर्धक अशी केलेली आहे. लेखकाला दीनाविषयीं वाटणारी अनुकंपा चित्रित करणारीं स्थळें अनेक आहेत. समाजसत्तावादाचा प्रचार, कलेची मर्यादा संभाळून जितका करतां येणें शक्य आहे, तितका हींत केलेला आहे. कादंबरीकाराचा सारा जन्म ज्या कोंकणभूमींत गेला, तिच्या पार्श्वभूमीवरच कथानक उभारलेलें असल्यानें सुंदर निसर्गवर्णनें जागोजाग आलेलीं आहेत.

## दोन जगांतील अंतर

समाजांतील विषमता हेंच त्याच्या दुःखाचें मूळ आहे; श्रीमंत व गरीब हा वर्गभेद नाहींसा झाल्याशिवाय समाजाला सुख, शांति व स्थैर्य लाभणार नाहीं, असा संदेश लेखकानें कलेच्या तुतारींतून ऐकविला आहे. श्रीमंती व गरिबी, विद्वत्ता व अज्ञान, कलाजीवी व श्रमजीवी यांचीं दोन जगें अगदीं भिन्न असतात. त्यांना एकत्र आणण्यासाठीं खांडेकरांनीं असें

कथासूत्र निवडलें आहे कीं, वत्सला ही एका ललित-लेखकाची बायको. ती कुरूप असल्यामुळें तिचा त्याग तो लेखक करतो. त्यामुळें ती कोंकणां-तील एका काजूच्या कारखान्यांत मजुरी करून दिवस कंठते. त्याच खेडयांतील एक कामकरीण शहरांत जाऊन नटी होते. तिच्यावर तो ललित-लेखक प्रेम करतो अशा या दोन मार्गांनीं त्या दोन जगांना सांध-णारा पूल खांडेकरांनीं निर्माण केला आहे. त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, " कला आणि जीवन, पांढरपेशा व कामकरी, भोग आणि त्याग-वत्सलेला जिकडे तिकडे ध्रुवांच्या जोड्या दिसूं लागल्या. ध्रुव दोन हेंच खरें ! पण त्यांच्यांतलें हें भयंकर अंतर ! या अंतरामुळेच जगांतलीं सर्व दु:खें उत्पन्न झालीं आहेत. "

## जीवनाला पोषक कला

या दोन ध्रुवांतील अंतर जितकें कमी होईल, तितकें समाजांतील दु:खहि संपुष्टांत येईल. जीवन व कला यांचेंहि ऐक्य होणें अवश्य आहे हें या कादंबरींतील एक गांधीवादी व्यक्ती अलंकारिक रीतीनें सांगते. बाप्पा म्हणतात, ' जीवन म्हणजे जमीन ! काळी, उंच सखल, ओबडधोबड पण तिच्यांतूनच पिकं निघतात. कला ही आकाशासारखी ! आकाशांत नक्षत्रं चमकलीं तरी फळं जमिनीवरच पिकतात ! '

' पण ती पिकवतं कोण ? आकाशानं पाऊसच पाडला नाहीं तर ? ' सुलोचनेनें विचारलें.

' आकाशांत पाऊस जातो कुठून ? जमिनीवरूनच ना ? '

## गांधीवादी पुढाऱ्याचें शब्दचित्र

या बाप्पांचें शब्दचित्र खांडेकरांनीं इतक्या कुशलतेनें काढलें आहे कीं, तें वाचून कोणालाहि कोंकणांतील एका सुप्रसिद्ध गांधीवादी पुढाऱ्याची मूर्ति दिसूं लागते. बाप्पा शरिरानें कसे होते ? तर "स्वारी इतकी हडकुळी होती कीं, बोलून सोय नाहीं. प्रसंगीं वंदनाला झेंडा नसला तरी यांच्या डोक्याला तिरंगी फडकें बांधून झेंडावंदन केलें तरी चालण्याजोगें होतें. वर्ण काळसरच. गालांच्या हाडांप्रमाणें, पुढचे दोन दांतही वर आलेले.

'खादीचा पंचा गुडघ्याच्या खालीं एकदोन अंगळें असेलनसेल. केस डोक्याबरोबर कापलेलें. एखाद्या उघड्याबोडक्या डोंगराप्रमाणें डोकें दिसत होतें त्यामुळें. अंगावरली खादीची चादर मात्र त्यांनीं खांद्यापाशीं दोन्ही हातांनीं घट्ट धरली होती. ''

## सृष्टि-वर्णनाची बहार

कोंकणांतील सृष्टिसौंदर्याचें वर्णन खांडेकर पुढीलप्रमाणें करतातः—
" देवळाला वळसा घालून आल्यावर त्या भव्य सुंदर तळ्याचें दर्शन होतांच वत्सलेच्या श्रमांचा परिहार झाला. त्याच्या निळसर पाण्यावर हलुहलु मिटूं लागलेलीं कमळें दुरून तारकांप्रमाणें दिसत होतीं. मधून-मधून पाण्यावर एखादा लहान तरंग उठे आणि एखाद्या कमळाभोंवतीं नाचे. जणुं कांहीं तो त्या कळीला लाडकेपणानें म्हणत होता, 'कमळाताई, काय ग झालं इतकं रागवायला ? हा घे माझा पापा ! ' तळ्याच्या तीन बाजूंना तीन टेकड्या होत्या. त्याच्या मध्यभागीं हिरव्या कोंदणांतल्या निळाच्या खड्याप्रमाणें तें तळें चमकत होतें. मधूनच वाऱ्याची मंद झुळुक काजूच्या मोहराचा सुगंध घेऊन येई. त्याचा मंदमधुर वास वत्सलेला अत्तरापेक्षांहि अधिक आनंददायक वाटला."

## शहरी संध्याकाळचें चित्रण

मुंबई शहरांतील संध्याकाळच्या देखाव्याचें वर्णन करतांना खांडेकरांनीं प्रत्येक वाक्याच्या गळ्यांत एक एक अलंकार घातला आहे ते म्हणतात,
" सुरकुतलेल्या चेहऱ्याच्या म्हातारीप्रमाणें संध्याकाळ मुंबईत प्रवेश करीत होती. रस्त्यावर उलटसुलट चाललेलीं अगतिक माणसें ! त्या वृद्धेच्या हृदयांतील अनंत आशाच होत्या त्या ! वत्सलेनें समोरच्या इमारतीच्या कांचेच्या तावदानांकडे पाहतां पाहतां तिच्या मनांत आलें—माझ्या आशा आणि हीं कांचेचीं तावदानें सारखींच नाहींत कां ? हीं तावदानें उद्यां पुनः चमकूं लागतील; पण माझ्या आशा ? लग्नाच्या वेळीं आपण केवढीं मनोराज्यें केलीं. ' मी कांहीं कुणाची स्वयंपाकीण होण्याकरितां जन्माला आलेलें नाहीं ' हें आपल्या गर्विष्ठ मामीला आपण किती तोऱ्यानं जाणवलें.

पण मनोराज्यें म्हणजे दंवाचे थेंब ! दंवबिंदूंच्या माळा जगांत कुणाला गळ्यांत घालायला मिळाल्या आहेत ?"

## कृत्रिमतेचा त्याग

'दोन ध्रुव' व 'उल्का' याप्रमाणेंच 'हिरवा चाफा' हीहि खांडेकरांची कादंबरी आपल्या विशिष्ट गुणांनीं लोकप्रिय झालेली आहे. 'ज्योत्स्ना' या आपल्या मासिकींत ही कादंबरी खांडेकरांनीं १९३६ च्या ऑगस्ट-पासून सुरू केली. त्यावेळीं प्रा. फडके यांच्या कादंबऱ्या लोकप्रियतेच्या लाटेवर उभ्या होत्या. त्या लाटेच्या अग्रावर आपली कादंबरीहि आपण बसवूं, अशा ईर्षेनेंच जणू कांहीं खांडेकरांनीं ही कादंबरी लिहिलेली दिसते. अलंकारांची कृत्रिमता कमी करून प्रणयाची मादकता या कादंबरींत खांडेकरांनीं वाढविलेली आहे. हिच्यांतील 'दोन रहस्यें' हें प्रकरण तर फडक्यांच्या कोणत्याहि कादंबरींत सहज खपून जावें इतकें सहजसुंदर व प्रणयरम्य आहे. नायिका सुलभा ही एका श्रीमंत वकिलाची मुलगी, डॉक्टर झालेली. 'ती हंसली' ही साधी गोष्ट खांडेकर कलात्मक रीतीनें कशी सांगतात पहा. "सुलभेनें हंसूं आवरण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला पण जोरानें उतूं जाऊं लागलेलें दूध पाण्याच्या चार थेंबांनीं थोडेंच खालीं बसतें ! अवखळ बालकानें आईच्या हाताला झटका देऊन एकदम मऊ वाळूंत लोळण घ्यावी, त्याप्रमाणें हें खुदकन बाहेर पडलें."

## कथानकांतील रहस्यें

आपले गुरू श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यापासून रहस्यमयता हा गुण घेऊन खांडेकरांनीं ह्या कादंबरींत ओतला आहे. सुलभेचा भाऊ मनोहर यावर खुनाचा आरोप आलेला आहे म्हणून तो फरारी झालेला असतो, असें आरंभीं कळतें; मध्यंतरीं तो अभयमित्र या नांवानें लपतछपत येऊन भेटतो आणि शेवटीं तो खून त्यानें केलेला नसून एका पठाणानें केलेला आहे असें उघडकीस येतें. तसेंच दुसरें रहस्य त्याच्यावर प्रेम करणारी केशर हिचें. ती एका गिरणीवाल्याची मुलगी. ऐश्वर्यांत लोळणारी, गाण्यांत निष्णात, पण तिच्या आईला तारुण्यांत वाईट मार्गाला लावलेलें असतें.

कोणी ? तर मुलभेच्या वकील असलेल्या वडिलांनींच. स्वाभाविकतेला धक्का न देतां रहस्यें आलीं तर तीं जिज्ञासा वाढवूं शकतात. पण तसें येथें फारसें घडत नाहीं. मुलभेचें प्रेम बसतें मुकुंदावर. तो कामगारांचा पुढारी असतो. त्याच्या मुखानें समाजसत्तावादाचीं तत्त्वें खांडेकरांना घोषित करतां आलीं आहेत.

## आयुष्याचें तत्त्वज्ञान

आयुष्य ही एक लढाई आहे हा विचार खांडेकरांनीं मुकुंद व मुलभा यांच्या एका संवादांत मांडला आहे. तो संवाद असा—

'आयुष्य ही एक फार विचित्र लढाई आहे. या घनघोर संग्रामांत मनुष्याला समाजाशीं लढावं लागतं, आपल्यावर प्रेम करणाऱ्या नातलगाशीं लढावं लागतं, फार काय स्वतःशींहि लढावं लागतं.'

'स्वतःशीं ?' एकदम चमकून मुलभेनें विचारलें.

'हो, शत्रूचा बालेकिल्ला तर तोच आहे.'

'म्हणजे मनुष्य स्वतःचाच शत्रु असतो ?'

'नवलसं वाटलं तुला ? Better is the enemy of Good. प्रत्येक मनुष्यांत दोन विरोधी आकांक्षा असतात. त्याला सुखानं रहावसं वाटतं, पण त्याचबरोबर कांहींतरी विशेष करावं, जगाच्या उपयोगीं पडावं, असा दिव्य भासहि त्याला मधूनमधून होतो. हा भास मर्त्यसृष्टींत उतरावा म्हणून त्याला स्वतःशींहि लढावं लागतं!'

'आणि या लढाईत जखमा झाल्या तर ?'

'झाल्या तर कां ? होतातच ! ही कांहीं लुटूपुटीची लढाई नाहीं. पण त्या जखमांवर छानसं औषध आहे एक !'

'कोणतं ?'

'प्रेम करणारं मनुष्य !'

## क्रांतीचा नेता कोण ?

'श्रीमंतांच्या जवळचा दाम म्हणजे गरिबांचा निढळचा घाम' हा सिद्धान्त मुकुंद मुलभेला पढवितो. आणि पुढें असें सांगतो कीं, "आणखी

कारखाने निघूं देत, आणखी माल उत्पन्न होऊं दे, पण तो ज्यांच्या श्रमानें निर्माण होतो, त्यांचा त्याच्यावर हक्क असूं दे. ' असें ' श्रम हेंच भांडवल ' हें साम्यवादी तत्त्व तो तिच्या मनावर बिंबवतो. त्यामुळें तीहि शेतकऱ्यांच्या चळवळींत सामील होते. ही समाजवादी क्रांति घडवून आणण्याची जबाबदारी व शक्ति मध्यमवर्गातच आहे असें तिला वाटतें. तिचें मन म्हणतें, " आजचें जग गरिबांचें नसेल. पण उद्यांचें जग त्यांचें कां होऊं नये ? पण जगांत एवढा फरक पडेल कां ? या जगांत आपोआप कांहींच बदलत नाहीं. कुठल्याहि देवाची मूर्ति दगडांतून कांहीं प्रगट होत नाहीं. मूर्तिकारानें ती दगडांतून निर्माण केलेली असते. मग आतां जगाला हें नवें रूप कोण देणार ? गरिबांना शक्ति नाहीं, श्रीमंतांना इच्छा नाहीं ! या दोन जगांच्या सीमेवर राहणाऱ्या माणसांनींच या क्रांतीचा पुढाकार घ्यायला हवा. त्यांच्या डोळ्यांवर श्रीमंतीचा धूर नसतो आणि त्यांच्या डोळ्यांतून गरिबीचे अश्रुहि वहात नसतात. त्यामुळें उघड्या डोळ्यांनीं सारी वस्तुस्थिती त्यांना स्पष्ट पाहतां येते. त्यांचीं अंतःकरणें उपासानें सुकलेलीं नसतात आणि विलासानें कुजलेलींहि नसतात. एकमेकांशीं प्रेमाचा काडीमात्रहि संबंध न ठेवणाऱ्या या दोन जगात मोकळेपणानें जर कुणी संचार करूं शकतील तर ते मध्यमवर्गातील लोकच ! उद्याचें जग गरिबांचें होईल अशी धडपड करणें हें या लोकांचें कर्तव्यच आहे. "

## ध्येयाची ओढ

हिरव्या चाफ्याचा वास दुरून येतो आणि तें फूल लपलेलें असतें झाडावरील पानांत. त्याप्रमाणेंच प्रेम व ध्येय दूर असतें, पण हृदयाला ओढ लावीत असतें. ही कल्पना या कादंबरींत चाफ्याच्या सुगंधाप्रमाणें ओतप्रोत भरून राहिलेली आहे. मुकुंदाच्या गरीब बहिणीच्या शुश्रूषेसाठीं सुलभा घरीं न जातां तिच्याजवळ राहते, तेथून निघतांना तिच्या हातावर एक नोट ठेवते आणि शेवटीं ' ताई सोडून गेली रे आपल्याला ' ही दुःखद वार्ता जखमी झालेल्या मुकुंदाला सांगते, हे तिन्ही प्रसंग करुण रसानें भरलेले आहेत. सुभाषितांची पखरण तर सर्वत्रच आहे. मुकुंद

मुलभेला लिहिलेल्या एका पत्रांत म्हणतो, "वर्तमानकाळ हा वाहत्या नदीसारखा असतो. तो भूतकाळाच्या पर्वतांतून उगम पावत असला तरी भविष्यकाळिच्या सागराकडेच त्याची धांव असावयाला नको कां?"

क्रौंचवध, पांढरे ढग इत्यादि अलीअलीकडच्या कादंबऱ्यांत खांडेकरांनीं आपल्या भाषेतील कृत्रिमतेला कातरी लावली आहे, पात्रांत जिवंतपणा आणला आहे आणि समाजवादाचा प्रचार कलात्मक पद्धतीनें केला आहे. चित्रपट-सृष्टींत प्रवेश केल्यामुळें त्या सृष्टींतील चमत्कृतीचे पडसाद त्यांच्या कथा-सृष्टींत उमटूं लागले आहेत.





## ग. त्र्यं. माडखोलकर : : २२

'राजकीय कादंबरीकार' हा बहुमान मराठींत मिळविणारे प्रमुख साहित्यिक म्हणजे माडखोलकर. त्यांचेपूर्वी कादंबऱ्यांमध्यें राजकीय विचार किंवा वातावरण अगदींच येत नसे असें नाहीं. अर्थात् कादंबरी म्हणजे एक ललित कृति—मानवी भावनांच्या आविष्काराचें एक साधन—संसारांतील सुखदुःखांचें चित्रण करणें हें तिचें मुख्य कार्य—त्यामुळें सामाजिक विषयांना सहजच प्राधान्य आलेलें. तरुण-तरुणींचा प्रणय, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, विधवांची दुःस्थिती, इत्यादि हृदयांतील भावना हलविणारे विषय कादंबऱ्यांमध्यें मुख्यतः रंगविलेले असतात. पण ते रंगवितां रंगवितां, कुशल कादंबरीकार त्या त्या वेळच्या परिस्थितीचें चित्रहि त्यांत उमटवितो.

आणि त्या चित्रणांत राजकारण सहजच येतें. ' कर्मयोग, ' ' आजच ' इत्यादि कादंबऱ्या म्हणजे हरिभाऊ आपट्यांच्या राजकीय मतांच्या तुताऱ्याच होत. ऐतिहासिक कादंबऱ्या रचण्यांतहि हरिभाऊंचा उद्देश चालू राजकारणाला पर्यायानें वाचा फोडण्याचाच होता. याशिवाय कांहीं कादंबऱ्या खास राजकीय विषय घेऊनहि रचलेल्या होत्या. १९३४ साली प्रसिद्ध झालेली ' थोरली आई ' ही कादंबरी तर १९३० सालांतील गांधीजींच्या चळवळीवरच आधारलेली आहे आणि त्यासाठींच ती परक्या सरकारनें जप्तहि केली होती. तशीं प्रश्नोत्तरेंहि विधिमंडळांत झालीं होतीं. राजकीय कारणासाठीं आक्षिप्त ठरलेली तीच पहिली मराठी कादंबरी. पण राजकारणाला प्राधान्य देणाऱ्या कादंबऱ्या कलावैभवानें नटविणारे व एकापाठोपाठ अनेक प्रसिद्ध करणारे माडखोलकर हे पहिलेच होत. केवळ संख्येच्याच नव्हे, तर पृष्ठसंख्येच्या—आणि त्याहिपेक्षां कलात्मकतेच्या दृष्टीनेंहि माडखोलकरांच्या राजकीय कादंबऱ्यांचें स्थान उच्च श्रेणींत आहे.

## वाङ्मयीन गुरु

सुमारें दहा वर्षांचे अल्पावधींत दहा-बारा कादंबऱ्या लिहून माडखोलकरांनीं मराठी कथासृष्टींत आपल्या नांवाचें लेणें कोरलें आहे. ' केवळ सौंदर्य–निर्मिति हें ललित वाङ्मयाचें उद्दिष्ट नसून उद्‌बोधन हें आहे ' असें त्यांचें निश्चित मत आहे. ' सौंदर्य-निर्माणाचें एकमेव उद्दिष्ट ललित-वाङ्मयाच्या माथीं मारून त्याला जें एकांगीं आणि कृत्रिम स्वरूप देण्यांत येत असतें ' त्यावर त्यांनीं टीका केलेली आहे. त्यांचें साहित्य सहेतुक असतें. त्यांचें लालित्य लोकजागृतिकारक असतें. त्यांच्या लेखनांतील प्रमुख गुण म्हणजे रेखीवपणा. शब्दांची योजना, वाक्यांची रचना, कथानकाची घडण - सारें कसें, हस्तिदंती वस्तूप्रमाणें, कोरीव—कातीव ! हा गुण त्यांनीं आपले गुरु श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांजपासून उचलला. त्याबरोबरच श्री. न. चिं. केळकर यांचेकडूनहि त्यांनीं चिकित्सकपणा व समतोलपणा हे गुण घेतले. गडकऱ्यांच्या भाषावैभवाची छापहि माडखोलकरांच्या लेखनावर आरंभीं आरंभीं घनदाट पडलेली दिसते. कोल्हटकर, केळकर, व

गडकरी या तिघांच्याहि ललित गुणांचा रस आपल्या मनाच्या मुशींत ओतून माडखोलकरांनीं आपल्या साहित्याची सुवर्ण–मूर्ति निर्माण केली.

कादंबरीकार या दृष्टीनें पहातां त्यांनीं प्रा. फडके व श्री. खांडेकर या दोघांचेहि चांगले गुण घेतले. फडक्यांचा रस-परिपोष त्यांनीं आपलासा केला; पण त्यांच्याप्रमाणें ते केवळ शृंगारांतच रंगून गेले नाहींत. खांडेकरांप्रमाणेंच माडखोलकर प्रौढ, रम्य व सुसंस्कृत भाषा लिहितात आणि तिच्या अंगावर मोजके पण ठसठशीत अलंकारहि घालतात. परंतु खांडेकरांप्रमाणें त्या अलंकारांचा अतिरेक करून व कथानकांत कृत्रिमता आणून ते स्वभाव-रेखनाची किंवा रसनिर्मितीची हानि होऊं देत नाहींत. कोल्हटकर व केळकर या " दोन तात्यां "पासून आपल्याला किती व कसा लाभ झाला, हें कृतज्ञतेनें नमूद करतांना माडखोलकर म्हणतात, " केळकरांजवळ जे पांच महिने मी काढले, त्या पांच महिन्यांत जन्मभर पुरेल इतकें लेखनकलेचें शिक्षण त्यांनीं मला दिलें. पण तें सगळें सहजगत्या आणि अप्रत्यक्ष; कोल्हटकरांप्रमाणें सहेतुक किंवा श्रमपूर्वक नव्हे. पण आंब्याच्या झाडाखाली बसलेल्या माणसाला त्याच्या छायेचा गारवा सहजासहजीं मिळाला आणि फलभारानें लवलेल्या त्याच्या फांदीला लागलेले चार आंबेहि अनायासें त्यानें तोडले म्हणजे तो लाभ नव्हे असें थोडेंच आहे ? "

## बाळपणांतील श्रीमंती

एकोणिसावें व विसावें या दोन शतकांच्या सीमेवर माडखोलकरांचा जन्म झालेला आहे. १९०० सालीं तारीख २८ डिसेंबर या दिवशीं मुंबई येथें ते जन्मले. जुन्या शतकांतील भारतीय संस्कृति व नव्या शतकांतील पाश्चात्य संस्कृति या दोघींकडूनहि त्यांना जणुं कांहीं साहित्याचें बाळलेणें मिळालें. त्यांचे वडील भिक्षुक होते, तरी बरेच संपन्न होते. घरच्या गणेशोत्सवांत आरतीच्या वेळीं नेसण्याकरतां आठ दिवसांसाठीं आठ सुदर पीतांबर लहानग्या गजाननासाठीं त्यांच्या वडिलांनीं घेतले होते. विसावें वर्ष लागेपर्यंत प्रत्येक सणाला गजाननाला कंठीपासून कडीतोड्यापर्यंत दागिने घालावयास मिळत. शाळेंत जावयाचें तेंहि अशा झोकानोकानें

कीं, कोणाला वाटावें एखादा लक्ष्मीपुत्रच आला आहे. डोक्याला जांभळ्या मखमलीची भरजरी टोपी, अंगांत सॅटिनचा झगझगीत लांब कोट, दोन्ही हातांत हिऱ्याच्या आंगठ्या, कपाळाला उभें केशरी गंध आणि पायांत जरीची काडी असलेला लालभडक पुणेरी जोडा अशा थाटांत जेव्हां ते मराठी शाळेंत गड्यासह जात असत, तेव्हां मास्तर विनोदानें म्हणावयाचे, " यावं सवाई माधवराव ! "

## वाचनाचा सोस

गजाननरावांच्या आयुष्यांतील पहिलीं वीस वर्षें मुंबईंतच गेलीं. तापट वडिलांच्या कडक नजरकैदेंत त्यांना हा काळ काढावा लागला. भस्म व गंध अंगाला लावावें, प्रदोषाचा उपवास करावा, शंकराची प्रार्थना करावी, योगासनें-प्राणायाम करावे-इत्यादि कर्मठ परंपरेंत त्यांचें पूर्वायुष्य न्हाऊन निघालेलें आहे. १९१८सालीं त्यांना मॅट्रिकच्या परीक्षेंत अपयश आलें. वडिलांनीं पुनःपुनः आग्रह केला तरी मॅट्रिकचे तोंड न पहाण्याचा हट्ट त्यांनीं कांहीं सोडला नाहीं. पण त्यांचें खरें यश म्हणजे वाङ्मय-लेखनांतील. त्या यशाचे एकएक तुरे ते लहानपणापासूनच आपल्या मस्तकीं खोवीत चालले होते. मोरोपंत, रामदास, तुकाराम व शाहिरी वाङ्मय यांचा अभ्यास ते करून करीत होते. कालिदास, भवभूति, बाण, जयदेव वगैरे संस्कृत वाग्भटांचाहि परिचय त्यांनीं चांगलाच करून घेतला होता. इंग्रजींतील वर्डस्वर्थ, टेनिसन, शेले, वगैरे कवींचें काव्य त्यांनीं वाचलें होतें. इटाली व आयर्लंड यांच्या इतिहासाचें अध्ययनहि त्यांनीं केलें होतें.

या वाचनाचें फल लेखनाच्या रूपानें देण्यास ते समर्थ होते. नुसतें टिप-कागदाप्रमाणें दुसऱ्याचे विचार शोषून घेणारे वाचक पुष्कळ असतात, पण स्पंजाप्रमाणें घेतलेलें ज्ञान जसेंच्या तसें, किंबहुना मेघाप्रमाणें तें मधुर करून परत देणारे वाचक मात्र विरळा. माडखोलकरांनीं वयाचे अकरावे वर्षीं पद्य व पंधराव्या वर्षीं गद्य लिहावयास सुरवात केली. ' सारस्वत-सेवक-संघ ' नांवाचा एक मित्रांचा गट त्यांनीं बनविला होता. त्या संघाचें ' महाराष्ट्र ' नांवाचें मासिकहि निघत असे. वाचन, विवेचन व

लेखन असें कार्य या संघामार्फत होत असे. त्याच्या जोडीलाच ‘ देशसेवक संघ ’ हि त्यांनीं स्थापन केला होता. त्या संघातर्फे ‘ जागृति ’ नांवाचें हस्तलिखित निघत असे. त्याचे संपादक माडखोलकरच होते. दर आठवड्यास सभा भरून राष्ट्रीय प्रश्नांचा विचार अनेक अंगांनीं होत असे. या सर्व भाषणालेखनाचा झरा म्हणजे सामुदायिक मालकीचा ग्रंथसंग्रह. त्यांत सुमारें दोन हजार ग्रंथ होते. त्यांचा फडशा माडखोलकरांनीं केव्हांच पाडला होता.

## श्रेष्ठ टीकाकार

‘ केशवसुतांचा संप्रदाय ’ हा माडखोलकरांचा टीकात्मक लेख १९१९ सालीं ‘ नवयुग ’ मासिकांत प्रसिद्ध झाला. त्यामुळें ते एकदम प्रकाशांत आले. त्यापूर्वीं त्यांच्या कविता ‘ विविध-ज्ञान-विस्तार ’ वगैरे मासिकांतून प्रसिद्ध होत होत्या. पण टीकाकार म्हणूनच ते मराठी वाचकांपुढें तेजस्वीपणानें आले. आणि अजूनहि त्यांचें स्थान ‘ टीकाकार ’ म्हणूनच श्रेष्ठ आहे. या पहिल्या टीका–लेखाची प्रशंसा पुष्कळच झाली. श्री. कोल्हटकर तर मिस्किलपणानें म्हणाले, “ यांचा गडकऱ्यांवरला लेख जेव्हां मी वाचला तेव्हां मला कळेना, आपण गडकऱ्यांवरला लेख वाचतों आहोंत कीं, गडकऱ्यांचा लेख वाचतो आहोंत हें !” यानंतर कांहीं वर्षांनीं कोल्हटकरांनीं आपल्या या शिष्याला असें प्रशंसा–पत्र दिलें कीं, “...आपलें गद्य उत्तरोत्तर फारच तेजस्वी व वैचित्र्यमय होत चाललें आहे. आपल्याहून चांगलें गद्य लिहिणारे लेखक फारच थोडे असतील असें वाटतें. ”

## रवि-किरण-मंडळाचा लाभ

साहित्याबरोबरच राजकारणावरहि लेख लिहिण्यास माडखोलकरांनीं १९२१ पासूनच सुरवात केलेली आहे. त्यावर्षीं त्यांनीं आयर्लंडांतील सिनफेन चळवळीवर चार लेख लिहिले. ते सर्व केळकरांनीं केसरींत प्रसिद्ध केलें–आणि तेहि अग्रलेखाजवळच्या मानाच्या स्थानीं. त्यानंतर एका वर्षानें ‘ आधुनिक कवि-पंचक ’ हें माडखोलकरांचें टीकापर पुस्तक प्रसिद्ध झालें व खूप गाजलें. त्याच सुमारास पुणें येथें ‘ रविकिरण मंडळ ’ स्थापन

झालें. त्यांत यशवंत, गिरीश, माधव जुलिअन् इत्यादि कवि-श्रेष्ठांचा सहवास माडखोलकरांना लाभला. तो त्यांच्या साहित्यिक उत्कर्षाला पुष्कळच पोषक ठरला. ना. गोखले यांच्या ‘ भारत-सेवक-समाजामध्यें ’ १९२२ सालीं माडखोलकरांनीं प्रवेश केला. ‘सोसायटीं’त राहून वाङ्मयकार्य करण्याचा त्यांचा विचार होता. पण १९२४ सालीं त्यांनीं राजीनामा दिला. तेथें त्यांना चाळीस रुपये पगार मिळत होता. या अवधींत ‘ ज्ञानप्रकाशांत ’ दर शनिवारीं ‘ काव्यशास्त्रविनोद ’ व दर शुक्रवारीं ‘ परराष्ट्रीय राजकारण ’ हीं सदरें माडखोलकर लिहीत. १९११ सालीं केळकरांनी बडोद्याच्या साहित्य-संमेलनाचे अध्यक्षपदावरून जें संस्मरणीय भाषण केलें, त्याचें प्रत्यक्ष लेखन आणि लेखनाची आधींचीं व नंतरची तयारी हीं सर्व कामें माडखोलकरांनींच पार पाडलीं; एवढेंच नव्हे तर, या भाषणांतील आधुनिक मराठी काव्याच्या विवेचनांत माडखोलकरांचें आपणाला मोठें साहाय्य झालें असें केळकरांनींच स्वतः जाहीर केलें.

## वृत्तपत्राच्या सृष्टींत

बुद्धीला चौरसपणा आणून देणाऱ्या व समाजाच्या दैनंदिन जीवनाची घडण बनविणाऱ्या वर्तमानपत्राच्या धारेस माडखोलकर पुणें येथें जे लागले, ते नागपूरपर्यंत वहात गेले. तेथील ‘ महाराष्ट्र ’ साप्ताहिकाच्या संपादक-वर्गांत तें १९२४ सालीं जाऊन दाखल झाले. साहित्यांतील विजयाचे ध्वज हातीं घेऊन गेलेल्या माडखोलकरांना तेथें आरंभीं पगार किती मिळत होता ? तर फक्त साठ रुपये. शेवटीं शेवटीं चढत चढत तो ९५ पर्यंत गेला. शंभरी कांहीं तेथें गांठली गेली नाहीं ! त्यासाठीं त्यांना स्थानांतर करावें लागलें. नागपूर येथेंच १९४४ सालीं ‘ तरुण भारत ’ नांवाचें दैनिक निघालें, त्याच्या मुख्य संपादकाचा मान माडखोलकरांना लाभला. मान मोठा, पण धन ? शंभर रुपये पगार त्यांना मिळूं लागला. आपलीं ठाशीव मतें पल्लेदार भाषेनें व डौलदार मांडणीनें समाजापुढें ठसठशीतपणें ठेवण्याचें स्वातंत्र्य त्यांना ‘तरुण भारतां’त लाभलें. १९३० सालीं जंगल सत्याग्रहांत भाग घेऊन माडखोलकरांनीं चार महिने कारागृहवास भोगला.

## संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार

सुमारें दहा वाङ्मयविषयक प्रबंध, बारा कादंबऱ्या, सहा नाटिका, दोन कथासंग्रह आणि कांहीं कविता यांचें ललित भांडार महाराष्ट्र-शारदेच्या चरणीं माडखोलकरांनीं अर्पण केलें. तिचा प्रसाद म्हणून बेळगांव येथें १९४५ सालीं भरलेल्या साहित्य संमेलनांतील ललित वाङ्मय विभागाचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें. त्या अध्यक्षपदावरून त्यांनीं संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार आवेशानें पण सयुक्तिकपणें केला. त्यापुढेंहि याच कार्याचें कंकण हातीं बांधून त्यांनीं चळवळ केली. बडोदे, इंदूर, औरंगाबाद, मुंबई, पुणें, महेश्वर, उज्जयिनी वगैरे अनेक ठिकाणच्या प्रांतिक साहित्य संमेलनांचीं अध्यक्षपदें त्यांनीं भूषविलीं आहेत. १९४८ सालीं, गांधी-हत्येनंतर नागपुरांत जी जाळपोळ झाली, त्यांत त्यांचा प्राणप्रिय असा ग्रंथसंग्रह जळून खाक झाला. या अनर्थाचें वाङ्मयीन स्वरूप ' निर्वासितांची कहाणी ' या पुस्तकांत पहावयास मिळते. तरीहि पराजित न होतां पूर्वीच्याच उत्साहानें ते आपलें लेखनाचें कार्य पुढें चालवित आहेत. त्यांना कादंबरी-लेखनाला प्रवृत्त करणाऱ्या त्यांच्या सुविद्य पत्नी सौ. शांताबाई यांनाहि १९५१ सालीं ' करुणा-विमुख ' मृत्यूनें हिरावून नेलें. तथापि माडखोलकरांची साहित्य-सेवा अखंड चालूच आहे.

## सीमोल्लंघनाचे प्रकार

या साहित्यांतील लालित्य जितकें मोहक असतें, तितकेंच त्यांतील राजकारण दाहक असतें. त्यांची ' नवे संसार ' ही महायुद्धकालीन कादंबरी तिच्यांतील राजकीय विचारामुळें परक्या सरकारनें आक्षिप्त ठरविली होती. ' विषय-मर्यादा, काल-मर्यादा आणि पृष्ठ-मर्यादा' या तीन मर्यादांचें उल्लंघन या कादंबरींत झाल्याची कबुली माडखोलकरांनीं दिली आहे. पण परक्या सरकाराच्या दृष्टीनें त्यांनीं कायद्याचेंहि उल्लंघन केलें असें ठरलें व म्हणून ती कादंबरी जप्त झाली. हें असें राजकीय तसेंच नैतिक सीमोल्लंघनहि त्यांच्या हातून कांहीं कादंबऱ्यांत घडलें आहे असा टीकाकारांचा आक्षेप आहे. प्रा. फडक्यांप्रमाणें केवळ उत्तान शृंगाराचाच नव्हे तर

अश्लीलतेचाहि कलंक त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांना लागल्याचा आरोप त्यांच्या निकट मित्रांनींहि प्रकटपणें घेतला आहे. पण शुद्ध कलात्मक असें सुंदर ललित लेखनहि आपण करूं शकतों असा निर्वाळा देणारें लेखन माडखोलकरांनीं केलें आहे व तें दीर्घकाल टिकणारें आहे. कवि, कथाकार, कादंबरीकार, वृत्तपत्रकार या सर्वांपेक्षां त्यांची ' टीकाकार ' ही भूमिका उच्च आहे व सर्वांच्या आदरास निरपवाद पात्र होण्यासारखी आहे.

## राजकीय टीकेचें पुट

' मुक्तात्मा ' ही त्यांची पहिली कादंबरी. सुमारें तीन वर्षे लेखन करून १९३३ सालीं त्यांनीं ती प्रकाशांत आणली. चंद्रशेखर हा नायक ना जात, ना कुळ–असा अँग्लो–मराठा दाखविला आहे. त्याच्यावर केशवाची दृढ भक्ति. ललिता व सुमति यांच्या प्रेम-जालांत त्या दोघांचे जीव गुंतलेले, त्यामुळें प्रणयाचें वर्णन माडखोलकरांना करतां आलें. चंद्रशेखर क्रांतिकारक दाखवून लो. टिळक, म. गांधी, डॉ. बेझंट वगैरे थोर थोर राजकीय पुढाऱ्यांवर त्याला माडखोलकरांनीं तोंडसुख घ्यावयास लावलें आहे. प्रेमाबाईच्या अड्ड्यांत व ' प्रागतिक ' पत्राच्या कचेरींत राजकारण कुटलें जाई तें निराळेंच. प्रेमकारण व राजकारण या दोन्ही विषयांच्या तोंडांत क्लिष्ट संस्कृत शब्दांचा कांटेरी लगाम घातल्यामुळें ही कादंबरी खांडेकरांच्या ' हृदयाच्या हाके ' प्रमाणें बरीचशी दुर्बोध झाली आहे. पण विद्यमान व्यक्तीवरील खरपूस टीकेमुळें ती त्यावळीं गाजली.

## आईचें प्रेम

आईचें प्रेम किती उदात्त असतें याविषयीं ओझरते उल्लेख या कादंबरींत एक-दोन ठिकाणीं आले आहेत. ते असेः—" जें रागानें कठोर होऊं शकतें, तें प्रेम कसलें ? खरें प्रेम तेंच कीं, जें कधींहि रागावूं शकत नाहीं, कधींहि कडू बोलूं शकत नाहीं आणि कधींहि झिडकारूं शकत नाहीं. आपली आई; उभ्या आयुष्यांत ती आपल्यावर फार तर तीनचारदांच रागावली असेल. आणि तिचा तो राग किती क्षणिक ! त्याचें पर्यवसान

पहातां पहातां प्रेमाश्रुंत होत असे; व त्याची झळ आपल्याला लागते न लागते, तोंच तिचा जीव पस्ताव्यानें पोळून जात असे. ”

आईचें समाजावर किती ऋण असतें हें पुढील शब्दांनीं सांगितलें आहे, “ आईपणा ही गोष्ट अशी आहे कीं, ज्याच्यापुढं सर्व जगानं कृतज्ञतेनं मस्तक नमवावं! स्त्री ही माता झाली, म्हणजे समाजाच्या ऋणांतून ती मुक्त होते;—नव्हे समाजच उलट तिचा ऋणी होतो. आणि जिनं समाजाला ऋणी केलं, त्याची परंपरा पुढं चालू ठेवायला हातभार लावला, तिला समाजानं कमी लेखणं कृतघ्नपणाचं होणार नाहीं काय ? ”

## रेखीव वर्णन

कोरीव शब्दांनीं रेखीव वर्णन करण्याचा माडखोलकरांचा गुण या पहिल्या कादंबरींतहि उठून दिसतो. एका शिक्षकाचें शब्द—चित्र त्यांनीं कसें केलें आहे पहा, ‘ नाकाच्या या वाश्याच्या टोकावर जस्ती कड्यांचा चष्मा ते अशा खुबीनें ठेवीत कीं, जरूर तेव्हां दृष्टि खालावून त्यांना त्यांच्यांतून वाचतां येत असे; व ती उंचावून त्याच्या मदतीशिवाय जगाकडे पाहतां येत असे. ते स्वतः कधीं हसत नसत; व वर्गांतहि कोणी हंसलेलें त्यांना खपत नसे. ते चुकून एखादे वेळीं उपरोधानें जेव्हां हंसत तेव्हां पडक्या वाड्याच्या भंगलेल्या भिंताडावर चांदणें पडलें असतां तो जसा भयाण दिसावा, तसें त्यांचें तोंड दिसत असे.’

## जीवनाचें तत्वज्ञान

जीवनांतील सुखदुःखांच्या अनुभवाला कादंबरीकारांनीं किती मनोहर उपमा दिली आहे पहा—“ मानवी जीवन ही आशा आणि निराशा यांची नृत्यभूमि आहे व त्या भूमीवर या जुळ्या बहिणी एकमेकींच्या गळ्यांत लडिवाळपणानें हात घालून, अहर्निश नृत्य करीत असतात. त्यांच्या सलील पदक्षेपानें तुडविल्या जाणाऱ्या हृदयांना संमिश्र संवेदना होतात, त्यांनाच आपण सुखदुःखें म्हणतो; व संध्यारागांत ज्याप्रमाणें प्रकाश आणि छाया यांची मनोहर सरमिसळ झालेली असते, त्याप्रमाणें

सुखदुःखांच्या समप्रमाण मिश्रणानें मानवी जीवनाला एक प्रकारची उदात्त माधुरी येते. ”

## निसर्गाचें साहचर्य

निसर्गाची छाया व्यक्तीच्या मनःस्थितीवर परिणाम घडविते तसाच व्यक्तीच्या मनोधर्माचा पगडा निसर्गावर बसतो. संध्याकाळ किती रम्य! त्यावेळचे आकाशांतील रंग किती आकर्षक! कैक लेखकांनीं त्यांचें हृदयंगम वर्णन केलेलें. पण निराश माणसाला वाटतें, “ क्षितिजाच्या कडेवर ठेपलेलें त्याचें सौम्य बिंब, त्यावर ढगाच्या काळसर रेषा आल्यामुळें छिन्नविच्छिन्न झालें होतें; व त्याच्यावर काळाभोर ढग नुकत्याच मारलेल्या सावजाच्या रक्ताच्या चिळकांड्या उडून रंगलेल्या अस्वलासारखा दिसत होता. ”

## कलात्मक प्रचार

कवि काय किंवा कादंबरीकार काय, त्याचें कार्य कोणतें, याविषयीं माडखोलकर एका पात्राच्या मुखानें म्हणतात, “ या अपूर्ण जगाला पूर्णता देण्यासाठींच कलावंतांचा अवतार आहे ना? मग कवींच्या सृष्टींत तरी गुलाबाला कांटे नसावेत, चंद्राला कलंक नसावा, स्त्रीला वैधव्य नसावें, सौंदर्याला विनाश नसावा, आणि प्रेमाला निराशा नसावी. ” अशा अद्‌भुतवादाच्या गंधर्व—नगरींतच वाचकांना गुंगवत ठेवणाऱ्या माडखोलकरांच्या बहुतेक कादंबऱ्या आहेत.

‘ मुक्तात्मा ’ ही माडखोलकरांची कादंबरी क्रमानें पहिली, तर त्यांची गुणानें पहिली कादंबरी म्हणजे चंदन-वाडी. खांडेकरांची ‘ दोन ध्रुव ’ किंवा वरेरकरांची ‘ धांवता धोटा ’ या कादंबऱ्यांप्रमाणेंच चंदनवाडी या कादंबरींतहि कला व प्रचार यांचा सुंदर मेळ बसला आहे. या तिन्ही कादंबऱ्यांत साम्यवादाचा प्रचार ज्यानें त्यानें आपापल्या पद्धतीनें केला आहे. खांडेकरांची ‘ हृदयाची हांक ’ ही पहिली कादंबरी जशी अलंकारपूर्ण पण कृत्रिम; तशीच माडखोलकरांची ‘ मुक्तात्मा. ’ पण ‘ दोन ध्रुवां’-मध्यें खांडेकरांनीं ज्याप्रमाणें कृत्रिमतेचीं कवचें बरीचशीं टाकून दिलीं

आणि सहजसुंदर भाषेनें आपलें कथानक रंगविलें, तशीच परिणति चंदनवाडी कादंबरीत माडखोलकरांची झालेली दिसते. एखादा प्रसंग किंवा संवाद रेखीव रीतीनें रेखाटणें यांत माडखोलकरांचा हातखंडा आहे. त्यांचें पद-लालित्य तर पहिल्या प्रतीचें आहे. कथानकाची प्रमाणबद्ध मांडणी करण्यांत ते फडक्यांशीं बरोबरी करूं शकतात, पण कल्पकता व रसवत्ता हे दोन गुण फडक्यांपेक्षां कमी प्रमाणांत असल्यामुळें त्यांचे संवाद तितके सहज वाटत नाहींत, पात्रें अगदीं जिवंत भासत नाहींत आणि त्यांच्या सुखदुःखाशीं वाचक पूर्णपणें समरस होऊं शकत नाहीं. ही उणीव जास्तींत जास्त भरून निघाली असेल, तर चंदनवाडी कादंबरींतच.

## संमिश्र संस्कृतीचें प्रतिबिंब

सौ. शांताबाई यांनीं १९३१ सालीं ‘ सोन्याची सांखळी’ या नांवाची एक गोष्ट लिहिली. त्या गोष्टींत चंदनवाडी कादंबरीचें कथाबीज आहे. ही कादंबरी १९४३ सालीं प्रसिद्ध झाली. भारतांतील संमिश्र संस्कृतीचें प्रतिबिंब या कादंबरींत उमटलेलें आढळतें. स्पृश्य-हरिजन, मुसलमान, ख्रिश्चन अशा विविध पात्रांच्या स्वभावांचें इंद्रधनुष्य चंदनवाडींत दृष्टीस पडतें. मध्यप्रदेशांतील मालगुजार व शेतकरी यांच्या संग्रामांतून कथानकाला सुरवात झाली असली आणि गिरणीमालक व मजूर यांचा लढा शेवटीं चित्रित केला असला, तरी ते कांहीं या कादंबरीचे मुख्य विषय नव्हत. सांस्कृतिक विचारावरच या कादंबरीचा भर आहे. हरिजनांचा या भूमीवर अग्रहक्क कसा आहे, त्यांनीं हिंदुसमाजापासून अलग कां राहूं नये, हिंदूंचा विस्काळितपणा त्यांचा घात कसा करीत आहे, मुसलमानांनीं ‘ हा देश हें आपलेंच घर ’ मानून कां राहिलें पाहिजे, ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या परोपकारांतहि धर्मप्रसाराचा स्वार्थी व आक्रमक हेतु कसा वळवळत असतो, इत्यादि प्रश्नांची सूक्ष्म व स्पष्ट चिकित्सा या कादंबरींत केलेली आहे.

## चित्तवेधक प्रारंभ

पण ही कादंबरी आहे, चर्चात्मक प्रबंध नाहीं. गुंतागुंतीचें कथानक घेऊन व तें एका रहस्याभोंवतीं गुंडाळून जिज्ञासु वाचकाला त्याच्यामागें

सतत धांवत ठेवावयाचें, हें कौशल्य या कादंबरींत माडखोलकरांना साधलेलें आहे. आरंभींच एखाद्या वावटळीप्रमाणें धांवत सुटणारी येसू वाचकाला भेटते. तिच्या पाठोपाठ वाचक जो धांवत सुटतो, तो अखेर मृत्युशय्येवरील चंदनपाशीं येऊन थबकतो. कादंबरीचा प्रारंभच मुळीं असा चित्तवेधक केला आहे कीं,

" दादासाहेब, गरिबाचं घर बुडवूं नका व ? "

देशपांड्यांच्या वाड्याच्या दिशेनें धांवत सुटलेल्या येसूच्या त्या आक्रोशानें सारी चंदनवाडी हलून गेली.

कावळ्यानें घरट्यांत घुसून पिलूं चोचींत धरून न्यावें आणि मग चिमणी चिव चिव करीत त्या कावळ्यामागून धांवत असतां इतर चिमण्या जशा तिला साथ देत तिच्याभोवतीं उडतात, त्याप्रमाणें येसू रस्त्यानें धांवत जात असतां दोहों बाजूंचीं बायकामाणसें तिला सहानुभूतीनें कांहींबाहीं विचारीत होतीं. "

## भावनापूर्ण वर्णनशैली

येसूची नात म्हणजे चंदन. " तारकेचें मधुर तेज आणि फुलांची सुवासिक शुचिता यांचा मिलाफ तिच्या मनोज्ञ व्यक्तित्वांत झाला असून, तिची करुणसुंदर मूर्ति आपल्या आसवांनीं भरलेल्या डोळ्यांपुढून किती तरी वेळ हालत नाहीं. " या नातीला व तिच्या आजीला—दोघींनाहि त्या चिमुकल्या चंदनवाडींत ब्रह्मांड सांठल्याइतका आनंद वाटत असे. तेथील वर्धा नांवाची नदी तर येसूला आपली आईच वाटे. तिची ही भावना माडखोलकर पुढील शब्दांनीं प्रगट करतात:—" तिचें मन हें वर्धेच्या बाबतींत जणूं नाळ न तोडलेल्या तान्हुल्यासारखें होतें. शहरांतल्या माणसांची नागर, सुसंस्कृत मनें हीं नाळ तोडलेल्या मुलांसारखी असतात. वाढत्या वयाबरोबर मुलांचा आईविषयींचा लळा जसा कमी कमी होतो, तसा शहरांतील नागर मनांना सृष्टीमातेशीं असलेल्या आपल्या नात्याचा विसर पडत जातो. पण, येसूला वर्धा ही आईसारखी, नव्हे आईच वाटे; व तिचें अनागर, अनघ मन त्या आईचा पदर सोडून जावयाला तयार नव्हतें. "

## कारखान्याचें शब्द-चित्र

खेड्यांतील या सृष्टिसौंदर्यांत मानवी विकार सापाप्रमाणें लपून बसलेले होते. तेथील जमीनदार दादासाहेब देशपांडे यांनीं येसूची जमीन गिळंकृत केली होती, एवढेंच नव्हें तर तिची सून रखमा हिच्यावर पापी दृष्टी ठेवून तिला परागंदा व्हावयास लावलें होतें. तेंच संकट आतां चंदनवरहि आलें. म्हणून तिला आपल्या पंखाखालीं घेऊन येसू नागपूरला निघून गेली. तेथें रखमा गिरणींत राबत होती—इतकी कीं, कामावरून घरीं आली म्हणजे जमिनीवर आपलें ताठ शरीर ती फेंकून देई. गिरणींतील कामकरी स्त्रियांचें सुख काय असतें, हें माडखोलकरांनीं पुढील मोजक्या शब्दांनीं सांगितलें आहे; " त्या खात्यांत शेकडों रहाट यंत्रानें चालले होते; व त्या प्रत्येक रहाटापाशीं उभ्या राहून बायका सुताचा गुंडाळा तयार करीत होत्या. त्यांच्या डोक्यावर कापसाचे बारीकबारीक तंतु जमले होते. उन्हानें सर्व गिरण तापून गेली होती. त्यांतच फरशीवर टाकलेल्या पाण्याच्या वाफा निघून, रहाटाशीं काम करणाऱ्या बायकांना घामाच्या धारा लागल्या होत्या. "

## सूक्ष्म वर्णन

कादंबरींतील नायक अवधूत याचें शब्दचित्र माडखोलकरांनीं किती बारकाईनें रेखाटलें आहे. " सायंसूर्याच्या अरुण प्रकाशांत त्याच्या पिंगट केसांना सोनेरी छटा आली होती; व त्याच्या विस्फारलेल्या हंसऱ्या डोळ्यांतील बुबुळांच्या पिंगट लकाकींतूनहि तीच छटा ओसंडत आहे, असें चंदनला वाटलें. हंसतांना त्याच्या जिवणीची डावीकडली बाजू जास्त विलग होऊन त्याची अणीदार शुभ्र दंतावलि जशी खुलून दिसे, तसाच चेहऱ्यावर लाजरेपणाचा मोहक भावहि ओझरता उमटून जाई. त्याच्या अंगांतील किंचित् पिवळसर झांक असलेला बिनगळ्याचा घोळदार खादीचा शर्ट त्याच्या मानेची पुष्टता आणि खांद्याचा रुंदपणा सुव्यक्त करीत होता. "

## नक्षत्रांची चमक

निसर्गातील एखादें दृश्य रंगविण्यांत माडखोलकरांची कुंचली तरबेज आहे. आकाशांतील ताऱ्यांचा उपयोग मार्मिकपणें करून घेऊन ते आपली सृष्टिवर्णनें रंगवीत असतात. आचार्य कालेलकरांना तर ते तारे जिवंत व्यक्तीच वाटतात—सारें आकाश जणूं त्यांच्याशीं बोलतच असतें. पण त्यांच्याखालोखाल ताऱ्यांचें सूक्ष्म ज्ञान प्रगट करणारे ललित लेखक म्हणजे माडखोलकरच. जसें आकाशांतील तारे तशींच पृथ्वीवरील फुलें. दोहोंचेंहि सूक्ष्म ज्ञान माडखोलकरांच्या वर्णनशैलींत आढळून येतें. त्यांनीं केलेलें उषःकालचें वर्णन नक्षत्राप्रमाणें चमकत आहे, तें असें–" पूर्वेकडील क्षितिज सतेज होऊन त्यावर विखुरलेल्या कोरड्या ढगांवर कुठें कुठें लाल तकतकीत रेषा उमटलेल्या होत्या. आकाशांतले तारे बहुतेक आतां मावळण्याच्या बेतांत आले होते. पण रोहिणीचा पाठलाग करीत नभोमध्यावर येऊन ठेपलेला मृग मात्र अद्याप लखलखत होता; व त्याच्या उत्तरेला पुनर्वसूच्या मधोमध असलेला गुरु आपल्या रम्य प्रभेनें व्याधाला लाजवीत होता. वर्षाकालाचा अंत सुचविणाऱ्या अगस्तीला मात्र दक्षिण क्षितिजावर अभ्रांनीं गिळून टाकलें होतें अंगणांत पहाटच्या गार वाऱ्यावर आपला गंध उधळणारीं चमेलीचीं आणि स्वस्तिकाचीं फुलें खदखदां हंसत होतीं."

नदीवरील चांदण्याची मौज 'मुखवटे' कादंबरींत माडखोलकरांनीं पुढील शब्दांनीं वाचकापुढें उभी केली आहे,

" चंद्र आतां पुष्कळच खालीं आला होता. नारिंगी रंगाचें सुंदर खळें त्याच्या त्या मोठ्या झालेल्या कोरीभोंवतीं पडलें होतें; व नदीच्या विलोल प्रवाहावर त्याच्या सुदीर्घ किरणांचा नाच चाललेला होता. पुराचा पहिला भर ओसरून गेल्यामुळें नदीच्या पात्रांतील खडकांची रांग कांहीं ठिकाणीं उघडी पडली होती. त्या खडकांवरून हत्तीच्या सोंडेसारख्या पाण्याच्या शेंकडों धारा खालच्या प्रवाहांत उडी घेत होत्या. त्या धारांचा अखंड होणारा गंभीर घोष !—त्या घोषांत रात्रींच्यावेळीं होणारे इतर सारे क्षुद्र नाद विलीन होऊन नदीकांठची ती सशब्द शांतता विशाल आणि उदात्त वाटत होती."

## निसर्गाचें सूक्ष्म-रम्य वर्णन

पावसाळ्यांतील सृष्टीचें शब्दचित्र माडखोलकर पुढीलप्रमाणें रेखाटतात.

" पावसाची झिमझिम सुरू होती. पण पश्चिम–क्षितिजावरल्या एका पांढुरक्या ढगाच्या आडून लकाकणारें सूर्यबिंब खिडकीच्या धूसर तावदानानें तळपत असलेल्या विद्युद्दीपाची आठवण देत होतें. त्याचा फिका प्रकाश अतिवृष्टीनें चिंब झालेल्या सृष्टीवर पडून तिला विशोभित पांडुरता आली होती. त्या प्रकाशांत छावलेल्या घरांवरील पावसानें शेवाळून बुरसलेल्या कौलारांत जी एकादीच नव्या कौलांची लाल लाल रांग दिसे, ती एकाद्या जुन्या मलिन वस्त्राला नव्या धाग्यानें केलेल्या रफूसारखी वाटत होती. गणेशोत्सव नुकताच संपला होता. पण ज्वारी कांहीं अद्याप जमिनींतून गुडघाभरसुद्धां वर आली नव्हती; व तिच्या पातीला येत चाललेला पिवळेपणा त्या प्रकाशांत, अकालीं पिकलेल्या केसांच्या तकाकीसारखा विद्रूप दिसत होता."

## एक सुंदर व्यक्ति-रेखा

चंदनचें हास्य, तिचें शरीर-सौष्ठव, तिची ढब, वगैरेंचें वर्णन किती नारकाईचें आहे पहा—

" सायंसूर्याचा रम्य प्रकाश तिच्या अंगावर पडला होता. त्या प्रकाशांत तिची केळफुलाच्या गाभ्यांतल्या कोंवळ्या पानासारखी आरक्त अंगकांति खुलून दिसत होती आणि तिच्या तोंडावरलें हास्य कन्हानच्या तांबूस वाळूवर खेळणाऱ्या चकचकीत जललहरीसारखें शोभत होतें.

तो तिला हंसत हंसत कांहीं तरी बोलला; ती त्याला हंसत हंसत कांहीं तरी उत्तर देऊन सायकलवर बसली.

तिचें तें हास्य पाहून त्यांना रखमाच्या हास्याची आठवण झाली. रखमा हंसल्याबरोबर जो मनाला रोमांचित करणारा गोड आवाज खळखळत कानांवर पडत असे, तोच आवाज आपण आज पुनः बारातेरा वर्षांनीं ऐकत आहोंत असा त्यांना भास झाला. बोलतांना ऐटदारपणानें मान

वेळण्याची मोहक तऱ्हाहि अगदीं तीच; लांबट चेहऱ्यावर स्वाभिमानाची प्रभा पाडणारे टपोरे डोळेहि अगदीं थेट तसेच; व पॅडलवर पाय ठेवून सायकलवर झेप घेतांना बांधेसूद शरिराला आलेला मनोहर बांकहि अगदीं तसाच. ''

## प्रपंचकथेंतील राजकारण

' नवे संसार ' ही कादंबरी १९४१ सालीं माडखोलकरांनीं लिहिली. तो युद्धकाळ होता तथापि केवळ सांसारिक जीवनच या कादंबरींत रंगवावयाचें असा त्यांचा आधींचा बेत होता. पण माडखोलकरांच्या लेखणीतील राजकारणाचें रक्त या ' प्रपंचकथेंत ' हळुहळू उतरूं लागलें. तेव्हां प्रकाशकांनीं त्यांना इषारा दिला. पण माडखोलकरांनीं उत्तर दिलें, ''युद्धकाळांत जर कादंबरी लिहायची आणि युद्धामुळें झालेला मनाचा क्षोभ जर तींत व्यक्त करायचा नाहीं, तर मग कादंबरी लिहायची तरी कशाला?'' हा सारा इतिहास सौ. शांताबाईंनीं आपल्या प्रस्तावनेंत दिला आहे. राजकीय चळवळीसाठीं दरोडा घालणें आणि मुसलमानांच्या प्रतिकारासाठीं शस्त्राचें शिक्षण घेणें, या विचारांच्या पुरस्कारामुळें बहुधा ही कादंबरी पूर्वीं जप्त झाली होती.

## विस्कळित कथानक

'' जुन्या संसारांत प्रेम नसेल कदाचित्; पण निष्ठा होती, स्थैर्य होतं. नव्या संसारांत प्रेमहि नाहीं, निष्ठाहि नाहीं न् स्थैर्यहि नाहीं. '' हा विचार या कादंबरींत माडखोलकरांनीं ओझरतपणें मांडला आहे. त्या विचाराच्या साधकबाधक बाजू साकार करण्यासाठीं त्यांनीं असें कथानक रचलें आहे कीं, विद्याधर खेर या नांवाचा एम्. ए. झालेला व काव्यतीर्थ पदवी घेतलेला तरुण साठ रुपयांवर शिक्षकाची नोकरी करतो. त्याची पत्नी मीरा हीहि नोकरी करते व त्याच्या प्राप्तींत भर घालते. पण जमाखर्चाचीं दोन्ही तोंडें कांहीं मिटत नाहींत. तेव्हां तो कोळशाची वखार काढतो, विमा कंपनीचा एजंट बनतो, आणि शेवटीं शाळेचा राजिनामा देऊन क्रांतिकारकांच्या चळवळींत शिरतो. त्यांनीं घातलेल्या एका दरोड्यांत हा

दुरून भाग घेतो. त्यामुळें त्याला अटक होते, पण लगेच त्याची सुटकाहि होते. त्याचा शाळेंतील राजिनामा हा जितका अकारण, तितकाच त्याचा राजकारणांतील प्रवेश आकस्मिक. चित्रपटकथा लिहिण्याचाहि त्यानें प्रयत्न केलेला असतो, पण तेथील कलेचा काळाबाजार पाहून त्याचें मन विटतें. त्याच्या लेखनावर लुब्ध झालेली सुशिक्षित तरुणी मुक्ता हिच्या प्रणयाचे खेळ कादंबरीच्या पानांतून कवडशाप्रमाणें दिसतात. या कथानकाला खमंग-पणा आणण्यासाठींच कीं काय हुर्डापार्टी, मद्यमांसाशन, दौलतजादा इत्यादि मालमसाला कादंबरींत भरलेला आहे आणि पंपूशेठासारखीं आच-रट पात्रेंहि त्यांत गोवलीं आहेत.

## 'शुष्क रमणीयता'

माडखोलकरांची नेहमींची भाषाशैलीसुद्धां प्रौढ व संस्कृतप्रचुर असते. त्यांतहि या कादंबरींतील सारींच पात्रें सुविद्य. त्यामुळें सुषमा, अनघ, शलाका, चषक, विदारक, मदिर, घणाघाती, उद्दीपिका, इत्यादि संस्कृत शब्द सर्वत्र विखुरलेले आहेत, ते सामान्य कथा-वाचकाला कितीसे कळ-णार ? वर्णनें अगदीं रेखीव आहेत. पण कथानकांत जिव्हाळ्याचा ओलावा फारसा आढळत नाहीं आणि पात्रांत रसरशीत जिवंतपणा बहुधा दिसत नाहीं. 'शुष्क रमणीयता' या माडखोलकरांच्या शब्दांनींच त्यांच्या या कादंबरीचें—किंबहुना त्यांच्या सर्वच ललित कृतींचें—वर्णन केलें, तर तें योग्य ठरणार आहे. एखाद्या बागेंतील संगमरवरी पुतळे पहाण्याचा आनंद त्यांच्या कादंबऱ्या वाचतांना होतो. 'मुक्ता'च्या काव्याचे जे गुण-दोष त्यांनीं या कादंबरींत वर्णिले आहेत, ते स्वतः माडखोलकरांच्याच लेखनांत-बहुतांशीं आढळतात. मुक्ताच्या काव्याविषयीं माडखोलकर लिहितात, "मुक्ता'च्या काव्यांतल्या आणि कथांतल्या भावोर्मि या मृग-जळाच्या तरंगांसारख्या वाटल्या होत्या त्याला किती तरी वेळां. अत्यंत मोहक आणि अत्यंत तेजस्वी पण आर्द्रतेचा लवलेशसुद्धां नसलेल्या !

पण त्या दिवशीं रात्रीं तिच्या डोळ्यांत जे भाव, जी उत्कंठा आणि जें कुतूहल त्याला दिसलें, तें स्निग्धतेनें आणि सहानुकंपेनें किती ओथंबलेलें

होतें. अर्थात् तिच्या काव्यांत आणि कथांत ही शुष्क रमणयिता, हें संगमरवरी शिल्पांचें मृदुकठोर सौंदर्य आहे."

## मनोहर उपमा

एकाद्या सुंदर इमारतींत रंगीबेरंगी कांचेच्या खिडक्या असाव्यात, त्याप्रमाणें माडखोलकर आपल्या ललित भाषेमध्यें मधून मधून सुंदर उपमा देतात. त्याचे दोनतीन नमुने पहा. "कधीं एकाग्र आणि अंतर्मुख न होणारें मन अशा वेळीं स्वतःशींच रममाण होतें; व आगगाडीच्या अंधाऱ्या खोलींत, स्वतःच्या डोळे न उघडलेल्या पिलांना सुरक्षिततेच्या खात्रीनें चाटीत, पाजीत, कुरवाळीत निश्चित पसरलेल्या मांजरीप्रमाणें मन आपल्या अथांग कुहरांत दडी देऊन बसलेल्या अबोध विचारांना आणि अंशानुभूत भावनांना साद घालून त्यांच्याशीं खेळत बसतें."

" मन विव्हळ असतां, गाण्याची अवचित् कानांवर पडलेली भेदक लकेर किंवा सप्तमीच्या छायाबहुल चांदण्यांत पाहिलेलें एकादें आभासिक रमणिय दृश्य जसें मनांत घोळत राहतें, तशी तिच्या त्या पहिल्या भेटीची स्मृति, त्या स्मृतीची असंवेद्य संवेदना, त्याच्या मनांत सतत जागृत होती."

" पाऊस आणि चांदणें यांनीं उजळलेली सृष्टि, जिच्या केसांतुन आणि वस्त्रांतुन पाणी निथळत आहे अशा न्हाणीघरांतून अंग पुशीत घाईघाईनें बाहेर येणाऱ्या कमनीय स्त्रीसारखी, स्वच्छ आणि प्रसन्न दिसत होती."

## रौद्र-सौम्य वर्णनें

सृष्टिवर्णनाची माडखोलकरांची शैली खांडेकरांपेक्षां फडक्यांकडे अधिक झुकलेली आहे. त्या त्या प्रसंगाचें सूक्ष्म तपशीलवार वर्णन ते देतात आणि त्या वर्णनावरून वाचकाचें चित्त उडूं नये अशाच बेतानें उपमा-रूपकादि अलंकार त्यामध्यें मिसळतात. वादळाचें वर्णन करतांना ते लिहितात, " तोंच बाहेर वीज एवढ्या मोठ्यानें कडाडली कीं, त्या गॅरेजच्या एकेरी विटेच्या भिंती कोसळून पडतात कीं काय, असें त्यांना वाटलें; व बाहेर

धिंगाणा घालीत असलेल्या धूळ–वादळाच्या धडाक्यानें सारीं दारें आणि खिडक्या, थंडीनें थडथडणाऱ्या दांतांप्रमाणें, सारखीं खडाखडा वाजूं लागलीं. एकमेकांच्या चोचीला चोच भिडवून घरट्यांत बसलेलीं पांखरें जशीं वाऱ्याच्या झपाट्यानें भयभीत व्हावींत, तशी क्षणमात्र त्यांच्या मनाची अवस्था झाली. ”

हें वर्णन जितकें रौद्र, तितकेंच सौम्य वर्णनहि माडखोलकर करूं शकतात. झाडें, फुलें, तारे यांचें सूक्ष्म ज्ञान या वर्णनांत ते ओतूं शकतात, चांदण्या रात्रीं बागेंतील फुलझाडें आनंदाची बहार कशी लुटीत असतात. याचें वर्णन करतांना माडखोलकर म्हणतात, “ अंगणांतल्या चाफ्यांच्या उंच खोडाच्या शाखाग्रांना आलेलीं पांढरीं फुलें पाहून असा भास होत होता कीं, चंद्रकिरणांतून स्रवणारे सुधेचे बिंदु झेलण्यासाठीं बिचाऱ्या उघड्यावाघड्या पर्णविहीन चाफ्यानें आपल्या चिमुकल्या ओंजळी आतुरतेनें वर धरल्या आहेत. गच्चीच्या कठड्यावर ठेवलेल्या कुंड्यांतलीं मोगऱ्याचीं फुलें आपला मस्त गंध हंसतमुखानें वाऱ्यावर उधळीत होतीं आणि रस्त्यावरल्या चिचव्याला आलेला बहर आपला नाजुक मंद गंध त्या सौम्य चांदण्यांत मिसळीत होता. ”

## नृत्याचें शब्द–चित्र

एका नर्तिकेचें शब्दचित्र माडखोलकरांनीं इतकें सूक्ष्म व सांगोपांग वर्णिलें आहे कीं, तें वाचतांना माधव ज्युलियन यांच्या ‘ कंचनी ’ या कवितेचें स्मरण व्हावें नर्तिकेच्या मयूर–नृत्याचें शब्दचित्र माडखोलकर पुढील डौलदार शब्दांनीं व लयबद्ध वाक्यांनीं रेखाटतात.

“ पायांतील घुंगरांच्या तालावर छुमछुमत ती नर्तकी रंगपटांतून बाहेर आली. मोरपंखी रंगाची जी घोळदार साडी या वेळीं ती नेसली होती, तिच्यावरील मोराचे डोळे त्या उज्ज्वल दीपप्रकाशांत इतके कांहीं लखलख करीत होते कीं, ती एक एक पाऊल तालावर टाकून मंदगतीनें पुढें येत असतां मोरच मोठ्या डौलानें पावलें टाकीत येत आहे, असा भास

प्रेक्षकांना झाला. थोडेसें अंतर अशा रीतीनें चालत आल्यावर तिनें आपले कमरेवर असलेले हात वेलीच्या शाखांसारखे लांब पसरले. अत्यंत चपलतेनें, एक गिरकी घेऊन पाहतां पाहतां साडी दोहों बाजूंनीं झर्रकन वर उचलली; व मोराच्या तुऱ्यासारखी नीलमण्यांची बिंदी घातलेलें आपलें मस्तक किंचित् पुढें झुकवून एकदम नृत्याला प्रारंभ केला साडीच्या घोळानुळें मोराच्या पिसाऱ्यासारखी दिसणारी तिची ती रमणीय आकृति, पुढें झुकलेल्या मस्तकाचें तें भावपूर्ण आंदोलन आणि नृत्योन्मत्त डोळ्यांतून ओसंडणारा विलोल आनंद–तिच्या त्या मयूर-नृत्यावर, त्या मोहक वेषभूषेवर आणि त्या तरल हावभावांवर नजर ठरेना."

विशिष्ट प्रसंगांतील शब्दचित्र उभें करण्यांत माडखोलकरांचें चातुर्य चांगलें दिसून येतें. त्याचा एक नमुना पहा. "मिरानें आपले दोन्ही ओचे वर खोंवले होते व पदरहि हाताखालून घेऊन घट्ट बांधला होता. विजेच्या प्रकाशांत उजळून दिसणाऱ्या तिच्या त्या गोरट्या हातांवर उडालेले पाण्याचे शिंतोडे चमकत होते. गुढग्यापर्यंतचा पायांचा भागहि ओला झाला होता. आणि हातांतलें काम तसेंच टाकून घाईनें दार उघडावयाला आल्यामुळें जो श्वासाचा वेग वाढला होता, त्यामुळें होणारी तिच्या वक्षःस्थलाची वरखाल स्पष्ट दिसत होती. विस्कटलेल्या केसांच्या काळ्याभोर बटा उंच कपाळाच्या दोहों बाजूंनीं भुवयांपर्यंत येऊन भिडल्या होत्या."

## सयुक्तिक संवाद

माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत छोटेछोटे संवाद पुष्कळ असतात, आणि त्यांत संयुक्तिकपणा, कोटीबाजपणा व विनोद हे गुण आढळतात. संवादांतील सहजोद्गार त्यांच्या लेखणींतून फारसे उतरत नाहींत, पण सुशिक्षितांच्या एखाद्या वादसभेंतील हास्यविनोदाचें प्रतिबिंब त्या संवादावर पडलेलें दिसतें.

समाजांतील दुःखाचें मूळ कोणतें या प्रश्नाचें उत्तर समाजवादी दृष्टिकोनांतून माडखोलकर असें देतात कीं, "मनुष्याच्या अधःपाताचें मूळ कारण संपत्तीची विषम वांटणी हें आहे. श्रीमंतांचा अधःपात होतो,

तो संपत्तीच्या अतिरेकामुळं, आणि गरिबांचा अधःपात होतो तो संपत्तीच्या अभावामुळं! श्रीमान्, सुसंस्कृत मनुष्य दारू पितो, तो आपल्या अतिरिक्त सुखोपभोगामुळं निःसत्त्व झालेल्या मनाला, बुद्धीला आणि इंद्रियांना चेतना आणण्यासाठीं! गरीब, अडाणी मनुष्य दारू पितो, तो दारिद्र्यामुळं होणाऱ्या दुर्धर यातनांचा मनाला विसर पडावा म्हणून! अर्थात् माणसाच्या अधःपाताचं खरं कारण दारू हें नव्हे; तर संपत्तीचा अतिरेक किंवा अभाव हें आहे. संपत्तीच्या अभावाप्रमाणंच तिचा अतिरेकहि माणसाच्या अधःपाताला कारण होतो!"

## आत्मकथेचें यशापयश

संसारांतील प्रेम व त्या प्रेमाची विफलता हा विषय ललित लेखकांना सदैव पुरणारा आहे. तोच विषय 'भंगलेलें देऊळ' या कादंबरीत माडखोलकरांनीं रंगविलेला आहे. "विवाहाचें देऊळ भंगलेलें असेल, भ्रष्ट झालेलें असेल, तर तुमच्या कल्पनेप्रमाणें त्याचा जीर्णोद्धार करा, पण तें पाडून टाकूं नका." असा संदेश या कादंबरीचे शेवटीं दिलेला आहे. पण हा विचार वाचकांच्या चित्तावर ठसविणें हा कांहीं कादंबरीचा उद्देश दिसत नाहीं. तशी तिची रचनाच नाहीं. तिच्यांतील सारे प्रवाह या एका केंद्राकडे वहात नाहींत. सारें वातावरण भरलें आहे प्रणयचेष्टांनीं. प्रेम-भावनेंतील चढउतार रंगविणें हेंच या कादंबरीचें प्रयोजन दिसतें.

'मृत्युशय्येवरील मानिनीची' ही आत्मकथा आहे. आपल्या 'जीविताची पायमल्ली' झाल्यामुळें, अनसूया या सुशिक्षित स्त्रीच्या 'भग्न हृदयाचें एकांतांतील आक्रंदन' म्हणजे ही कादंबरी. माडखोलकरांची ही अनु खांडेकरांच्या उल्केची बहीण शोभण्यासारखी प्रगल्भ विचाराची आहे—हरिभाऊंची यमू किंवा वरेरकरांची मथू यांच्याप्रमाणें हृदयाला चटका लावणारी ही करुण कहाणी नाहीं. तिची भाषा सहज नाहीं, स्त्रियांना शोभणारी नाहीं. अनु ही सुशिक्षित, तर तिचें चित्त वेधून घेणारा अरुण हा तर कवीच. त्यामुळें त्याच्या संवादांत कालिदास आणि भवभूति, शेक्सपिअर आणि टेनिसन, ब्राउनिंग आणि शेले—अशा कविश्रेष्ठांचे उल्लेख

येतात हें एक वेळ स्वाभाविक म्हणतां येईल; " पण आज तुम्हां दोघींना पाहिल्यावर कीं नाहीं मला वाटलं, रजनी आणि उषाच बसल्या आहेत मूर्तिमंत माझ्यापुढं ! " ही संवादांतील भाषा कृत्रिम व अस्वाभाविक वाटते. त्यांतहि विशेष हें कीं, मृत्युशय्येवर पडलेली एक दुःखी व दुर्दैवी स्त्री 'आपल्या शिणलेल्या मनाला विरंगुळा' म्हणून हें सारें लिहीत आहे. मनूचें वर्णन अरूच्या तोंडीं घालतांना अनु किती कृत्रिम लिहिते पहा. " तिच्या गालांवर संध्येची लाली आहे, डोळ्यांत तारकांचं तेज आहे, केसांत क्षितिजाचा नीलिमा आहे, भुवयांत लाटांची वक्रता आहे अन् हंसऱ्या ओठांवर त्यांच्या फेसाचा शुभ्रपणा आहे ! "

## मजेशीर उपमा

नेहमींप्रमाणें मनोहर उपमा माडखोलकरांनीं मधून मधून दिलेल्या आहेत. भानुमतीचा खेळ खेळणाऱ्या मुलींचा आनंद व्यक्त करतांना ते म्हणतात, " अनरशाचे स्वच्छ धुतलेले तांदूळ आंगणांत वाळत घातले असतां चिमण्या जशा त्यांच्याभोंवतीं चिवचिंवत उडत असतात, तशा आम्हीं मुली बागडत होतों. "

आणखी एक उपमा पहा.

" झाडांचीं मुळें पाण्याचा ओलावा ज्या बाजूला मिळेल, त्या बाजूला पसरत जातात आपोआप. मनुष्याच्या भावनांचेहि तसेंच नाहीं कां ? प्रेमाचा जिव्हाळा जिकडे म्हणून लाभेल असें त्याला वाटतें, तिकडे धांव घेतें त्याचें मन. "

आयुष्यांत सुख मिळणें हें बाहेरच्या परिस्थितीपेक्षां आंतल्या मनःस्थिती-वरच अवलंबून आहे, हा विचार माडखोलकर पुढील शब्दांनीं मांड-तात; " कोणत्याहि गोष्टीपासून होणारं सुखदुःख हें तिच्या आपल्यावर होणाऱ्या प्रत्यक्ष परिणामावर—ज्या अनुकूल—प्रातिकूल संवेदना आपल्या मनांत उत्पन्न होतात त्यांच्यावरच नसतं कां अवलंबून अखेर ? जगांतलं सारं सौंदर्य सकलंक, सारं सुख समर्याद अन् सारीं तत्त्वें सापेक्ष आहेत.

त्यांना जी पूर्णता येते, ती केवळ आपण तसं म्हणतों म्हणून, निव्वळ आपल्या भावनेच्या प्रभावानं ! ”

## आत्मचरित्राचा आभास

‘ दुहेरी जीवन ’ ही माडखोलकरांची कादंबरी कांहीं अंशीं आत्मचरित्रपर आहे असें म्हटलें तरी चालेल. लेखकाच्या अनुभवाचे रंग थोडेफार त्याच्या वाङ्मयांत कळत न कळत उमटतातच. पण ‘मी’ मध्यें हरिभाऊंचें, ‘ उल्के ’मध्यें खांडेकरांचें किंवा ‘ स्मृति–लहरीं ’मध्यें वामनरावांचें आत्मचरित्र अधिक स्पष्टपणें प्रतिबिंबित झालें आहे; तसेंच या कादंबरींत माडखोलकरांचें जीवन चित्रित झालेलें आढळतें. आपल्या कादंबरीवर सत्यसृष्टीचा मुखवटा चढविण्यासाठीं त्यांनीं श्री. वझे, जोगळेकर, डांगे, पर्वते, भिडे, डॉ. झकरायस वगैरे व्यक्तींचें व ‘ रविकिरण मंडळा ’ सारख्या संस्थाचे स्पष्ट उल्लेख केलेले आहेत. ‘ मला जगावंसं वाटतं रे ! ’ हे जे करुण उद्गार माडखोलकरांनीं आपल्या जीवनांत ऐकले, त्यांचाच पडसाद सुशीलकुमार या कादंबरींत उमटावितो. ‘ मुक्तात्मा ’ कादंबरीतहि केशवच्या ‘ कपाळाला खळगा ’ पाहून एक म्हातारी भविष्य वर्तविते. तोच प्रकार खुद्द माडखोलकरांच्या आयुष्यांत घडलेला आहे. अशा सत्य घटनांची कल्पिताशीं गल्लत करूनच माडखोलकर आपली कादंबरी रचतात.

## राजकारणाचीं ठिगळें

सत्यसृष्टीचा आधार व्यक्तीपुरताच घेऊन न थांबतां माडखोलकर आपल्या राष्ट्राचा इतिहास, तो घडविणाऱ्या कांहीं संस्था आणि त्या संस्थांचे सर्वश्रेष्ठ पुढारी, यांचाहि ‘ उद्धार ’ ते करतात. कॉंग्रेस व गांधीजी यांच्यावर त्यांनीं या कादंबरींत आणि ‘ कांता, ’ ‘ मुखवटे, ’ ‘ प्रमद्वरा ’ वगैरे कादंबऱ्यांतहि जी टीका केली आहे, ती कलादृष्टीला कलंकभूत आणि राजकीय दृष्टीनें अज्ञानाची आहे. माडखोलकरांना उदारमतवाद नको, गांधीवाद नको, रॉयवाद नको, साम्यवादहि नको;— पाहिजे आहे ‘ क्रांतिवाद ’ असें ते म्हणतात. पण, फुटकळ व्यक्तीनें दरोडे

घालणें व खून करणें यापलीकडे या क्रांतीचें तत्त्वज्ञान त्यांना स्पष्ट करतां आलें नाहीं. वैयक्तिक दहशतवादालाच त्यांनीं हें व्यापक नांव आधीं दिलें आणि पुढें त्यावर ‘ सुभाषवाद ’ या सोज्वळ नांवाचें पांघरूण घातलें. परंतु बंकिमचंद्रांची ‘ आनंदमठ ’ किंवा शरच्चंद्रांची ‘ भारती ’ याप्रमाणें त्यांच्या कादंबरीचा आत्मा आणि तिच्या देहाचे अणुरेणु राजकारणानें स्फुरणारे नाहींत. त्यांचें राजकारण ठिगळवजा आहे.

## मुख्य सूत्र

विकृत प्रणयचेष्टांचें उत्तान वर्णन करणें, हेंच माडखोलकरांच्या कादंबरी–लेखनाचें मुख्य सूत्र दिसतें. त्याला राजकारणाचा वास ते देतात तो, एखाद्या शृंगारिक लावणीचा आध्यात्मिक शेवट करावा तितकाच. ‘दुहेरी जीवना’चा नायक मुकुंदा हा मध्यप्रांताच्या पंतप्रधानांचा पार्लमेंटरी सेक्रेटरी दाखविला आहे. तो कामगार संघ, चरखा संघ, हरिजन संघ यांचाहि कार्यकर्ता आहे म्हणे. कादंबरीकार म्हणूनहि त्याचा लौकिक आहे. अशा दर्जाच्या पुढाऱ्याचें हें दुहेरी जीवन म्हणजे काय आहे ? तर नृत्य, जुगार, मद्यपान व व्यभिचार यांचा चौखूर धिंगाणा. कायदेमंडळ व कायदेभंग यांचें वर्णन केवळ झालरीसारखें लावलेलें आहे. गांधीवाद व साम्यवाद यांचा उपयोग चटणी-कोशिंबिरीप्रमाणें केलेला आहे. सारें महत्त्व, सारी मदार आहे विकृत प्रेमावर.

## उथळ टीका

गांधी–अर्विन कराराचा कालच पार्श्वभूमीसाठीं घेऊन माडखोलकरांनीं लिहिलेली दुसरी कादंबरी म्हणजे ‘ शाप ’. तिचा नायक निशिकांत क्रांतिकारक आहे असें कादंबरीकार सांगतात. पण त्याचें वर्तन उल्लूपणाचें, बदफैलीपणाचें आहे. त्याचें प्रायश्चित्त त्याला घाणेरड्या रोगानें मिळतें. ‘ कांता ’ कादंबरीचा नायक प्रियदर्शन हा मध्यप्रांताच्या माजी गव्हर्नरांचा पुतण्या. गव्हर्नर सर महादेव ठाकूर यांचें करारी व दिलदार स्वभाव-चित्र माडखोलकरांनीं उमदेपणानें रेखाटलें आहे. पण शामासुंदरीचें तें ‘ मिष्टान्न-

भांडार ', त्यांतील तें मित्रमंडळ आणि त्यांची चर्चा, पंडितजींची लांबलचक व्याख्यानें व दहा-दहापानीं पत्रें—या सर्वांमुळें कांतेचें महत्त्व कादंबरींत कमी झालें आहे. दांडी-यात्रेची पार्श्वभूमि नांवापुरतीच आहे. याच प्रियदर्शनाला नायक बनवून व त्याचे तोंडावर डॉ. खरे यांचा मुखवटा चढवून माडखोलकरानीं ' मुखवटे ' या कादंबरींत, गांधीवादावर उथळ टीका केली आहे. ' प्रमद्वरा ' या शेवटच्या कादंबरींतहि त्याच अज्ञानी टीकेचें तुणतुणें त्यांनीं वाजविलें आहे. पण स्वातंत्र्य-प्राप्तीच्या इतिहासानें माडखोलकरांची ही सारी टीका फोल ठरविली आहे.

## जीवनांतून पलायन

आत्मचरित्रपर किंवा राजकारणपर कथा-भागापेक्षां माडखोलकरांच्या लेखणीचा खरा भर—किंवा बहर—स्वैर प्रणय-जीवनावर आहे. त्याचा खुला, पुरा व निर्भेळ आविष्कार ' नागकन्या ' व ' डाक बंगला ' या दोन कादंबऱ्यांत पहावयास सांपडतो. या दोन्ही कादंबऱ्या युद्धकालांतच लिहिलेल्या आहेत. पण त्यांत उल्लू माणसाच्या नंग्या नाचापेक्षां दुसरें कांहींच नाहीं. " युद्धकाळांत जर कादंबरी लिहायची, आणि युद्धामुळें झालेला मनाचा क्षोभ जर तींत व्यक्त करावयाचा नाहीं, तर मग कादंबरी लिहायची तरी कशाला ?" असा बाणेदार सवाल प्रकाशकांना माडखोलकरांनीं ' नवे संसार ' या कादंबरीच्या वेळीं टाकला होता. तोच प्रश्न त्यांच्या एखाद्या चहात्या वाचकानें त्यांना या दोन कादंबऱ्यांबाबत केला, तर त्यांचेजवळ उत्तर काय आहे ? ' नाग-कन्या ' व ' मत्स्य-कन्या ' यांच्या मनसोक्त जलक्रीडा व प्रणयक्रीडा हाच कां त्यांचा युद्धकालीन क्षोभ ? विकृत मनाचे कल्पनातरंग रंगविणाऱ्या माडखोलकरांच्या या उच्छृंखळ कादंबऱ्या तरुण पिढीनें न वाचल्या तरच त्यांचेविषयींचा त्यांचा आदरभाव टिकून राहील. या कादंबऱ्यांत खरा वास्तववादहि नाहीं. समाजांतील कोणत्याहि वर्गाचे प्रतिनिधि होणारीं त्यांतील पात्रें नाहींत. विद्यमान समाजास्थितीचें हें सत्य प्रतिबिंब नव्हे. शेंकडो—नव्हे हजारो महाराष्ट्रीय कुटुंबापैकीं एकांत तरी या कादंबरींतल्यासारखे प्रणयाचे प्रसंग वा प्रकार

घडत असतात काय ? हा ध्येयवाद नाहीं कीं वास्तववाद नाहीं, केवळ पलायनवाद ( Escapism ) मात्र या कादंबऱ्यांत भरलेला आहे. लहान मुलाची किरकिर थांबावी म्हणून त्याला अडाणी आई अफूची गोळी चारते, त्याचप्रमाणें रोजच्या जीवनांतील कटकटीला कंटाळलेल्या सुशिक्षित वाचकांना माडखोलकर आपल्या मोहक व मादक कल्पना-सृष्टींत फिरवून आणीत असतात. चंदनवाडी व कांता या दोनच कादंबऱ्या माडखोलकरांच्या शुद्ध कथा-कौशल्याच्या निदर्शक आहेत.





## सानेगुरुजी : : : : २३

' **आ**धुनिक संत ' या रूपानेंच श्री. सानेगुरुजी यांना महाराष्ट्र ओळखतो.

ज्ञानेश्वरादि संत येथें पूर्वी होऊन गेले; पण विसाव्या शतकांतील या विज्ञानयुगांतहि, गुरुजींनीं आपलें जीवन असें घालविलें व संपविलें कीं, त्यामुळें त्यांना ' संत ' ही पदवी सहजच लाभली. चोहोकडे जडवाद व भोगवाद यांच्या लाटा उसळत असतांना आणि डोळस बुद्धिवादाचा व भौतिक शास्त्रांचा प्रकाश झगझगत असतांना, त्याग, सेवा, भक्ति, श्रद्धा, परोपकार आणि शेवटीं आत्मसमर्पण असल्या दैवी गुणांनीं नटलेलें निर्मल व निरहंकारी जीवन गुरुजींनीं घालविलें, हें पुढील पिढ्यांना कदाचित् खरेंहि वाटणार नाहीं—एक नुसता ' चमत्कार ' वाटेल. पण गुरुजींचा

निगर्वी स्वभाव, प्रेमळ वाणी आणि अखंड सेवा हे अलौकिक गुण साक्षात् पाहिलेले–अनुभविलेले शेकडों–हजारों लोक महाराष्ट्रांत आहेत.

## उदात्त रसाचें अभ्यंगस्नान

झऱ्याचें झुळझुळणें किंवा पांखरांचें किलबिलणें, तसें गुरुजींचें सारें बोलणें–चालणें. ' करी मनोरंजन जो मुलांचें । जडेल नातें प्रभुशीं तयाचें' अशी त्यांची भावना. त्यामुळें लहान मुलांना गोष्टी सांगण्यांत ते स्वतः रंगून जात आणि त्या मुलांनाहि गुंगवून सोडीत. मुलांसाठीं त्यांनीं किती-तरी गोड गोड गोष्टी लिहिल्या ! आणि त्यांची ती अद्वितीय कादंबरी ! महाराष्ट्रांतील कोणा सुशिक्षितानें ती वाचली नसेल ? आणि वाचतां वाचतां आपल्या अश्रूंनीं तिचीं पानें भिजविलीं नसतील ? सर्व महाराष्ट्रीय वाचक-वर्गाला या कादंबरीनें उदात्त प्रेमाचें जणुं अभ्यंग स्नानच घातलें. मातृ-प्रेमाचें महिम्न–स्तोत्रच तें ! ज्ञानेश्वरांची जशी ज्ञानेश्वरी, तशीच ' साने-श्वरांची ' ' श्यामची आई. ' दोन्हींमध्यें प्रेमाचें अमृत सांठविलेलें आहे. एक सागर असेल व दुसरें सरोवर असेल; पण दोहोंमधील जीवन एकच.

## तीन क्षुधा

सानेगुरुजींना आपल्या सानपणाची जाणीव फार होती. ' लहानाहून लहान ' ते होत. थोर पुरुषांची ' भित्री भक्ती ' ते करीत. त्यांचें ' प्रेम मुके' होतें. गांधीजी, विनोबाजी व सेनापति बापट यांच्याविषयीं त्यांना अपार आदर–पण त्यांच्यापासून ते नेहमीं दूरदूर रहात. मनांतल्या मनांत ते परमेश्वराची अशी प्रार्थना करीत कीं, " एक परार्धांश गांधी, एक परार्धांश टागोर, एक परार्धांश रामकृष्ण परमहंस अशा मिश्रणाचा मी बनावें. गांधींची सेवावृत्ति, रवींद्रांची काव्यशक्ति व रामकृष्णांची भक्ति, या तिहींचा संगम माझ्यांत व्हावा. हात सेवेंत थोडेफार राबोत, ओठ गोड गाणें गुणगुणोत व डोळे देवासाठीं ओले होवोत, या माझ्या तीन क्षुधा आहेत.' सेवा, भक्ति व काव्य या त्रिगुणांचा विकास गुरुजींनीं आपल्या जीवनांत केला–महाराष्ट्रांतील कुमारांची ते ' आई ' बनले.

## आईचें स्तोत्र

सानेगुरुजी यांचें नांव पांडुरंग सदाशिव साने. लहानपणीं त्यांना ' पंढरी ' म्हणत. पंढरीच्या पांडुरंगाची सेवा पुढें प्राणपणानें करणाऱ्या या संताला पांडुरंग हें नांव किती शोभतें ! त्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील पालगड येथें ता. २४ डिसेंबर १८९९ रोजीं झाला. हा दिवस म्हणजे दया-मूर्ति येशूख्रिस्त यांचा जन्मदिन. पालगड येथें मराठी चौथीपर्यंत पंढरीचे शिक्षण झालें. पण खरें शिक्षण मिळालें आईकडूनच. तीच त्याच्या मनाची मूर्तिकार व शीलाची शिल्पकार. तिनेंच पंढरीच्या अंतःकरणांत प्रेम–भावनेचीं रोपें लावलीं. वेलीवरील कळ्या खुडूं नयेत, मेलेल्या चिमणीचें सुतक धरावें, गाईशीं नातलग माणसाप्रमाणें ममतेनें वागावें, कांहीं झालें तरी खोटें बोलूं नये–इत्यादि भूतदयेच्या उदार भावना लहान लहान प्रसंगांतून तिनें त्याला नकळत शिकविल्या. आईचें नांव होतें यशोदा. पंढरीला तिचें शिक्षण खरोखरच यशोदायक झालें.

आईला तो गुरू मानी, कल्पतरु मानी. या आपल्या भावनेचेंच वर्णन त्यांनीं ' शामची आई ' मध्यें पुढील शब्दांनीं केलेले आहे. ' आई–या अक्षरांत श्रुतिस्मृति आहेत; सारीं महाकाव्यें आहेत. या दोन अक्षरांत माधुर्याचा सागर आहे, पावित्र्याचा आगर आहे; फुलांची कोमलता, गंगेची निर्मलता, चंद्राची रमणीयता, सागराची अनंतता, पृथ्वीची क्षमता हीं सारीं आईजवळ पहावयास मिळतील; सारीं दैवतें आईत येऊन गेलीं. आई हें दैवतांचें दैवत आहे. "

## गरिबीशीं झुंज

मराठीच्या चार यत्ता पुऱ्या झाल्यावर इंग्रजी शिक्षणासाठीं गुरुजी दापोलीस गेले. त्यापूर्वीं ते पुण्यास मामाकडे कांहीं काळ राहिले होते. दापोलीस असल्या वेळेपासूनच त्यांनीं जुनें संत वाङ्मय वाचावयास सुरुवात केली. संस्कृत काव्यहि त्यांनीं अभ्यासलें, पाठ केलें. स्वतः कविताहि ते रचूं लागले. वक्तृत्व विकासलें. दर शनिवारीं बारा मैल पायीं चालून ते दापोलीहून पालगडला जात. गरिबीमुळें तेथून ते औंध येथें शिक्षणासाठीं

गेले. त्या संस्थानांत शिक्षण मोफत होतें. कोठें कोंकण व कोठें औंध ! पण आईनें प्रोत्साहन दिलें, ' ध्रुवाप्रमाणें जा ! ' औंध येथें अत्यंत गरिबींत राहून त्यांनीं ज्ञान मिळविण्यास सुरुवात केली. कोठेंच जागा मिळेना, तेव्हां मशिदीजवळ चार आणे भाड्याच्या खोलींत राहून व माधुकरी मागून त्यांनीं दिवस काढले. कधीं अन्नछत्रांत जाऊन, कधीं पाण्याबरोबर भाकरी खाऊन, तर कधी उपवास करून ते विद्यादेवीची आराधना करीत होते. पिठाच्या गिरणींत सांडलेल्या पिठावरहि त्यांनीं आला दिवस घालविला. पण प्लेगनें खो दिला. म्हणून गोंधळून ते पुणें येथें आले तेथें तरी काय ? विद्येच्या मार्गावर गुलाबाच्या पायघड्या थोड्याच घातल्या होत्या ? तीन दिवस तर नुसते डाळेचुरमुरे खाऊन त्यांनीं काढले. एका मित्राच्या घरी ते रहात. सहा सहा महिन्यांत हजामत नसे. आठवड्यांतून चार दिवसांचेच वार लागले. अर्थात् तीन दिवस त्यांना उपवास पडे. दोन्ही वेळां जेवण तर त्यांना प्रायः कधींच मिळत नसे. रात्रीचें जेवण म्हणजे बहुधा बुधवार बागेंत हवा खाणें हेंच. ' नूतन मराठी विद्यालयां 'त सहाव्या यत्तेमध्यें त्यांनीं नांव दाखल केलें. बरोबरीच्या विद्यार्थ्यांपैकीं कोणी आजारी पडला तर त्याची शुश्रूषा ते जीव तोडून करीत. मंडईत गेले तर कुडबुड्या जोश्याला त्यांनीं आपल्या अंगांतील कोट व जोडा दिला. १९१८ सालीं ते मॅट्रिक झाले. त्यावेळीं त्यांना किती आनंद वाटला असेल, हें एक आगरकर जाणोत ! ' सुखदुःखाचीं पारडीं समान ' राखण्यासाठींच की काय, याच वर्षी गुरुजींची आई इहलोक सोडून गेली.

## गुरुकुलांत गुरुजी

खाचखळग्यांतून व कांट्यांकुट्यांतून धांवण्याची शर्यत असते ना ? तसाच प्रकार गुरुजींच्या विद्याभ्यासाचा होता. अडचणींना न जुमानतां ते शिक्षणाची चढण हसतमुखानें चढत होते. ते कॉलेजांत गेले. तेथें खूप वाचावें आणि एकलकोंड्या वृत्तीनें रहावें, असें त्यांचें वर्तन असे. अभ्यासांतील नैपुण्यानें ते आपल्या प्राध्यापकांना चकित करीत. ' न्यू पूना कॉलेज ' मध्यें असतांना त्यांनीं लिहिलेल्या मराठीच्या उत्तरपात्रिका त्यांचे

गुरु प्रा. पोतदार यांनी अजून जपून ठेवल्या आहेत. इंटरच्या परिक्षेंत त्यांना संस्कृतची शिष्यवृत्ति मिळाली. १९२२ सालीं ते बी. ए. ची परीक्षा उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाले. त्यामुळें कॉलेजांतील फेलोशिप त्यांना मिळाली. तिच्या आधारावर ते १९२४ सालीं एम. ए. झाले. त्यापूर्वींच खानदेशांतील अंमळनेर येथील तत्त्वज्ञानमंदिरांत ते फेलो म्हणून राहिले. नंतर प्रताप हायस्कुलांत १९२४ च्या जूनपासून ते शिक्षकाचें काम करूं लागले. त्या कामाशीं ते अगदीं तन्मय झाले. रात्रंदिवस, तन-मन-धन ओतून ते विद्यार्थ्यांना शिकवीत, संभाळीत व वाढवीत. गुरु-कुलच झालें होतें तें खरेखुरें ! तासाच्या घंटेचें किंवा महिन्याच्या पगाराचें भान त्यांना नसे !

विद्यार्थ्यांवर ते आईसारखी माया करीत. वसतिगृहामध्यें राहून ते साऱ्या विद्यार्थ्यांचा परामर्श घेत. विद्यार्थीच काय पण गोपाळसारख्या गड्याशींहि ते भावाप्रमाणेंच वागत—त्याच्या आजारीपणांत अलोचन जागरण करून सेवाशुश्रूषा करीत. पडित जमिनीमध्यें ते बाग फुलवीत. ‘ छात्रालय ’ या नांवाचें एक दैनिक ते काढीत. तें सारें गुरुजी स्वतः एकटे एकटांकी लिहीत. तें वाचण्यासाठीं विद्यार्थ्यांच्या उड्या पडत. शाळेच्या चालकांनीं छापील मासिक काढण्यासच त्यांना उत्तेजन दिलें. त्यांतहि गुरुजीच पुष्कळ लिहित. आपल्या पगारांतील बचत करून, ते पैसे गुरुजी मासिकासाठीं खर्च करीत. हें ‘ विद्यार्थी ’ मासिक सरकारनें बंद केलें.

## कारागृहांतील शीघ्र साहित्य

गांधीजींनीं १९३० सालीं कायदेभंगाचें रणशिंग फुंकलें. त्यांची दांडी-यात्रा देशभर दुमदुमूं लागली. स्वातंत्र्य—संग्रामाची ती घोषणा—मातृभूमीची ती हांक कानावर पडतांच, गुरुजी त्या गुरुकुलांतून बाहेर पडले आणि राष्ट्रीय आंदोलनांत सामील झाले. सारा खानदेश आपल्या वक्तृत्वानें त्यांनीं हलविला. सरकारनें त्यांना पंधरा महिने सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली. आधीं धुळें व नंतर त्रिचनापल्ली या तुरुंगांत गुरुजी

सक्तमजुरी भोगीत होते. चक्की पिसण्याचें कठीण कामहि त्यांना देण्यांत आलें होतें. पुढें १९३२, १९३४, १९४० व १९४३ साली पुनः पुन: तुरुंगवास त्यांच्या वाट्यास आला. तुरुंगांतील छळ, अपमान, अन्याय— सारें कांहीं त्यांनीं शांतपणें सोसलें. एवढेंच नव्हे तर, तें विष पचवून त्यांनीं प्रसन्न साहित्याचें अमृत निर्माण केलें. कारागृह हें त्यांना जणुं शालागृहच झालें.

नाशिक तुरुंगांत असतांना त्यांनीं " शामची आई " ही आपली अमर कृति लिहिली. त्यावेळीं त्यांच्या लेखणींत वीज सळसळत होती मातृप्रेमानें त्यांचें अंतःकरण अथांग भरलेलें होतें आणि पावसाळ्यांतील पाण्यानें भरलेला मेघ वारा लागतांच पर्जन्याच्या जशा सहस्रधारा सोडतो; तशा मातृप्रेमाच्या अमृतधारा गुरुजींनीं या आपल्या कादंबरींत ओतल्या आहेत. अवघ्या तीन दिवसांत सुमारें तीनशें पानांची ही रसपूर्ण कादंबरी गुरुजींनीं लिहिली. ' भारतीय संस्कृति ' हा ग्रंथ तर तात्त्विक व विवेचक असा प्रबंध आहे. पण तोहि त्यांनीं रचला अवघ्या पांच दिवसांत. गांधीजींचें गोष्टीरूप चरित्र तुरुंगांतल्या एका रात्रींत त्यांनीं लिहिलें. ' क्रांतीच्या मार्गावर ' हें पुस्तक ४८ तासांत त्यांनीं लिहून पुरें केलें. ' कला म्हणजे काय ? ' हा टॉलस्टॉयच्या ग्रंथाचा अनुवाद तर तीन दिवसांत त्यांनीं पुरा केला. त्यांच्याइतकें शीघ्र लेखन करणारे लेखक मराठींत विरळाच !

## ' कॉंग्रेस ' चें संपादन

चळवळ संपली, तरी गुरुजींची राष्ट्रसेवा चालूच राहिली. १९३६ सालीं फैजपूर येथें खेड्यांतील पहिली कॉंग्रेस भरली. तिच्या पूर्वतयारी-साठीं गुरुजींनीं जिवाचें रान केलें व सारा खानदेश पालथा घातला. ते घराघरांत गेले, तरुणांच्या पोटांत शिरले आणि कॉंग्रेसचा प्रचार त्यांनीं झंझावाताप्रमाणें केला. त्यांनीं आपलें जीवनच कॉंग्रेसमय करून टाकलें होतें. उत्कृष्ट भावना हा त्यांच्या जीवनाचा आत्मा. ज्यावेळीं जें हातीं घेतील, तें शेवटच्या टोकाला नेऊन पोंचवतील. मिळमिळीतपणा, अर्धवट-

पणा, हिशेबीपणा, आस्तेकदमपणा–त्यांच्या गांवींच नसे. कॉंग्रेसच्या प्रचारासाठीं १९३८ साली त्यांनीं ‘ कॉंग्रेस ’ साप्ताहिक काढलें. तें परक्या सरकारच्या डोळ्यावर आलें. त्यांनीं चार हजार रुपयांचा जामीन मागितला. तेव्हां तें पत्र बंद पडलें. पत्र बंद पडलें, तरी गुरुजींचें कॉंग्रेस-कार्य चालूच राहिलें. कॉंग्रेसचे सभासद महाराष्ट्रांत एक लाख व्हावेत म्हणून त्यांनीं १९३७ सालीं २१ दिवसांचें उपोषण केलें. १९४४ सालींहि नाशिक तुरुंगांत कामगारासाठीं त्यांनीं २१ दिवसांचा उपवास केला. हें त्यांचें आध्यात्मिक शस्त्र होतें. शेवटचें आध्यात्मिक शस्त्र म्हणजे प्राण-त्याग. तेंहि त्यांच्याजवळ सदैव सिद्ध असें. लोक–कल्याणासाठीं ते आपले प्राण आपल्या ओंजळींत घेऊनच उभे होते. अंमळनेर येथील कामगारावर अन्याय होतो आहे, असें कळतांच गुरुजींनीं जाहीर केलें, “ मी तापींत उडी घेईन. ” केवढी भूतदया ! केवढा त्याग ! त्याच्या प्रभावानें पंतप्रधान ना. खेर तेथें गेले व त्यांनीं कामगारावरील अन्याय दूर केला.

## मातृ–देवाचा क्रांति–देव

‘ चले जाव ’च्या चळवळींत १९४३ सालीं गुरुजींनीं भूमिगत राहून मोठी बहादुरी गाजाविली. ‘ मातृदेव श्याम क्रांतिदेव बनला ! ’ शूर सेनापतीच्या स्फूर्तिदायक भाषेमध्यें ते गुप्त पत्रकें ( बुलेटिन्स ) काढीत. त्यांच्या साहित्याचा तो ओजस्वी नमुना अज्ञातच आहे. ४२ च्या चळवळींतील हुतात्म्यांचे पोवाडे गात ते महाराष्ट्रभर हिंडले. त्यांतील वीर व करुणरसांनीं ते २०–२०, २५–२५ हजार श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत. श्रोत्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे पाझर काढण्याइतकें भावनापूर्ण व प्रभावी वक्तृत्व गुरुजींचें होतें. त्यांचे भाषण वा लेखन जसें रडवें, तसेंच कडवेंहि होतें. १९४६ सालीं ‘ कुमार–साहित्य–संमेलनाचे ’ ते अध्यक्ष होते. ‘ कामकऱ्याच्या खोलींत जा, दरिद्री नारायणांत मिसळा ” असा संदेश त्यांनीं कुमारांना दिला. ‘ वाङ्मय हें जीवनाच्या अनुभवांतून निर्माण होणारें आहे. जीवनाची उत्कटता वाङ्मयांत प्रगट व्हावयास पाहिजे,

साधेपणांत सत्याचा आविष्कार होत असतो. विराट समाज हाच देव. त्याच्या गरजा पहा.' असें त्यांचें वाङ्मयविषयक तत्वज्ञान होतें. त्याच आधारावर त्यांनीं सुमारें ८० पुस्तकें लिहिलीं. त्यांतील २० अनुवाद आहेत. पण ते स्वतंत्र ग्रंथाइतके सरस वठले आहेत.

## हरिजनांविषयीं अनुकंपा

केवळ राजकीयच नव्हे तर सामाजिक अन्यायहि दूर करण्याची त्यांना तळमळ होती. हरिजनांविषयीं त्यांना गाढ अनुकंपा वाटे. विनोबाजींच्या एका उद्गारानें ती भावना डिवचली गेली. 'हरिजनांना पंढरपूरचें विठ्ठलमंदिर खुलें झालें पाहिजे' अशी घोषणा त्यांनीं केली. पुणें हें महाराष्ट्राचें मस्तक असले, तर पंढरपूर हें त्याचें हृदय आहे. तेथील देऊळ खुलें झालें म्हणजे लाखों वारकरी समतेचा संदेश गांवोगांव पोंचवतील आणि त्यामुळें तेथील शेंकडों देवळें खुलीं होतील, अशी गुरुजींची अपेक्षा. चार महिने त्यांनीं मंदिर–प्रवेशासाठीं महाराष्ट्रभर हिंडून प्रचाराचा पाऊस पाडला. त्यावेळचीं त्यांचीं भाषणें म्हणजे सहज-स्फूर्त वाङ्मयच आहे. शेवटीं पंढरपूर येथें ता. १ मे १९४७ रोजीं, वैशाखी एकादशीस, त्यांनीं प्राणांतिक उपोषण मांडलें. त्या दिवशीं ८०० खेड्यांत सभा भरल्या. सारा महाराष्ट्र हादरून गेला. दहा दिवसानंतर बडवेमंडळींनीं भागवतधर्माचें खरें तत्त्व ओळखून हरिजनांना पांडुरंगाचें मंदिर खुलें केलें.

## इच्छा-मरण

राजकीय व सामाजिक विषमतेप्रमाणेंच आर्थिक वर्गभेदाशींहि गुरुजींनीं युद्ध पुकारलें होतें. आर्थिक समतेसाठीं समाजवाद हवा, या विचाराचा ते प्रचार करूं लागले. १९४८ सालीं त्यांनीं मुंबई येथें 'कर्तव्य' नांवाचें दैनिक एक वर्षभर चालविलें. गांधीजींची हत्या एका महाराष्ट्रीयानें केली, याचें दुःख धुण्यासाठीं त्यांनीं १९४८ सालीं २१ दिवसांचा उपवास केला. त्याच वर्षी ता. १५ ऑगस्टपासून त्यांनीं 'साधना' नांवाचें साप्ताहिक चालविलें. त्यांतून ते लोकशाही समाजवादाचा प्रचार

करीत. पण त्या साप्ताहिकाचें स्वरूप मुख्यतः सांस्कृतिकच आहे. भारतांतील भिन्नभिन्न संस्कृतींचें दळणवळण वाढावें या हेतूनें त्यांनीं 'आंतर-भारतीं'ची कल्पना या साप्ताहिकातून जोराने मांडली. त्यासाठीं ते व्याख्यानेंहि देत. १९५० सालीं कर्नाटकांतून आंतर-भारतीचा दौरा पुरा करून ते मुंबईस परत आले.

आणि ता. ११ जून रोजीं त्यांनीं आपल्या जीवनाचा अमृत–कुंभ आपल्या इच्छेनें, आपल्या हातानें, फोडून टाकला ! 'डोक्यांत असह्य वेदना ' झाल्यानें त्यांनीं झोपेच्या गोळ्या घेऊन शांतपणें काळझोंप घेतली. ज्ञानेश्वरांच्या जिवत समाधीचें स्मरण व्हावें असाच हा हृदयद्रावक प्रसंग ! साऱ्या महाराष्ट्राच्या हृदयाचें दुःखानें पाणी पाणी झालें. जे जें कांहीं पवित्र, उदात्त व मंगल आहे, त्याची शिकवण आपल्याला देणारा प्रेमळ गुरु, निर्मळ पुढारी व त्यागी सत आपणांस दुरावला याबद्दल लहानथोर सर्व महाराष्ट्रीयांना हळहळ वाटली.त्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें शोकाचा धक्का सर्वांना अधिकच बसला. त्यांच्या स्मरणार्थ 'आंतरभारती ' साठीं सुमारें एक लाखाचा निधि महाराष्ट्रांत जमला. त्यापूर्वी त्यांना एक लाखाची थैलीहि त्यांच्या भक्तगणानें अर्पण केली. त्या सर्वांचा ' विश्वस्त निधि ' करण्यांत येऊन समाज–सेवेसाठी ते पैसे उपयोजले जात आहेत. स्वतः गुरुजींनीं आपल्या हयातींत किती विद्यार्थ्यांना किती पैसे दिले याची गणतीच नाहीं. पुढेंपुढें प्रकाशकाकडून त्यांना हजारो रुपये मिळत, पण ते सारे ज्ञात–अज्ञात व्यक्तींना, राजसूय यज्ञांतील धर्मराजाप्रमाणें, गुरुजी मुक्तहस्तानें वाटीत.

## पवित्र वातावरण

सानेगुरुजींची कादंबरी वाचणें म्हणजे एखाद्या पवित्र देवळांत जाऊन बसणेंच होय. फुलांचे हार आपला मंद गंध दरवळीत आहेत, तुळशीच्या मंजिरी आपला पवित्र परिमल पसरत आहेत, नीरांजनाची शांत ज्योत स्निग्ध प्रकाश पाडीत आहे आणि बाहेर बारीक सनई कोमल राग आळवीत आहे–अशा देवालयांत, स्नान करून, शुचिर्भूत होऊन, क्षण दोनक्षण चिंतन व ध्यान करण्यांत जो आनंद; तोच गुरुजींची गोष्ट व कादंबरी

वाचतांना लाभतो. तुकाराममहाराजांनीं पांडुरंगाला जितक्या परोपरीनें आळविलें असेल, तसेंच ह्या पांडुरंगानें आपल्या आईची कथा घोळघोळून सांगितली आहे. आपल्या मुलाचे अंगीं भूतदया, बंधुप्रेम, सत्यनिष्ठा, धीटपणा, स्वावलंबन, स्वाभिमान वगैरे गुण यावेत, म्हणून शामच्या आईनें त्याला लहान लहान प्रसंगांतून थोर शिकवण कशी दिली, याचें ‘ करुण व गोड कथात्मक चित्र ’ म्हणजेच श्यामची आई !

## थोर संस्कृतीचें रम्य चित्र

नाशिकच्या तुरुंगांत १९३३ सालीं दिवसभर सक्तमजुरी करून पांच रात्रींमध्यें ही कादंबरी गुरुजींनीं लिहून पुरी केली. तुरुंगांत त्यांनीं छत्तीस प्रकरणें लिहिली व बाहेर आल्यावर नऊ प्रकरणें वगळलीं. मातेचा महिमा हें या पुस्तकांतील मध्यसूत्र आहे. त्याबरोबरच साध्या व रम्य संस्कृतीचें चित्रहि यांत आलें आहे. ही या पुस्तकाची भूमिका सांगून गुरुजी प्रांजळपणें व निरभिमानानें प्रस्तावनेंत सांगतात, “ हें पुस्तक पवित्र आहे. हृदयांतील सारा जिव्हाळा येथें ओतप्रोत भरलेला आहे. या गोष्टी लिहीत असतांना माझे डोळे शतवार ओले झाले होते. अनेकदां गहिंवरून व उचंबळून आले होते.……………तुरुंगांत अनेक मित्रांना या रात्रीं आवडल्या, त्यांना वाचून दाखवीत असतां तेहि रडले व मीहि रडलों.” मराठींतच काय पण साऱ्या भारतीय भाषांमध्यें मातेचा महिमा गाणारी ही कादंबरी अद्वितीय आहे.

## हृदयाचा आविष्कार

गुरुजींनीं स्वतःच्या आईचेंच पवित्र चित्र या कादंबरींत रेखाटलें आहे. “ हृदय भरलेलेंच असे, भराभरा शाईनें कागदावर ओतावयाचें एवढेंच उरलेलें असे. ” अशी मनाची स्थिती ही कादंबरी लिहितांना गुरुजींची होती. गाईची कास दुधानें भरलेली. हीच कवीची अवस्था ! जणुं कांहीं मारुतीप्रमाणें आपलें अंतःकरण फाडूनच त्यांतील आपल्या मातेची मूर्ति गुरुजींनीं जगाला दाखविली. आश्रमांतील आपल्या सवंगड्यांना शाम आपली जीवनकथा रोज रात्रीं सांगत आहे. प्रस्तावनेच्या शेवटीं भावनापूर्ण

शब्दांनीं गुरुजी लिहितात, " आज श्यामची आई माझ्या घरांतून सर्वांना भेटण्यासाठीं बाहेर पडत आहे. तिनें स्वतःच्या मुलाला वाढविलें, त्याप्रमाणें इतर मुलाबाळांनाहि वाढविण्यासाठीं ती बाहेर पडत आहे. उघड्या दारांतून ती आंत शिरेल, बंद दारें ठोठावून पाहील; परंतु सारींच दारें बंद झालीं तर ? तर ती माझ्या घरांतच येऊन राहील; माझ्या हृदयांत तर ती आहेच आहे." नवल नाहीं कीं, महाराष्ट्रांतील लाखों दारें या प्रेमळ व परोपकारी आईच्या स्वागतासाठीं खुलीं झालीं. बारा आवृत्त्या मराठींत तर निघाल्याच. पण हिंदींतहि या पुस्तकाचें भाषांतर झालें. मातृमहिम्याची ही सत्य कथा चित्रपटाच्या रुपेरी पडद्यावर आली.

## चारित्र्याचा वस्तुपाठ

साध्यासुध्या जीवनांतील लहान लहान प्रसंग ! पण त्यांतूनच गुरुजींनीं केवढा मोठा ' आशय ' व्यक्त केला आहे ! श्यामनें कधीं फुलांच्या कळ्या तोडल्या, तर त्यावरून त्याच्या आईने त्याला प्रेमाचा धडा द्यावा; कधीं मोरी गाय मरण पावली, तर आईनें जेवूं नये; कधीं श्यामनें दक्षिणा आणली, तर ती आपण घेऊं नये, असें सांगून आईनें त्याला स्वाभिमानाचा धडा शिकवावा: कधीं पत्रावळ लावण्यास श्यामनें नकार दिला, तर त्याला जेवावयास न घालून स्वावलंबनाचा कित्ता घालून द्यावा; कधीं श्याम पोहावयास गेला नाहीं, तर आईनें त्याला मारमार मारावें, पण त्याच्या अंगीं धीटपणा आणावा; जेवणावळींत श्लोक म्हटल्याची थाप देणाऱ्या श्यामला आईनें सत्याचा महिमा शिकवावा; कधीं आजारी मोलकरणीला आईनें आपल्या मुलाबरोबरच जेवूं घालावें—एक ना दोन, दररोज, हरघडी, ज्या ज्या लहानसहान घटना घडतात; त्या जणुं परमेश्वराला पाहण्याच्या दुर्बिणीच आहेत, अशा दृष्टीनें श्यामची आई त्यांचा उपयोग करून घेत असे. ' मनुष्यावरच नव्हे तर गाईगुरांवर, फुलांपाखरांवर, झाडामाडावर प्रेम करावयास तिनेंच शिकविलें ' त्याचा परिणाम काय झाला ? तर, गरीब गवताळू झोंपडींत श्यामचें कुटुंब रहावयाला गेलें असतांना त्या रात्रीं आकाशांतील एक तारा पडला. तें पाहतांच श्याम आपल्या आईस म्हणतो, " हें घर पहावयास ते तारेहि येतील. कारण

आपल्या घरांत प्रेम आहे, तूं आहेस. " आणि हें प्रेम कुणाबद्दल ? चिमणीच्या पिलाबद्दलहि. खालीं पडून तें पिलूं मेलें तर श्यामनें त्याचें सुतक धरलें !

## गद्य-काव्यच हें !

किती साधा हा प्रसंग ! कैक मुलांच्या नजरेस तो पडला असेल आणि क्षणांत विसरलाहि गेला असेल. पण श्यामचें अंतःकरण अनुकंपेनें थबथबलेलें ! त्यामुळें त्याला " शोधतां शोधतां झाडावरून पडलेलें एक पांखराचें लहानसें पिलूं आढळलें. त्याची छाती धडधडत होती. फारच उंचावरून ते पडलें होतें. त्याची फारच दुर्दशा झाली होती. लोळागोळा झाला होता. अजून त्याला नीट पंख फुटले नव्हते. डोळेसुद्धां तें नीट उघडीत नव्हतें. लोहाराचा भाता जसा हलत असतो, त्याप्रमाणें त्याचें सारें अंग एकसारखें हलत होतें, खालीं वर होत होतें. त्याला जरा हात लावतांच तें आपली सगळी मान पुढें करी व ची चीं असें केविलवाणें ओरडे. " रे टिळकांच्या " केवढें हें क्रौर्य ! " या कवनांतील भाव वरील गद्य उताऱ्यांतून व्यक्त होत नाहीं काय ?

अखेर ते बिचारें पिल्लूं मेलें. त्याची उत्तरक्रिया श्यामनें नको कां करावयास ? त्यानें आईजवळ एक फडकें मागितलें. श्यामचीच आई ती ! " आईला एक जुनी फाटकी जरीची चोळी होती. त्या चोळीचा एक तुकडा आईनें फाडून दिला. त्या रेशमी कापडांत त्या पिलाला आम्ही घेतलें व जेथें फुलझाडें होतीं तेथें गेलों. शेवंती व मोगरे यांच्यामध्यें त्याच्यासाठीं खळगी खणूं लागलों. आमच्या डोळ्यांतून पाणी गळत होतें. अश्रूंनीं जमीन पवित्र होत होती. खळगी खणली. त्या खळगींत फुलें घातलीं. त्या फुलांवर त्या पिलाचा देह त्या वस्त्रांत गुंडाळून ठेविला, परंतु त्यावर माती ढकलवेना—लोण्याहून मऊ अशा त्या सुंदर चिमुकल्या देहावर माती ढकलवेना शेवटीं डोळे मिटून माती लोटली. " पदलालित्य नाहीं, लयबद्ध रचना नाही कीं भाषेचे अलंकार नाहींत, तरी हें गद्यकाव्य आहे खास.

## पति-प्रेमाचें दर्शन

पांखराबद्दल ही आस्था, हें प्रेम, ही माया ! मग माणसाबद्दल किती ?– आणि घरांतल्या माणसाबद्दल ?–मुलाबाळाबद्दल ?–पतिबद्दल ? एकदां श्यामचे वडिल परगांवी गेले होते. परत येतांना जंगलांत त्यांना कांहीं मांगांनीं मारलें. ती बातमी कळतांच श्यामची आई कळवळून देवाला अशीं प्रार्थना करूं लागली, " माझें सौभाग्य–नको, आई नको ! त्यावर कुऱ्हाड नको पडूं देऊं. मी काय करूं ? कोणतें व्रत घेऊं ? देवा ! माझी करुणा येऊं दे हो तुला. तूं करुणेचा सागर. येऊं दे हो घरीं सुखरूप. पाहीन त्यांना डोळे भरून; नांदूं तुझ्या आशीर्वादें सुखानें जन्मभर. मला दुसरें कांहीं नको. नकोत हे दागिने, नकोत हीं मोठीं वस्त्रें. कशाला मेली ती खोती ? नको मला, कांहीं नको. पति हाच माझा दागिना, तेवढा दे. देवा ! दे. "

आईच्या पति-प्रेमाचा एक प्रसंग तर अत्यंत हृदयंगम आहे. श्यामचें घराणें पूर्वीं श्रीमंतीचें–सरदारामारखें होतें. पण तें वैभव कोसळलें. गरिबी आली. झोपडींत सारेजण राहूं लागले. तशा स्थितींत दिवाळी आली. पण घरांत साराच खडखडाट. तरी वडिलांनीं मुलांना एकएक नवीन सदरा केला. त्यांच्या स्वतःचीं धोतरें पार फाटलीं होतीं, आईनें तीं सतरांदा शिवलीं होतीं–सतरा ठिकाणीं शिवलीं होतीं वडिलांचें प्रेम असें कीं, त्यांनीं मुलांना सदरे केले, पण स्वतःला कांहीं धोतरें घेतलीं नाहींत. रोज धोतराचा फाटका भाग निऱ्यामध्यें लपवून वडील वेळ मारून नेत असत. आईलासुद्धां कितीतरी दिवसांत नवीन लुगडें मिळालें नव्हतें. पुण्याच्या मामांनीं आईला भाऊबीजेचे तीनें रुपये पाठविले. त्या तीन रुपयांचें आईनें काय घेतलें ? स्वतःला लुगडें ? छे: ! तिनें गुपचुप मुलाकडून एक धोतरजोडी विकत आणली आणि दिवाळीच्या दिवशीं, एकदम ती आपल्या पतीपुढें करून त्यांना चकित केलें. धोतराचा वृत्तांत ऐकल्यावर वडिलांना खेद वाटला. तेव्हां त्या पति-पत्नींत झालेला उदात्त प्रेमाचा सात्विक संवाद ऐका. " माझें सारें तुमचेंच आहे व तुमचें तें माझेंच आहे. आहे तरी काय आपणाजवळ ? तुम्ही नवीन धोतर नेस-

लात म्हणजे मीच नवीन लुगडें नेसल्यासारखें आहे. त्यांतच माझा आनंद आहे. नेसा, मीं त्याला कुंकवाचें बोट लावलें आहे. ” आई म्हणाली.

“ मीं नवीन धोतर नेसावें व तुला नवीन लुगडें नसावें याचें मला नाहीं का वाईट वाटणार ? तुला आनंद होत आहे, परंतु मला दुःख होत आहे. तूं आपल्याला आनंद मिळविलास आणि मला ? ” त्यांच्यानें बोलवेना.

माझा आनंद तो तुमचाच आहे. ”

पति-पत्नींच्या प्रेमाचें अद्वैत किती साध्या प्रसंगांतून दृष्टीस पडत आहे!

## कलेचें अकृत्रिम सौंदर्य

अशा त्यागांतील वैभवाचा, गरिबींतील श्रीमंतीचा, अबोलक्या वक्तृत्वाचा सात्त्विक संवाद किती मराठी कादंबऱ्यांमध्यें वाचावयास मिळतो ? नाही म्हणावयास वामनराव जोशी यांनीं आपल्या ‘ स्मृति-लहरी ’ या कादंबरींत त्या दिव्य प्रेमाचे थोडेबहुत तुषार उडविले आहेत. केवळ कलेच्या विकासासाठीं एखाद्या कादंबरीकारानें या प्रसंगाची पूर्तता अशी केली असती कीं, वडिलांनीं आपल्या हातांतील सोन्याचें पवित्रक विकून त्याच्या पैशांतून आईला लुगडें विकत आणलें. पण अशी तंत्रशुद्ध प्रमाण-बद्धता कृत्रिम बनत जाते, असत्य वाटूं लागते. ती नसली म्हणून काय झालें ? गुरुजींनीं रंगविलेल्या प्रसंगांत काय रस निर्माण होत नाहीं ? त्याची गोडी चाखण्यास जीभ मात्र, अतिरंजित वर्णनें वाचून वाचून चरबट झालेली नसावी. अत्तराचा सूक्ष्म गंध किंवा संगीताचें सूक्ष्म कंपन जाणण्यास इंद्रियेंहि तशींच तल्लख व निर्मळ असावीं लागतात.

## श्यामचें स्वभाव-लेखन

आईचें पतिवर हें प्रेम-आणि मुलावरहि तसेंच ! श्याम इंग्रजी शिक्षणासाठीं दापोलीस राहिला होता. तेथून एका शनिवारीं संध्याकाळीं बारातेरा मैल पायीं चालून तो घरीं आला. आईला विशेषच आनंद वाटला, म्हणून जेवतांना तिच्या हातून थोडासा पंक्तिप्रपंच घडला. तो कसा

हें श्याम सांगतो, " आरती झाली. पानें वाढलीं. आम्ही जेवावयास बसलों. आईनें मला दहीं वाढलें. मलाच वाढलें. माझ्याजवळ लहान भाऊ होता. त्याला नाहीं वाढलें. माझ्याकडे कोणाचें लक्ष नाहीं असें बघून माझ्या पानांतील दहीं मी लहान भावाच्या पानांत घातलें व त्याला भात कालवून दिला. तें दहीं त्याला देतांना मला धन्यता वाटत होती. मी त्या दिवशीं अगदीं हळुवार मनाचा झालों होतों. त्या वेळेस माझ्या शरिरास कोठेंहि बोट लावलें असतें तर चटकन् पाणीच बाहेर आलें असतें. जणुं मी अश्रुमय बनलों होतों ! आसवांची मूर्ति झालों होतों. " त्यागाच्या बाबतींत श्यामनें आईची बरोबरीच केली. श्यामच्या अशा प्रेममय स्वभावाचें लेखन गुरुजींनी अथपासून इतिपर्यंत सुरेख केलेलें आहे.

## कल्पकतेची चमक

कोंकणची सृष्टि गुरुजींची लाडकी. तेथील समुद्राचें वर्णन ते असें करतात, " समुद्र शेकडों हातांनीं हळूच गुदगुल्या करावयास हंसत हंसत खेळत येत होता. पायांखालची वाळू लाट माघारीं जातांच निसरत होती. आम्हीं मायलेकरें ईश्वराच्या कृपासमुद्रात डुंबत होतों पाणी खारट होतें, तरी तीर्थ म्हणून आई थोडें प्यायली व तिनें मलाहि प्यावयास लावलें. आईनें समुद्रास फुलें वाहिलीं, हळदकुंकू वाहिलें. समुद्राची तिनें पूजा केली. चार आणे समुद्रांत फेंकून दिले ! मोत्यांच्या राशी ज्याच्या पोटांत आहेत त्या रत्नाकराला आईनें चार आणे दिले ! ती कृतज्ञता होती. " सोपी भाषा ! थोर भावना !

चांदण्या रात्रीची समुद्रावरील मौज गुरुजी पुढील शब्दांनीं सांगतात, " आपल्या मुलांच्या अंगाखांद्यावर घालण्यासाठीं समुद्रानें दागदागिने आणले आहेत कीं काय असेंहि मनांत येतें. किंवा चंद्रच शेंकडों रूपें घेऊन खालीं लाटांशीं खेळण्यासाठीं उतरला आहे, असें वाटतें. सारी मौज असते. वारे वहात असतात, नारळी डोलत असतात, लाटा उसळत असतात, दीप चमकत असतो, चद्र मिरवत असतो आणि पडाव भ्रमत असतो. " गुरुजींचें कांहीं काव्य गद्यरूप असलें, तरी त्यांचें पुष्कळसें गद्य काव्यमय आहे, याचा हा पुरावाच होय.

## सुविचारांची खाण

गुरुजींची लेखणी म्हणजे उदात्त विचारांची खाण ! सुभाषितांची जणुं टांकसाळ ! शिक्षणासाठीं निघालेल्या श्यामला ' ध्रुवाप्रमाणें जा ' अशी प्रेरणा देऊन आई उपदेश करते कीं,

" कसाहि रहा परंतु चोरीचहाडी करूं नको, पाप करूं नको, सत्याचा अभिमान सोडूं नको, इतर सारे अभिमान सोड. आपल्याला देतां येईल ती मदत देत जा. गोड बोलावें. हंसतमुख असावें. जीभ गोड तर सारें जग गोड. मित्रमंडळी जोड. कोणाला टाकून बोलूं नको, हृदयें दुखवूं नको. अभ्यास झटून कर. आईबापांची आठवण ठेव; बहीण भावांची आठवण ठेव. ही आठवण असली म्हणजे बरें. " उपनिषदांतील ' सत्यं वद । धर्मं चर । इत्यादि उपदेशाचेंच हें प्राकृत स्वरूप नव्हे काय ? ही सारी कादंबरी म्हणजेच एक मराठी उपनिषद आहे. आईच काय, पण श्यामची कथा ऐकणारा त्याचा मित्र राम हाहि म्हणतो,

" श्याम ! दुःख पाहून दुःख दूर करण्यास उठावें; अंधार पाहून उजेड आणण्यास धडपडावें, बंध पाहून बंध तोडण्यास सरसावावें. निराश कां व्हावें ? वीराला जितकीं संकटें अधिक तितका चेव अधिक, स्फूर्ति अधिक.

" आपल्याला करतां येईल तें करावें. दगड उचलावा; कांटा फेंकावा ! फुलझाड लावावें; रस्ता झाडावा; कोणाजवळ गोड बोलावें, गोड हसावें, आजाऱ्याजवळ बसावें; रडणाऱ्याचे अश्रु पुसावे दोन दिवस जगांत राहणें ! माझ्यासारखे याहून जास्त काय करणार ? या फाटलेल्या आकाशाला माझ्यासारखे दुबळे कोठवर ठिगळें जोडणार ? "

## श्रमाची पूजा

श्रमाचें माहात्म्य श्याम ओळखतो. तो म्हणतो, " श्रमांत आत्मोद्धार आहे. फुकट घेण्यांत व फुकट देण्यांत पतन आहे. उन्हातान्हांत काम करणारा मजूर, रस्ते झाडणारा झाडूवाला, मलमूत्र नेणारा भंगी, मेलेलीं गुरें फाडणारा ढोर, वहाणा बांधणारा चांभार—हे सारे आयतेखाऊ लोकांपेक्षां

पवित्र आहेत, श्रेष्ठ आहेत. कांहीं तरी निर्माण करा. विचार निर्माण करा, धान्य निर्माण करा, स्वच्छता निर्माण करा, कांहीं तरी मंगल असें, सुंदर असें, हितकर असें, निर्माण करा; तरच जगण्याचा तुम्हांस अधिकार आहे. ज्या राष्ट्रांत समाजसंवर्धक, समाजरक्षक, समाजपोषक श्रमाची पूजा होते तें राष्ट्र वैभवावर चढतें. बाकीचीं भिकेस लागतात."

## "धर्ममय गोष्टी"

अशा सुविचारांचे सुवर्णकण सर्वत्र विखुरलेले आहेत. ते वेचणारा त्याचा मित्र राजा परगांवीं निघाला असतांना तो श्यामच्या गोष्टीचें महत्त्व वर्णन करतो, "श्याम, तूं ज्या आठवणी सांगतोस त्या असतात साध्या, परंतु त्यांतून सुंदर धर्म तूं दाखवून देतोस. कृष्णाच्या लहानशा तोंडांत यशोदेला विश्व दिसलें, तसें तुझ्या या लहान लहान गोष्टींत धर्माचें व संस्कृतीचें विशाल दर्शन होतें. श्याम, काल मीं रामजवळ म्हटलें कीं, हा गोष्टीमय धर्म आहे किंवा या धर्ममय गोष्टी आहेत. गोष्टीरूपानें तूं धर्म सांगत आहेत; धर्मरूपानें गोष्टी सांगत आहेस. रोजच्या आपल्या साध्या जीवनांतहि किती आनंद व सहृदयता आपणांस ओततां येईल, हें तूं दाखवीत आहेस, नाहीं का ? या आयुष्याच्या मार्गावर सुखाला व संपत्तीला तोटा नाहीं. बहीणभावाचें प्रेम, गुराढोरांचें प्रेम, पशुपक्ष्यांचें प्रेम—या सर्वांमुळें जीवन समृद्ध, सुंदर व श्रीमंत करतां येईल."

यांत अतिशयोक्ति आहे काय ? असत्य आहे काय ? मुळीच नाहीं. ही कादंबरी म्हणजे गुरुजींनीं वाजविलेली प्रेमाची मुरली आहे, 'माझ्या आईनेंच जीवनांत अत्तर ओतलें.' असें श्याम म्हणतो. हें अत्तर कोणतें ? तर "ही माधुरी ! ही सरलता ! ही कोमलता ! हें प्रेम ! हें गोड हंसणें ! ही सेवावृत्ति ! ही निरहंकारिता ! कोणतेंहि काम करण्यास लाज न वाटण्याची वृत्ति !" ह्या साऱ्या गुणांचें अत्तर श्यामच्या जीवनांत-आणि म्हणून त्याच्या ह्या जीवन-ग्रंथांत—उतरलें आहे. शाळेच्या क्रमिक पुस्तकांत या कादंबरीस सर्वत्र व अक्षय्य स्थान मिळालें, तर पुढील पिढ्यांचें मन सात्त्विकतेनें न्हाऊन निघेल व विद्यार्थी चारित्र्यसंपन्न होतील यांत शंका

नाहीं. मुलांचें शील आपोआप बनत जाईल आणि तें बनत असताना मुलें आनंदानें म्हणतील, " आतां आम्हांस रोजच सुधारस प्यावयास मिळणार—रोजच पावन-गंगेंत डुंबावयास मिळणार. "

## त्रिखंडांत भरलेला श्याम

श्याम म्हणजे सानेगुरुजी. त्यांच्या बालपणाची हकीकत ' श्यामची आई ' या कादंबरींत येऊन गेली आहे, पण आनुषंगिक म्हणून. तिचा मुख्य भर आईच्या प्रेमावर, प्रेमळ शिकवणीवर, त्या शिकवणीतील उदात्ततेवरच आहे. श्यामची आई कशी होती ? ती त्याच्या मनाची मूर्ति कशी घडवीत होती, याचाच ठसा या कादंबरीनें आपल्या मनावर उठतो. पण खुद्द श्यामच कसा होता ? त्याचे गुण कोणते ? दोष कोणते ? विचार कोणते ? विकार कोणते ? या सर्वांची माहिती आपणाला व्हावी अशी जिज्ञासा त्या श्रोत्यांमध्यें—त्या मित्रांमध्यें उत्पन्न झाली. त्यांनी श्यामला आग्रह करकरून त्याचा पुढील इतिहास सांगण्यास प्रवृत्त केलें. ' तुमच्या इच्छेवरच मी जगत आहें. ' असें म्हणून श्यामनें अनिच्छेनें आपला शाळेंतील व कॉलेजांतील ' जीवन-विकास ' त्या आपल्या स्नेहाळू श्रोत्यांना ऐकविला. त्याचें शाश्वत स्वरूप म्हणजे ' श्याम ' या कादंबरीचे तीन खंड. पहिल्या खंडांत इंग्रजी पांचवी-पर्यंतच्या शाळेंतील शिक्षणाचा अनुभव दिलेला आहे. दुसऱ्या खंडांत श्यामनें ' औंधांत सुतक्यासारखा प्रवेश केला ' आणि तेथें गरिबीचा कटु अनुभव कसा घेतला हा भाग आलेला आहे. नंतर पुण्याच्या नू. म. विद्यालयांत आल्यावर कोण शिक्षक कसें शिकवीत वगैरे वृत्तांत तिसऱ्या खंडांत आलेला आहे.

## पुनरुक्ति व अतिशयोक्ति

कलेच्या कसोट्या लावल्या तर त्रिखंडात्मक श्याम बराच उणा ठरतो, असें टीकाकारांना वाटतें. या तीन खंडांत आदि, मध्य, अंत कल्पून कथानकाची प्रमाणबद्ध रचना केलेली नाहीं. तेच तेच विचार, त्याच त्याच भावना, तींच तींच वर्णनें — आणि या सर्वांचा शेवट निराश होण्यांत व मुळुमुळु रडण्यांत होतो. पुनरुक्ति व अतिशयोक्ति यांच्यामध्यें

तर जणुं शर्यतच लागलेली आहे. त्यामुळें 'पाल्हाळ' हा दोष मोठ्या प्रमाणावर शिरलेला आहे, संगीत नाटकांतील पात्रें जशीं रस-भंग करणाऱ्या तानांचीं भेंडोळीं फेकीत, त्याप्रमाणें निवेदनाच्या ओघांत जो शब्द येईल, त्याच्यावर त्या निवेदनाची गति खुंटाविण्याइतकें लांबलचक भाष्य करावयाचें — आणि तेंहि आत्यंतिक टोकाचें. 'भारत म्हणजे परमेश्वर' 'सहानुभूति म्हणजे मोक्ष' 'निद्रा म्हणजे अमृत, देवता, प्रभूचें परम कारुणिक स्वरूप.' असे एकांतिक सिद्धांत बोलबोल म्हणतां फेंकून दिलेले! मुख्य उणीव म्हणजे मानवी भावनांची विविधता व सखोलता यांचे पापुद्रे काढण्याची कला सानेगुरुजींना जमतच नाहीं. अंतःकरणाच्या गाभाऱ्याला ते स्पर्शच करूं शकत नाहीत. पेटत्या ज्वालामुखीच्या पोटांत उतरणाऱ्या व तेथले फोटो वर घेऊन येणाऱ्या संशोधकाचें धाडस ज्या प्रतिभासंपन्न लेखकाजवळ असते, तोच निरनिराळ्या अंतःकरणाच्या अंतरंगांत शिरून तेथील क्रियांचें, हालचालींचें, हेलकाव्यांचें यथातथ्य चित्रण लोकांपुढें ठेवूं शकतो. तसें न करतां ज्वालामुखींवर उगवलेल्या हिरवळीवर चरणाऱ्या गाई-हरणाप्रमाणें इतर लेखक वरवरच्या सुंदर भावनांवरच मोहित होतात. "त्यांना अंतरंगांतील घडामोडी उत्कटपणें वर्णितां येत नाहींत." असा आरोप गुरुजींनीं हरिभाऊ आपट्यांवर श्यामच्या दुसऱ्या खंडांत केला आहे. तो हरिभाऊंपेक्षां गुरुजींच्याच कादंबऱ्यांना अधिक लागू पडणारा आहे.

## व्याख्यानांची गर्दी

गुरुजींनीं आपल्या कादंबऱ्यांत 'प्रेमाची पाणपोई' घातलेली आहे. पण श्यामचें चरित्र सांगतांना प्रसंग थोडे आणि व्याख्यानें फार असा प्रकार झालेला आहे. देशांतील शिक्षणाची दुर्दशा, इन्फ्युएंझाच्या सांथींत पाऊण कोटी लोकांचा संहार, लो. टिळकांची वऱ्हाडांतील स्वराज्याची मोहीम, बालवीर चळवळ, मांसाशन, संगीत, परीक्षा इत्यादि नाना विषयांवर गुरुजींनीं आपले विचार श्यामच्या तिसऱ्या खंडांत विस्तारानें मांडले आहेत - आणि तेहि इतक्या उघडपणें व कडकपणें कीं, ब्रिटीश सरकारनें तें पुस्तक जप्तच केलें. पुढें कॉंग्रेस सरकारनें ती बंदी उठविली.

समाजांतील विषमतेचें वर्णन श्यामनें केलें आहे. तें असें, " आज मला लाखो आया अशा दिसत आहेत; आजारांत दवा नाहीं, थंडींत पाघरायला पांघरूण नाहीं, पावसांत निवारा नाहीं, उन्हांत छाया नाहीं, पिण्याला पाणी नाहीं, खायला दाणा नाहीं, दुधाचा थेंब नाहीं, फळाचें दर्शन नाहीं, ज्ञानाचा गंध नाहीं, कलेचा स्पर्श नाहीं, सारें शून्य, अशीं लाखों कुटुंबें या देशांत आहेत. एकीकडे मोठमोठ्या हवेल्यांतून, मोठमोठ्या बागांतून रसाळ फळाचे करंडेच्या करंडे येत आहेत, दुसरीकडे विषम-ज्वरांतहि शिळ्या भाकरीचे तुकडे कोणी खात आहेत, एकीकडे विजेचे पंखे फिरत आहेत, दुसरीकडे उन्हाच्या झळा लागून लोक मरत आहेत; एकीकडे रेडिओचें संगीत आहे, दुसरीकडे मरण्याचा आक्रोश आहे; एकीकडे विलास आहे, दुसरीकडे विनाश आहे; एकीकडे स्वर्ग आहे, दुसरीकडे नरक आहे."

## स्फूर्तीचे स्फुल्लिंग

अशा सामाजिक विषमतेंतूनहि प्रगतीचा मार्ग आंखला पाहिजे. हा आशावादी विचार गुरुजींनीं किती स्फूर्तिदायक शब्दांनीं मांडला आहे पहा :—" परिस्थिती कीं माझी चिच्छक्ति ? शेवटीं माझी चिच्छक्तीच विजयी झाली पाहिजे. मी मृत्यूंतून अमृतत्व निर्माण करीन. मातींतून अमरावती घडवीन. अंधःकारांतून प्रकाश प्रकटवीन. जगांतील सर्व महान् विभूतींनीं हें महान् सत्य जीवनांत अनुभविलें आहे. त्यांचा आत्मा कधींहि कशानेंहि चिरडला गेला नाहीं. कृष्णाच्या अंगावर भगदत्तानें रागानें अंकुश फेकून मारला. परंतु त्या अंकुशाचें काय झालें ? श्रीकृष्णाच्या वक्षःस्थळावर त्या अंकुशाची वैजयंती माळ झाली."

जो समाधानी, समतोल व हंसऱ्या वृत्तीनें आपल्या जीवनाकडे पाहील, त्याला सारें जीवन — जीवनच काय, पण मृत्युहि — सुंदर, स्वागतार्ह व आनंददायक वाटतो. या सोनेरी दृष्टीनें पाहून श्याम म्हणतो, " मरण म्हणजे मेवा. जीवनाला मरणाचें फळ येतें व मरणाला जीवनाचे कोंब फुटतात. मला तर मृत्यु म्हणजे देवाकडे जाण्याचें दार वाटतें. एखाद्या

मोठ्या राजवाड्याला अनेक प्रवेशद्वारें असतात. त्याप्रमाणें मृत्यूचीं अनंत प्रवेशद्वारें ओलांडित सिंहासनावर बसलेल्या त्या राजराजेश्वराचें दर्शन घ्यावे लागतें. ”

## करुण रसाचा उठाव

श्यामचा भाऊ सदानंद अकस्मात् निधन पावला हें कळतांच श्यामचें कोमल हृदय बेभान झालें—सैरावैरा भटकूं लागले. श्याम सांगतो,—

“ मी फिरत फिरत दूर गेलों. एखाद्या झाडाखालीं बसून ‘ सदानंद, सदानंद ’ मी हांका मारीत सुटे. पक्षी उडाले कीं मी ‘ सदानंद, सदानंद ’ हांक मारी. सदानंद कोठून तरी येईल असें मला वाटे. मी चोहोबाजूंस पहात होतों. मी झाडावर डोकें आपटीं, दगडावर डोकें आपटी, परंतु फुटून जाईल इतक्या जोरानें कांहीं आपटींत नव्हतों. मी हळूच आपटीत होतों. स्वतः मरून जावें असें कांहीं मला वाटत नव्हतें. माझें दुःख कृत्रिम होतें असें नाहीं. परंतु तळ्यांत उडी घ्यावी असें कांहीं वाटलें नाहीं. मी भटक भटक भटकलों. रड रड रडलों. शेवटीं दमून एके ठिकाणीं मी बसलों. ”

शोकाच्या अतिरेकानें शामला वाटलें, आपला मृत भाऊ सदानंद हाच एका पांखराच्या रूपानें आपल्याला भेटत आहे. तो म्हणतो,

“ इतक्यांत अकस्मात् कोठूनसें माझ्यासमोर एक सुंदर पांखरूं येऊन बसलें. किती तरी वेळ तें पांखरूं हलेना, चालेना, बोलेना. मी त्या पांखराकडे पाहात राहिलों. तें पांखरूं छातीशीं लावावें असें मला वाटलें. मी उठलों. परंतु पुनः बसलों. तें पांखरूं उडून जाऊं नये असें मला वाटत होतें. ”

## इंग्रजी कथा-बीजाचा विस्तार

‘ तीन मुलें ’ ही एक छोटी कथा आहे. तिचें कथानक अगदीं लहान आहे—आणि जें आहे तेंहि इंग्रजींतील टेनिसन कवीच्या ‘ इनॉक ऑर्डन् ’ या काव्यावरून घेतलेलें आहे. याच काव्यावरून वामनराव जोशी यांनीं ‘ आश्रम-हरिणी ’ ही आपली छोटेखानी कादंबरी रचली. त्यांनीं तिला

पौराणिक वेष दिला होता. पण गुरुजींनीं एक कोंकण-कथा रंगविली आहे. सारंग या समुद्रकांठच्या गांवीं तीन मुलें खेळत असतात. त्याच्या प्रेमाची ही कथा आहे. ती बहुतांशीं संवादरूपानेंच सांगितली आहे. वर्णनाचा भाग नाहीं म्हणण्याइतकाच आहे. पण या कथेत स्वाभाविकता फारशी नाही. एखाद्या अद्‌भुत कथेसारखें हें कथानक वाटतें. त्यांतील पात्रेंहि हाडामासांची, विकारा–विचारांचीं, जिवंत दिसत नाहींत. त्यांचे संवाद स्वाभाविक वाटत नाहींत. आहे काय तो, त्यागी प्रेमाचा उदात्त नमुना. तो सोप्या सोप्या शब्दांनीं, लहान लहान वाक्यांनी रंगविला आहे, ‘ ला मिझरेबल ’ या फ्रेंच कादंबरीचा अनुवाद ‘ दुःखी ’ या नांवानें गुरुजींनी केला.

## पौराणिक कथेचें रूपक

‘ आस्तिक ’ ही कादंबरी विशेष गुणांनीं युक्त आहे. तींत सद्यःस्थितीवर पौराणिक कथेचें रूपक गुरुजींनीं चढविलें आहे. तें इतक्या कौशल्यानें कीं, तें वाचतांना शिवरामपंत परांजपे यांचें स्मरण व्हावें. जनमेजय राजानें सर्पसत्र आरंभिलें, या कथेवर आधारलेली ही कादंबरी गुरुजींनीं नाशिक तुरुंगांत १९३३ सालीं लिहिली. त्यावेळीं गांधीजींच्या दांडीयात्रेचें अद्‌भुत व अपूर्व दृश्य सर्व जगानें, चकित नेत्रानें, पाहिलें होतें, उलट हिंदु-मुसलमानांच्या द्वेषाचे व कलहाचे निखारेहि फुलूं लागले होते. या कालखंडाच्या पार्श्वभूमीवर गुरुजींनीं या पौराणिक कथाबीजाचा विस्तार केला आहे. आर्य हे गोरे व नाग हे काळे. या दोघांचें अगदीं हाडवैर. पण त्यांचें ऐक्य कां, कसें व केव्हां घडून आलें, याचें वर्णन या कादंबरींत आहे.

कादंबरीचा प्रारंभ एका नाट्यमय प्रसंगांतून केलेला आहे. नदीला पूर आला असतांना आर्य–कन्या वत्सला बुडूं लागली. तेव्हां जिवावर उदार होऊन एका तरुणानें तिला काढली. तो होता नागानंद. त्या दोघांचा पुढें विवाह झाला. अशा रीतीनें आर्य व नाग हे वंश एकमेकांत मिसळत होते. पण त्यांच्या पुढाऱ्यांत मात्र वैर कायम होतें. महर्षि आस्तिक या

दोन्ही वंशांच्या ऐक्यासाठीं त्यागाचा, सेवेचा व शांततेचा मंत्र पढवीत होते. “ सर्वत्र मांगल्य आहे असें मानणारा तो आस्तिक. मनुष्यातील सत्प्रवृत्तींवर विश्वास ठेवून मानवी जीवनाचा सर्वांगीण विकास करावयास जे झटतात तेच खरोखर आस्तिक. ” त्यांचे डोळे म्हणजे जणूं प्रेमाचीं सरोवरें होतीं. त्यांच्याहि आश्रमावर जेव्हां राज्यसत्तेची संक्रांत आली—आर्यांनीं हल्ला केला—तेव्हां महर्षि आस्तिकांनीं संदेश दिला, “ आतां तुम्हींच एकेक आश्रम बना. ” यावरून आस्तिकाच्या रूपानें महात्मा गांधींचीच मूर्ति गुरुजी रंगवीत आहेत असें दिसतें.

## उपनिषदाचें वातावरण

आस्तिक ऋषींनीं केलेला उपदेश, पांच पांच, दहा दहा पानें या कादंबरींत आलेला आहे. तो साराच मंगल व आशापूर्ण आहे. उपनिषदांची आठवण व्हावी अशा रीतीनें आस्तिक आपल्या शिष्यांना शिकवीत आहेत. तसाच शुक्राचार्यांनीं ‘ शांति मंदिरांत ’ परीक्षितीला केलेला बोधहि विस्तृत आहे. शेवटीं जनमेजय राजानें वक्रतुंडाच्या प्रेरणेनें नाग जातीचें उच्चाटनच आरंभिलें, त्यांच्या पुढाऱ्यांना पकडलें, बेड्यांनीं जखडलें, तुरुंगांत डांबलें आणि होळीमध्यें जाळून खाक करण्याचा घाट घातला. त्याच वेळीं प्रेमधर्माचा प्रचार करणारें वत्सला-नागानंद तेथें आले. त्यांचा मुलगा शशांक याला हाताशीं धरून आस्तिक ऋषी दुसरीकडून आले आणि त्यांच्यापाठोपाठ हजारों अनुयायांची शांति—सेनाहि आली. जनतेचें तें भव्य स्वरूप पाहिल्यानें आणि आस्तिकांचें दिव्य तत्त्वज्ञान ऐकल्यानें जनमेजय राजानें आपली दडपशाही थांबविली, दोन्ही जमातींचें ऐक्य केलें आणि बंधुभावाचें साम्राज्य पसरलें. “ राजाची आज्ञा अयोग्य असेल, तर ती पायाखालीं तुडविणें हेंच प्रजेचें कर्तव्य. ” असें राजा जनमेजयानेंच कबूल केलें.

भरतखंडाच्या अखंडत्वाची ही कथा अजूनहि मार्गदर्शकच आहे.

## प्रेमाचा संदेश

राष्ट्रीय ऐक्याचा मंत्र उपदेशितांना महर्षि आस्तिक म्हणतात, “आर्यांनीं

नागासमोर सेवामय, सहकार्यमय, प्रेममय जीवन उभें करावें. नागांनीं आर्यांसमोर उभें करावें. त्या दोन प्रेमळ लाटा एकमेकींत मिसळून जातील. एक नवीन महान् लाट उत्पन्न होईल. ती आणखी दुसरींत मिसळेल. अशा रीतीनें ह्या भारतांत मानवतेचा गोड सिंधु उचंबळवूं या. समजलेत ना ? सर्वांवरचीं आवरणें दूर होतील, पापुद्रे पडतील, कवचें गळतील आंतील सौंदर्य सर्वांस दिसेल, ही दृष्टि घेऊन येथून जा व द्वेषमय दृष्टीनें पाहणारी आसमंतांतली मानवसृष्टि प्रेममय करा. ''

याहूनहि अधिक स्पष्ट व जोराची प्रेरणा गुरुजी किती स्फूर्तिदायक शब्दांनीं देतात पहा. '' द्वेषाची लाट आली आहे; प्रेमाचा सिंधु घेऊन चला. संकुचितपणा येत आहे; विशालता घेऊन चला. क्षुद्रता घेरूं पहात आहे; उदारता घेऊन चला. अंधार येत आहे; प्रकाशाचे झोत आणा. घाण येत आहे; सुगंध पसरा. मरणाचा सुकाळ होत आहे; जीवनाची वृष्टि करा बंधनें वेढूं पहात आहेत; तोडा तीं बंधनें. मुक्त करा म्हणजे मुक्त व्हाल. ''

## कल्पनेचे खेळ

काळ्या-गोऱ्यांचा भेदभाव कसा व्यर्थ आहे हें गुरुजी काव्यमय वाणीनें ऐकवितात. '' काळे नि गोरे रंग घेऊन काय बसलांत ? काळ्या रात्रीचें चंद्राशीं लग्न लागत असतें. हजारों नक्षत्रांच्या अक्षता त्या वेळेस त्यांच्या-वरून ओंवाळून टाकतात. काळा रंग कां वाईट ? काळ्या लाटांच्या डोक्यांवर पांढरीं फेसांचीं फुलें उधळलीं जात असतात. वेद सांगतो, ' अंतर्मुख हो '. काळे असोत, गोरे असोत. काळीं करवंदें कां कडू असतात ? तीं रानचीं करवंदें किती रसाळ व मधुर असतात. तीं काळीं म्हणून फेकाल तर मूर्ख ठराल. या काळ्या नागकन्या म्हणजे मंजुळ मैना आहेत काळ्या कोकिळा आहेत. प्रेमाचें संगीत त्यांनींच ऐकवावें, त्यागाच्या श्रुति त्यांनींच जगाला द्याव्या. ''

याहूनहि अधिक बहारीचा काव्य-कल्पनेचा खेळ पहा. '' हिमालयाला शेंकडों शिखरें आहेत, त्या सर्वांमुळें तो शोभतो. भारतीय धर्माला शेंकडों

मुंदर सुंदर विचाराआचारांचीं शिखरें शोभोत. विविधता हें वैभव आहे, परंतु त्या विविधतेच्या पाठीमागें एकता मात्र हवी. एका वृक्षाच्या फांद्या, एका नदीचे प्रवाह, एका सागरांतील लाटा, एका अंबरांतील तारे, एका सतारींतील बोल ! "

## सृष्टि-वर्णनांतहि सद्भाव

सूर्योदयाचें वर्णन अनेक लेखकांनीं केलें आहे. गुरुजींची शैली कांहीं वेगळीच. ते लिहितात, " ते कार्तिक-मार्गशीर्ष महिन्याचे दिवस होते. वटवृक्षाच्या पानांपानांमधून लाल-लाल फळें शोभत होतीं. जणू लाल रुद्राक्षच त्या वटवृक्षानें सर्वांगीं धारण केले होते. सूर्य उगवला होता. आश्रमांतील कुमारांनीं झाडलोट करण्याचे आधींच सूर्यानें आपली सोन्याच्या हिरांची केरसुणी घेऊन सारा अंधार झाडून टाकला होता. दऱ्याखोऱ्यांतून, वृक्षराईतून सर्वत्र त्यानें तो सुवर्ण-झाडू फिरविला. औष-धालाहि अंधाराचा केरकचरा ठेवला नाहीं. सूर्यानें अंधाराचा कचरा दूर केला. वाऱ्यानें पुष्कळसा पानपातेरा पहाटे उडून दूर केला. दंव पडून सडा घातला गेला होता. फुलांचे सुगंध पसरून पावित्र्य व प्रसन्नता निर्मिली होती. पक्ष्यांनीं गोड किलबिल सुरू केली होती. "

## कादंबरीत्व असलेली कादंबरी

रूढ अर्थानेंहि जिला ' कादंबरी ' म्हणतां येईल, अशी गुरुजींची कला-कृति म्हणजे ' रामाचा शेला. ' त्यांत प्रणयाचा आनद व वियोगाचें दुःख यांच्या छायाप्रकाशाचा खेळ आहे, सुष्ट-दुष्ट स्वभावांचें चित्रण आहे, दोन कथानकांचा गोफ विणलेला आहे. विधवावरील अन्यायाचें एक प्रमेय मांडलेलें आहे आणि समाजाच्या एका विभागावर टीकाहि पण आहे. रसाची उत्कटता व पेंचप्रसंगामुळें उत्कंठा यामुळें कथानक जिज्ञासा खेचून घेतें. या सर्व गुणसमुच्चयामुळें गुरुजींची ही कादंबरी चित्रपट-निर्मात्यांनीं आपल्या उपयोगासाठीं निवडली आणि ' आगे बढो ' ही हिंदी पट-कथा जरूर त्या फेरफारानें निर्मिली.

" जिच्या दुर्दैवाला सीमा नाहीं अशा पराकाष्ठेच्या अभागिनी " ची

ही करुण कथा आहे. ती कथाहि अभागिनीच दिसते. कारण तिच्यावर गुरुजींनीं १९३० सालीं त्रिचनापल्लीच्या तुरुंगांत असतांना प्रथम नाटक लिहिलें. १९४१ सालीं त्यांनीं त्याच कथेला कादंबरीचा वेष दिला; पण त्या पोशाकांत ती फरारीच झाली ! तें हस्तलिखितच गहाळ झालें पण गुरुजींनीं पुन ती कादंबरी लिहिली. त्यांची स्मृति पक्की व लिहिण्याची तयारी दांडगी. ही कादंबरी प्रसिद्ध झाली १९४३ सालीं–तेव्हां गुरुजी तुरुंगांत होते.

या कादंबरीची नायिका सरला खरोखरीच अभागिनी आहे. तिची आई, भाऊ, पति सारे निधन पावलेले. वडिलांनीं दुसरें लग्न केलें. ते व त्यांची दुसरी पत्नी सरलेला ‘ विषवल्ली ’ मानतात, फुलाला-मुलाला हात लावूं देत नाहींत. म्हणून रानांत जाऊन सरला दगडावर डोकें फोडून घेऊं पहाते. तेथें तिला सावरतो उदय. हा एका स्वयंपाकि-णीचा मुलगा, पण बी. ए. पर्यंत शिकलेला. लहानपणीं त्याला श्रीमंत मुलाकडून त्रास होतो, माफी मागण्याची पाळी येते. ‘ यशवंतराव खरे ’ याचेवरहि असाच प्रसंग आलेला. पण हरिभाऊ आपटे यांनीं तो किती सूक्ष्मतेनें व रसपूर्णतेनें रंगविला गुरुजींनीं तो केवळ निवेदिला आहे–चित्तांतील खळबळीचें चित्रण फारसें नाहींच.

## प्रणयाचें सरळ निवेदन

आपल्या प्रेमाचा परिस्फोटहि सरला अगदीं सरळपणानें करते—त्यांत कलेचे कटाक्ष नाहींत कीं लज्जेचें सूचन नाहीं. ती उदयला एकदम म्हणते, “ आणि तुमचें नांव उदय ! तुमच्या रुमालानें मला सांगितलें. किती सुंदर नांव ! उदय ! अंधारांत उगवलेला तारा; अंधारांत उगवलेला चंद्र; अंधारांत उदयास येणारा सूर्यनारायण. उदय ! खरेंच किती सुंदर नांव ! मी त्या नांवाचा जप करीत असतें. ‘ उदय, माझ्या जीवनांत कर ना रे तुझा उदय. येशील ना माझ्या जीवनांत ? तूं असशील कां उदार, दिलदार प्रेमळ, स्नेहाळ ! ’ असें मी त्यांना विचारीत असतें. ”

‘ प्रेमाची सृष्टि ’ हें प्रकरण बत्तीस पानांचें आहे. पण त्यांत प्रेमी

युवयुवतीच्या हृदयांतील खळबळीचें चित्रण असें फारसें नाहीं. भावनोत्कट उद्गार तेवढे आहेत. प्रेमाचा अंकुर वाढीला लागल्यावर ती उदयला स्वतःसंबंधीं म्हणते, " कोमल वेल. हिच्यावर उपेक्षेची वीज न पडो. हिच्यावर निराशेचें निखारे न सांडोत. आजवर मी खूप रडलें आतां मला हंसव. बाबा मला विषवल्ली म्हणतात. तुझ्या दारांत ती अमृताची ठरो. तुझ्या प्रेमळ कटाक्षांनीं, प्रेमळ स्पर्शांनीं ती अमृतमय होवो, रसमय होवो. "

' तुझे हृदय हेंच माझें घर ' असे नाटकी उद्गारहि सरला काढते. लहान मुलाप्रमाणें ' मी तुझ्या डोळ्यांत बसेन, खिशांत मावेन ' अशी भाषा प्रणयी सरला काढते. प्रेमभावनेला फारच भरती आली तर ' मी तुझें बोट चावीन ' असें ती म्हणते. अशा प्रणयिनी सत्य-सृष्टींत विरळा.

## समाज-ऋणाची जाणीव

लौकिकी विधीशिवाय उदय व सरला यांचें लग्न होतें. पण उदय आपल्या मरणोन्मुख आईला पहावयास जातो. ती आधीच मेली हें कळतांच त्याची शुद्ध जाते. सरला एकाकी रहाते. वडील तिला घराबाहेर घालवतात. आत्महत्येचा विचार ती वारंवार करते. ती पंढरपुरास जाऊन अनाथाश्रमांत मुलाला जन्म देते. तेथून परत येतांना एक लफंगा माणूस गोड बोलून तिला नाशिकास नेतो व वेश्यागृहांत ठेवतो. तेथें येणाऱ्या एका लक्षाधीश शेटजीला केवळ आपल्या वाणींतील तेजानें ती ' पुण्य-प्रभावांत'ल्याप्रमाणें शुद्धीवर आणते. तिकडे उदय शुद्धीवर येतांच सरलेचा शोध करतो. पण तिचा पत्ता न लागल्यानें तो जीव देऊं पहातो. तेव्हां त्याचा एक मित्र त्याला उपदेश करतो. ' एकच प्याल्यां'तील रामलालच्या भाषणाप्रमाणेंच तो उपदेश लांबलचक पण उदात्त विचारांनीं भरलेला आहे. तो मित्र उदयाला समाज-धर्माची जाणीव करून देतांना म्हणतो, " या समाजांत तुम्ही जगलेत. समाजाचें ऋण नाहीं कां ? शेतकऱ्यानें धान्य पिकविलें. विणकरांनीं वस्त्र विणलें. अनेकांच्या उद्योगांमुळें आपण जगतों. आपलें जीवन म्हणजे कोट्यवधि लोकांच्या श्रमांचें फळ. आपलें

जीवन केवळ आपलें नाहीं. तें समाजाचें आहे. एकादा दुःखी मनुष्य रस्त्यांत भेटला तर तुम्ही त्याचे अश्रु पुसायला नाहीं जाणार ? एकाद्याच्या पायांत कांटा बोंचला तर तो काढायला नाहीं जाणार ? ”

तो आणखी सांगतो,

“ तुम्ही नवधर्माचा उदय करा. नव समाजरचनेचा उदय करा. हिंदुस्थानात प्रचंड क्रांति पेटणार आहे. सारी विषमता, सारें दास्य त्यांत खाक होणार आहे. सारी क्षुद्रता त्यांत होमिली जाणार आहे. तुमच्या डोळ्यांना नाहीं दिसत ती क्रांति ? केवळ परकी सत्तेचीच तिच्यांत आहुति पडणार आहे असें नाहीं. सर्व प्रकारचा जुलूम नष्ट होणार आहे. या क्रांतीचे पाईक बना. अग्रदूत बना. ”

## शतमुखी क्रांति

केवळ राजकीयच नव्हे, तर ‘शतमुखी क्रांति’ या देशांत व्हावयास हवी आहे, अशी तळमळ गुरुजींना लागलेली होती. तिचे पडसाद या कादंबरींत उठले आहेत. अस्पृश्यता नष्ट करून सामाजिक क्रांति व्हावयास पाहिजे. तिच्या आड येणाऱ्या सनातनी हिंदूचीं कृष्णकृत्यें गुरुजींनीं या कादंबरींत भडकपणें रंगाविलीं आहेत. अशा विरोधांतूनहि समाजाचा विकास ईश्वर घडवील अशी गुरुजींची श्रद्धा होती. ती त्यांनीं ज्या तऱ्हेनें प्रगट केली आहे, ती शिवरामपंत परांजपे यांना शोभण्यासारखी आहे. गुरुजी सांगतात, “ परमेश्वर हा सर्वांत मोठा क्रांतिकारक आहे. तो केव्हां, कशी, कोठें क्रांति करील त्याचा नेम नाहीं. कधीं एखादें फूल दाखवून तो क्रांति–करील; कधीं एकादें निष्पाप बालक दाखवून तो क्रांति करील. हजारों साधनें, हजारों मार्ग. प्रत्येक क्षणाला प्रत्येकाच्या जीवनांत क्रांति उत्क्रांति होत आहे. परंतु कांहीं क्षण महाक्रांतीचे असतात. एकदम मोठी उडी असते. जणुं नवजन्म होतो. कायापालट होतो. माकडाचा एकदम मानव होतो. तो महान् क्रांतिकारक दिसत नाहीं. त्याला स्थानबद्ध करतां येत नाहीं. फांशी देतां येत नाहीं. परंतु त्याचें महान् क्रांतिकार्य या अखिल विश्वांत सारखें चालू आहे. ”

या क्रांतिकारक परमेश्वरानें निदान सरला व उदय यांच्या जीवनांत तरी प्रकाश पाडला. ‘ सेवकराम ’ या नांवानें उदय आदिवासींची सेवा करूं लागला. तो नाशिक येथें आला होता. तेथें सरलेनें सनातन्यांच्या परिषदेत व्याख्यान दिलें. तें पांच पानें भरेल एवढें मोठें आहे. पण वरेरकरांच्या ‘ मथूशास्त्र्या ’ प्रमाणें त्याला उठाव देणें गुरुजींना जमलें नाहीं. शेवटीं उदय व सरला यांची भेट होते आणि तो लक्षाधीश व्यापारी व सरलेचे वडील हे तर पश्चात्ताप पावलेलेच होते. त्यामुळें शेवट गोड झालेला आहे.

## वात्सल्याचे पाझर

‘ क्रांति ’ ही कादंबरीदेखील गुरुजींनीं तुरुंगांतच लिहिलेली. क्रांति म्हणजे काय ? मूल्य–परिवर्तन. “ श्रम न करणाऱ्याला तुच्छ मानलें पाहिजे. श्रम करणाऱ्याला उच्च मानलें पाहिजे. याला मूल्य–परिवर्तन म्हणतात. अन्यायाला सिंहासनावरून ओढून तेथें न्यायाची प्रतिष्ठापना करणें म्हणजे क्रांति.”

या कादंबरींत मिनीचें चारित्र लडिवाळपणें वर्णिलें आहे. तिचे वडील श्रीनिवासराव यांचा प्रेमळ, उदार व विरक्त स्वभाव ठसठशीतपणें रेखाटला आहे. त्यांची तुलना भगवान शंकराशीं करतांना गुरुजी म्हणतात,

“ एखादा मृत्युंजय शिवशंकरच, वैराग्याचें भस्म अंगाला फांसलेला, ज्ञानगंगा ज्याच्या मस्तकांतून स्रवत आहे, शीलाचा चंद्रमा ज्याच्या भाळीं मिरवत आहे, पवित्र निश्चयाचा तिसरा डोळा ज्याचा उघडलेला आहे, असा तो योगियांचा राणाच श्रीनिवासरावांच्या रूपानें बोलत आहे असें त्या वेळेस वाटे.” श्रीनिवासरावांच्या मिनीवरील प्रेमाचे पाझर कादंबरींत ठिकठिकाणीं वहात आहेत.

## भारतीय ऐक्याचें स्वप्न

खादीचा प्रचार करणारे एक शिक्षक मुकुंदराव यांना देशभक्तीसाठीं शाळा सोडावी लागली. ते आणि रामदास असे दोघे डॉ. टागोरांच्या

शांतिनिकेतनांत गेले. त्यामुळें महाराष्ट्र व बंगाल यांचा एक धागा जोडला गेला. त्याचें सगुण स्वरूप म्हणजे वंग-कन्या माया व महाराष्ट्र-पुत्र रामदास या दोघांचें एकमेकावर प्रेम बसलें. 'मायेच्या पसाऱ्यात' रामदास सांपडला. त्या दोघांच्या संवादांतून व पत्रांतून महाराष्ट्र व बंगाल यांच्या गुणदोषांचीं वर्णनें पुष्कळ आलीं आहेत. महाराष्ट्राचा बुद्धिवाद, प्रयत्न-वाद, स्वातंत्र्यवाद व विवेकवाद यांचें विवेचन मुकुंदरावांनीं आपल्या पंधरा व्याख्यानांत केलेलें आहे.

बंगाल, महाराष्ट्र वगैरे सर्व प्रांतांतील सर्व धर्मांचे व वर्गांचे लोक उच्च-नीच-भाव टाकून सहकार्यानें वागतील तर? या प्रश्नाचें मधुर उत्तर गुरुजी पुढील गोड शब्दांनीं देत आहेत. "सर्व धर्मांचे, सर्व संस्कृतींचे लोक मी कसे सहकार्यानें, प्रेमानें एकत्र नांदवतें पाहा, कसा ऐक्याचा गोफ विणीत आहेत माझी लेंकरें; पाहा कसें विविधतेंतून संगीत निर्मीत आहेत; पाहा शतरंगांचा, शतगंधांचा बगीचा कसा फुलवीत आहेत; पाहा शतरंगांचा गालिचा कसा विणीत आहेत.' असें हिंदमाता जगाला सांगेल. जगांतील राष्ट्रें या मातेजवळ येऊन धडे शिकतील. पुनः भारत जगद्‌गुरु होईल." गुरुजी येथें जणुं आपलें आंतरभारतीचें स्वप्नच रंगविण्यांत गुंग झाले आहेत!

## ध्येयवादाचें सूत्र

'ही कादंबरी मला अति-प्रिय आहे' अशी प्रशंसा खुद्द गुरुजींनींच जिची केली, ती म्हणजे 'संध्या.' १९४१ सालीं धुळ्याच्या तुरुंगांत असतांना त्यांनीं ही कादंबरी लिहिली. तिच्यांत १९३० व १९३२ सालच्या दोन चळवळींची पार्श्वभूमी घेतलेली आहे. आईच्या आठवणीनें रडणारा विश्वास तेथें आहे आणि ध्येयासाठीं सर्वस्वावर पाणी ओतण्याची तयारी असलेला,—'लग्न करूनहि संन्यासी राहणारा' असा कल्याण आहे. या दोघांची राष्ट्रसेवा या विस्तृत कादंबरींत वर्णिलेली आहे. किंबहुना "ध्येयार्थी जीवांचा संघ" शोभणाऱ्या एका कुटुंबाचेंच चित्र यांत रंगविलेलें आहे.

## करुण रसाचा उत्कर्ष

कल्याणच्या ध्येयाशीं पूर्णपणें समरस होणारी अशी संध्या दाखविली आहे. त्यांचे प्रेमाचे संवाद इतके सहज आहेत कीं, प्रत्येकाचें एक एका शब्दाचेंच भाषण आहे व तें चार चार पानें दिलेलें आहे एका महिन्यांत तीन मृत्यु संध्येला पहावे लागल्यामुळें तिचें हळुवार मन पिळवटून निघतें. कल्याणलाहि लागोपाठ दोनदां सक्तमजुरीची शिक्षा तुरुंगांत भोगावी लागते त्यामुळें संध्येच्या प्रणयाला विरहाची व कारुण्याची तीक्ष्ण धार येते. कादंबरीतील करुणरसाचा उत्कर्ष-बिंदु म्हणजे संध्येच्या बाळाचा मृत्यु. तो प्रसंग गुरुजींनीं दीर्घकाळ आळवून आळवून घोळाविला आहे. भाईजींच्या उदात्त अंतःकरणांतील कारुण्यानें तर मूळच्या करुण रसाला निराळाच उठाव मिळाला आहे. भाईजींच्या रूपानें गुरुजींनीं स्वतःचेंच चित्र काढलें काय? गुरुजींच्या साऱ्या जीवनाचें स्वरूप म्हणा, रहस्य म्हणा, तत्त्वज्ञान म्हणा, भाईजींच्या स्वतःविषयींच्या शब्दांत प्रतिबिंबित झालेलें आढळतें. ते म्हणतात,—" मी प्रेमाचा पुजारी आहें प्रेमाचा कण कण गोळा करणारा भिकारी आहें. किंवा माझं प्रेम सर्वांना देत फिरणारा मी फकीर आहें. मला अमुक तत्त्वज्ञान नाहीं, अमुक पंथ नाहीं······अमुक एका पक्षाचा शिक्का असा माझ्या कपाळावर नाहीं. सहानुभूति हा माझा धर्म जिथं दुःख आहे, अन्याय आहे, जुलूम आहे, तिथं जावं, झगडावं, हें माझं ब्रीद."

## समाजवादाचा प्रचार

आपल्याभोंवतालीं दारिद्र्यामध्यें होरपळणारीं माणसें पाहून गुरुजींचा जीव तिळतिळ तुटे. त्यांचें दारिद्र्य, तसेंच अज्ञान, रूढीचा जाच इत्यादि सर्व दुःख दूर कसें करतां येईल, ही एकच चिंता त्यांचें चित्त रात्रंदिवस पोखरीत असे. या सर्व रोगांवर रामबाण औषध कोणतें? 'स्वराज्य' असें उत्तर त्यांचें मन देई. पण पुढें स्वराज्य-प्राप्तीनंतरहि तीं दुःखें कायमच आहेत, असें पाहून त्यांच्या मनानें दुसरें उत्तर दिलें; व तें म्हणजे 'समाजवाद.' १९५० सालीं प्रसिद्ध झालेल्या 'श्रमणारी

लक्ष्मी ' या कादंबरींत जनी, धर्मा वगैरे व्यक्तींच्या रूपानें गुरुजींनीं दारिद्र्याचीं विविध दर्शनें दाखविलीं आहत आणि बहुतेक प्रत्येक प्रकरणाचें पालुपद, " समाजवादाशिवाय तरणोपाय नाहीं. " हेंच आहे. या व या वेळच्या त्यांच्या इतर कादंबऱ्यांत बहुतेक सारा 'गोलपोटे व खोलपोटे' यांच्या विग्रहाचा प्रचारच आहे.



## ज्ञानाचा खजिना

सर्वसामान्य वाचकाला कोशाचें महत्त्व समजत नाहीं, किंबहुना त्याचें अस्तित्वहि जाणवत नाहीं. मराठींतील या अनेक कोशांचा उपयोग शेंकडा किती वाचक करतात ? नव्हे, असे कोश आहेत याची माहिती तरी किती-जणांना असते ? पण हे कोश म्हणजे ज्ञानाचे झरे होत, खजिने होत, विद्युत्केंद्रें होत. कोशकार म्हणजे लेखकांचे लेखक ज्ञानाचे विश्लेषण ( Analysis ) जितकें आवश्यक; तितकें त्याचें संकलन ( Synthesis )-हि अगत्याचें असतें. नदीचें पात्र नुसतें विस्तृत असून भागत नाहीं, तें खोलहि असावें लागतें. ज्ञानाची खोली वाढविण्याचें काम कोशकार करीत असतात. जगांतील ज्ञानगंगेचीं मुखें किती अनंत आहेत, याची कल्पना नव्या वाचकांना कोशांवरूनच येते. त्याचप्रमाणें कोणत्याहि लेखकाला आपला लेख माहितीपूर्ण रीतीनें मांडावयाचा असेल, तर कोशाचें साहाय्य फार होतें. तुम्हांला कोणत्याहि विषयाचा अभ्यास करावयाचा असो, त्याचा प्रारंभ कोशग्रंथ चाळण्यापासून करा, म्हणजे त्या विषयासंबंधीं त्या कालापर्यंत साऱ्या जगांत काय लिहिलें गेलें आहे याचें ज्ञान तुम्हांला होईल. जगांतील सर्व ज्ञानांचें रत्नभांडार म्हणजे कोशग्रंथ. अशा कोशांची परंपरा निर्माण करून डॉ. केतकर यांनीं महाराष्ट्रावर अक्षय्य उपकार केले आहेत.

## " चालताबोलता कोश "

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा जन्म १८८४ सालीं झाला. त्यांचे चुलते उमरावतीस होते. तेथें त्यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण झालें. त्यावेळींहि चौफेर व्यासंग करण्याचा हव्यास त्यांना होता. त्यामुळें त्यांचे शिक्षक त्यांना " चालता-बोलता ज्ञानकोश " असें म्हणत. मॅट्रिक झाल्यानंतर ते मुंबई येथें विल्सन कॉलेजांत दाखल झाले, तेथेंहि अवांतर वाचनाचा नाद त्यांना दांडगा ! त्यामुळें इंटरमध्यें त्यांनीं एक गटंगळी खाल्ली. बी. ए. च्या परीक्षेनें हि अपयशाचा तडाखा दिला. परीक्षेपेक्षां वाचनाचें आणि लेखनाचेंहि वेड त्यांना अधिक होतें. " महाराष्ट्र वाग्विलास "

या नांवाचें मासिक त्यांनीं बी. ए. मध्यें असतांनाच काढलें. त्यांची महत्त्वाकांक्षा जबर. संकटें त्यांच्या खिसगणतींत नसत. त्याच्या मनानें घेतलें कीं, आपण अमेरिकेस जावें आणि त्या स्वतंत्र, संपन्न व सुधारलेल्या देशांतील ज्ञान लुटावें. एकदां निश्चय केला कीं तो ठाम, या कडव्या वृत्तीचे केतकर होते. त्यानीं आपलें घरदार विकले आणि ते अमेरिकेस गेले. तेथें त्यांनीं समाजशास्त्राचा अभ्यास केला. ते १९०७ सालीं बी. ए. झाले आणि १९०८ सालीं एम. ए.तहि उत्तीर्ण झाले. 'हिंदुस्थानांतील जातिसंस्थेचा इतिहास' या विषयावर प्रबंध लिहून त्यांनीं पीएच डी. ही पदवी मिळविली. अशा तीन पदव्यांचे तुरे आपल्या मंदिलांत खोवून डॉ. केतकर हिंदुस्थानांत १९१२ च्या आक्टोबरांत परत आले.

## भाषावार प्रांताची मागणी

येथें आल्यावर त्यांना कलकत्ता विद्यापीठांत उपप्राध्यापक म्हणून एक वर्ष काम करण्याची संधि मिळाली. तेथें असतांना त्यांनीं भारतीय अर्थशास्त्र, हिंदु कायदा वगैरे विषयांवर प्रबंध लिहिले. 'राष्ट्रधर्म प्रचारक संघ' या नांवाची संस्था स्थापून त्यांनीं आंध्र, उत्कल वगैरे प्रांतांत प्रचार केला. हा प्रचार त्यांनीं संस्कृतमधून केला हें विशेष. आपल्या देशाचें शिक्षण व राज्यकारभार देशी भाषांतूनच झाला पाहिजे असा प्रचार त्यांनीं आग्रहानें केला. १९१४ सालच्या डिसेंबर महिन्यांत मद्रास येथें राष्ट्रसभा भरली होती. तेव्हां केतकरांनीं भाषावार प्रांतरचनेची मागणी करणारीं शेंकडों पत्रकें वाटलीं. स्वभाषेच्या उद्धाराचा व उत्कर्षाचा त्याना जणुं निदिध्यासच लागला होता.

## ज्ञानकोशाचें तप

मातृभाषेच्या सेवेचा एक अभिनव मार्ग केतकराच्या डोक्यांत चमकून गेला. ज्ञानकोशाची रचना त्यावेळीं अखिल भरत खंडांतील भाषांमध्यें कोठेंच झालेली नव्हती—तेलगूचाच काय तो अपवाद होता. पण केतकरांची मनीषा नेहमीं गगनचुंबी असे. "मराठींत लिहिलेल्या ग्रंथांचें

नाहींत, प्रसंग स्वाभाविक नाहींत व स्वभाव सहज नाहींत. कथानकांत कोठें जिज्ञासा उत्पन्न होत नाहीं कीं रसाची निर्मिति नाहीं—आहे काय तें, अभिनव स्वरूपाचें कथानक व त्यावर टांगलेले समाजशास्त्रीय विचार. चार पात्रांचीं नांवें घेऊन व दोनचार प्रसंग उल्लेखून, त्या त्या निमित्तानें विवाहसंस्था, जाति-संस्था, मजूर चळवळ, पतित स्त्रीपुरुषांचें स्थान इत्यादि विषयांवर आपले शास्त्रीय व ऐतिहासिक विचार गंभीर भाषेनें व माहिती-पूर्ण रीतीनें मांडलेले आहेत. कोणत्याहि विषयाच्या मुळाशीं जाऊन त्याचा विचार करण्याचें कौशल्य जसें केतकरांच्या अंगीं आहे, तसेंच समाजाची घडी बदलून टाकणारी अभिनव योजना मांडण्याचें धारिष्टहि त्यांचेजवळ आहे. त्यामुळें त्यांची कोणतीहि कादंबरी वाचकाच्या बुद्धीला धक्के दिल्या-शिवाय रहात नाहीं.

## पतितांचा कैवार

या विचार-प्रवर्तनाप्रमाणेंच दुःखितांविषयीं अनुकंपा हाहि त्यांच्या कादंबऱ्यांचा एक प्रशंसनीय गुण आहे. जे जे कोणी धार्मिक, सामाजिक, आर्थिक वा राजकीय वर्चस्वाखालीं चेंगरले गेले असतील, त्यांचेकडे सहानुभूतीनें व समतोल वृत्तीनें पहाण्याचा दृष्टिकोन ते वाचकांना देतात. समाजाच्या कोपऱ्यांत दडलेलीं, अंधारांत सडलेलीं जीं जातिहीन, ज्ञानहीन, द्रव्यहीन माणसें असतील, त्यांचा कैवार घेऊन केतकर उठतात—आणि त्यांना सुस्थितींत आणण्यासाठीं समाजानें काय करावें, समाजाची रचना कशी बनवावी याविषयींचे आपले मूलगामी व क्रांतिकारक विचार ते कादंबऱ्यांतून मांडतात. प्रिं. गोळे यांनींहि आपल्या विचारांचें वाहन म्हणून 'हिंदुधर्म आणि सुधारणा' ही कादंबरी लिहिली. प्रिं. वामनराव जोशी यांच्या 'रागिणीची' हि बैठक तीच. पण या दोघांपेक्षांहि केतकरांच्या कादंबऱ्यांत रंजकता व आकर्षकता कमी. विद्यमान व्यक्तींचीं नांवें किंचित् बदलून त्यांचीं पात्रें केतकर आपल्या कादंबरींत रंगवितात आणि त्यावर तोंड टाकून, एकेरी शब्दानेंहि, हवी तशी टीका करतात. यामुळेंहि त्यांच्या कादंबऱ्यांची अप्रियता वाढली.

## भाषेचे दोष

केतकरांच्या भाषेमध्ये केवळ बोजडपणाच आहे, असें नव्हे तर परकेपणाहि आहे. दुःप्रसिद्धी, सु-पथ-त्याग, भवितव्य--विलोकन, द्रव्योत्पादन--समर्थता, परजनसंग्राहक इत्यादि क्लिष्ट संस्कृत शब्द कथा कादंबऱ्या वाचणाऱ्या मराठी वाचकाला कसे कळणार ? ' अभिज्ञता ' हा शब्द तर वारंवार येतो. पण ते शास्त्रदृष्ट्या तरी सदोष नाहींत, परंतु इंग्रजी तऱ्हेची वाक्यरचना केतकर मधूनमधून जी करतात, ती मराठी वाचकाला खटकते व आक्षेपार्ह वाटते. " आपल्यावर फटकारा आहे, " " तिला चांगलें भवितव्य देतां आलें असतें, " " त्यांत माझा सद्‌गुण झाला नाहीं. " इत्यादि वाक्यरचना मराठीला न शोभणारी आहे. त्यांच्या कादंबऱ्यांच्या अप्रियतेंत या भाषा-दोषामुळेंहि भर पडली.

## विद्यमान व्यक्तीवर टीका

' गोंडवनांतील प्रियवदा ' ही केतकरांची पहिली कादंबरी. एका स्नेह्यानें डिवचल्यामुळें, आपण कोशाप्रमाणेंच कथाहि लिहूं शकतो, हें दाखविण्यासाठीं ते कादंबरीच्या मुलुखांत शिरले. या पहिल्या कादंबरींत नागपूरकडील देशस्थ--कोंकणस्थ--कऱ्हाडे या ब्राह्मणांच्या पोटजातींतील चुरस त्यांनीं उघड केली आहे आणि गिरण्यांतील डायरेक्टर व सरकारी अधिकारी यांना आपल्या टीकेच्या धारेवर धरलें आहे. विशेष कलाहीन गोष्ट म्हणजे महाराष्ट्राला आदरणीय वाटणारे इतिहासाचार्य श्री. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांची मूर्ति डोळ्यापुढें उभी करणारें वैजनाथशास्त्री हें पात्र या कादंबरीत रंगविलें आहे. या शास्त्रीबुवांनीं एका सुशिक्षित विधवेशी पुनर्विवाह केलेला दाखविला आहे आणि इतरहि बरेच स्वभाव-दोष चित्रित केले आहेत. कल्पित सृष्टीच्या आसऱ्यानें विद्यमान व्यक्तीवर अशी टीका करणें हें " चोरट्या छाप्यांत मागून वार करण्याइतकें अश्लाघ्य " आहे, असाच कांहीं साहित्य-समालोचनकारांचा अभिप्राय पडला आहे. भाषेंत बेडौलपणा व विचारांत विचित्रपणा असला तरी केतकरांची सूक्ष्म दृष्टि, सहानुभूतीची वृत्ति व अनुभवाची, व्यासंगाची

बैठक-या गुणांमुळें या कादंबरीनें मराठी वाचकांचें लक्ष आपलेकडे ओढून घेतलें.

## विचार-प्रवर्तनाचें स्वरूप

'ब्राह्मण–कन्या' या कादंबरींत कालिंदीचा जीवनवृत्तांत सांगितलेला आहे. पहिल्या सहा प्रकरणांत तिच्या पूर्वींच्या दोन पिढ्यांचा इतिहासच दिला आहे. त्या वंशावळीच्या गुंतावळीमुळें वाचकाचा जीव प्रारंभींच गुदमरतो. त्यानंतर इस्रायल समाजाचा इतिहास येतो. कालिंदीनें लिहिलेल्या एका गोष्टीनें तेहतीस पानें व्यापलीं आहेत! आणि नंतर तिच्यावर चर्चा–अभिप्राय–वादविवाद! शिवाय तिला उत्तर म्हणून रामराव जी गोष्ट लिहितो. तिनेंहि या कादंबरीचीं अठरा पानें भरलीं आहेत. शिवाय कालिंदी व तिचा भाऊ सत्यव्रत यांचीं पत्रेंहि प्रदीर्घ आहेत. आणि शेवटीं रुक्षतेचा कळस केला आहे 'वैजनाथ-स्मृतीनें'. बेचाळीस कलमांची ही स्मृति बारा पानें पसरली आहे. हे वैजनाथशास्त्री इतिहास-संशोधक व सनातनी असतात, तरी त्यांनीं पुनर्विवाह केलेला असतो. त्यांचा फटकळपणा असा कीं, ते न्या. रानडे यांना उद्देशून "त्या महाद्याला इतिहास काय समजतो?" किंवा "त्या राम्या भांडारकरला कांहीच समजत नाहीं." असें अवाच्य बोलतात. पुणें–त्यांतले त्यांत सदाशिव पेठ–यावर तर केतकर जातांयेतां दांतओठ खातात. अशा लिखाणानें वाचकांच्या सदभिरुचीला, संस्कृतीला किंवा सभ्यतेला धक्के बसतात हें खरें, पण त्यानें त्याच्या बुद्धीला धक्के बसून विचारप्रवर्तन कितीसें होणार?

## कलेचा आत्मा

कालिंदीला रामराव आपल्या लग्नाची मागणी घालतो ती सरळ रोखठोक भाषेनें. त्यांत प्रेमाची लपवाछपव किंवा नाजूकपणा नाहीं. केतकरी खाक्या हाच आहे. एखाद्या सौद्याच्या भाषेंत "रामराव एकदम तीस म्हणाला, "कालिंदी, चल आपण आपलीं आयुष्यें जोडून टाकूं."

"तुम्हीं ही मागणी विचारपूर्वक करीत आहां काय?"

" अगदीं विचारपूर्वक. "

" तर मग मला सांगितलेंच पाहिजे कीं, तुमच्या या कृपेबद्दल मी ऋणी आहें पण तुमच्या कृपेचा मला फायदा घेतां येणार नाहीं." बस्स, खलास!

शिक्षणासाठीं, नोकरीसाठीं, व्यापारासाठीं किंवा देशोद्धारासाठीं अनेक धाडसी तरुण हिंदुस्थानांतून इंग्लंड–अमेरिका वगैरे देशांत जातात. आणि त्यांपैकीं कांहीं तेथें कायमचे स्थानिकहि होतात. मातृभूमीपासून परागंदा झालेल्या अशा हिंदी लोकांच्या संसाराचें चित्र डॉ. केतकर यांनीं आपल्या ' परागंदा ' या कादंबरींत रंगविलें आहे. खुद्द केतकर हे अमेरिकेस जाऊन राहून आलेले. त्यामुळें त्यांनीं तेथील हिंदी स्त्रीपुरुषांचीं बरीवाईट कृत्यें प्रत्यक्ष पाहिलेलीं, अनुभवलेलीं. पण त्यांत कलेचा आत्मा ओतण्याची इच्छा व पात्रता त्यांच्या ठिकाणीं नव्हती. त्यांनींच या कादंबरीच्या उपसंहारांत, कादंबऱ्यामध्यें खोटीं समाजचित्रें घालण्याच्या ' कारस्थानावर ' टीका केली आहे. आणि आपलें असें मत निवेदिलें आहे कीं, " कथेचा कथापणा कारस्थानामुळें उत्पन्न होत नसून अनेक माणसें एकत्र मिळून जो व्यवहार होतो, त्यामुळें उत्पन्न होतो. " ही कैफियत लंगडी वाटते. कारण साध्या आयुष्यक्रमांतील सत्य व्यवहार वाचनीय वाटावेत म्हणून कथालेखकानें भल्याबुऱ्याची निवड ( Selection ) केली पाहिजे आणि त्यांचें चित्र प्रमाणबद्ध (Proportion ) रचनेच्या चौकटींत बसविलें पाहिजे. हें कलेचें पथ्य केतकरांना कधींच पाळता आलें नाहीं.

## टीकेचा काळा कुंचला

हिंदी पुढाऱ्यावर टीका करण्याची आपली हौस केतकरांनीं याहि कादंबरींत पुरी करून घेतली आहे. लाला गजपतराय हे एक पंजाबमधून आलेले देशभक्त दाखविले आहेत. ' लाल-बाल-पाल ' या वंदनीय राष्ट्रीय त्रिमूर्तींपैकी लाला लजपतराय यांचें चित्र डोळ्यापुढें उभें रहावें असें हें फसवें नांव आहे. पण केतकरांना त्यांचें नीटसें विडंबनहि करतां आलें नाहीं–मग यथार्थ चित्रण कोठलें ? डॉ. रवींद्रनाथ टागोर यांच्या काव्यावर ' बायकी कोमलपणाचा ' शिक्का मारून केतकरांनीं टीका केली आहे.

सर्वसामान्य हिंदी पुढाऱ्यावरहि आपल्या हातांतील काळा कुंचला त्यांनीं फिरविला आहे. शेवटीं प्रो. गोगटे हे आपले लांबलचक ' विधान ' वाचतात. त्यांत केतकरांनीं देशाच्या उद्धाराची कोणती जडीबुट्टी सांगितली आहे ? तर " देशासाठीं उच्च संस्कृतीची वाहक अशी एक मोठी उघड्या तोंडाची जात तयार व्हावयास पाहिजे त्या जातींत अर्थात् वाटेल त्या कर्तृत्ववान लोकांचा प्रवेश झाला पाहिजे." हा उपाय जितका विक्षिप्त, तितकाच अव्यवहार्य नाहीं काय ?

## हें मूर्ति-भंजनहि नव्हे

अमेरिकेंत वीस वर्षें राहून हिंदुस्थानांत परत आलेले ब्रह्मगिरीबोवा यांची कथा ' आशावादी ' या कादंबरींत केतकरांनीं सांगितली आहे. त्यांनीं परत येण्याचें कारण म्हणजे " देशांतील सर्व लोकांविषयीं माझ्या मनांत असलेलें प्रेम, आपल्या लोकांनीं उन्नतीला यावें ही इच्छा, आणि तसेंच आपल्या जगभर प्रवासामुळें जो आपणांस अनुभव उत्पन्न झाला आहे तो इतरांस प्राप्त करून द्यावा ही इच्छा, आणि हिंदुस्थानांत आपण जाऊन कांहीं तरी करूं हा आत्मविश्वास." हीच केतकरांची बैठक.

ब्रह्मगिरीबोवा म्हणजे देवीदास अत्रे. त्यांचीं मतें निर्भीड व वर्तन निःस्पृह दाखविलें आहे. संन्यासी असून ते निष्क्रिय संन्यास–मार्गावर टीका करतात. गीतेपरील त्यांचीं व्याख्यानें कादंबरींत लांबलचक दिलेलीं आहेत. त्यांच्या मुखानें केतकरांनीं गीतेची नालस्ती मनमुराद केली आहे. " गीतेचा उपदेशच आजच्या स्थित्यंतरक्षम जगांत योग्य नाहीं," असें म्हणून न थांबतां त्यांनीं ' गीताकार बहकले,' ' गीताग्रंथ सैतानी आहे.' अशीं बेछूट विधानेंहि केलीं आहेत. यांत विपर्यास आहे, तर्कदुष्टता आहे आणि बुद्धीचा वक्रपणाहि आहे. अशा विधानांत स्वतंत्र प्रज्ञा नाहीं, मूर्तिभंजन नाहीं, नवें असें तत्त्वज्ञान नाहीं.

## परदेशांतील जीवन

' गांवसासू ' या कादंबरींत केतकरांनीं १९१२ सालच्या सुमारास इंग्लंडांत रहाणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांचें जीवन रेखाटलें आहे. खरें म्हणजे

त्या जीवनांतील केवळ प्रणयविषयक भागच त्यांनीं रंगविला आहे.— ' रंगविला ' म्हणण्यापेक्षां चर्चेस घेतला आहे. मिसेस दास यांची धडपड आपल्या सुनीतीला आय. सी. एस. नवरा मिळावा यासाठीं चाललेली असते. चंदनानी हा तसा तरुण आय. सी. एस. असतो. पण त्याचें मनांत त्या मायलेकींबद्दल कांहीं गैरसमज निर्माण झालेले असतात. ते दूर करण्याचें कार्य मिसेस कैलासनाथ अधिकारवाणीनें बजावतात आणि शेवटीं घाईघाईनें व खुषीच्या सक्तीनें चंदनानी व सुनीता यांचें लग्न ठरवून टाकतात. याशिवाय कादंबरींत त्यांचा ' गांवसासूपणा ' कोठेंच दिसत नाहीं. या मुख्य कथानकाच्या निमित्तानें हिंदी विद्यार्थ्यांच्या नीतिमत्तेबद्दल केतकरांनीं आपले विचार मांडले आहेत. आरंभीं व शेवटीं सुमारें दहादहा पानें सभेंतील भाषणांनीं व्यापलीं आहेत !

## शेंडेफळांतील सरसता

' विचक्षणा ' ही केतकरांची कादंबरी 'स्त्री' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाली. म्हणूनच कीं काय, तिच्या पूर्वार्धांत तरी सुगमपणा, सहजपणा, जीवंतपणा—म्हणजेच कादंबरीपणा—कांहीं प्रमाणांत आला आहे. किंवा आपल्या पूर्वींच्या कादंबऱ्यांवरील टीकेपासून केतकरांनीं धडा घेतला असावा ' विचक्षणा ' लिहिण्यापूर्वीं तीनचार वर्षें आधीं त्यांनीं ' कळ्यांचे निःश्वास ' या कथासंग्रहाला प्रस्तावना लिहितांना असें म्हटलें आहे कीं, " सामान्य वाचक ..अनीति सहन करील, शिव्या सहन करील, पण लेखकाची नीरसता कधींच सहन करणार नाहीं." ' विचक्षणा ' या कादंबरींतहि, सर्वसामान्य वाचकवर्गाच्या दृष्टीनें अनीतीचे विचार आहेत; राजकीय पुढारी व धार्मिक गुरु यांना 'शिव्याहि' आहेत; पण कादंबरीच्या प्रथमार्धांत नीरसता मात्र फारशी नाहीं. ही कादंबरी त्यांच्या मृत्यूच्या थोडेच दिवस पूर्वीं पूर्ण झाली होती. पहिल्या कादंबऱ्यांतील भाषेचा बोजडपणा बराचसा या कादंबरींत झडला आहे. तथापि 'विचारपौष्कल्य, आयुष्य–कार्य-निश्चय, शिष्य–विज्ञापकारक,' असल्या शब्दांच्या शृंखला भाषेच्या पायांत आहेतच. ' तर्कटेन भर्कटितम् ' अशा तऱ्हेची मनःपूत टीका गीतेवर, धर्मावर, देशभक्तीवर केलेली आहे. 'पुष्टिमार्गाचें' स्तोम

माजविणाऱ्या श्रीरंगाचार्यांच्या बुवाबाजीचें कांहींसें समर्थनच यांत केलें आहे. कदाचित् तो केतकरांच्या उपरोधिक लेखनाचा नमुना असावा ! शेवटीं डॉ. तर्कटे यांची ' तर्कट-नीति ' आठ पानें दिलेलीं आहे. ती पाहिली म्हणजे ' ब्राह्मण-कन्येंतील ' वैजनाथ-स्मृतीचें स्मरण कोणासहि होईल. तेवढ्या माऱ्यानें वाचक चीत होणार नाहीं, म्हणूनच कीं काय, प्रो. लोंढे यांची पुरवणी चार पानें जोडलेली आहे--आणि वर पासंगासाठीं ' पद्मनाभ——चतुःसूत्रीहि ' लोढण्यासारखी अडकाविली आहे. या सर्व जडजंबाल लेखनाचा संदेश काय ? तर वेश्यागमन व बुवाबाजी यांची तरफदारी करून स्वैराचाराला प्रतिष्ठा मिळवून देणें !

स्त्रीपुरुषांचेंच काय, पण त्याच्या बारीकसारिक वस्तूंचेंहि बारकाईनें वर्णन करण्यास केतकरांची लेखणी या कादंबरींत सज्ज झाली आहे. मंजुळेच्या घरच्या कलात्मक 'टी सेट'चें केतकर पुढीलप्रमाणें वर्णन करतात, " तो चहाचा सेट स्वयंकल्पनेनें व थोर अभिरुचीनें बनविला होता. इंग्रजी नमुन्याचें अनुकरण नव्हते, ही गोष्ट त्यांच्या चटकन् लक्षांत आली. त्यांत चहा ओतण्याकरितां जी तोटी होती त्या तोटीवर शिव व त्याच्या जटेंतील गंगा असें नक्षीकाम होतें, आणि अनेक शिखरांचीं चित्रें चहादाणीच्या मध्यभागावर काढलेलीं होतीं. साखर ज्या भांड्यांत ठेवली होती तें भांडें मयूराकृति होतें; आणि त्यावर कार्तिकस्वामींची आकृति झांकणाच्या शीर्ष-भागीं बसविली होती. चहादाणीमध्यें जीं अनेक पर्वतशिखरें कोरलेलीं होती त्यांतून देखील दक्षयज्ञ, यज्ञविध्वंस, पार्वतीची तपश्चर्या, इत्यादि चित्रें कोरलेली होतीं. "

## विविध अनुभवांचें चित्र

' भटक्या ' ही केतकरांची शेवटची कादंबरी. त्यांच्या मृत्यूमुळें ती अपूर्ण राहिलेली. गुणांच्या दृष्टीनेंहि तिचें स्थान शेवटचेंच लागतें. अंजनवेल येथील एक मुलगा चिपळूण येथें अठराव्या वर्षापर्यंत शिक्षण घेतो, मॅट्रिकमध्यें तीनदां नापास होतो आणि मग शेटजीचा नोकर, डॉक्टराचा कंपौंडर, मेसोपोटोमियामधील लष्करी नोकर, आणि नंतर राजकीय चळवळीं-

तील एक वाजारबुणगा—अशीं निरनिराळीं कामे करतों, आणि समाजांतील विविध वर्गांचें अनुभव घेतो. असें एकेरी व दुबळें कथासूत्र या कादंबरीचें आहे. तिचा हेतु "आयुष्यक्रमाची विविधता लक्षांत यावी, आमच्या समकालीनांच्या सामाजिक स्थितीची चित्रणा पुरी व्हावी" एवढाच आहे पण ती चित्रणाहि अगदीं ओबडधोबड पद्धतीनें केलेली आहे. ना प्रमाण, ना रंग अशी कलाहीन कृती ती आहे. नायकाचें बालपण कोकणांत गेलें म्हणून कोंकणचें रम्य वर्णन त्यांत आलें असेल म्हणावें, तर तें नाहीं, आणि रणक्षेत्रावरील रौद्ररस कादंबरीच्या पाटांतून वहात असेल म्हणावें, तर तोहि नाही.

## कादंबऱ्यांचा कच्चा माल

केतकरांनीं आपल्या कादंबऱ्यांमध्यें समाजापुढील समस्या विचारासाठीं घेतलेल्या आहेत. कोणत्याहि वर्गाची कसलीहि समस्या हातीं घेण्यांत त्यांनी तत्वज्ञाचें धाडस दाखविलें आहे. त्या समस्या सोडविण्यासाठीं ते नवे व विलक्षण मार्ग निःशंकपणें सुचवितात. त्यांचीं मतें रूढ परंपरेहून अगदीं भिन्न असतात. त्यामुळें तीं वाचकांच्या बुद्धीला धक्के देतात. आपलीं लोकविलक्षण मतें मांडतांना केतकर जे युक्तिवाद करतात; ते नेहमींच तर्कशुद्ध नसले, तरी विचार करावयास खास लावतात. त्यांची भाषा स्पष्टवक्तेपणाची—किंबहुना फटकळपणाची आहे, आणि त्यांच्या कादंबरीचा मुख्य गुण म्हणजे महाराष्ट्रांत, किंबहुना सर्व हिंदुस्थानांत, फार काय सर्व जगांत पसरलेला जो मानवसमाज आहे, त्यांतील हिंदु—मुसलमान, पार्शी—ख्रिश्चन इत्यादि धर्मांची व डॉक्टर—प्रोफेसर, स्वामी—सेवक, वेश्या—वकील, इत्यादि बहुविध वर्गांचीं चित्रें, नामरूपानें तरी, त्यांत रेखाटलीं आहेत. समाजाच्या भिन्नभिन्न थरांचें चित्रण—किंवा नुसते उल्लेखसुद्धां—त्यांच्याइतके दुसऱ्या कोणत्या मराठी कादंबरीकारानें केलेले आढळत नाहीत. कुळहीन स्त्रीपुरुषाचें लग्न व त्यांचे समाजांतील स्थान हा त्यांचा नित्याचा व आवडीचा विषय आहे. केतकरांच्या एकएका कादंबरींत इतकीं कथाबीजें ठेंचून भरलेलीं असतात कीं, त्यावर दुसरे कादंबरीकार दहादहा कादंबऱ्यांचे बगीचे सहज फुलवतील. नाना ठिका-

णचा कच्चा माल कादंबरीच्या कारखान्यांना पुरविणारे केतकर हे एक मोठे ठेकेदार आहेत.

## रसायनशाळेचें स्वरूप

फडके–माडखोलकरांच्या कादंबऱ्या वाचणें म्हणजे अत्तरांचा घमघमाट सुटलेल्या एकाद्या नृत्य–मंदिरांत पाऊल ठेवण्यासारखें असेल, वामनराव जोशी व सानेगुरुजी यांच्या कादंबऱ्या हातांत घेणें म्हणजे धूप–दीप पाजळलेल्या व आरती–भजन चाललेल्या पवित्र देवालयांत प्रवेश करणें असेल, तर केतकरांच्या कादंबऱ्या उघडणें म्हणजे रासायनिक द्रव्यांच्या दर्पानें कोंदटलेल्या व प्रयोग–नालिकांनीं गजबजलेल्या एखाद्या आधुनिक रसायनशाळेंत शिरण्यासारखेंच होय. तेथें कोणत्या रसायनाचा थेंब कोणाच्या कपड्यावर वा शरीरावर केव्हां पडेल याचा नेम नाहीं.





## र. वा. दिघे : : : : २५

'**रा**जकीय' कादंबऱ्यांचें जसें एक स्वतंत्र दालन आहे, तसेंच 'ग्रामीण' कादंबऱ्याचेंहि आहे. हें दालन उघडण्याचा मान श्री. दिघे यांजकडे जातो. 'पाणकळा' ही त्यांची पहिली कादंबरी अस्सल गांवरान आहे. त्या एका कादंबरीच्या धक्क्यानेंच कीर्तीच्या किल्ल्याचा दरवाजा त्यांनीं उघडला. त्यांचेपूर्वीं खेडेगांवासंबंधींच्या कादंबऱ्या मराठींत अगदींच नव्हत्या असें नाहीं. पण सरबताला मीठ किंवा शेताला कुंपण, तसाच वापर खेडेगांवांतील विषयांचा मराठी कादंबरीकार करून घेत. ज्या वेळेस जो विषय वातावरणांत घुमत असेल, त्याचेच पडसाद ललित वाङ्मयांत निघणे स्वाभाविक आहे. पण कादंबरीचा पिंडच मुळीं ग्रामीण

बनवावयाचा असा भर दिघे यांच्यापूर्वी फारसा कोणी दिलेला नाहीं. माड-खोलकरांनीं ज्याप्रमाणें अनेक राजकारण-प्रधान कादंबऱ्या लिहून नवी प्रथा सुरु केली, तशीच ग्रामीण कादंबऱ्यांची नवी पाऊलवाट पाडण्याचे श्रेय दिघे यांना आहे.

## अस्सल ग्रामीण थाट

दिघे यांच्या ग्रामीण कादंबऱ्या दोनच—' पाणकळा ' व ' सराई '. पण त्यांतील सारें वातावरण, किंबहुना त्यांची प्रकृतिच ग्रामीण आहे. खेड्यां-तील माती घेऊनच त्यांनीं त्या मूर्ति बनविल्या आहेत—शहरी शाडूला गांवटी काव फांसलेली नाहीं. सर्वसामान्य नाटक-कादंबऱ्यात स्त्रियांची भाषा सजविण्यासाठीं, ' इश्श्य ' ' मेलं ' असे जसे दोनचार शब्द पेरले जातात, तसेंच ' लई,' ' बेस ' अशा शब्दांचे तुकडे जोडून खेडूतांचें चित्र उभें केलें जातें. पण त्यांत कांहीं जीव नसतो. कादंबरीच्या अणुरेणू-मध्यें तेंच एक तत्त्व स्फुरलें पाहिजे आणि तिच्या रोमरोमांतून तें बाहेर पडले पाहिजे. आपल्या कादंबरीच्या सर्वांगांतून ग्रामीणतेचा आविष्कार करणारे मराठी लेखक म्हणजे र. वा. दिघे., ग. ल. ठोकळ, चिं. य. मराठे, द. र. कवठेकर इत्यादि होत. त्यांमध्यें दिघे यांनीं मोठें यश कमावलें आहे. शब्द न् शब्द, प्रसंग न् प्रसंग, भावना न् भावना ग्रामीण ठेवण्याची कोशीस ते करतात.

श्री. रघुनाथ वामन दिघे यांचा जन्म १८९८ सालीं झाला. भोरच्या आसपासचा शिवप्रभूंनीं पावन केलेला पहाडी मुलुख दिघे यांचा बाळ-पणींचा सोबती होता. शिवाजीमहाराजांचा मार्ग मोकळा करण्यासाठीं आगीच्या खंदकावर आपल्या ' देहाचा पूल ' करणाऱ्या दिघे—घराण्याचा रघुनाथरावांना अभिमान आहे. हें भौगोलिक सौंदर्य व ऐतिहासिक अभि-मान यांच्या धारा त्यांच्या कादंबऱ्यांच्या नसांतून वहात आहेत. त्यांचे वडील सरकारी नोकरींत होते. त्यामुळें त्यांना फिरतीवर जावें लागे. अनायासेंच रघुनाथरावांना बरींच शहरें परिचित झालीं. डेक्कन कॉलेजांत शिक्षण घेऊन दिघे बी. ए. झाले व पुढें एल् एल्. बीहि झाले. वकि-

लीचा धंदा करतांनाच हौस म्हणून ते साहित्यांत शिरले. गडकरी हे तर त्यांचे नातलगच. त्यांच्याशिवाय श्री. कृ. कोल्हटकर, रे. टिळक, बालकवि इत्यादि साहित्यिकांच्या सहवासांत त्यांनीं बराच काळ घालविला. 'पाणकळा' कादंबरीची कल्पना त्यांना सुचली १९२२ सालांत, पण ती लिहून झाली १९३९ साली. हौसेहौसेनें मनापासून कलापूर्ण लेखन कोरीत रहाण्याचा त्याना छंद आहे.

## चार आकर्षक अंगें

केवळ ग्रामीण जीवनाला वाहिलेली आपली कादंबरी मामुली वाचकांना नीरस वाटूं नये म्हणूनच की काय, दिघे यांनी आपल्या कादंबऱ्यांना इतर आकर्षक अंगेंहि जोडलीं आहेत. तरुण स्त्रीपुरुषांच्या श्रृंगाराचें वर्णन ते उत्कटपणें पण संयमानें करतात. या मोहकतेवर मादकतेचेहि पुट चढविण्यासाठीं, रहस्यकथेप्रमाणे, एखाद्या खुनाचे गूढ व त्या निमित्तानें मारहाण असेहि प्रसंग ते आपल्या कादबरींत घालतात. तसेंच शेतकऱ्यांची दुःस्थिति दूर करण्यासाठीं कोणी काय केले पाहिजे याविषयीचें देशभक्तिपर विवेचनहि ते भरपूर प्रमाणांत करतात. शिवाय ग्रामीणतेचा गंध तर अनन्यसाधारण आहेच. या चारी गुणांमुळें दिघे यांच्या कादंबरीनें मराठी मनाची पकड सप्पादिशीं घेतली. त्यांच्या 'पाणकळा' या कादंबरीला 'दक्षिण महाराष्ट्र साहित्य पुरस्कार समितीनें' पांचशें रुपयांचे पहिलें 'फडके पारितोषिक' दिलें. 'पाणकळा' व 'सराई' या त्यांच्या दोन्ही कादंबऱ्यांना रुपेरी पडद्यावर चित्रित होण्याचें भाग्य लाभलें आहे.

## ग्रामीण मुखांतून ग्रांथिक भाषा

'पाणकळा' म्हणजे पाऊस. त्याच्यावर शेतकऱ्याचें सारें जीवन हेलखावे खात असतें. त्या हेलकाव्यांचें रमणीय व सांगोपांग वर्णन दिघे यांनीं या कादंबरींत कसून केलें आहे. सोन्याचा जसा अतिशय पातळ पत्रा कसबी सोनार काढतो, त्याप्रमाणें निसर्गाचीं वर्णनें बारीक बारीक तपाशिलानें, अस्सल खेडूत शब्दांनीं करण्यांत दिघे यशस्वी झाले आहेत. मात्र संवाद सुरू झाले कीं, लेखकाला आपल्या या भूमिकेचा विसर पडतो ही

खेदाची गोष्ट होय. डोंगर-पहाडांतील सकऱ्या भिल्ल असो, त्याची अल्लड मुलगी रैना असो, किंवा खेड्यांतील लक्ष्मीप्रमाणें विहरणारी भुजबाची सोनी असो-सर्वांची भाषा एकसारखी.-मुंबईहून शिकून आलेल्या आनंदरावांचीच शहरी भाषा त्यांच्याहि तोंडांत-जणुं कांहीं एकटे दिघेच उभे राहून निरनिराळ्या पात्रांच्या कण्यांतून बोलत आहेत ! राजमलच्या खुनाचा तलास अडाणी रैना गुप्त पोलिसाच्या शिताफीनें लावते हें एक आश्चर्य, तर त्या तलासाचें वर्णन ती सुशिक्षित कादंबरी-काराच्या चातुर्यानें करतें हें दुसरें आश्चर्य ! "माझ्या सौंदर्याच्या बादशहा, माझ्या जीवनाच्या मुशाफरा, माझ्या प्रणयाची फुलवंती बाग तुझ्याकरतां होती." अशी भाषा काढणाऱ्या निरक्षर ग्राम-कन्येनें, सोनीनें, गडकरी-वाङ्मय पालथें घातलें होतें काय ? "आपण प्रातिज्ञा केली ती तुम्ही विसरलांत काय ?" असा प्रश्न पुण्यामुंबईच्या पुढाऱ्याप्रमाणें कोण करतो ? तर सकऱ्या भिल्ल. आणि त्याची नाचरी पोरगी रैना ही तर कर्मगतीचा सिद्धांत सांगते ! एवढें एकरंगी भाषेचें हें गालबोट वगळलें, तर दिघे यांनीं बनविलेली ग्रामीण जीवनाची मूर्ति सर्वांगसुंदर आहे.

## खऱ्या शेतकऱ्याचें स्वभाव-चित्र

'पाणकळा' कादंबरीचें कथानक घडतें सजलपूर या खेड्यांत. तेथील रंभाजी पाटील हा मोठा रगेल व रंगेल माणूस दाखविला आहे. तो जितका उदार तितकाच क्रूर आहे. छोटा संस्थानिक किंवा सुलतानच तो ! त्याच्या अन्यायी व व्यसनी जीवनाला पार्श्वभूमि शोभण्यासारखें उजळ चित्र भुजबाचें आहे. त्याची छाती रंभाजीच्या दीडपट रुंद आणि त्याचें अंतःकरण म्हणजे तर दया-क्षमा-शांतीचें माहेरघरच. 'देवालाहि दुर्लभ असें आदर्शभूत जीवन' त्याचें दाखविलें आहे. कादंबरीकार आश्वासतात कीं, "भागवतधर्मानें वेडावलेल्या महाराष्ट्राच्या उदंड शेतकीवर्गांत भुजबासारखीं माणसें खेडोपाडीं पाहावयास मिळतील." या वारकरी वीरानें आश्रय दिलेल्या एका कुटुंबांतील मुलीवर-पारूवर-रंभाजीची वांकडी नजर जाते. तेव्हां रंभाजीला गाडीच्या चाकाला बांधून

भुजबानें त्याच्या उघड्या पाठीवर शिवळीचे तडाखे दिले. हा बेदम मार पाटील कसा विसरणार? त्यानें सापासारखा डूख धरला आणि भिल्लांच्या मदतीनें भुजबाचा वाडा पेटवून दिला. पारूवर जतीचें संकटहि त्यानें आणलें व भुजबाकडे आलेल्या आनंदरावावर राजमलचा खून केल्याचा आरोप घातला. पण या सर्व सत्त्वपरीक्षेंतून भुजबा उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाला, एवढेंच नव्हें तर; रंभाजीचे भिल्ल त्याच्यावर उलटले असतांना आणि रंभाजीच्या वाड्याची जाळपोळ करूं लागले असतांना, भुजबा जिवावर उदार होऊन रंभाजीच्या मदतीस धांवतो–त्याचेवर दयेचा अभिषेक करतो आणि त्याला पावन करून सोडतो असें हें भुजबाचें स्वभावचित्र अत्यंत उदात्त आहे. त्याचेवर खोट्या आरोपावरून खटला चालू असतांना, तो "पिंजऱ्यांत धीरगंभीर असा बसला होता. जणूं काय तो न्यायाधीशालाच न्याय देणार असें वाटत होतें." आणि भोळ्या भावाचे भिल्ल तर काय? "आईबापांनी आम्हांला जन्म एकदां दिला, भुजबा देवानें दुसरून दिला. आम्ही भिल्लांनीं भुजबाला देव करून देव्हाऱ्यांत ठेवलें आहे. आम्ही त्याची रोज पूजा करतो." असें ते मानीत.

## सात्विक गुणांचा पुतळा

भुजबाला देवाविषयीं भक्ति जितकी गाढ व गरिबांविषयीं दया जितकी अपार; तितकीच अन्यायाची चीडहि तीव्र आणि शेवटीं क्षमाहि निःसीम. त्याला पाण्यांत पहाणाऱ्या रंभाजी पाटलालाहि बेदम मार बसला व त्याच्या पाठीचीं धिरडीं निघालीं, तेव्हां भुजबा काय करतो? "रंभाजीचे पाठीस हळद व तेल लावतांना पारू रंभाजीची कृति अगदीं विसरून गेली होती. रंभाजीस स्पर्श करतांना तिला कोणत्याहि प्रकारचा संकोच वाटत नव्हता. दयेचा जोर लज्जेपेक्षां अधिक आहे. तिचे मनांत उत्पन्न झालेल्या दयेनें तिचे लज्जेला हाकलून दिलें होतें. भुजबा हळद तेल लावतांना "अरे, अरे," "चकचक" असें खेदानें आपल्याशींच पुटपुटत होता. दयेनें त्याचें अंतःकरण ओथंबलें होतें."

भुजबा आनंदरावांच्या अंगांतील सात्विक गुणांचा गौरव किती

सूचकतेनें करीत आहे, पहा:—" आज तुकारामबुवा जिवंत असते तर त्यांनीं अभंगांत काय लिहिलें असतें ? " भुजबानें विचारलें.

" त्यानीं अभंग लिहिले नसते. देहूला शास्त्रीय प्रयोग शाळा काढली असती." आनंदरावानें उत्तर केलें.

"मला वाटतें, त्यांनीं कपेरेकांटीं ती काढली आहे " भुजबाचें विनोदानें सर्व शेतकरी मनापासून हसले."

## सह्याद्रीवर रूपक

महाराष्ट्राचा पिता म्हणजे सह्याद्रि. त्याच्या स्वरूपाचें वर्णन दिघे पुढीलप्रमाणें करतात, " उंच उंच आकाशाला भिडलेला नीट कड्याचा डोंगर शंकरासारखा जटा सोडून उभा आहे, त्याचे माथ्यावरून शुभ्र पाण्याची धोद गर्जना करून खालीं पडत आहे. त्या डोंगराच्या माथ्यावर संध्याकाळीं पारव्याचे कंठाप्रमाणें दिसणाऱ्या हिरव्या–निळ्या–तांबड्या–जांभळ्या आकाशांत जेव्हां चंद्रकोर व शुक्राचा तारा ढळे, तेव्हां डोंगराच्या जटाजटांतून गंगावतरणाचा अभिनय चालला आहे असें वाटे. शुक्राचा तारा म्हणजे शंकराचा तृत्रीय नेत्रच ! पाण्याचा खालीं पडणारा धबधबा म्हणजे जटेंतून उडी मरणारी गंगा. माथ्यावरची चंद्रकोर म्हणजे भाळीं धरलेली चंद्रलेखा."

## पाणकळ्यांतील संगीत

पावसाळ्याचे परिणाम एकंदर सृष्टीवर किती भिन्न भिन्न व रमणीय होतात, याचीं शब्द-चित्रें दिघे यांनीं खूप काढलीं आहेत. "हा ' पाणकळा ' म्हणजे शेतकऱ्यांचें जीवन, सुखाचें स्वप्न, आनंदोत्सव. मातींत राबणाऱ्या व काबाडकष्ट करणाऱ्या जीवांचें ' पाणकळा ' म्हणजे विश्वसंगीत. वाजत-गाजत गर्जत येऊन त्यानें तापलेल्या कस्तुरीच्या काळ्या वावरांत अमृताची बरसात सुरू केली, कीं लाखों कमळें फुलल्याप्रमाणें मातीचा सुगंध पसरतो. खेड्यांतील लोक शेतांत खपूं लागतात, कस्तुरीच्या वावरांत पाभरी सुरू होतात व त्यांतून मोत्याचा पेरा होतो. पांचसात दिवस वाफसा झाला म्हणजे जिकडे तिकडे हिरवेंगार होतें. "

पर्जन्यराजाच्या आगमनावर किती सुंदर उत्प्रेक्षा रचल्या आहेतः— " कडकडत गडगडत ता आज येथें पडला, तर उद्यां लांब क्षितिजावर पडतांना दिसेल व काळ्या ढगांतून पडणाऱ्या त्याच्या धारा जलवंतीच्या सुटलेल्या केशकलापाप्रमाणें दिसतील; कधींकधीं त्यांत विजेची कलाबूत किंवा इंद्रधनुष्याचे रंग दिसतील, तर कधीं तो स्वर्गातून सोडलेल्या झुलत्या जिन्यासारखा दिसेल. शेतकऱ्यांचा स्वर्ग याच जिन्यानें खालीं येतो. ऊन्ह-पावसाच्या तिरपेंत इंद्रधनुष्याच्या कमानींतून हा स्वर्ग पावसाळ्यांत कैक वेळां पहावयास मिळतो. "

## सुगंधाचा दर्या

विलासी जीवन खेड्यांना पारखें. पण निसर्ग तीहि उणीव कशी काढतो, पहा, " निरनिराळे सुवास सुटूं लागले कीं, निसर्गानें कानपुरी अत्तरवाल्याचें सोंग घेतलें आहे व तो शेमल्यांत खोंवलेल्या निरनिराळ्या अत्तराचे फाये काढून गिऱ्हाइकांना पटवीत आहे असें वाटूं लागतें. आंबेबार, मृगबार, व हत्तीबार या मोसमांत सत्री–मोसंब्यांच्या बागा चढाओढीनें एकमेकांवर ताण करीत फुलूं लागल्या कीं, सजलपूरच्या अंतराळात सुगंधाचा दर्या उसळतो. आणि तशांत या फळझाडांच्या सुवासाबरोबर जाई, जुई, नेवाळी, कुंद, मोगरा, गुलाब किंवा शेवंती याचे सुवास वाऱ्याच्या झुळकीबरोबर रात्रींच्या प्रशांत समयीं अंतरा-अंतरानें येऊं लागले कीं, सुगंधाची अखंड रागदारी चालली आहे असें वाटतें. "

## महाराष्ट्रीय निसर्ग

महाराष्ट्रांतील झाडें, फुलें व पांखरें यांचें बारकाईनें वर्णन करण्यांत दिघे यांचा हातखंडा आहे. ते लिहितात, " आजूबाजूला गव्हाचीं पिकें सळसळत होतीं. कांद्याच्या पोगाऱ्यांनीं व गाजराच्या तुऱ्यांनीं शेतें चित्रविचित्र गालिच्याप्रमाणें दिसत होतीं व त्यांतून बगळे चरत होते. तित्तर व लावी पक्षी आपल्या पिलांचे परिवार घेऊन या शेतांतून त्या शेतांत धांवत होते. फळांना बार धरून झाडें लावलीं होतीं. संतुष्ट शेतकरी

ललकाऱ्या मारीत गुरें घरीं हांकीत चालले होते. सबंध दिवस चरून पोट भरलेले पक्षी झाडावर बसून परमेश्वराचीं संध्यास्तोत्रें म्हणत होते. जिकडे तिकडे शेतकीच्या जीवनाचा आनंदीआनंद चालला होता. अशांत तिन्हीसांजची पिवळ्या पिकानें लवलेली पारू वाटेनें जातांना धरित्री-देवीप्रमाणें दिसत होती."

'सराई' कादंबरींत कारवीच्या सुगंधाचें वर्णन कितीहि केलें, तरी दिघे यांना तें अपुरेंच वाटत असावें. "सुगंधाचा दर्या उसळला होता." किंवा "सुगंधाचा वणवा पेटला होता" अशा नाना रीतींनीं वर्णन करून ते त्या अमूर्त सुगंधाला वाचकापुढें मूर्तिमंत उभे करूं पहात आहेत.

तसेंच, निरनिराळ्या पशूंचे व्यापार काय चालत होते, तें पहा— "भेकर, खिटखिटी, कोल्हीं, तरस, सांबर, ससे, रानमांजरें, ऊद, चितळ हे प्राणी आधींच पाण्यावर येऊन गेले होते. लांब रानांत भेकर कोकत होते, सांबर भोंगा करीत होते व चितळ कुक कुक असा आवाज काढीत होतें. हे सर्व प्राणी एकदम गप्प झाले. पेटविलेला परसा विझत आला, रात्र भेसूर झाली व कमालीची शांतता वाढली. तेव्हां पाण्यावर वाघाचे डोळे भल्यामोठ्या दोन काजव्यासारखे चमकले."

## सूक्ष्म वर्णन-शैली

डोंगरांतील साधी, लहानशी, वाकडीतिकडी वाट. तिचेंहि वर्णन दिघे इतक्या बारकाव्यानें करतात कीं, आपणच त्या वाटेवरून चाललों आहों असें वाटावें. ती वाट, "कधीं अजगरासारखी वर चढे तर कधीं धामणी-सारखी झपाट्यानें खालीं उतरे. कधीं रानांत कारवटांत गडप होई तर कधीं माळावरून भांगासारखी सपाटीनें जाई. कधीं ती वृक्षवेलींच्या मांडवांतून जाई तर कधीं कधीं ती दगडाळींतून धडपडे."

हें झाले निर्जीव वाटेचे वर्णन. मग सुंदर वैशिष्ट्यांनीं नटलेल्या व्यक्तींचें स्वभावचित्र दिघे इतक्या सूक्ष्मतेनें व रम्यतेनें रेखाटतात की, ती ती व्यक्ति आपल्या डोळ्यापुढें उभी रहाते व स्मृतींत दीर्घकाळ घोळते. एक नमुना पहा—"सोनीचा गळा सुंदर होता.

ती मुंबईस शाळेंत गावयास शिकली होती. ती गाऊं लागली म्हणजे तिचा पहाडी आवाज समुद्राच्या भरतीप्रमाणें अथांग चढू लागे. संध्याकाळचे वेळीं पडळीवर सोनी तुळशीवृंदावनाच्या अंगणांत बसून गाऊं लागली कीं, आकाशाचा गाभारा दणाणून जाई व तारका गाण्याच्या आलापांनीं थरकत. पारूचाहि गळा सुंदर होता. पुष्कळ वेळां त्या दोघी गळ्यांत गळा मिसळून जोडीनें गात. त्यावेळीं त्यांचे आवाज बीनाप्रमाणें दोन ठिकाणीं घुमत. न कळे कीं यक्षकन्यका कीं अप्सरा ! " सोनी, पारू व रैना या तीनहि मुली खेड्यांतीलच, पण त्यांच्या व्यक्ति-रेखा दिघे यांनीं किती भिन्न भिन्न काढल्या आहेत !

## कल्पनेचें वैभव

ग्रामीण शब्दांच्या व रमणीय कल्पनाच्या थैल्या दिघे यांच्या हातांत भरलेल्या आहेत. दोन-दोन चार-चार शब्दांत ते आपली चमकदार कल्पना प्रगट करूं शकतात. दुष्काळामुळें ओसाड दिसणाऱ्या गांवाकडे पाहून त्यांना वाटते, " घरांच्या जोत्याच्या रांगा विराट पुरुषानें फराळ करून रिकाम्या केलेल्या नैवेद्याच्या ताटाच्या पंक्तीप्रमाणें दिसतात. त्या घरांत राहाणाऱ्या मनुष्यांचा कालपुरुषानें संहार केला होता काय ? "

खेड्यांतील बाजारांतील गोंगाट ऐकतांच त्यांना असा भास होतो कीं, " सुगीचा बाजार पुरा भरला आहे. एक मोठा राक्षस हों हों करून ओरडावा तसा त्याचा गोंगाट लांबून ऐकूं येत आहे. "

वेळूच्या बेटांतून वारा जात असतांना जो नाद होतो, तोहि कादंबरी-काराला कसा भासतो ? तर " वारा आला कीं, कळकीचीं बेटें एखाद्या राक्षसानें दांत खावेत त्याप्रमाणें मधून मधून कडकडकड असा आवाज करीत होतीं. "

चंद्रोदयासारखें रम्य दृश्य शब्दांनीं मूर्त करण्यासाठीं ते असा नित्याचा घरगुती दाखला देतात कीं, " अंधाराच्या डोहांतून रजनीनाथ वर हळूं हळूं येऊं लागला. जणूं काळ्या पाण्यांत उपडी बुडवून खालीं धरून ठेवलेली चांदीची कळशी सोडून दिल्यामुळेंच वर उसळून आली आहे." रौद्र व रम्य–अशा उभयविध कल्पना लढविण्यांत कादंबरीकार चतुर आहेत.

## कातोड-कन्यकेची भाषा

'पाणकळा 'पेक्षां 'सराई 'त ग्रामीण सौंदर्याचा उठाव अधिक झालेला आहे. पहिल्या कादंबरींत भुजबा व रंभाजी या सुष्ट-दुष्टांची जशी जोडी, तशी दुसऱ्या कादंबरीत बाप्पाजी व केसूतात्या यांची. कातोडी–समाजाचें शब्दचित्र 'सराई 'त ठसठशीपणें रेखाटलेलें आहे. कातोडी हा 'वन्य' समाज म्हणजे निसर्गाच्या कटि-खांद्यावर खेळणारा. तो जितका धिप्पाड व चपल; तितकाच स्वाभिमानी व प्रामाणिक. कातोडी लोक रानावनाला, डोंगरापहाडाला, वाघा-लांडग्याला मुळींच न जुमानणारे. सरकारचा कायदा, त्याचे पोलिस व त्यांची बंदुक यांना ते डरत हें खरें; पण धैर्य व शिताफी या गुणानी ते त्यांच्यावरहि कांहीं काळ मात करीत. लाडी ही एक कातोडी-कन्यका, नैसर्गिक सौंदर्याची जणूं मूस. तिच्या तोंडीच काय ते अस्वाभाविक संवाद आलेले आहेत.

'पाणकळा 'प्रमाणें या कादंबरीत ग्वेड्तांच्या तोंडीं शहरी भाषा घातलेली नाहीं. या सुधारणेला अपवाद एकच व तो म्हणजे लाडीचा. "शंकरानें चंद्रमा मस्तकीं धारण केला; मी माझ्या हृदयांत तुमचा मुख–चंद्रमा धारण केला." अशी गडकरी-खांडेकरी भाषा "बेहोष लाडी" बोलूं लागते, तेव्हां आश्चर्य वाटतें. "मन–हरणा, मी दुरून तुझी नेत्रभेट घेईन. तेवढं चकोरलेणं मला पुरे." अशी काव्यमय भाषाहि ती जंगल-कन्या काढते. एवढेंच नव्हे, तर डोंगरांत बसून ती मुक्त कंठानें गाणें गाऊन दऱ्यानूदऱ्या घुमविते, तेव्हांहि तिचें गाणें ग्रामीण नसतें–तर 'कर जोडुनी विनवितसें दशमुखांतका !' ही तिची सारी भाषा–संपदा पाहून ती कातोड–कन्यका आहे कीं कॉलेज-कन्यका आहे, असाच प्रश्न कोणीहि कादंबरीकारास विचारील.

## ठळक स्वभाव–चित्रें

या लाडीवर बाप्पाजीचा मुलगा मनोहर पुरा भाळला. त्यामुळें तिच्या आयुष्याचें वाटोळें झालें आणि शेवटीं ती मरून पडली. त्यावर 'अपरि-हार्य !' असें मत बाप्पाजीनें दिलें. पण तेवढ्यानें कादंबरीकाराची सुटका

होत नाहीं. मनोहरच्या उमद्या स्वभावचित्राला हें निष्कारण गालबोट लागलें आहे. त्याचें कारण शोधलेंच तर एकच दिसतें. तें म्हणजे बंधनापलीकडील मस्त प्रणयाचा मालमसाला आपल्या कादंबरींत असावा ही लेखकाची वासना. मनोहरचें ज्या मुलीशीं लग्न झालें ती मनोरमा देखणी, चतुर व सुशील अशीच दाखविलेली आहे. मनोहरच्या आईचें स्वभावचित्रहि जुन्या खानदानी घराण्यांतील थोर स्त्रीला शोभण्यासारखें आहे.

मनोहरची आई कशी दिसत असे याचें चित्र दोनचार ओळींत कादंबरीकारानें सहज रेखाटलें आहे तें असे. " ती नथ वाडिलार्जित होती. करवंदांसारखे मोती होते तिला. लालडीच नुसती पांचशे रुपयांची होती. ती नथ मोठ्या आईंना घातली कीं लालडीचा तांबडा उजेड त्यांचे गालावर पडे व त्या कोल्हापूरच्या अंबाबाईसारख्या घवघवीत दिसत. "

बाप्पाजी तर काय ? ' शांकर स्वभावाचे '. " डोंगरांतून जसे जिवंत झरे निघतात, तशी त्यांच्या हृदयांत दया होती. " त्यांच्याउलट स्वभाव तात्यांचा. तात्यांचें एकएक दुष्कृत्य पाहून बाप्पाजी शंकराप्रमाणें क्रुद्ध होत. अशा क्रुद्ध अवस्थेंतील बाप्पाजींचें शब्दचित्र कादंबरीकारानें किती कुशलतेनें रेखाटलें आहे पहा.

" बाप्पाजींचा क्रोध अनावर झाला. त्यांचें कपाळांतून निघालेलें उंच नाक फेंदारलें. जाड भुंवयांखालच्या सिंहासारख्या दिसणाऱ्या डोळ्यांतून ठिणग्या पडतात कीं काय, असें दिसूं लागलें. त्यांची तांब्याच्या पत्र्याप्रमाणें दिसणारी कातडी लालभडक दिसूं लागली. ते भृगुऋषीप्रमाणें तात्यांना शाप देऊन भस्म करतात कीं काय असें लोकांना वाटलें. "

## मनोवेधक प्रारंभ

मनोहरचा लाडीशीं अनिर्बंध प्रणय आणि मनोरमेशीं परिमित शृंगार, हा या कादंबरीचा मुख्य कथाभाग असला, तरी त्याला कोंदण म्हणून जें ग्रामीण वातावरण दिघे यांनीं रंगविलें आहे, तेंच वाचकाच्या चित्तांत अधिक ठसण्याइतकें विस्तृत व सरस आहे. दिघे यांना वर्णनाचा कंटाळा नाहीं. हौसेहौसेनें सविस्तर वर्णन ते करतात. खेड्यांतील तरुणांच्या कुस्त्या,

बैलांची झोंबी, वाघाची शिकार, इत्यादि प्रसंगांचीं वर्णनें कौशल्यानें रंगविलेलीं आहेत. लाडीचें कुटुंब आपलें गांव सोडून परागंदा होतें—हा प्रसंगहि हृदयस्पर्शी वठला आहे. त्या वेळची बाप्पाजींच्या हृदयाची ओढाताण सुंदर रंगविली आहे. कातोडी समाजांतील अडाणी व क्रूर चालीरीती व्यक्त करणाऱ्या घटनाहि या कादंबरींत अनेक आहेत. कादंबरीची सुरवातच मुळीं वाचकाचें मन वेधून घेणाऱ्या एका वेगवान प्रसंगानें केलेली आहे, आणि त्याचें वर्णन लेखकानें सविस्तर केलें आहे. तें असें:—

" शिरलीन् रं, शिरलीन् रं, शिरलीन् रं, राजपाटींत कातोड्याचीं पोरं शिरलीन्. "

रानसई गांवांत खलाटींतून दुपारीं गोंग आली. बाप्पाजींचा गडी अंधू गणू गोठ्यांत भुईला चोप देऊन शेणखळा करीत होता. तो शेणाभरल्या हातांनीं बाहेर आला व गळयाच्या शिरा फुगवून आपला एकुलता एक ढुचका डोळा मिचकावीत तणतणूं लागला. त्या आवाजानें दुपारचें ओटीवर लवंडलेले बाप्पाजी जागे झाले. त्यांनीं उठून चूळ भरली, तोंडावरून हात फिरवला, अंगावरचें उपरणें डोकीला गुंडाळलें, नंतर डोकीपेक्षां उंच असा एक जाडा सोडगा हातांत घेऊन ते उघड्या अंगानें शेतावर जाण्यास निघाले. "

## नानाविध शब्द-चित्रें

कातोड्यांच्या झोपड्या म्हणजे दारिद्र्याचीं वारुळें. त्यांचे एक चित्र पहा. " कातोड्यांच्या झोपडींतून थोडीं गाडगीमडकीं दिसत होतीं. बाकी सामान म्हणजे शिकारीचें. धनुष्यबाण, गळ, चिकोटी, भाले, बर्च्या मोठ्या काळजीनें ठेवल्या होत्या. कुडांचे फटींतून कोयते, विळे, कुऱ्हाडी अडकवल्या होत्या. आढ्याला ढोल लटकला होता. सर्व झोपड्या म्हणजे कातोड्यांचे हवाई महालच. "

भातानें पिकलेलीं शेतें किती मोहक दिसत होतीं याचें वर्णन कादंबरीकारानें पुढीलप्रमाणें केलें आहे. " सोनेरी भातावर सोनेरी उन्ह पडलें

होतें. वाऱ्याच्या झुळकींत खाचरांतील भाताचीं लोंबरें, बांधावरचीं अर्धीं पांढरीं, अर्धीं लाल कुर्डूचीं फुलें डुलक्या घेत होतीं. वाऱ्यानें वाकलेल्या गवताचे तुरे वाफ चालल्याप्रमाणें दिसत; गवताच्या लाटा सशांचीं खिल्लारें पळावींत अशा टेकड्यांवरून, माळावरून उठत होत्या रानांत सागाचीं पानें खुजबुजत होतीं. त्या दरींतील नितांत शांततेंत फक्त झाडांच्या साव-टींतून होले, कड्यावरून रानपारवे घुमत होते व कुपणींतून बुलबुल आणि काळे पक्षी आवाज करीत होते."

## सराईची प्रसन्नता

'सराई' म्हणजे सुगीचा काळ. त्यावर शेतकऱ्यांचा सारा जीव, तिच्यासाठीं तो काय करणार नाहीं? दिघे सांगतात, "सराई, सराई, सराई! तिच्याकरितां शेतकऱ्यांनीं बारा महिने कष्ट केले ती ही सराई. जिच्याकरितां घरांतील पोरीबाळींनीं रानोमाळ हिंडून शेणाचा राब मिळवला, बाप्यागड्यांनीं उरापोटावर टहाळ कापला, ओंतकी केली, जमीन सारखी ओढून मुशी पाडल्या, खांडी भरून बांध घातले. म्हशे ठेवले, धुळपेरे केले, बेंबट पिळून नांगर हांकला, चिखलांत हातपाय कुजून नखें उडेसतोंवर लावणी–बेणणी केली, शेतांत गवताची काडी कुठं दिसूं दिली नाहीं आगोटीपासून पावसाच्या धूम धारेंत भिजल्या अंगानें भात-शेतीची मशागत केली, ती ही सराई. हिला डोंगरांनीं वेढली, रानांनीं अडवली, नदीनें मांगली. कमलावर जशी कमलासना श्रीशारदा तशी खलाटींतील भातावर सराई शारदीय प्रसन्नतेनें हसत होती."

## अद्भुत रसाचा उठाव

'रानजाई' हें नांव जरी ग्रामीण कादंबरीला शोभेसें असलें, तरी दिघे यांनीं तिची रचना अगदीं वेगळ्या धर्तीची केली आहे. रानाचे, डोंगराचे, नदीचे असे नैसर्गिक देखावे या कादंबरींत मधून मधून आले असले; तरी एवढ्यानें कांहीं ही कादंबरी ग्रामीण ठरत नाहीं. तिचा आत्मा अद्भुतता हाच आहे. अद्भुत रसाची आवड दिघे यांना किती आहे, हें 'पाणकळा' व 'सराई' या कादंबऱ्यांवरूनहि दिसून आलें

आहेच. पण त्यांत अद्‌भुताला गौण स्थान होतें. ' रानजाईत ' मात्र एकापेक्षां एक रहस्यपूर्ण व अद्‌भुत प्रसंग रचून दिघे यांनीं वाचकाला आश्चर्याचे धक्के देण्याचें ठरविलेले दिसतें. अर्थातच वास्तववादी कादंबऱ्यांमध्यें किंवा ग्रामीण कादंबऱ्यांमध्ये ' रानजाईची ' गणना होण्यासारखी नाहीं. ती एक अद्‌भुत–कथा आहे, या दृष्टीनेंच तिच्याकडे पाहिलें पाहिजे व स्वाभाविकतेच्या किंवा सुसंगतीच्या कसोट्या बाजूस ठेवल्या पाहिजेत.

## जिज्ञासा ताणणारें कथानक

या अद्‌भुत कथेला योग्य असें ऐतिहासिक वातावरण कादंबरीकारानें निवडलें आहे आणि त्यांत प्रसंगहि तसेच गुंफले आहेत. ते वाचतांना कोठें ' वज्राघाताचें ' स्मरण होतें, तर कोठें ' गड आला पण सिंह गेला ' यांतील कमलकुमारीच्या सुटकेची आठवण होते, तर कोठें ' पुण्यप्रभाव '–मधील कालिंदी-भूपालाच्या संवादाचे पडसाद ऐकूं येतात. अरुणाचल राज्याचा दुष्ट राजा निकुंभ आणि वरुणाचल राज्याचा धीरोदात्त राजा वज्रकांत या दोघांच्याहि प्रेमाचें स्थान एकच; तें म्हणजे ' रानजाई '. ही ' रानजाई ' कोण ? हें रहस्य सात पडद्याआड दडवून ठेवलेलें आहे. अलौकिक असें एक श्रीकमल नदींतून वहात आलें असतांना, वज्रकांतानें तें आपल्या हातांत घेतलें. तें कमल नदींत कोण सोडतें अशी जिज्ञासा वज्रकांताला–त्याबरोबरच वाचकालाहि–वाटूं लागते. या जिज्ञासेनें ताणलेल्या अवस्थेंत वज्रकांतानें सहा वर्षें काढलीं. अखेर त्यानें त्या कमळाचें मूळ शोधून काढलें. नदीकांठच्या एका रानांत, " अंधुक संधि–प्रकाशांत, खडकावर शुभ्र–वसना तेजस्वी स्त्रीची पद्मासनाकृति " राजाला दिसली. तेव्हां त्याला " कवीला शारदा, लोभ्याला लक्ष्मी, तृषिताला अमृत, योग्याला शांति न् पाप्याला मुक्ति मिळावी " तसा आनंद झाला. या ' रानजाईला ' निकुंभानें पळवून नेली व आपल्या किल्ल्यांत बंदोवस्तानें ठेवली. तिच्यावर देखरेख करण्यासाठीं जी स्त्री होती, तिचें नांव अवंतिका. त्या दोघींच्या संवादावरून वाचकाचा असा ग्रह होतो कीं, जाई ही अवंतिकेचीच कन्या असावी. पण कादंबरीच्या शेवटीं असा उलगडा

होतो कीं, ती अरुणाचलाच्या राजाचीच कन्या आहे. तो राजा निकुंभानें ठार केलेला आहे, असा लोकांचा समज असतो. पण तोहि कादंबरीच्या शेवटीं खोटा ठरतो व राजा प्रगट होतो. अशा गुंतागुंतीचे अनेक व्यूह या कादंबरींत आहेत. शेवटी चौफेर युद्धहि आहे–त्यांत हत्तीचीहि करामत आहे. अखेर सर्वांचे गोड संमेलन होते.

## एक निसर्ग-कन्या

" सुंदर पुरुष कसे दिसतात तें मी अद्याप या वनांत पाहिलं नाहीं." असें म्हणणारी हास्यमुखी जाई, शेक्सपियरच्या मिरांदाप्रमाणें, वाचकाचें मन जिंकणारी आहे. ती नदीशी बोलत बसते आणि नदीनें दिलेलें उत्तरहि तिला ऐकूं येतें. सृष्टिमातेच्या अंकावरच ती वाढलेली आहे. " जाईच्या फुला, तुझ्या हृदयांत हिऱ्याचा खडा आहे. " असें तिचे वर्णन अवंतिका करते, ते योग्यच आहे. कण्वऋषींनीं जसे शकुंतलेचें लालनपालन केलें; तसें तिचें संगोपन केदारनाथांनी केले. एवढेंच नव्हे तर, त्यांनीं तिला योगविद्या, वैद्यकशास्त्र व तत्त्वज्ञानहि शिकविलें. त्या तत्त्वज्ञानाचें तेज, तिच्या प्रत्येक भाषणांत पडलेलें दिसून येतें. तिचें सारेच संवाद चातुर्याचे व बुद्धिमत्तेचे द्योतक आहेत. अवंतिका तिला म्हणते, " राजवाड्यांतदेखील तुझी बुद्धिमत्ता मिळायची नाहीं. पोलादापेक्षा तुला जास्त धार आहे. बाणाच्या टोकासारखं तुझं मन एकाग्र होतं. पुष्पाप्रमाणं तूं हंसतेस, कांट्याप्रमाणें बोचतेस. " या पवित्र बुद्धिमत्तेच्या बळावरच तिने निकुंभाचे हृदयांतील ईश्वर जागा केला.

## संगीतमय कादंबरी

'रानजाई' सारखीच प्रणयानें ओथंबलेली दिघे यांची दुसरी अद्भुतकथा म्हणजे 'गानलुब्धा मृगनयना.' पहिल्या कादंबरींत श्रीकमळाचें गूढ जसें जिज्ञासा वाढविणारें होतें, तसें या दुसऱ्या कादंबरींत वनांतून अकल्पितपणें ऐकूं येणारें संगीत आहे. पंधरावे शतकांतील ग्वाल्हेरचा राजा मानसिंग मृगया करण्यासाठीं रानांत जातो, तेव्हां त्याचे कानीं वीणा–रव ऐकूं येतो असा या कादंबरीचा मधुर प्रारंभ आहे. तिच्या

नांवांतच माधुर्य व सौंदर्य सामावलेलें आहे. त्यांचेच निनाद अखेरपर्यंत उठत रहातात. “ गंधर्वांचे मेळे, अप्सरांचे ताफे गात गात स्वर्गंगेच्या स्नानाला यावेत ” तसा भास सर्व कादंबरीभर होतो. तींत संगीत आहे, काव्यपूर्ण पदें आहेत, रासक्रीडा आहे आणि सौंदर्याचा तर आरसे–महालच आहे. या सर्वांवर रहस्याचें मंदमधुर चांदणेंहि पडलेलें आहे. ‘ ही मृगनयना कोण ? ’ हें कोडें रसिकाला शेवटपर्यंत गुंगवीत ठेवतें. अखेर गुजरी तीच मृगनयना व फुलवा ही तिची बहीणच असा रहस्य–स्फोट होऊन अद्‌भुतरसाचीं कारंजीं उडूं लागतात. मानसिंग व मकरंद, गुजरी व मानसिंग, गुजरी व फुलवा या कलावंतांच्या संगीतांतील शर्यती पाहतांना रसिक वाचकाचें मस्तक धुंद झाल्याशिवाय रहात नाहीं.

